# प्रास्ताविक

कै. शिवराम महादेव परांजपे यांची ' विंध्याचल ' ही कादंबरी सन १९१९ ते १९२४ या कालांत ' चित्रमय-जगत् 'मध्यें क्रमशः प्रसिद्ध झाली. ती क्रमशः प्रसिद्ध होत असतांनाच तिनें वाचकांना चटका लाविला होता. त्यानंतर पुस्तकरूपानें तिच्या दोन आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या व लगेच त्या संपल्याहि. गेलीं अनेक वर्षें ही कादंबरी अजिबात मिळतच नसे; आणि अनेकांची मागणी असूनहि युद्धजन्य कागदाच्या टंचाईमुळें आम्ही ती कादंबरी प्रसिद्ध करूं शकलों नव्हतों. आतां परिस्थिति निवळतांच आम्ही ही तिसरी आवृत्ति प्रसिद्ध करीत आहोंत.

प्रकाशक

अंतःकरणांतील निबिड अंधकारामध्यें वाट काढूं शकत नव्हता. बाहेरची थंडी पुष्कळ नाहींशी झालेली होती; तरी पण याच्या हृदयांतील भीतीची धडधड अद्यापि यत्किंचितहि कमी झाली नव्हती. इतक्या लवकर उजाडलेलें पाहून त्याच्या मनाला अतिशय वाईट वाटलें. रात्रीनें आपल्यावर घातलेलें काळोखाचें पांघरूण ती इतक्यांत आणि अशा रीतीनें एकाएकी काढून घेईल ही त्याला कल्पनाहि नव्हती. एखादी आई अल्प वयामध्यें मरण पावून आपल्या मुलाला उघडें टाकून जाते, त्याप्रमाणें त्याला वाईट वाटूं लागलें. इतक्या लवकर रात्र कशी संपली, याबद्दल तो मोठ्या बुचकळ्यात पडला. त्यानें खालच्या गांवांतील पहाटेच्या पहिल्या प्रहरीं ओरडणाऱ्या कोंबड्यांचे आवाज ऐकून अजून फार वेळ झाला नव्हता. आणि पहाटेस डोंगरांतून चरावयाकरतां सोडलेल्या जनावरांची चाहूल त्याच्या कानावर येऊं लागूनही फार वेळ लोटला नव्हता. त्यामुळें ही उरलेली रात्र एकदम असा विश्वासघात करून आपल्याला अकस्मात रीतीनें उजेडाच्या स्वाधीन करील, ही त्याला कल्पना नव्हती. त्यामुळें तो अगदीं कावराबावरा होऊन गेलेला होता. आणि पावसाळ्याच्या दिवसांतील सूर्य आपल्या तोंडांभोंवतीं दाट ढगांची घोंगडी जास्त जास्त ओढून घेऊन ज्याप्रमाणें आपलें तोंड झांकून घेण्याचा प्रयत्न करीत असतो, त्याप्रमाणें तो मनुष्य आपल्या अंगावरील पायघोळ, काळ्या कपड्याचा बुरखा आपल्याला वाट दिसली नाहीं तरी हरकत नाहीं, पण आपलें तोंड दुसऱ्या कोणाला दिसूं नये, अशा रीतीनें आपल्या तोंडावर अधिक अधिक ओढून घेत होता. आणि अशा रीतीनें एक काळ्या कपड्याचें झाडच त्या डोंगरांतून वर चढत आहे कीं काय, असा भास होत होता. त्यानें याप्रमाणें आपलें सर्व अंग जरी गुरफटून घेतलें होतें, तरी त्याचे कान मात्र त्या काळ्या बुरख्याच्या जुलमाखालीं दबून राहण्याला बिलकूल कबूल नव्हते. आपल्या पाठीमागून कोणी येत आहे कीं काय, याबद्दलची चाहूल घेण्याचें काम ते कान साऱ्या रात्रभर डोळ्यांना जेव्हां कांहीं दिसत नव्हतें, अशा वेळीं फार बारकाईनें करीत होते. आणि तेंच काम करण्याकडे अजूनहि त्यांचें सारें लक्ष लागून गेलेलें होतें. ते कान त्याच्या बुरख्याच्या आंत अडकून न राहतां आसपासच्या प्रांतांत बाहेर चोहोंकडे वावरून मोठ्या दक्षतेनें आपली कामगिरी बजावीत होते.

अशा रीतीनें चालतां चालतां तो त्या पर्वतांतील ज्या डोंगरावर चढत होता त्या डोंगराच्या माथ्यावर अखेरीस येऊन पोंचला. आणि नंतर त्यानें तेथील एका

मोठ्या दगडाच्या आड आश्रय घेऊन आपल्या तोंडावरचा बुरखा थोडा बाजूला सारला आणि तो ज्या वाटेनें वर चढून आला होता, त्या वाटेनें त्यानें आपली दृष्टि खोलपर्यंत खालीं उतरविली. परंतु त्या दृष्टीच्या तपासणींत त्याला कोणीही आढळलें नाहीं. तेव्हां त्याला थोडा धीर आला व आपल्या पाठीमागून कोणीही आलेलें नाहीं, व आपण कोणीकडे आलों हें कोणालाही कळलेलें नाहीं, अशी त्याला खात्री वाटून त्यानें निर्धास्तपणाचा एक मोठा थोरला उसासा टाकला. नंतर ज्या मोठ्या दगडाच्या आड उभें राहून त्यानें त्या पश्चिमेकडच्या उतरणीचा प्रदेश हेरला होता, त्या दगडाकडे पाठ करून त्यानें आपलें तोंड पूर्वेकडे वळविलें तों त्याला त्या क्षणीं तेथें किती सुंदर देखावा दिसला! आपल्या सहस्र करांनीं आपलें स्वागत करण्याकरितां प्रत्यक्ष सूर्य आपल्यापुढें उभा असलेला त्यानें पाहिला! सूर्याचें सर्व बिंब त्या वेळीं क्षितिजावर आलेलें होतें; प्रवासाला निघणाऱ्या आपल्या प्रिय पुत्राच्या अंगावरील शेल्याचें टोक तरी निदान त्याची आई पुत्रवात्सल्यानें धरून ठेविते, त्याप्रमाणें त्याच्या रथाचीं मागचीं चाकें फार तर पृथ्वीनें आपल्यापासून अजून वियुक्त होऊं दिलेलीं नसतील! आपल्या जननीच्या उदरांतून नवीन जन्मास आलेल्या अगदीं कोंवळ्या लुसलुशीत गर्भपिंडाप्रमाणें तें अचिरोद्गत सूर्यमंडळ आरक्त, गोंडस आणि प्रेमळ दिसत होतें. तें पाहून त्याच्या मनामध्ये आनंदाची भरती आली. आणि त्याच्या तोंडून पुढील उद्गार निघाले : "या सूर्याचें हें तेज किती तरी आनंद देत आहे! हा सूर्य सगळ्या वाटसरूंना वाट दाखविण्याकरितां उगवला आहे. त्याप्रमाणें तो मलाही माझी पुढील वाट खात्रीनें दाखवील. या ठिकाणीं, या अरण्यांत, या सूर्याच्या छत्राखालीं, जिकडे तिकडे स्वतंत्रता आणि राजरोसपणा पसरलेला दिसत आहे. येथें प्रत्येक जण स्वतंत्र आहे. कोणाला येथें कोणताही निर्बंध नाहीं. त्याचप्रमाणें मीही येथें कांहीं वेळ स्वतंत्रपणानें राहूं शकेन. हे पहा येथील वारे! यांना जिकडे वाटेल तिकडे ते वाहत आहेत. हे पक्षी या साऱ्या मोकळ्या आकाशामध्यें पाहिजे तिकडे उडत आहेत. हे येथील ओढे या अरण्यांतून सरळ, वांकडे तिकडे, वाटतील तसे वाहत चालले आहेत. आणि हीं येथील झाडें आणि या वेली वाटतील तिकडे आपल्या शाखा आणि पल्लव पसरवीत आहेत. यांचें आयुष्य येथें किती सुखानें जात असेल! यांच्या सहवासामध्यें मी येथेंच कोठें तरी कांहीं दिवस राहिलों, तर माझ्या मनाचें दुःख कदाचित् विसरून जाऊन मलाही आपले कांहीं दिवस यांच्यासारखेच येथें

घालवितां येतील. हे वनवृक्षांनों, तुमच्या या रमणीय नगरामध्यें राहण्याकरितां हा एक नवीन नागरिक तुमच्यामध्यें आला आहे. याला तुम्ही आश्रय द्या!" असें म्हणून त्यानें तेथें कोठें तरी निवाऱ्याची जागा पाहून राहण्याचा निश्चय केला. अशी सोईची जागा शोधण्याकरितां तो थोडा वेळ इकडे फिरत असतां स्वच्छ पाण्याच्या एका ओढ्याजवळ त्याला एक लहानशी गुहा दिसली, व त्या गुहेमध्यें राहण्याचा त्यानें बेत केला. गुहेंत कोणी कदाचित क्रूर श्वापद वगैरे राहत असेल अशी त्याला शंका आली; परंतु माणसाइतकें क्रूर श्वापद कोणतेंही असूं शकणार नाहीं, अशा वैतागाच्या बुद्धीनें त्यानें ती गुहेची जागा स्वतःच्या राहण्याकरितां पसंत केली.



: :

# रांग दुसरी

पूर्वी वर्णन केलेल्या ठिकाणापासून पश्चिमेच्या दिशेला सुमारें दहा बारा कोसांच्या अंतरावर, विंध्यपर्वतांतील एका निबिड अरण्याच्या भागामध्यें, आदल्या दिवशीं संध्याकाळीं जी एक कांहीं लोकांची छावणी पडलेली होती, त्या छावणी-मध्यें दुसऱ्या दिवशीं पहाटेच्या हजेरीच्या वेळीं हजेरी झाल्यानंतर अतिशय मोठी गडबड उडून गेली होती. रोजच्या शिरस्त्याप्रमाणें पहाटेचें शिंग वाजलें, आणि नंतर कांहीं वेळानें त्या छावणींतलि सर्व लोक हजेरीकरितां त्या झाडांच्या मध्य-भागीं थोड्याशा उघड्या असलेल्या एका जागेमध्यें येऊन ओळीनें उभे राहिले; व सर्वांची नांवनिशीवार हजेरी सुरू झाली, तेव्हां बाकीची सर्व हजेरी बरोबर जमली. फक्त एक नांव चुकूं लागलें. म्हणून फिरून हजेरी घेण्यांत आली. आणि फिरून सर्व लोक मोजण्यांत आले. तरी पण एक कमी तो कमीच. सगळ्यांच्या नांवांना ज्यांनीं त्यांनीं जबाब दिले. परंतु भग्याखानाच्या नांवाला कोणी जबाब देईना. तेव्हां भग्याखान आहे कोठें आणि तो जबाब कां देत नाहीं, याबद्दल शोध सुरू झाला. तो अजून जागाच झाला नाहीं काय, त्यानें शिंग वाजलेलें ऐकलें नाहीं काय, तो निजला होता कोठें, वगैरे अनेक प्रश्न उत्पन्न झाले. तो बहुतकरून कोठें तरी निजलेला असावा, आणि त्यानें शिंगाचा आवाज झोपेंत न ऐकल्यामुळें तो उठला नसावा, असेंच बहुतेकांना वाटलें; आणि म्हणून तो कोठें आसपास निजला असेल, असें वाटून त्याला पाहण्याकरितां आणि उठविण्याकरितां कांहीं लोक गेले. त्यांनीं बराच तपास केला; परंतु भग्याखान त्यांना कोठें आढळला नाहीं. भग्या-खानाचा काळा भोर रंगाचा, शेपटी कापलेला आणि पाठीवर वार लागलेला घोडा मात्र एका झाडाला बांधलेला आढळला. त्याच झाडाखालीं भग्याखान रात्रीं निजावयास गेलेला मीं पाहिला होता, अशी माहिती त्यांतीलच एकानें सांगितली.

म्हणून तो घोडा ज्या झाडाच्या बुंध्याला बांधलेला होता, त्याच्या आसपास त्यांनीं पुष्कळ ठिकाणीं आणि पुष्कळ वेळ शोधून पाहिलें; परंतु भग्याखानाचा कोठेंच कांहीं मागमूस मिळेना. घोडा बांधलेल्या झाडाच्या जवळच एके ठिकाणीं उशाकरितां घेतलेला दगड आणि अंगाखालीं अंथरण्याकरितां पसरलेले झाडाचे कांहीं टहाळे अशा खुणा त्यांच्या नजरेस पडल्या. त्यावरून भग्याखान येथें निजलेला असावा एवढें त्यांनीं निश्चित केलें; परंतु तेथून पुढें त्याचें काय झालें असावें, याची कोणालाच कांहीं कल्पना येईना, आणि त्यामुळें अनेकांचे अनेक तर्क सुरू झाले.

अरण्यांतील आयुष्य म्हणजे केवळ सुळावरची पोळी. तेथें पावलोपावलीं आणि क्षणोक्षणीं एका जीवावर हजार संकटें! ऊन, पाऊस, थंडी, हीं तर आहेतच; पण याशिवाय रानांत राहणाऱ्यांवर दुसरीं काय थोडीं संकटें आहेत! त्या बिचाऱ्यांना कोठें घर ना दार. जेथें ते उतरतील तें त्यांचें घर आणि जेथें ते निजतील, तो त्यांचा बिछाना! डोंगरांतून आणि पहाडांतून प्रवास करतांना केव्हां कोठें काय दुखापत होईल, याचाही नेम नसतो. कांटेकुटे आणि खांचखळगे यांच्यापासून होणाऱ्या दुखापतींची तर खिजगणतीच नसते. एखाद्या लहानशा दगडावरून चालणाराचा पाय घसरला, तर त्याचे हातपाय मुरगळण्याची आणि मोडण्याची किती तरी भीति असते! आणि एखाद्या खोलवर तुटलेल्या कड्यावरून चालतांना जर डोळे फिरले आणि पाऊल चुकलें, तर कड्याच्या खालीं त्याचें थडगें त्याला आपल्या पोटांत घेण्याकरितां 'आ' पसरून तयारच असतें! शिवाय विंचू, इंगळ्या, काळे विषारी साप, इत्यादि प्राणी एखाद्या विश्वासघातकी शत्रू-प्रमाणें हा कोठें सांपडेल, आणि याला कोठें दंश करूं, अशी जणूं काय वाट पहातच प्रत्येक दगडाखालीं किंवा प्रत्येक फटींतून टपून बसलेले असतात ते निराळेच! परंतु या झांकलेल्या शत्रूंशिवाय मनुष्याच्या जीवाचे दुसरे उघड उघड शत्रु रानांत थोडेथोडके असतात असें नाहीं. रानडुक्कर समोरून धांवत येऊन केव्हां मुसंडी मारील, किंवा एखादा तरस, चित्ता, किंवा बिबळ्या वाघ कोणत्या जाळींतून गुरगुरत येऊन अंगावर उडी टाकील, याचा अरण्यांत कांहीं एक नेम नसतो!

अशा दुःखमय आणि संकटपूर्ण अरण्यवासामध्यें एखादा मनुष्य नाहींसा झाला किंवा त्याच्या जीवाला कांहीं अपाय झाला, तर ती गोष्ट मोठी आश्चर्याची आहे, असें नव्हे. इतक्या संकटांतून हे लोक कसे सुरक्षित राहात असतील, हीच

उलट एक अतिशय आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट आहे. परंतु त्या चोरांना आणि ठगांना त्याचें कांहीं विशेष महत्त्व वाटत नसे. त्यांच्यापैकीं एकानें अशी कल्पना काढली कीं, भग्याखान निजला असतांना बहुतकरून त्याला रात्रीं वाघानें उचलून नेऊन खाऊन टाकलें असावें. ही कल्पना अगदींच अशक्य आणि टाकाऊ आहे, असें कांहीं कोणाला वाटलें नाहीं. म्हणून त्यांच्या त्या टोळीपैकीं कांहीं लोक त्या दिशेनें त्याचा शोध करूं लागले, व कांहीं थोडया दिवसांतच त्यांना जवळच्या डोंगराच्या एका कपारीमध्यें कांहीं हाडें आढळलीं. तेव्हां तर भग्याखानाला वाघानें येथपर्यंत ओढून आणून त्याला येथें खाल्लें असलें पाहिजे, असें त्यांनीं नक्की ठरविलें व बाकीच्यांची खात्री पटविण्याकरितां त्यांतील कांहीं लहान लहान हाडेंही आपल्याबरोबर गोळा करून घेऊन ते परत आले. त्या टोळीच्या जमादारानें तीं हाडें हातांत घेऊन बारकाईनें तपासून पाहिलीं, व नाक मुरडीत मुरडीत तीं त्यानें खालीं ठेवलीं. त्याच्या चर्येवरून त्या कल्पनेनें त्याची खात्री झालेली दिसत नव्हती. त्याच्या मनामध्यें आणखी कांहीं तरी शंका असावी, असें त्याच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें. तो म्हणाला:—

"हीं हाडें भग्याखानाचीं नसतील असें नाहीं; कदाचित् तीं त्याचीं असतीलही. पण कदाचित् तीं त्याचीं नसतील, असाही तितकाच संभव आहे; कारण, हीं हाडें वाघानें मारलेल्या दुसऱ्या एखाद्या जनावराचीं नसतील कशावरून? म्हणून संशयाला जागा राहते. तशी जागा या कामीं राहतां कामा नये. यासाठीं भग्याखानाचा नक्की छडा लावला पाहिजे. त्याला आपल्या पुष्कळ गुप्त गोष्टी माहीत आहेत. आणि आपण त्याच्या मंडळींना लुटलें, आणि त्यांचेही पुढें हालहाल केले, या गोष्टी तो विसरला नसेल; आणि त्या सगळ्याचा सूड उगविण्याचीही कदाचित् त्याच्या मनांत इच्छा असेल. आतांपर्यंत तो जरी आपल्याशीं कधीं फारसा बेइमानीनें वागला नाहीं, तरी तो आपल्यामध्यें राहण्याला खुषी आहे, असें त्याच्या चेहऱ्यावरून कधींहि दिसून येत नव्हतें. तो आपल्याशीं नाखूष राजनिष्ठ असे, म्हणून मला त्याच्याबद्दल फार संशय येतो. आणि त्याला वाघानें खाल्लें असें तुम्हांला वाटत असतांना, कदाचित तो आपल्यामधून पळून गेला असेल अशी मला भीति वाटत आहे. त्याला खरोखरच वाघानें खाल्लें असलें, तर ती एका दृष्टीनें निखालस मोठ्या आनंदाची गोष्ट होय. परंतु त्याला वाघानें खाल्लें नसेल, तर मात्र त्यासारखी धोक्याची

गोष्ट दुसरी कोणतीच नाहीं. आपल्यांतील आपला एकादा सोबती मेला किंवा त्याला वाघानें खाल्लें, तर त्याबद्दल वाईट वाटून रडत बसण्याच्या स्थितीपलीकडे आपण दरवडेखोर लोक कधींच गेलेले आहों. आपण जेव्हां पहिल्यानें आपलीं मनें दगडाचीं बनवितों, तेव्हांच या डोंगरांतील दगडांच्या सिंहासनावर बसून या वनचे राजे म्हणवून घेण्याला आपण पात्र होतों. आपण मरणाची किंमत बाळगीनासे होतों तेव्हांच आपल्या जिवंतपणाला सुरवात होते. म्हणून मी म्हणतों कीं, भय्याखान मेला असला, तर त्याचें आपणांला दुःख नाहीं. पण तो जिवंत असला, तर मात्र त्याचें आपल्याला फार दुःख आहे. त्याला वाघानें खाल्लें असलें तर तो सुटला आणि आम्हीहि सुटलों. पण तो जर का आपल्यांतून पळून गेला असेल, आणि त्याला जर का वाघानें खरोखर खाल्लें नसेल, तर मात्र कठिण आहे! कारण, मग कदाचित तोच वाघ होऊन आपल्याला खावयाला आल्यावांचून कधींहि राहणार नाहीं. तो जर पळून जाऊन फितुर झाला, तर मग आपली काय वाट होईल? या जगामध्यें आपले मित्र थोडे आणि शत्रु पुष्कळ अशी स्थिति आहे. आमचा धंदा बरा चाललेला कोणाच्यानेंहि पाहावत नाहीं. लोकांची संपत्ति मात्र आम्हीं खुशाल वाढूं दिली पाहिजे. आणि आमची संपत्ति वाढविण्याला मात्र यांनीं कोणीहि यत्किंचितसुद्धां मदत करूं नये, अशी या जगाची स्थिति आहे. आम्ही मात्र तेवढे ठग, आणि यांनीं दिवसाढवळ्या कितीहि लोकांना ठकविलें, तरी हे साव आणि शहाजोग, असा या जगाचा उलटा न्याय आहे! अशा या विचारसरणीला बळी पडल्यामुळें आपल्या स्वतःच्याखेरीज बाकीचे सर्व लोक आपले शत्रु झालेले आहेत. आपल्यासारख्यांच्या टोळ्यांचा नायनाट करण्याचे त्यांचे प्रयत्न चोहोंकडे जारीनें चाललेले आहेत. अशा वेळीं आपल्यामधून फुटून जाऊन जर कोणी फितूर होऊं लागला, तर तो जेथें सांपडेल तेथें त्याला ठार करून टाकणें याच्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. फितुरीसारखें या साऱ्या जंगली विषारी औषधांमध्यें दुसरें जालीम विष नाहीं. फितुरीसारखा या साऱ्या जंगली डोंगरांत जहरी साप नाहीं. तो जेथें आढळेल तेथें त्याला पायाखालीं ठेंचूनच टाकलें पाहिजे. आपलीं ठग लोकांचीं जीं दारूचीं कोठारें ठिकठिकाणीं भरलेलीं आहेत, त्यांत जर ही फितुरीची ठिणगी आपण पडूं दिली आणि पेटूं दिली, तर ती आपला केव्हां भडका उडवील याचा नेम नाहीं. याकरितां ह्या फितुरी भय्याखान आपला भडका उडवून देण्याच्या आधीं आपणच

त्याचा भडका उडवून दिला पाहिजे ! त्याला वाघानें खाल्लें नसलें, तर आपण त्याचे वाघ होऊन त्याला खाऊन टाकलें पाहिजे ! ही हयगय करण्यासारखी गोष्ट नव्हे. मला याचा चांगला तपास लावला पाहिजे. "

हे उद्गार त्याच्या तोंडून निघत होते, त्या वेळीं रागानें त्याचा अगदीं जळफळाट होऊन गेला होता. त्याचे डोळे लाल झालेले होते. आणि त्याचे केस पिंजारलेले होते, व त्या रागाच्या आवेशांतच भय्याखानाचा पुरा छडा काढण्याच्या उद्योगाला लागण्याचा त्यानें निश्चय केला.

• • •

## : : रांग तिसरी

पूर्वी सांगितलेल्या टोळीच्या या नायकाचें नांव करीमबक्ष असें होतें. हें त्याचें मुसलमानी नांव होतें. त्याचे जसे पुष्कळ निरनिराळे पोषाक होते, त्याचप्रमाणें त्याचीं पुष्कळ निरनिराळीं नांवेंही होतीं. त्याच्या धंद्याच्या जरूरीसाठीं त्याला निरनिराळ्या प्रसंगीं जशी बतावणी करावयाची असेल, त्याप्रमाणें त्याला निरनिराळीं सोंगें घ्यावीं लागत असत; आणि म्हणून त्या त्या सोंगाकरितां त्यानें निरनिराळे पोषाख आणि निरनिराळीं नांवें तयार करून ठेविलेलीं होतीं. निरनिराळ्या तऱ्हेचे पोषाख आणि नांवें त्यानें घेतलीं, तर त्या त्या सोंगाची त्याला नीट उठावणी करतां यावी, म्हणून त्यानें पुष्कळ भाषाहि शिकून ठेविलेल्या होत्या. जसा देश तसा वेष, आणि जसा वेष तशी भाषा, या गोष्टी म्हणजे केवळ त्याच्या हातचा मळ होता. त्याला त्या वेळच्या प्रचलित स्थानिक भाषांपैकीं इतक्या भाषा येत असत कीं, त्यांवरून हल्लींच्या काळांतील अनेकभाषाकोविदत्वाच्या पदवीच्या एखाद्या परीक्षेला त्याला बसावयाचें असतें, तर त्यांत तो खास उत्तीर्ण झाला असता. आणि दुसऱ्या लोकांच्या भाषेचें ज्ञान आणि आपल्या लोकांच्या कल्याणसाधनाची धूर्तता या गुणांवर, हल्लीं जसे परदेशांतील वकील नेमले जातात, तसे जर त्या वेळीं नेमले जावयाचे असते, तर त्या कामांत पहिल्यानें याची नेमणूक करण्याइतकी याची शिताफी होती. शिवाय, त्या जुन्या काळच्या चोरांच्या नायकांमध्यें हल्लींच्या नव्या काळचा एक मोठा सद्गुण होता. तो असा कीं, त्याला जात्यभिमान बिलकूल नव्हता. कारण, त्यानें आपल्या आयुष्याच्या क्रमामध्यें इतक्या वेळां आपल्या जाती बदललेल्या होत्या कीं, आपली मूळची आणि खरी जात कोणती, याबद्दल त्याला वास्तविकपणेंच स्मरण राहिलेलें नव्हतें. जशी वेश्यांना पतीचें नांव सांगण्याची मारामार, किंवा त्यांच्या

चिरंजीवांना वडिलांचें नांव माहीत असण्याची मुष्कील, त्याप्रमाणें बिचाऱ्या करीमबक्षाची जात सांगण्याच्या कामांत पंचाईत झालेली होती. त्यानें निरनिराळ्या प्रसंगीं अनेक निरनिराळ्या जातींचा फायदा घेतलेला होता आणि तोटाही सोशिलेला होता. त्यामुळें एखाद्या जातिबंधविनिर्मुक्त वेदांत्याप्रमाणें तो प्रत्येक जातीचा होता किंवा कोणत्याच जातीचा नव्हता, अशी त्याची विश्वव्यापक स्थिति झालेली होती. जातबीत कांहीं असलीच, तर ती याच्या आईबापांना फार तर असेल; परंतु बापाच्या जातीसंबंधानेंही फारशी जुनी माहिती त्याला उपलब्ध नसल्याकारणानें, त्याच्या आईलाच जी कांहीं थोडीशी जात कोणी शिल्लक ठेविलेली असेल, तेवढीच काय ती तिची जात होय. पण त्याच्या पलीकडे याला एका जातीशीं असा कायमचा संबंध ठेवणें शक्यच नव्हतें. पठाण, रोहिला, पंजाबी, मुलतानी, भाट, चारण, रजपूत, ठाकूर, कंजारी, वंजारी, कैकाडी, कोल्हाटी, सुतार, सोनार, महार, मांग, धेड, चांभार, भिल्ल, कोळी, अशा हिंदुस्थानांतील असंख्य जातींपैकीं त्याला कोणत्या जातीचें केव्हां बनावें लागे, याचा कांहीं नेम नव्हता!

कादंबऱ्यांच्या लेखकांमध्यें असा एक कविसंप्रदाय पडून गेलेला आहे कीं, कोणतेंही नवीन पात्र कथानकाच्या रंगभूमीवर आणावयाचें झालें, तर त्याची जातगोत, रूपरंग, वगैरेबद्दल कांहीं माहिती आधीं देऊन ठेवावी. परंतु करीमबक्षाच्या बाबतींत हे कविसंप्रदाय पाळणें बरेंच कठिणपणाचें आहे. त्याच्या जातीच्या बाबतीमधील प्रयत्न कसा निष्फळ झाला, हें वर दिसून आलेंच आहे. तशीच त्याच्या इतर बाबतींतीलही स्थिति होती. त्याचें वय तारुण्याचें होतें असें म्हणावयाला जावें, तर तो एखादे वेळीं म्हाताऱ्या माणसाच्या स्वरूपामध्यें इतका हुबेहूब दिसत असे कीं, करीमबक्ष तरणा आहे अशी बातमी देणाऱ्या जासुदाच्या गळ्यामध्यें खोटी बातमी दिल्याची घोरपड आल्यावांचून कधीं राहावयाची नाहींच. दाढीमिशा काढणें किंवा लावणें ह्याचे पोरखेळ लहान लहान पोरें देखील हल्लींच्या नाटकांतून करितात; तसलीं कामें करीमबक्ष वरच्यावर करीत असे, हें सांगण्यांत तर करीमबक्षाची कांहींच पौढी नाहीं. त्याचप्रमाणें आपल्या त्वचेचा रंग बदलण्याकरितां रानांतील कांहीं झाडपाल्यांच्या रसांचा उपयोग करण्याची कलाही त्याला चांगलीच साधलेली होती; त्यामुळें ठगीचीं आणि दरवडेखोरपणाचीं भयंकर कृत्यें निर्भयपणें करण्याला त्याला कधीं कसलीही दिक्कत वाटत नसे. या सगळ्या

विद्या त्यानें आपल्या टोळींतील आपल्या हाताखालच्याही कित्येक लोकांना शिकविल्या होत्या. यांपैकीं गंगाप्रसाद हा त्या टोळींतील एक चांगला वरच्या दर्जाचा चोर होता. भग्याखान पळून गेला असला, तरी त्याचें एवढेसें महत्त्व नाहीं, असें त्याचें मत होतें. म्हणून त्या बाबतीसंबंधानें तो करीमबक्षाला म्हणालाः—

" भग्याखान पळून गेला असें जरी खरें आहे म्हणून मानलें, तरी त्याबद्दल तुला इतकें संतापावयाला काय झालें आहे? भग्याखानाला नवीनच आपण आपल्या टोळीमध्यें घेतलें होतें. आणि तो चोरीचें, खुनाचें किंवा दरवड्याचें काम मनापासून कधींच करीत नसे. मला वाटतें, आपल्या टोळींत त्याला घेतल्यापासून त्यानें कधीं एक खून केला असेल तर शपथ! तो पापाच्या कामांत भित्रा असावा असा मला त्याच्याबद्दल संशय येऊं लागला होता. तो आपल्यामध्यें आणखी कितीही दिवस राहिला असता, तरी तो कधींही चांगला चोर निपजला नसता. दगड तो दगड. त्याला कितीही घांसलें किंवा धुतलें, म्हणून तो काय देव होणार आहे? तो नुसता दिसावयाला धष्टपुष्ट होता. पण एखाद्याला मारून लुटून ये म्हटलें, तर असल्या कामाला तो अगदींच कुचकामाचा. आणि असले नेभळट लोक हे उजळमाथ्याचीं आणि राजरोसपणाचीं बावळट कामें करण्यालाच जन्मास आलेले! यांच्या हातून खरी मर्दुमकी आणि खरी शिपाईगिरी काय व्हावयाची आहे! तेव्हां मी म्हणतों, असला एखादा भिकार पोरगा आपल्यांतून पळून गेला तर गेला! त्याची एवढी फिकीर कशाला पाहिजे? त्याच्या कपाळीं नांवलौकिक मिळविण्याचें नाहीं, असें म्हणून तूं स्वस्थ बैस!"

" गंगाप्रसाद," करीमबक्ष खिन्न मुद्रेनें म्हणाला, " तूं अगदीं चुकतो आहेस. आपल्या टोळींतील एक इसम कमी झाला म्हणून का मला संताप येत आहे? तो एक कमी झाला, म्हणून आपल्या टोळीचें काय कमी झालें आहे? अरे, एकटा तूं किंवा मी एवढेच घेतले, तरी आपण एकेकटे पन्नास पन्नास इसमांना भारी आहोंत! तेव्हां तो एक गेल्याची काय फिकीर? आणि शिवाय तो एक गेला, तर त्याच्या जागीं आपल्या टोळीमध्यें येण्याला दुसरे शंभर चोर तयार आहेत! एकेकटे बिनआधारी चोऱ्या करणारे उठाईगिर, भामटे आणि भुरटे साऱ्या मुलुख-भर काय थोडे आहेत? ते आपल्यासारख्या ह्या राजमान्य ठगांच्या टोळ्यांतून येण्यासाठीं हातींपायीं पडून पाठीस लागत असतात. त्यांना नको नको म्हणतां

म्हणतां मला पुरेवाट होते. तेव्हां एक भय्याखान गेल्याबद्दल मला मुळींच वाईट वाटत नाहीं. शिवाय, आपल्या टोळीसारख्या आपल्या भाईबंदांच्या ठगांच्या टोळ्या या माळव्यामध्यें आणि या विंध्याद्रीच्या डोंगरामध्यें काय थोड्या आहेत? आणि त्या काय आपल्याला मदत करणार नाहींत? सारांश, एका माणसानें आपली मदत कमी झाल्याचें दुःख नाहीं."

"तर मग तुला एवढें दुःख कशासाठीं होत आहे?" हुक्का तयार करून तो करीमबक्षापुढें करीत करीत गंगाप्रसादानें विचारिलें, "मालिक, मला तर याच्या-शिवाय दुसरें कांहीं योग्य कारण दिसत नाहीं. तो फितुरी करील ही जी तुझ्या मनामध्यें भीति आहे, ती तर अगदींच निरर्थक आहे! तो कसला बावळा! तो काय फितुरी करितो? ज्याच्या मनांत एकदा पापपुण्याची धडकी भरली, त्याच्या हातून फितुरी तरी कसली होणार? खून हें पातक म्हणून एखाद्याला मारण्याला जो धजत नाहीं, त्याला फितुरी हें देखील एक विश्वासघाताचें पातक म्हणूनच वाटणार, आणि मग तें पातक करण्याला तरी त्याला धारिष्ट कोठून होणार? तूं खात्री ठेव कीं, तो बावळट भय्याखान फितुरी करूं शकणार नाहीं!"

हुक्का जवळ घेऊन ओढतांना आणि त्यांतील पाणी गुडगुड गुडगुड वाजत असतांना त्यांतूनच मध्यें करीमबक्षानें गंगाप्रसादचा हात धरून त्याला म्हटलें, "गंगाप्रसाद, भय्याखान फितुरी कां करूं शकणार नाहीं, याबद्दलचीं तुझीं कारणें अगदीं नवीन आहेत आणि ती मला थोडीशीं पटतातही. पण तूं एक गोष्ट चुकत आहेस. भय्याखान बावळा असेल; पण या जगांत बाकीचे जे शेकडों हरामखोर लोक पसरलेले आहेत, ते बावळे नाहींत ना! बिचाऱ्या भय्याखानाला पापपुण्याची चाड असेल; पण ती चाड या साव म्हणून मिरविणाऱ्या लोकांना कोठें आहे? गंगाप्रसाद, तुझ्यासारख्या साध्या आणि सरळ स्वभावाच्या ठगाला देखील फितुरी हें एक वेळ विश्वासघाताचें पातक म्हणून वाटत असेल; पण हा जो आपल्या-भोंवतीं या साऱ्या जगामधील शिष्ट आणि संभावित लोकांचा गराडा पडलेला आहे, त्यांना कोठें इतकी तुझ्यासारखी सदसद्विवेकबुद्धि आहे? गंगाप्रसाद, आपण एकाद्याला धोतऱ्याचें बीं घालून त्याच्या खिशांतलि पैसे काढून घेतों, म्हणून आपण ठग आणि चोर म्हटले जातों; पण हे लोक धतुऱ्याच्या बियांवांचूनही एखाद्याचें मन भुलवून आणि गुंगवून सोडतात, आणि त्याच्या मनाच्या खिशांतून हळूच

त्याला न कळत त्याच्या गुप्त रहस्याचें सारें द्रव्य बाहेर काढून घेतात! यांना काय नांव द्यावयाचें ? ”

“ करीमबक्ष, ” गंगाप्रसाद शांतपणानें म्हणाला, “ जाऊं दे, त्यांच्या-आपल्या-मधील हा वैरभाव जुनापुराणाच आहे. त्यांनीं आपल्या खिशांतील पैसे आम्हांला काढून घेऊं दिले, म्हणजे मग त्यांनीं एखाद्या बावळटाच्या मनांतून एखादी गुप्त गोष्ट काढून घेतली, तर त्याबद्दल मी नाहीं त्या क्षुद्र प्राण्यांच्या विरुद्ध मोठीशी तक्रार करणार! आणि चोर भिंत फोडून चोरी करून गेल्यानंतर भिंतीच्या भोकाची लांबी-रुंदी मोजून कोणी आपल्या मनाची करमणूक करून घेत असल्यास तुझी तरी त्याच्याबद्दल इतकी तक्रार कां असावी ? ”

“ इतकी तक्रार कां असावी! ” हुक्का पिण्याचें थांबवून करीमबक्ष म्हणाला, “ गंगाप्रसाद, या फितुरीचें महत्त्व तुझ्या लक्षांत आलें नाहीं, म्हणून तूं असें म्हणत आहेस. आपण विंध्याद्रीच्या पहाडांतील ज्या या ठिकाणीं बसलों आहों, त्याच्या सभोंवर तूं आपली दृष्टि फेंक. हीं पहा, लहान लहान, संस्थानांचीं जणू काय जाळींच आपल्याभोंवतीं पसरलेलीं आहेत. आपल्यासारख्या वाघांना ह्या जाळयांमध्यें धरण्याचा यांचा प्रयत्न आहे. आणि त्यासाठीं यांची एकसारखी धडपड चाललेली आहे. हे पहा, भोपाळवाले, बुंदीवाले, कोटावाले, टोंकवाले, निमचवाले, इंदूरवाले, रतलामवाले, मंदोसरवाले, अजमीरवाले, जयपूरवाले, उदेपूर-वाले, अलवारवाले, जेसलमीरवाले, ग्वालेरवाले, भरतपूरवाले, धोलपूरवाले, रामपूर-वाले, सागरवाले! असे हे सगळे संस्थानवाले आपणा ठग लोकांना ठकविण्या-करितां डोळ्यांत तेल घालून बसलेले आहेत! आणि त्यांना वाटत आहे कीं, आम्हां ठग लोकांचा नायनाट केला, म्हणजे जगांतील सगळे ठग नाहींसे झाले! ”

“ करीमबक्ष, ” गंगाप्रसाद धीर न खचतां म्हणाला, “ चोरांवर आतांपर्यंत दया करण्याइतका कोण दयाळू जन्मास आलेला आहे ? तरी पण जगाच्या प्रारंभा-पासून आतांपर्यंत या जगामध्यें चोर, ठग आणि दरवडेखोर, हे टिकाव धरून राहिलेलेच आहेत ना ? करीमबक्ष, कावळयाच्या शापानें कधीं ढोरें मेलीं आहेत काय ? तूं हें पक्कें लक्षांत ठेव कीं, खऱ्याला कधीं मरण नाहीं ! ”

“ पण आतां तें येणार असें मला दिसूं लागलें आहे! ” हुक्क्याचा धूर वातावरणामध्यें आपल्या तोंडांतून थोडा थोडा सोडीत सोडीत करीमबक्ष म्हणाला.

" असें कसें होईल ? " गंगाप्रसाद धार्मिक गहिवरानें भरून येऊन म्हणाला. " देवाच्या घरीं कांहीं न्याय आहे कीं नाहीं ? आपण नुकतीच जत्रा भरवून देवीचा कौल घेतला आहे ना ? मग असें कसें होईल ? "

" देवी विंध्यवासिनीच्या मनामध्यें काय असेल तें खरें ! " करीमबक्ष सचिंत मुद्रेनें म्हणाला, " पण या माणसांनीं तर आपल्यासारख्या वाघांना खाऊन टाकण्याचा घाट घातला आहे खरा ! त्यांनीं फार कडेकोट तयारी चालविली आहे. ह्या पहाडांत ठग लोकांच्या एकंदर किती टोळ्या आहेत, कोणत्या टोळींत किती लोक आहेत, त्यांचीं नांवें काय, ते मूळ कोणत्या गांवचे राहणारे, त्यांचीं बायकामुलें, भाईबंद कोण कुठें राहतात, ते कोणाला काय युक्त्यांनीं फसवितात, ते किती लूट मिळवितात, व ती कुठेंकुठें सांठवून किंवा पुरून ठेवितात वगैरेबद्दल त्यांनीं हल्लीं माहिती जमा करण्याचा विचार चालविला आहे. व अशी बातमी सांगणाराला आणि आम्हांला धरून देणाराला बक्षिसें देण्याचाही त्यांनीं बेत चालविला आहे असें मला कळलें आहे. अशा वेळीं हा भय्याखान आपल्यांतून पळून जाणें कांहीं इष्ट नाहीं. तो फितुर होऊन आपल्यांतलि सगळ्या बातम्या फोडील अशी मला भीति वाटत आहे. "

हें संभाषण चाललें असतां हुक्क्याच्यावरील चिलमींतील कांहीं कोळसे विझत चाललेले पाहून जवळ पडलेला चिमटा घेऊन त्यानें ते निखारे करीमबक्ष वर खालीं करून चेतवीत असतां गंगाप्रसाद त्याला म्हणाला, " ह्या भय्याखानाला आपण पहिल्यानें हातापायांत बिड्या घालून झाडाला बांधून ठेवीत होतों तेंच चांगलें होतें. "

" नाहीं ! " करीमबक्ष त्या चिलमींतील चेतणाऱ्या निखाऱ्यांप्रमाणें लाल होऊन म्हणाला. " त्याला आपण पहिल्यानेंच ठार मारून टाकलें असतें तर तें चांगलें झालें असतें ! सापाच्या पोरांना आपल्या घरांत घेऊन किंवा या निखाऱ्यांना आपल्या अंगाजवळ घेऊन त्यांची जोपासना करणें कधींहि चांगलें नाहीं. पण दया ही सगळी घाण करते ! मनुष्याला दया ही कधींही उपयोगी नाहीं. निदान ज्याला चोरीचा धंदा करावयाचा आहे त्यानें तर दुसऱ्यावर बिलकूल दया करतां कामा नये. आपल्या स्वतःवर निर्दय होण्यापेक्षां दुसऱ्यावर दया न करावी हेंच बरें ! पण तुम्हीं सगळ्यांनीं गळ घातली म्हणून मी त्याच्या

बांधलेल्या मुसक्या सोडल्या आणि त्याच्या हातापायांतील बिड्या काढून त्याला आपला साथीदार होण्याची बहुमानाची संधि दिली ! ”

“आणि त्याचे उपकार” गंगाप्रसाद म्हणाला, “ त्यानें फितुरी करून फेडले तर ही गोष्ट मनाला लागण्यासारखी आहे यांत कांहीं शंका नाहीं. याच्यापेक्षां आम्ही चोर पुष्कळ इमानी ! ”

“ माझ्या मनाला लागण्याचाच हा प्रश्न नाहीं. ” करीमबक्षानें उत्तर केलें. “या भय्याखानाबद्दल जी कांहीं तजवीज करावयाला पाहिजे आहे ती कांहीं माझ्या एकट्याच्याचकरतां नव्हे. तो फितुर झाला तर तो माझ्या एकट्याच्याच गळ्याला फांस लावील असें नाहीं. आपल्यावर केवढी मोठी जबाबदारी आहे, हें तुला माहीत नाहीं. सगळ्यांच्या जिवांची जोखीम आपल्यावर आहे. आपल्या टोळींतील आणि आपल्या टोळीच्या बाहेरील, पण आपल्या धंद्यांतलि ह्या सगळ्या हजारों लोकांचे जीव बचावण्याची जबाबदारी आपल्यावर आहे म्हणून इतक्या निरापराधी अनाथ प्राण्यांचे प्राण वांचविण्यासाठीं एका फितुरी आणि गुन्हेगार मनुष्याचा प्राण घेण्याला आपल्याला काय हरकत आहे ? ”

“ तो सांपडला मात्र पाहिजे. ” गंगाप्रसाद म्हणाला.

“ अरे तो जातो कोठें ? ” आपल्यापुढील हुक्का बाजूला सारून उठतां उठतां करीमबक्ष म्हणाला. “ मी स्वतः जाऊन त्याचा तपास काढतों आणि जेथें सांपडेल तेथें त्याचा मी खून पाडतों. गंगाप्रसाद, मी या कामगिरीवरून परत येईपर्यंत तूं आपल्या टोळीचा माझ्या पाठीमागें चांगला बंदोबस्त ठेव. किंवा या कामगिरीवर कोणीं कोणी जावयाचें हेंच आपण पहिल्यानें ठरवूं चला. ” असें म्हणून ते तेथून उठले.



: :

# रांग चवथी

हल्लीं कोंकणचा जो भाग रत्नागिरी जिल्ह्यामध्यें मोडतो, त्या भागांतील राजापुरजवळच्या एका खेडेगांवामध्यें पूर्वी एक सुखवस्तु व्यापारी गृहस्थ राहत होते. त्यांची तिकडे शेतीवाडी पुष्कळ होती व साऱ्या किनाऱ्यावर त्यांच्या गलबतांचा व्यापारही फार मोठा चालत असे. त्यावेळीं आगबोटी वगैरे साधनें नसल्यामुळें, समुद्रकांठच्या शहरांना लागणाऱ्या मालाची सर्व नेआण गलबतांच्या द्वारानें होत असे. आणि त्यामुळें सुवर्णदुर्ग, राजापूर वगैरें बंदरें त्या वेळीं फार भरभराटीस आलेलीं होतीं. एकट्या राजापुरचा त्या वेळीं लाखों रुपयांचा व्यवहार दुसऱ्या बंदराशीं चालत असे. कोल्हापुराकडून घाटावरून येणारा माल सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्या उलटून खालीं आला, म्हणजे राजापुरच्या वखारींतून त्याचा तळ पडत असे, व मच्छलीपट्टण, मलबार, कोचीन, वगैरे दूरदूरच्या बंदरांतून गलबतां-मधून आलेला मालही राजापुरच्या वखारींतून सांठविलेला असे. ज्याला जिकडे मागणी असेल, तिकडे तो माल तेथून पाठवला जात असे; त्यामुळें राजापूर ही त्या वेळीं एक अतिशय मोठी उतारपेठ झालेली होती, व व्यापाराच्या मोठमोठ्या उलाढाली तेथें होत असत. हजारो रुपयांच्या रोकड रकमा दररोज राजापुरच्या बाजारांत येऊन जमा होत असत. हजारो रुपयांच्या हुंड्या प्रत्येक दिवशीं बंदर राजापूर येथून काशी-रामेश्वरापर्यंत दूरदूरच्या सर्व ठिकाणच्या सावकारांवर लिहिल्या जात असत. इतकी व्यापाराची मोठी घडामोड राजपूर शहरांत पूर्वी चालत असल्यामुळें, त्या गांवीं साहाजिकपणेंच पेढीवाले, उदमी, व्यापारी वगैरे पुष्कळ श्रीमंत लोकांची वस्ती होती. परंतु तेथें ज्या कांहीं श्रीमंत पेढ्या होत्या, त्या सगळ्यांमध्यें वर सांगितलेले जे गृहस्थ त्यांची पेढी अतिशय

श्रीमंत होती. रामचंद्ररावांची पेढी--रामचंद्रराव हें त्या गृहस्थांचें नांव होतें-सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्ध होती, व आसपासच्या लहानमोठ्या राजे-रजवाड्यांना आणि सरदार-उमरावांनाही एखाद्या विशेष राजकारणाच्या प्रसंगीं लागेल तितकी पैशाची मदत ते मोठ्या हौसेनें करीत असत. त्यांचें मूळ ठिकाण जरी राजापुराजवळच्या एका खेड्यांत होतें, तरी त्यांचा नेहमींचा राहण्याचा मोठा चौसोपी वाडा राजापुरांतच होता. राजापुरच्या खाडीपासून सह्याद्रीच्या पायथ्यापर्यंत जीं अनेक लहान लहान गांवें आहेत, त्या सगळ्या गांवांतून रामचंद्ररावांचीं शेतें-भातें पसरलेलीं होतीं व त्यांतून त्यांनीं कित्येक ठिकाणीं तळीं, देवळें वगैरेही बांधलेलीं होतीं. इकडे जमिनीवर जसा त्यांचा हा श्रीमंतीचा पसारा पसरलेला होता, त्याचप्रमाणें दुसरीकडे समुद्रावरही त्यांचा व्यापार थोडाथोडका होता, असें नाहीं. एखादे वेळीं भरतीच्या चढत्या पाण्याबरोबर त्यांचीं गलबतें खाडींतून वर चढून येऊं लागलीं, तर त्या गलबतांच्या विस्तीर्ण शिडांनीं त्या खाडीचें सगळें पात्र येथून तेथून पांढरें शुभ्र होऊन जात असे !

रामचंद्ररावांची त्या वेळीं इतकी संपत्ति होती, पण तिचा आतां मागमूसही राहिलेला नाहीं. जुन्या काळच्या सगळ्याच व्यापाऱ्यांच्याप्रमाणें रामचंद्ररावांचीही पेढी हल्लीं चालत नसली, आणि त्यांच्या हुंड्या हल्लीं बंद पडल्या असल्या, तर त्यांत कांहीं नवल नाहीं. कारण पूर्वीच्या काळचें हल्लीं काय टिकलें आहे ! रामचंद्ररावांचीं तीं सगळीं गलबतें नाहींशीं झालीं, त्यांचा तो सगळा व्यापार नाहींसा झाला, आणि त्यांचें तें पूर्वी संपत्तीनें भरलेलें घर मागें राजापुरामध्यें कोठें होतें हें समजण्याला देखील हल्लीं कांहीं साधन उरलेलें नाहीं. सह्याद्रीच्या खालचीं जीं शेतें रामचंद्ररावांना एकदां आपले मालक म्हणून म्हणत होतीं, तीं शेतें दुसऱ्याच कोणाकरितां तरी हल्लीं पावसांत भिजत आहेत आणि उन्हांत तापत आहेत. राजापुरापासून सह्याद्रीकडे जातांना सह्याद्रीच्या पायथ्यापर्यंतच्या अवकाशामध्यें एखाद्या सुंदर नदीच्या कांठीं किंवा एखाद्या रमणीय टेकडीच्या शिखरावर एखादें पडलेलें देऊळ किंवा एखादी भंगलेली मूर्ती रामचंद्ररावांच्या वेळची कदाचित् असेल, व एखादा थकलेला वाटसरू अद्यापिही त्या ठिकाणीं बसून आणि क्षणभर विश्रांति घेऊन त्या विश्रांतीच्या जागा निर्माण करणाऱ्या परोपकारी पुरुषाला दुवा देत असेल. पण तो परोपकारी पुरुष रामचंद्ररावच कीं कोण, हें हल्लींच्या काळांतील कोणालाही माहीत नाहीं ! हल्लींच्या निर्दय काळानें आपला विस्मृतीचा

हात या सर्व प्रकरणांवरून पुरा पुरा फिरविला आहे. जुन्या काळची कांहीं एक खूण त्यानें शिल्लक उरूं दिलेली नाहीं!

परंतु रामचंद्ररावांचा हल्लीं कांहीं मागमूस, वंशवेल, किंवा वारस-हक्कदार कोणी उरला नाहीं, याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण, आपण ज्या जुन्या वेळची ही हकीकत वाचीत आहोंत, त्या वेळींही पुढें अशी दुर्धर स्थिति येणार, अशीं दुष्ट चिन्हें थोडींबहुत दिसत होतीं. कारण, त्या वेळींही रामचंद्र-रावांना पुत्रसंतान कांहीं एक नव्हतें. त्यांचें वय बरेंच झालेलें होतें व ते आणि त्यांच्या पत्नी ही उभयतांही वृद्धपणाच्या उंबरठ्यापर्यंत येऊन ठेपलेलीं होतीं. त्यामुळें त्यांना यापुढें पुत्रोत्पत्तीची आशा बिलकूल उरलेली नव्हती. आणि म्हणून ते नेहमी देवधर्मामध्यें आपला काळ घालवून आपल्या मनाची उद्विग्नता विसरून जाण्याचा प्रयत्न करीत असत. त्यांचा व्यापार आणि उद्योगधंदा जरी इतका मोठा होता, तरी त्यांतसुद्धां अलीकडे अलीकडे ते फारसें लक्ष घालीत नसत. सर्व कामकाज त्यांच्या हाताखालीं जे त्यांचे अनेक कारभारी आणि कारकून होते, त्यांच्यावर सोपवून ते भारत, भागवत, रामायण, इत्यादि पोथ्या-पुराणें वाचून आपल्या मनाचें दुःख दृष्टीआड करीत असत. एवढ्या संपत्तीचें काय करावयाचें, एवढा हा आपला व्यापार कोण आवरील, आपले हातपाय थकले तर आपल्या तोंडांत पळीभर पाणी कोण घालील, असे अनेक विचार मनामध्यें येऊन त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंचे पूर वाहूं लागत. 'तुम्ही कोणी तरी मुलगा दत्तक घ्या,' असें पुष्कळ लोक रामचंद्र-रावांना सांगत असत; परंतु ही कल्पना त्यांना बिलकूल पसंत नव्हती. दानधर्म, अन्नछत्रें, सदावर्तें, देवळें, तळीं, विहिरी, पाणपोई, इत्यदि अनेक धर्मकृत्यें आणि परोपकाराचीं कृत्यें यांमध्येंच ते आपला पुष्कळ पैसा खर्च करीत असत. आणि हेच आपले मुलगे आहेत आणि हे आपल्याला परलोकामध्यें उपयोगीं पडतील, असें म्हणून रामचंद्रराव हे आपल्या मनाची समजूत घालीत असत, आणि आपल्या पत्नीच्याही मनाचें समाधान करण्याचा प्रयत्न करीत असत.

त्यांतल्या त्यांत रामचंद्ररावांना दुःखांत सुख एवढेंच होतें कीं, त्यांना एक कन्या होती. तिच्याकडे पाहून तीं उभयतां नवरा-बायको आपलें दुःख विसरत असत. हाच आमचा मुलगा आहे, अशा भावनेनें तीं दोघें तिच्याकडे पहात असत. देवानें आपल्याला निदान मुलगी तरी दिली आहे, यांतच तें दांपत्य संतोष मानीत असे, आणि आपल्याला मुलगा दिला नाहीं म्हणून त्या दोघांपैकीं एक-

मुलगी आतां लवकरच येणार आहेत, ही बातमी त्यांनीं राजापुरांतल्या प्रत्येक घरीं जाऊन सांगितली; आणि कोणीही लहान मुलगी भेटली, तरी ' आतां आमची मुलगी आली म्हणजे तिच्याबरोबर भातुकली खेळावयाला तूं ये हं ! ' असें सांगितल्या-शिवाय त्या कधीं राहिल्या नाहींत. आपली मुलगी आल्यावर असें करावयाचें, तसें करावयाचें, असें त्यांनीं हजार बेत मनामध्यें योजिले होते. लग्न झाल्यापासून माहेरीं मुलीची मंगळागौर कधींच झालेली नव्हती, ती यंदा आपण आतां मोठ्या थाटानें करूं, आणि गांवांतल्या सगळ्या मुली फराळाला आणि जागवयाला बोलवूं, असे एक ना दोन, किती तरी बेत रामचंद्ररावांच्या पत्नीनें आपल्या मनामध्यें चालविले होते. शिवाय आपल्या कुटुंबाला कांहीं दिवस लोटले असल्या-मुळें बाळंतपणाला तिला तिकडेच ठेवूं, असाही भाऊसाहेबांच्या पत्रामध्यें उल्लेख होता, त्यामुळेंही रामचंद्रराव आणि त्यांच्या पत्नी यांना परमावधीचा आनंद झालेला होता.

हें वर सांगितलेलें भाऊसाहेबांकडील पत्र माघ महिन्याच्या अखेरीच्या सुमारास येऊन पोंचलेलें होतें व त्यांत त्यांनीं निघण्याचा जो मुहूर्त लिहिलेला होता, त्या मानानें पाहतां शिमग्याच्या दुसऱ्या पंधरवड्यामध्यें ही मंडळी कोंकणांत येऊन पोंचावी, असा रामचंद्ररावांनीं अंदाज केलेला होता व त्या बेतानें ते वाटेकडे अगदीं डोळे लावून बसलेले होते. त्यांच्या पत्नी तर कारकुनाकडून रोज तें पत्र फिरून फिरून वाचून घेत. आणि प्रत्येक दिवसांतून दहा वेळां किती दिवस झाले आणि बाकी किती दिवस उरले, याची बोटें घालून गणती करून पहात असत. त्यांनीं घाटाच्या पायथ्यापर्यंत ठिकठिकाणीं माणसें पाठवून ठेविलीं होतीं, आणि आपल्याला लवकर बातमी कळावी म्हणून त्यांनीं शक्य ती सर्व योजना केली होती.

परंतु रामचंद्ररावांनीं त्यांच्या येण्याबद्दलचा केलेला अंदाज चुकूं लागला. रंगपंचमीपर्यंत तरी निदान ते येऊन पोंचले पाहिजेत, असें त्यांना वाटत होतें; पण पंचमी गेली, षष्ठी गेली, सप्तमी गेली, तरी त्यांच्या येण्याचा कांहीं सुगावा दिसेना. त्यामुळें रामचंद्ररावांच्या पत्नीला थोडी अस्वस्थता वाटूं लागली. पण ते कांहीं आगगाड्यांचे दिवस नव्हते, कीं ज्या योगानें मनुष्य अगदीं नेमक्या वेळीं परगांवाहून आपल्या मुक्कामाला येऊन पोंचेल ! लांबचा प्रवास आहे, वाटे-मध्यें एक दिवसाला दोन दिवस लागतातच; आज उद्यां इतक्यांत मंडळी

येतील, तूं काळजी करूं नको, अशा अनेक गोष्टी सांगून रामचंद्रराव आपल्या बायकोची शक्य तेवढी समजूत घालीत होते; पण त्या माउलीचा स्वभाव अत्यंत प्रेमळ असल्यामुळें आणि प्रेम हें अतिशय उतावीळ असल्यामुळें तिचा हळूहळू धीर सुटत चालला. एक दिवशीं रात्रीं तिला कांहीं वाईट स्वप्न पडलें, तेव्हांपासून तर ती फारच काळजी करूं लागली. ती मंडळी कधीं येतील त्याबद्दल ती दर-रोज ज्योतिष्यांना प्रश्न विचारूं लागली, आणि तिचा धीर खचूं नये म्हणून जोशीबुवांनीं आशाजनक रीतीनें सांगितलेले प्रश्न दररोज चुकूं लागले! घरा-जवळच्या अंगणांतील झाडावर बसून कावळा उगाच ओरडूं लागला, तरीदेखील घरांतील कोणी तरी त्या कावळ्याला 'काव, काव, सोन्याचें पाव, आमचीं माणसें येत असलीं तर उडून जाव,' असें म्हणत असत. आणि रामचंद्ररावांच्या भोळसर बायकोची गोष्ट तर राहोच, पण रामचंद्रराव इतके समंजस होते, तरी ते सुद्धां कावळा उडून जातो आहे किंवा नाहीं, हे मोठ्या लक्षपूर्वक रीतीनें पहात असत! पण दिवस मावळला, काळोख पडला, रात्र झाली आणि कोणीही आल्याचीं पावलें वाजलीं नाहींत, किंवा हातांतील टेकावयाच्या काठ्यांचे आवाज दुरून ऐकूं आले नाहींत, किंवा काळोखांत रस्ता दिसण्यासाठीं पेटविलेल्या चुडींचा उजेड दुरून अंधुक अंधुक देखील कोठें दिसला नाहीं, म्हणजे रामचंद्रराव दीर्घ श्वास टाकीत स्वस्थ बसत, आणि त्यांची बायको मोठ्यानें अश्रु गाळण्याला सुरुवात करी. त्यांच्या येथील पूजेचा ब्राह्मण रोज सकाळीं पूजेचे वेळीं गणपति पाण्यांत घालून ठेवीत असे, आणि संध्याकाळीं निराशा झाली म्हणजे धूपारतीचे वेळीं तो गणपति फिरून पाण्यांतून काढण्यांत येत असे, व 'उद्यां तरी तूं प्रसन्न हो' अशी त्याची प्रार्थना करण्यांत येत असे. आपली मुलगी आणि जांवई येतील, तेव्हां त्यांच्या-वरून लिंबलोण उतरून टाकण्याकरितां जीं लिंबें आणून ठेविलीं होतीं, तीं वाळून गेल्यामुळें किती तरी वेळां बदललीं! पण येणारे पाहुणे कोणीही येईनात! 'मंडळी आली, आली!' अशी कांहीं कारणानें रामचंद्ररावांच्या नोकरलोकांमध्यें एखादे वेळीं उगीच खोटी हूल उठे, व थोडीशी गडबड होई; पण अखेरीस कांहीं नाहीं, असें ठरलें म्हणजे रामचंद्रराव आणि त्यांच्या पत्नी यांची कंबर खचून जाई. रामचंद्ररावांच्या पत्नी स्त्रियांच्या स्वाभाविक श्रद्धाळूपणानें आपल्या शेजारच्या घरच्या एकाद्या पांच सहा वर्षांच्या लहान मुलाला बोलावून आणून, त्याच्या निसर्गशुद्ध आणि निष्कलंक अंतःकरणामधून काय उत्तर येतें, तें पाहण्यासाठीं

म्हणून ' आमची मंडळी केव्हां येतील, ' असें विचारीत; किंवा एखादें तगरीचें पांढरें फूल आणि जासवंदीचें तांबडें फूल त्याच्यांपुढें ठेवून आणि अमक्या फुलाला त्यानें हात लावला तर आज येतील आणि दुसऱ्याला लावला तर येणार नाहींत, असा आपल्या मनामध्यें संकल्प ठरवून ती त्या फुलांपैकीं कोणतें तरी एक फूल त्याला धरावयास सांगत असे. पण ह्या तोडग्यांपैकीं कोणत्याही तोडग्याचा गुण बरोबर उतरेना. उलट अलीकडे कांहीं दिवस रामचंद्ररावांचा डावा आणि त्यांच्या बायकोचा उजवा डोळा मधून मधून लवूं लागला होता; त्यामुळें तर हें कांहीं शुभ चिन्ह नाहीं, असें त्यांचें मत होऊं लागलें होतें !

अशा विवंचनेमध्यें त्यांनीं शिमग्याचा महिना कसाबसा घालविला. पुढें जुनें वर्ष संपलें, पण रामचंद्ररावांचें जुनें काळजीचें मूळ संपलें नाहीं. संवत्सर बदलला; पण रामचंद्ररावांचा निदिध्यास तोच कायम होता. नवीन वर्षाला सुरुवात झाली पण रामचंद्ररावांच्या इष्टजनसमागमाच्या नवीन आनंदाला सुरवात झाली नाहीं. पाडव्याच्या दिवशीं गुढी तरी उभारावी किंवा नाहीं, असासुद्धां प्रश्न निघाला होता; पण कुलाचार चालू ठेविले पाहिजेत, म्हणूनच केवळ त्या दिवशीं ध्वजा-रोपण करण्यांत आलें; परंतु त्या दिवशीं रामचंद्ररावांनीं पुरणाच्या पोळीला हात-सुद्धां लाविला नाहीं, हें पंक्तीला बसलेल्या लोकांनीं पाहून कोणालाही त्या दिवशीं सण आहे असें वाटेना ! आणि रामचंद्ररावांच्या पत्नीनें तर त्या दिवशीं सकाळीं गांवांतल्या रामाच्या देवळांत जाऊन आणि तेथें रामनवमीचा उत्सव सुरू झालेला पाहून ' रामा, तुझ्या देवळांत जसा उत्सव चालला आहे, तसा आमच्या घरीं उत्सव होऊं दे ! आणि तुझी सीताबाई तुझ्यासह जशी वनवासांतून आल्यावर जनकाला भेटली, तशी माझी मुलगी आपल्या नवऱ्यासह आम्हांला सुखरूप येऊन भेटूं दे ! ' असें म्हणून देवापुढें नाक घांसलें, आणि रामनवमीचे नऊ दिवसपर्यंत मी अन्नग्रहण करणार नाहीं, असा निर्धार करून तिनें रामावर सांकडें घातलें !

परंतु रंगपंचमी गेली, पाडवा गेला, रामनवमी गेली, तरीही येणारी मंडळी येईनात, आणि यांच्या मनाची चिंता जाईना. तेव्हां कांहींतरीं विशेष कारण घडलेलें असलें पाहिजे, एरवीं इतका उशीर लागणें संभवनीय नाहीं, अशी सर्वांची खात्री झाली, परंतु या खात्रीमुळें सर्वांची चिंता मात्र जास्त वाढली. रामचंद्ररावांनीं पहिल्यानें झांशीला पत्र लिहिलें आणि नंतर मधल्या वाटेवर ठिकठिकाणीं त्यांचे

जे पेढीवाले ओळखीचे होते, त्यांनाही त्यांनीं चौकशी करून कळविण्याविषयीं पत्रें धाडिलीं, व कोठून कांहीं जबाब आला नाहीं तर आपण स्वतः जावयाचें, असा त्यांनीं निश्चय केला. त्यांची दोनदां काशीयात्रा झालेलीच होती व तिच्यसयांदा गंगास्नान व्हावें अशी त्यांची फार इच्छा होती; व जावयाचेंच झालें तर कुटुंबाला बरोबर घेऊन जावें म्हणजे तीर्थयात्रेच्या निमित्तानें तिच्या मनाला तेवढाच विरंगुळा होईल, असें त्यांनीं योजिलें होतें. पावसाळ्याचे दिवस पुढें डोकीवर येणार होते, तरी देखील मंडळीच्या शोधासाठीं जाणें जरूर असल्यामुळें आणखी महिना पंधरा दिवसांत कोठून कांहीं वर्तमान कळलें नाहीं, तर शोधाला व तीर्थयात्रेला निघण्याला अवकाश लावावयाचा नाहीं, असा त्यांनीं निश्चय केला होता.

• • •

: : 

## रांग पांचवी

" आतां तुझ्या लक्षांत आलें का ? " मातादिननें विचारिलें. " या त्याच्या खुणा आहेत. यांच्यावरून तूं त्याला ओळखिलें पाहिजेस. तुला ओळखितां येईल, असें तुला वाटतें ना ? "

" त्याची तुम्हांला काळजी नको. " चांदबिबीनें उत्तर दिलें. " तुम्ही त्याच्या सांगितलेल्या सगळ्या खुणा माझ्या लक्षांत आहेत. "

" तर मग सांग पाहूं, त्याचा बांधा कसा आहे ? " मातादिननें विचारिलें.

" त्याचा बांधा उंच आहे, असें तुम्हीं मला सांगितलें आहे ना ? " चांदबिबी म्हणाली.

" आणि त्याचा रंग ? "

" आम्हां बायकांना जो अतिशय आवडतो तो ! "

" म्हणजे कोणता ? " मातादिननें आपल्या अंगाच्या वर्णाकडे आणि तिच्या चेहऱ्याकडे पहात पहात विचारलें.

" कोणता म्हणजे ? गोरा ! " चांदनें गालांत हसत हसत उत्तर दिलें.

" तर मग माझा रंग तुला आवडणाऱ्या रंगांपैकीं नव्हे ? " मातादिननें थोड्या निराशेनें, पण बऱ्याचशा थट्टेनें, तिच्या गळ्यांत हात घालून विचारिलें.

स्त्रिया बोलण्याच्या कामांत मोठ्या चतुर असतात. आणि त्यांतून वेश्या तर फारच चतुर असतात. चांदबिबीनें मोठ्या खुबीनें उत्तर दिलें,

" तुमचा रंग आवडत नसला, तरी तुम्ही मला आवडत आहांना ! "

ह्या उत्तरानें खुष होऊन मातादिननें तिला आपल्याजवळ थोडें अधिक ओढून घेऊन म्हटलें, " बरें, जर मी तुला खरोखरच इतका आवडत असेन, तर माझें हें काम मोठ्या काळजीनें आणि शिताफीनें करून दिलें पाहिजे. पैशा-

बद्दल तुला काळजी नको. तूं आमचें एवढें काम करून दे म्हणजे तूं मागशील तितके पैसे आम्ही तुला देऊं."

"देऊं म्हणून नाहीं चालावयाचें! आधीं दिले पाहिजेत." चांदबिबी म्हणाली.

"आधीं ठरलेले पैसे तर मी तुला देतोंच." असें म्हणून मातादिननें आपल्याजवळची कांहीं रक्कम तिच्या हवालीं केली आणि फिरून तो तिला म्हणाला: "चांद, हें कांहींच नाहीं. तूं त्याला धरून आमच्या हवालीं कर, म्हणजे तूं मागशील तें बक्षीस आम्ही तुला द्यायला कधीं अनमान करणार नाहीं."

"तो येथें आला मात्र पाहिजे. या गांवांत जर आलाच नाहीं, तर मात्र इलाज नाहीं." चांदबिबी म्हणाली.

"तो या गांवांत आल्यावांचून राहणारच नाहीं. त्याची तुला शंकाच नको. आणि म्हणून तर आम्ही तुझ्याकडे ही कामगिरी सोपवीत आहों." मातादिन म्हणाला.

"तो या गांवांत आला म्हणजे पुरे आहे. मग या गांवांत तो कोठेंही असला तरी मी त्याचा शोध काढल्यावांचून राहात नाहीं." चांदबिबी म्हणाली.

"छे छे!" मातादिननें तिला सांगितलें, "त्याला शोधण्यासाठीं तुला गांवभर फिरण्याची देखील मुळींच जरूरी नाहीं. तुझ्या घराशेजारच्या या धर्मशाळेकडे तुझें लक्ष असूं दे म्हणजे झालें. तूं त्याला शोधायला जायला नको. तो या धर्मशाळेला शोधीत येईल."

"अहो," चांद एक मुरका मारून म्हणाली, "तो धर्मशाळेला शोधीत येईल किंवा नाहीं हें मला कांहीं माहीत नाहीं. पण त्याची बायको नाहीं असें जर तुम्ही म्हणतां, तर तो मला मात्र खास शोधीत येईल."

"तो तुला शोधीत येईल किंवा नाहीं," मातादिन नाक मुरडून म्हणाला, "हें मला नक्की सांगतां येत नाहीं. तो ती धर्मशाळा शोधीत खात्रीनें येईल; पण तो तुझ्यासारख्या एखाद्या नाटकशाळेची धर्मशाळा शोधीत येईल, असें मला वाटत नाहीं. कारण, त्यांच्यात सद्‌गुणीपणाचा दुर्गुण फार भरलेला आहे. म्हणून 'तो आपण होऊन तुझें घर शोधीत येईल, या घमेंडीवर तूं राहूं नको. तसें करशील तर तूं फसशील, आणि आमचाही सगळा बेत फसवून टाकशील; म्हणून भलत्याच डौलानें तूं बेफिकीर राहतां कामा नये. तूं त्या धर्मशाळेवर

चांगली नजर ठेव. कोण वाटसरू केव्हां येतात, केव्हां जातात, ते काय बोलतात, काय चौकशी करतात, या सगळ्या गोष्टींवर बारीक नजर ठेविली पाहिजे. ”

“ माझ्या आतां लक्ष्यांत आलें. मी आतां तें सगळें करीन. ” चांदबिबी म्हणाली.

“ चांद, ” मातादिन म्हणाला. “ मी सांगितलें अशी तूं काळजी घेतलीस तर मी तुला पूर्वी ज्या खुणा सांगितल्या आहेत, त्यांवरून त्याला ओळखून काढण्याला तुला अडचण पडणार नाहीं; पण-- ”

“ पण काय ? ओळखून काढण्याची अडचण पडणार नाहीं, तर मग दुसरी कसली अडचण पडणार आहे ? ” चांदनें विचारलें.

“ अडचण ती पुढेंच आहे. ” मातादिननें उत्तर दिलें. “ चांद, कठिण काम काय तें त्याला ओळखून काढल्यानंतरचेंच आहे. तूं आपले पाश त्याच्यावर कसे टाकशील आणि तो तुझ्या जाळ्यांत कसा सापडेल याची मला मोठी काळजी आहे. कारण मी मघाशीं तुला सांगितलेंच आहे कीं, तो बाहेरख्याली स्वभावाचा नाहीं ! ”

“ त्याची तुम्हांला काळजी नको. ” चांद थोडेसें हंसून म्हणाली. “ तें आमचें कसब आहे. तें मी सगळें करीन. त्याची तुम्हां पुरुषांना कल्पना आली नाहीं, तरी आमचा वेश्यांचा तो धंदाच आहे. तें आम्हांला कोणी शिकवावयाला नको ! ”

“ तुझ्या या सगळ्या बढाया आहेत. ” मातादिन मनामध्यें कांहीं हेतु धरून बोलूं लागला. “ प्रत्यक्ष माझी तूं खात्री करून दिल्यावांचून माझा नाहीं त्याच्यावर विश्वास बसत. ”

“ काय तुमची खात्री करून देऊं ? ” मातादिनच्या बोलण्याचा ओघ लक्षांत न येऊन फसून चांदबिबी मोठ्या आवेशानें म्हणाली.

त्याचा फायदा घेऊन मातादिन बिलकुल न हसतां गंभीर मुद्रा करून म्हणाला, “ माझी अशी खात्री झाली पाहिजे. समज कीं मीच तो आहे. आणि मी तुला आढळलों. पण मी सद्गुणी, सदाचारी, सत्यमार्गी आणि एकपत्नीव्रताचा अभिमानी आहे; तर तूं मला कशी भुरळ घालशील तें मला पाहूं दे. तूं माझ्याकडे पाहशील कशी, हंसशील कशी, बोलशील कशी, काय निमित्त काढून बोलत बोलत जवळ येशील, आणि कशी गळ्यांत पडून मला मोहून टाकशील तें मला पाहूं दे. हं, हा मी सदगुणी झालों. आतां कर सुरुवात पाहूं तूं आपलें एकेक अस्त्र माझ्यावर फेंकण्याला ! ”

" मी अशी तुमच्या फसवण्याला फसणारी नव्हे. " चांद हंसत हंसत म्हणाली. " आम्ही पुरुषांना फसविणार. पुरुषांकडून आम्ही नाहीं फसल्या जाणार ! पण माझ्यामध्यें एखाद्याला मोहून टाकण्याचें सामर्थ्य आहे किंवा नाहीं, याच्याबद्दल पुरावा दाखविण्याला मला लांब जावयाला नको. माझा साक्षीदार माझ्यासमोरच आहे. मातादिन, माझ्यामध्यें भुरळ घालण्याची शक्ति आहे. म्हणूनच तर मी तुम्हांला माझ्या नुसत्या डोळ्यांनीं आपल्याकडे ओढून आणलें ! सांगा, खरें आहे का खोटें आहे तें. पण तुम्हांला मात्र सद्‌गुणाचें सोंग कधींही आणतां यावयाचें नाहीं. आणा पाहूं आणीत असलां तर ! हं, व्हा सद्गुणी !--सद्गुणी आणि सदाचरणी मनुष्य एखाद्या वेश्येच्या अंगाला कधींही स्पर्श करीत नाहीं ! तर मग व्हा पाहूं तुम्ही माझ्यापासून दूर ! " असें म्हणून चांदबिबी त्याला आपल्यापासून खरोखरच हंसत हंसत दूर ढकलण्याचा प्रयत्न करूं लागली. तेव्हां आपला मूळचा हेतु सिद्धीस न जातां आपलीच युक्ति आपल्या गळ्यामध्यें येत असलेली पाहून तिच्यापासून दूर न सरतां मातादिन म्हणाला,

" चांद, मी कबूल करतों कीं, तुला सांगितलेलें काम तूं फत्ते करणार !—पण तुझ्या शरीराच्या स्पर्शसुखापासून तूं मला दूर सारूं नको ! माझी खात्री झाली ! मला शंका उरली नाहीं ! आतां झालें ना ? आणि तुझ्या या गुणाबद्दल आम्ही तर तुला बक्षीस देऊंच; पण तुझ्या माहितीकरितां आणि तुझ्या फायद्याकरितां म्हणून तुला मी आणखी असेंही सांगून ठेवतों कीं, त्याला जर तूं वश करून घेशील–आणि ती तूं घेणारच—तर त्याच्यापासून देखील तुला चांगला डल्ला मारावयाला सापडेल ! "

" तो कसा ? " चांदबिबीनें मोठ्या उत्सुकतेनें विचारलें.

" अग, " पूर्वीच्या भाषणाच्या वेळीं चांदबिबीनें आपल्या खांद्यावरील काढून टाकलेला हात तिच्या खांद्यावर फिरून हळूच टाकीत टाकीत मातादिन म्हणाला, " त्याच्याजवळ एक गाठोडें असलें पाहिजे, अशी माझी समजूत आहे. आणि तें त्याच्यापाशीं असलें, तर आपल्याला जो पाहिजे आहे, तोच तो मनुष्य, हें तूं पक्कें समज. त्याचें गाठोडें ही तुला त्याची आणखी एक खूणच होईल. त्या गाठोड्यावर तूं चांगली नजर ठेव ! त्यांत फार मौल्यवान् दागिने आहेत. आणि ते खुद्द त्याच्या बायकोच्या अंगावरचे आहेत. त्याच्या बायकोची जागा जर तुला

पटकावितां आली, तर मग अर्थातच ते दागिनेही तुझ्या अंगावर येणारच! ते सगळे मग तुझेच आहेत!"

इतक्या मौल्यवान दागिन्यांचें आमिष मातादिननें दाखविल्याबरोबर चांदबिबीच्याही हाताचा विळखा मातादिनच्या गळ्याभोंवतीं पूर्वीपेक्षां जास्त घट्ट बसला. त्यानंतर त्या दोघांच्यामध्यें आणखीही कांहीं संभाषण होऊन व पुढें आपल्याला बातमी पोंचविण्याबद्दल कशी काय व्यवस्था करावयाची याविषयीं चांदबिबीला सर्व माहिती सांगून मातादिन निघून गेला.

तिसऱ्या रांगेच्या प्रदेशामध्यें करीमबक्ष आणि गंगाप्रसाद या उभयतांच्या दरम्यान झालला वादविवाद वाचकांच्या लक्षांत असेलच. भय्याखानाचा तपास लावून त्याला फितुरी करण्याची सवड सांपडू न देतां त्याचा प्राण घ्यावयाचा, असा त्या दोघांचा निश्चय कायम ठरल्यानंतर ते दोघेही पुढल्या तयारीला लागले. त्यावेळीं आतां भय्याखान कसा हुडकून काढावा याविषयीं त्यांची पुष्कळ वाटाघाट झाली. त्यांत करीमबक्षानें असा विचार काढला कीं, "हा आपल्यापासून पळून गेला, तर तो पहिल्यानें कोठें जाईल? तो आपल्यामध्यें कांहीं थोडे दिवस होता, त्या वेळच्या त्याच्या बोलण्याचालण्यावरून तो आपल्या बायकोच्या फार नादीं असावा, असें दिसत होतें. ती बेशुद्ध पडलेली पाहून तिची अशी स्थिति ज्यांनीं केली त्यांच्यावर सूड उगविण्याच्या हेतूनें रागाच्या आवेशामध्यें तिला तशीच टाकून तो आमच्यामागें आमचा पाठलाग करीत आला, आणि आम्ही त्याला धरून कैद केलें, तेव्हांपासून त्याला आपल्या बायकोची वास्तपुस्त कांहीं एक ठाऊक नाहीं. म्हणून स्वाभाविकपणेंच आपली बायको जेथें बेशुद्ध स्थितींत टाकून तो निघाला, त्या ठिकाणावरच तो पहिल्यानें परत गेला पाहिजे, यांत कांहीं शंका नाहीं. तो दुसरीकडे कोठें जाणें शक्यच नाहीं; तेव्हां आपल्याला जर भय्याखानाला फिरून पकडावयाचें असेल तर आपण तेथेंच गेलें पाहिजे! म्हणजे तेथें तो नेमका सांपडेल!"

करीमबक्षाची ही विचारसरणी अगदीं बरोबर होती. करीबक्षासारखे अनेक प्रकारच्या लबाडीचे धंदे ज्यांना नेहमीं करावे लागतात, ते लोक असल्या सामान्य प्रकारच्या विचारसरणीच्या कामांत मोठे धूर्त आणि धोरणी असतात. त्यांचा तर्क सहसा चुकत नाहीं. बरोबर विचार करून बरोबर धोरण ठरविणें यांतच शहाणपण असतें. आणि म्हणूनच बरोबर विचार करण्याची देणगी परमेश्वरानें

ज्यांना दिलेली असते, ते आपल्या धंद्यामध्यें उत्कर्ष पावतात. आतां हें मानवी धोरण परमेश्वराच्या योजनेमध्यें कधीं चुकत नाहींच असें नाहीं. परंतु मनुष्याची दूरदृष्टि जितक्या दूरवर पाहूं शकते, तेवढ्या मानानें बोलावयाचें असतां धोरणी मनुष्याची विचारशक्ति ही त्याची काळोखांत वाट दाखवून धीर देणारी एक काठीच आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

भग्याखानाच्या पत्निप्रेमाच्या पायावर करीमबक्षानें हा जो तर्क रचला होता, त्याला आणखीही एक नवीन पुरावा मिळाला. भग्याखानाच्या लुटीमध्यें त्याच्या बायकोच्या अंगावरचे व इतर दागदागिने व इतर सामान वगैरे जें कांहीं चोरून आणिलें होतें, तें करीमबक्षानें वांटणीच्या वेळीं फिरून उकरून काढण्याकरितां आपल्या नेहमींच्या जागीं पुरून ठेविलें होतें, व ती पुरण्याची जागा भग्याखानाला माहीत झालेली होती. व या ठगांच्या टोळींतून निसटून जाण्याचा आपला बेत यशस्वी झाला, तर जाते वेळीं आपल्या बायकोच्या अंगावरील दागिने तरी निदान आपण घेऊन जावे, असा त्यानें संकल्प केलेला होता. पुढें भग्याखान पळून गेल्यानंतर कांहीं थोड्याच दिवसांनीं लुटीचें द्रव्य पुरण्याची जागा पाहण्याकरितां गंगाप्रसाद गेला असतां, भग्याखान दुसऱ्या कशालाही हात न लावितां आपल्या बायकोचे तेवढे दागिने घेऊन गेला असल्याचें त्याला आढळून आलें. तेव्हां त्यानें ती गोष्ट करीमबक्षाच्या कानावर घातली. त्यामुळें करीमबक्षाचा वरील तर्क जास्त दृढ झाला, आणि त्याचा क्रोध जास्त वृद्धिंगत झाला. आणि म्हणून भग्याखानाला ज्या गांवांत त्या ठगांनीं लुटलें होतें, त्या गांवांतच भग्याखानाला फिरून पकडण्याची तजवीज करण्याकरितां करीमबक्ष या रांगेच्या प्रारंभीं सांगितलेल्या ठिकाणीं आलेल्या होता.

सागर आणि जबलपूर यांच्या दरम्यान विंध्य पर्वताचा बराच डोंगराळ प्रदेश आहे. या प्रदेशांत झाडी फार आणि मनुष्यवस्ती थोडी, अशी पूर्वी स्थिति होती. मधून मधून कांहीं लहानमोठीं गांवें कोठें तुरळक होतीं. त्यांपैकीं ज्या एका गांवामध्यें भग्याखानाच्या मंडळीला या ठगांच्या टोळीनें मारलें आणि लुटलें होतें, त्याच गांवांत करीमबक्ष हल्लीं आलेला होता. एकदा खून आणि लूट केलेल्या ठिकाणीं ठगांनीं फिरून येणें ही फार धोक्याची गोष्ट होय. कदाचित् कोणी ओळखिलें, तर प्राणावर प्रसंग यावयाचा! म्हणून करीमबक्षानें रूपांतराच्या वगैरे बाबतींत बराच काळजी घेतलेली असून शिवाय त्यानें 'मातादिन' असें

नवीन बदललेलें एक नांवही धारण केलें होतें. अशा तयारीनें त्या गांवीं आल्यावर भग्याखान तेथें परत आला होता काय, आणि त्याची बायको जिवंत आहे किंवा मेली, या दोन बाबतींमध्यें करीमबक्षानें चौकशी केली. परंतु भग्याखानाच्या बायकोबद्दल त्याला कांहींच तपास लागला नाहीं. आणि भग्याखान त्या गांवांत आला असता, तर ' आम्हांला ठगांनीं या ठिकाणीं लुटलें,' असा त्यानें गांवांत खात्रीनें बोभाटा केला असता. पण गांवांत कोठें कांहीं बोभाटा झालेला त्याच्या कानावर आला नाहीं; त्यावरून भग्याखान अजून तेथें आलेलाच नसावा, असा त्यानें तर्क बांधिला. व तो आतां जेव्हां पुढें तेथें लवकरच येईल, तेव्हां त्याला अचानक पकडण्यासाठीं कसें जाळें पसरून ठेवावें याच्या विचाराला तो लागला.

आपल्या प्रवासाच्या प्रसंगीं भग्याखान त्या गांवांतील ज्या धर्मशाळेमध्यें उतरला होता, त्या धर्मशाळेपासून कांहीं थोड्या अंतरावरील एका हवेलीच्या माडीवर कोणी एक नवीन सुस्वरूप वेश्या येऊन राहिली आहे, असें करीमबक्षाला आढळून आलें. त्याच वेश्येचें चांदबिबी हें नांव होतें. चोर आणि वेश्या यांची मैत्री निसर्गसिद्ध होय आणि दोघांचाही धंदा जवळ जवळ एकाच ! एकाचें लुटणें निष्ठुरपणाचें आणि दुसऱ्याचें प्रेमाचें, एवढाच काय तो फरक ! त्यामुळें एकमेकांच्या धंद्यांत एकमेकांपासून एकमेकांना सहानुभूति आणि मदत मिळावी, यांत कांहीं फारसें मोठें आश्चर्य आहे, असें नाहीं.

करीमक्षानें आपल्या मनाशीं विचार केला कीं, " भग्याखान शोध करीत करीत या धर्मशाळेमध्यें फिरून येणार, हें खास ! आणि तपास करतांना बायकोचा कांहीं पत्ता लागला नाहीं, म्हणजे तो स्त्रैण मनुष्य अगदीं वेडा होऊन जाईल, यांतही कांहीं शंका नाहीं. अशा वेळीं या धर्मशाळेच्या जवळच राहणारी जी ही चांदबिबी तिचा खात्रीनें पुष्कळ उपयोग होईल. तिची माडी जवळ असल्यामुळें तो केव्हां येतो वगैरे माहिती हिला मिळायला मुळींच अडचण पडणार नाहीं. आणि त्याची एक बायको नाहींशी झालेली त्याला समजल्याबरोबर तिच्या जागीं ह्या चांदबिबीसारखी दुसरी सुरेख आणि सुंदर बायको सहजगत्या त्याच्या आटोक्यांत आली, तर त्यापासून आपल्याला काय वाटेल ती गोष्ट साधून घेतां येईल ! "

करीमबक्षाला किंवा त्याच्या टोळींतील दुसऱ्याही कोणाला आपल्याला कोणी ओळखील या भीतीनें त्या गांवांत एकसारखें फार दिवस राहणें शक्य नव्हतें;

त्यामुळें भय्याखानावर टेहळणी ठेवण्याचें काम कोणाकडे तरी सोंपवून देऊन करीमबक्षाला तेथून लवकर निघून जाणें जरूर होतें. या कामाला चांदबिबी ही त्याला पाहिजे तशी मिळाली होती. भय्याखान पूर्णपणें तिच्या कह्यांत गेला नाहीं तरी तिचा निरोप पोंचून भय्याखानाचा सूड उगविण्याकरितां आपण येथें परत येईपर्यंत तरी निदान कांहीं ना कांहीं तरी निमित्तानें ती त्याला आपल्या जाळ्या-मध्यें गुंतवून ठेवील, अशी करीमबक्षाला खात्री वाटत होती. आणि म्हणूनच त्यानें ती महत्त्वाची कामगिरी तिला नीट समजावून दिली होती, तिच्यावर पूर्णपणें सोपवून टाकिली होती. आणि याप्रमाणें ही व्यवस्था पक्की झालेली पाहून मग मातादिन उर्फ करीमबक्ष हा आपल्या दुसऱ्या कामगिरीकडे निघून गेला.



: :

# रांग सहावी

इ. स. १८१८ मध्यें पुण्यांतील पेशव्यांचें राज्य लयाला जाऊन बाजीराव ब्रह्मावर्ताला येऊन राहिले, ही बातमी ऐकून उत्तर हिंदुस्थानांतील असंख्य लोकांच्या डोळ्यांतून टिपें पडलीं. सवाई माधवराव आणि नाना फडनवीस हे पुण्यांतून गेल्यापासून त्यांच्या पाठीमागें बाजीरावसाहेबांची जी राज्यपद्धति सुरू झाली होती, आणि जे अश्रुतपूर्व अनाचार प्रचारामध्यें येऊं लागले होते, त्यांवरून बाजीरावाचें राज्य फार दिवस टिकणार नाहीं, असें पुष्कळांना वाटूं लागलें होतें; परंतु बाजीराव स्वतः राज्याला मुकला, तरी त्याच्याबरोबर सगळी हिंदुपदपातशाहीच लयाला जाईल, ही कल्पना कोणालाही नव्हती. राजा बदलेल, असें पुष्कळांना वाटत होतें; पण राज्यच जाईल, ही कल्पना कोणालाही नव्हती. बाजीराव हा पेशवा पदभ्रष्ट होईल, असें अनुमान काढण्याला पुष्कळ कारणें होतीं; पण तो आपल्याबरोबर सबंध पेशवाई रसातळाला घेऊन जाईल, हें अनुमान कोणाच्याही कल्पनेच्या आटोक्यांत आलेलें नव्हतें. अशा रीतीनें बाजीरावाच्या हातून राज्य जाणार असें जरी लोकांना वाटत होतें, तरीही त्याला मदत करावी, त्याला चांगली सल्लामसलत द्यावी, आणि त्याला सैन्याचीही लागेल तर कुमक पाठवावी, आशाबद्दल पुष्कळ लोकाचे प्रयत्न सुरू होते. शिंदे आणि होळकर यांचे कांहीं लढायांतून पराभव झाले आणि त्यानंतर झालेल्या तहांनीं त्यांचे हातपाय बांधले गेले, तरी पण त्यांच्याशिवायही बाकीच्या पुष्कळ लोकांचे हातपाय मोकळे होते. व अशा प्रकारचे लोक ठिकठिकाणीं या उद्देशानें आपल्या टोळ्या जमा करीत होते. अशा टोळ्या इतर ठिकाणीं जशा तयार होत होत्या, त्याचप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांतील झांशीच्या आसपासच्या प्रांतांतही अशा लोकांची जमावाजमव चाललेली होती. त्यांमध्यें भय्यासाहेब ह्या नांवाचे झांशीमधील एक तरुण जहागीरदार प्रमुख होते.

मागें चौथ्या रंगेंत राजापुरच्या रामचंद्ररावांचे जांवई भाऊसाहेब म्हणून ज्यांचें वर्णन केलेलें आहे, तेच हे भय्यासाहेब होत. दक्षिणेंतील दक्षिणी भाषेच्या पद्धतीप्रमाणें जरी त्यांना राजापुराकडील मंडळी भाऊसाहेब म्हणून म्हणत असत, तरी उत्तर हिंदुस्थानांतील तद्देशीय लोक त्यांना बहुतेक भय्यासाहेब या नांवानेंच हांका मारीत असत. भय्यासाहेबांच्या मनाची भरारी फार मोठी होती. त्यांना जगांतील व्यवहार साधारणपणें समजूं लागल्यापासून आपण आपल्या देशाच्या इतिहासामध्यें कांहीं तरी मोठा नांवलौकिक मिळवावा, असें त्यांना वाटूं लागलें होतें. त्यांना जरी झांशीमध्यें लहानशी जहागीर होती, तरी तें आकुंचित अंतरिक्ष त्यांच्या महत्त्वाकांक्षेच्या उड्डाणाला मुळींच पुरेसें नव्हतें. सगळ्या हिंदुस्थानचीं कारस्थानें पुण्यामधून चालतात, नाना फडनवीस पुण्याला होऊन गेले, शिंदे-होळकर पुण्याच्या गादीचे अभिमानी, सदाशिवरावभाऊ आणि राघोबादादा हे अर्वाचीन काळांतील अर्जुनासारखे आणि भीष्मासारखे पराक्रमी पुरुष पुण्यामध्यें होऊन गेले. पुण्याच्या शिपायांनीं दिल्लीचें तक्त फोडलें आणि आपले घोडे अटकेच्या पार नेले, हे इतिहास आणि हीं उदाहरणें भय्यासाहेबांच्या डोळ्यांपुढें सदोदित नाचत असत. आणि आपण त्यांच्यासारखे शूर होऊं, पराक्रमी होऊं, मुत्सद्दी होऊं, आणि आपल्या देशाच्या इतिहासामध्यें आपल्या राज्याचें आणि आपलें नांव आपण अजरामर करून ठेवूं अशा प्रकारचीं स्वप्नें त्यांना भर जागृतीमध्येंही पडत असत. ह्या विचारांनीं त्यांचें डोकें इतकें भणाणून गेलेलें होतें कीं, त्यापुढें त्यांना दुसरें कांहीं सुचतच नसे. बाजीराव हा वाईट राजा निघाला आहे, ही गोष्ट जी सर्वतोमुखीं झालेली होती, ती त्यांनाही मान्य होती; परंतु त्यांचें म्हणणें असें कीं, दुर्दैवानें आपल्यामधील एक मनुष्य वाईट निघाला म्हणून काय झालें? आपण दुसरे हजारों लोक चांगले निघूं आणि आपलें राज्य आपण राखूं, असें त्यांना वाटत असे व याच धोरणानें त्यांचे सर्व प्रयत्न चाललेले होते. त्यांना रात्रीची झोप नसे; आणि त्यांना साऱ्या दिवसभर याच्याशिवाय दुसरा निदिध्यास नव्हता. अशा प्रकारच्या जोखमीच्या धामधुमीमध्यें आपलें शिर हातावर घेऊन काम करावें लागणार, ही गोष्ट लक्षांत आणून, त्यांचें वय झालें होतें, तरी त्यांनीं लग्न करण्याचें सुद्धां कित्येक दिवसपर्यंत नाकारिलें होतें. आणि अशा एकनिष्ठेनें त्यांनीं आपले प्रयत्न चालविले होते.

परंतु इतक्यांत पुण्यांतील पेशवाईची इमारत पायासकट कोसळून पडल्याची दुःखकारक बातमी ग्वाल्हेरच्या दरबारांत येऊन पोंचली व तेथून ती झांशीपर्यंत येऊन पोंचण्याला पुढें फारसा वेळ लागला नाहीं. एखाद्या डोंगराच्या सुळक्यावर वरून वीज पडली असती, किंवा त्या डोंगराच्या खालून त्याला धरणीकंपाचे धक्के बसले असते, तर त्या योगानें त्या डोंगरावर जे परिणाम झाले असते, त्यांपेक्षां जास्त भयंकर परिणाम या भयंकर बातमीनें भय्यासाहेबांच्या मनावर घडून आले. त्यांच्या डोक्यावर आकाशचें वज्र कोसळलें असतें, तर त्यांच्या शरीराचे जितके तुकडे झाले असते, त्याच्यापेक्षां ह्या स्वराज्यनाशाच्या दारुण बातमीनें त्यांच्या आशेचे आणि महत्त्वाकांक्षेचे जास्त तुकडे होऊन गेले! त्यांचा सगळा उत्साह मावळला! आणि त्यांचें सर्व शौर्य निराधार झालें! त्यांचे हातपाय लुळे पडल्यासारखे झाले आणि त्यांच्या विचारशक्तीवरून वारें गेल्यासारखें होऊन ती बिलकूल कामच करीनाशी झाली. त्यांना डोळे असून पुढचें कांहीं दिसेनासें झालें. आणि एखाद्या पंख खुडून टाकलेल्या पक्ष्याप्रमाणें त्यांची बुद्धि जागच्या जागीं स्तब्ध आणि नष्टप्राय होऊन बसली.

अकस्मात् एखादी विपरीत आणि अनपेक्षित गोष्ट घडून आली, म्हणजे पुष्कळांच्या मनावर असे विलक्षण परिणाम होतात. बाजीरावसाहेब ब्रह्मावर्ताला येऊन राहिल्याची बातमी उत्तर हिंदुस्थानांत पसरल्यापासून तिकडच्या भटांभिक्षुकांना अतिशय आनंद झाला; परंतु असला हा स्वराज्य घालविणारा कुलकलंक उत्तर हिंदुस्थानामध्यें राहण्याकरितां आल्याबद्दल भय्यासाहेबांना अतिशय वाईट वाटलें. हिंदुस्थानचें स्वराज्य घालविणाऱ्या मनुष्याला हिंदुस्थानामध्यें कोठेंही जागा नसावी, असें भय्यासाहेबांना वाटत होतें. ब्रह्मावर्त म्हणजे जेथें सर्वबंधविनिर्मोक्षरूपी ब्रह्माचा आवर्त असावयाचा, त्या ठिकाणीं स्वराज्यनाशाच्या आणि पारतंत्र्याच्या बंधनांचा प्रत्यक्ष आणि मूर्तिमंत भोवरा गरगर फिरूं लागण्याला सुरवात झालेली पाहून भय्यासाहेबांचें अंतःकरण शंभर ठिकाणीं फाटून गेलें. गंगा नदी ही नदी इतके दिवस अतिशय पावन होती; पण ह्याच्यापुढें तिच्यामध्यें कोणी स्नान करूं नये; कारण स्वराज्यनाशाच्या पातकानें बाजीरावानें तिचें पाणी विटाळून टाकलें आहे, अशी कल्पना त्यांच्या डोक्यानें घेतली. स्वतंत्र रीतीनें राज्य करणाऱ्या पेशव्यांचें तें स्वर्गतुल्य पुणें शहर कोणीकडे, आणि गुलामगिरीमध्यें राहणाऱ्या बाजीरावानें दूषित आणि कलुषित केलेल्या ब्रह्मावर्ता-

तील तो नरकवास कोणीकडे ! अशी तुलना करून ते एका निमिषामध्यें दहा वेळां दीर्घ श्वास टाकीत असत !

परंतु पेशवाई बुडाल्यानंतर थोड्याच काळांत जिकडे तिकडे सर्व सामसूम झालें.जे ते आपआपल्या उद्योगाला लागले. जणूं काय कांहीं कमी जास्त कोठें झालेलें नाहीं,अशी स्थिति पूर्ववत् दिसूं लागली. वाळवंटांतला एखादा वाळूचा कण कोणी उचलून नेला, तर त्याचा जसा खळगा पडलेला कोठें दिसत नाहीं, तशी सगळ्या देशाची परिस्थिति सुयंत्रित झाली. ज्यांनीं स्वराज्य राखण्याकरितां शिकस्त केली ते धारातीर्थी मरून मोकळे झाले, आणि ज्यांनीं स्वराज्य घालविण्याकरितां शिकस्त केली, त्यांचे तनखे चांगले चालू होऊन तेही हरि हरि म्हणत आनंदांत काळ घालवूं लागले ! अशा रीतीनें लवकरच जिकडे तिकडे शांतता झाली. पण भय्यासाहेबांसारख्या लोकांच्या मनामध्यें जे सप्तसमुद्र खवळले होते, त्यांचीं वादळें आणि तुफानें इतक्या लवकर शांत होण्यासारखीं नव्हतीं. पुण्यांतून हें स्वराज्य गेलें नव्हे, तर आकाशांतून प्रत्यक्ष सूर्यच गळून पडला, असें भय्यासाहेबांना वाटत असे. आणि बाकीच्या लोकांना जरी चार चार प्रहरांनीं उजाडत असे आणि मावळत असे, तरी भय्यासाहेबांच्या मनाला ध्रुवाकडील प्रदेशांतल्याप्रमाणें ही एक दीर्घकाल टिकणारी रात्रच पसरली आहे, असें सदोदित वाटत असे. सौभाग्यावांचून स्त्री, प्राणावांचून कुडी, किंवा चंद्रावांचून रात्र जशी दिसावी, त्याप्रमाणें भय्यासाहेबांना त्यांची जन्मभूमि दिसूं लागली, आणि आपण हिंदुस्थानांतले सारे लोकही पोरकीं पोरें झालों, असें त्यांच्या मनानें घेतलें !

त्यांच्या मनावर या राजकीय परिस्थितीचा अशा प्रकारचा परिणाम झाल्याच्या योगानें तेव्हांपासून त्यांची एकंदर वृत्ति फारच बदलली. वडिलांच्या आग्रहावरून त्यांनीं नंतर कांहीं दिवसांनीं लग्न केलें हें खरें. व त्यांच्या सहधर्मचारिणी पत्नीवर त्यांचें अप्रतिम आणि अमर्याद प्रेम होतें, हेंही खरें; तरी पण तारुण्याच्या वयांतील या सुखोपभोगांच्या करमणुकीनेंसुद्धां त्यांच्या मनाला आराम वाटत नसे. त्यांची पत्नी जरी सुंदर आणि सद्गुणी होती, तरीही असल्या सुंदरीच्या सद्गुणांचा उपभोग घेण्याला जर स्वराज्याचे सुंदर आणि सद्गुणी दिवस आपल्याला लाभले असते, तर किती चांगलें झाले असतें, असें त्यांना वाटे. त्यांची जहागीर अगदींच लहान होती असें नाहीं; परंतु त्या जहागिरविरचें स्वराज्याचें छत्र नाहींसें झाल्यापासून ती जहागीरही त्यांना नकोशी झालेली

होती. सारांश, स्वराज्यनाशाच्या दुःखाचा डोंगर कोसळल्यामुळें त्यांच्या मनाला अतिशय उद्विग्नता प्राप्त झाली होती. आपल्या संस्कृत वाङ्मयामध्यें एकाएकी वैराग्य प्राप्त होण्याचें प्रसूतिवैराग्य, स्मशानवैराग्य, वगैरे कित्येक प्रकार वर्णिलेले आहेत. त्यांमध्यें स्वराज्याशापासून उत्पन्न होणाऱ्या वैराग्याचा समावेश जरी करण्यांत आलेला नाहीं, तरी तें वैराग्य असंभवनीय आहे, असें मात्र नाहीं. ज्याची ज्या गोष्टीबद्दल तीव्र भावना असते, त्याची त्या गोष्टीच्या बाबतींत एकाएकीं निराशा झाली, म्हणजे त्या निराशेच्या पाठोपाठ वैराग्य हें येतेंच. ज्या काळची परिस्थिति प्रस्तुत कथानकामध्यें वर्णन केली जात आहे, त्या काळीं या स्वराज्याच्या विनाशानें कांहीं कांहीं अंतःकरणें इतकीं उद्विग्न झालीं होतीं कीं, पुण्यांतील पेशवाई बुडाली ही बातमी समजल्याबरोबर रायगडावरच्या टकमकीच्या भयंकर टोंकावरून आपला कोणी कडेलोटच केला कीं काय, असें त्यांना वाटलें. कित्येकांना वेडें लागलीं. कित्येक भ्रमिष्ट झाले, कित्येक बैरागी होऊन तीर्थाटनें करूं लागले. कित्येक देशोधडीला गेले आणि कित्येक परागंदा झाले ! सगळ्या इरसाल अंतःकरणांची अशी दुर्दशा झाली ! कोणी कोणी लोक ख्यालीखुशालीमध्यें आणि वैधव्याच्या चैनबाजीमध्यें राहिले नाहींत, असें नाहीं. परंतु भय्यासाहेब हे अशांपैकीं नव्हते. त्यांना बाह्यात्कारीं वेड लागलें नव्हतें इतकेंच काय तें; परंतु स्वराज्याच्या नाशामुळें आंतून त्यांचें मन वेडें झालें होतें, त्यांचें डोकें भ्रमिष्ट झालें होतें. आपण बैरागी होऊन कोठें तरी नाहींसें होऊन जावें, असे त्यांच्या मनामध्यें आलेले विचार त्यांनीं किती तरी वेळां बाजूला सारले होते. त्यांना कांहीं कामधंदा सुचत नसे. गृहकृत्यांवरचें त्यांचें सर्व लक्ष उडून गेलेलें होतें. आज जहागिरीचा वसूल आला नाहीं, तर उद्यां आपल्याला खावयाला मिळावयाचें नाहीं, या गोष्टीचीही त्यांना पर्वा वाटेनाशी झाली होती. उद्विग्नता, निर्विण्णता, वैराग्य, या मनोविकारांचें प्राबल्य त्यांच्या मनावर फार बसलें होतें. त्यांच्या मनाच्या विस्तीर्ण, पवित्र आणि गंभीर अशा गंगा नदीच्या प्रवाहाला फक्त दोनच थडी होत्या. त्यांच्या मनाला मध्यंतरींच्या तिसऱ्या थडीची ओळखच नव्हती. एक स्वराज्याचें सुख तरी भोगावें, किंवा दुसरें अरण्यामध्यें जाऊन भगवच्चिंतन करावें, याच्याशिवाय मधल्या अर्धवट स्थितीमध्यें जिवंत राहाण्याची जी कला पुष्कळांना अगदीं सोपी वाटते व सहज साधते, ती त्यांना अगदीं दुर्घट वाटे.

**कुसुमस्तबकस्यैव द्वे गती स्तो मनस्विनाम् ।**
**मूर्ध्नि वा सर्वलोकस्य विशीर्येत वनेऽथवा ॥**

या श्लोकांत भर्तृहरीनें ज्या अभिमानी वृत्तीचें इतक्या उठावदारपणानें वर्णन केलें आहे, ती वृत्ति भय्यासाहेबांच्या अंतःकरणामध्यें मूर्तिमंत जागृत होती. आपली महत्त्वाकांक्षा पूर्ण होत नाहीं, तर उगीच अर्धवट मेलेल्या स्थितीमध्यें न राहतां आपण अरण्यामध्यें निघून जावें, असें त्यांच्या मनाला वारंवार वाटे. पांडवांचें चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें एका दिवसांतून तीनदां उभें राही. पांडवांचें राज्य गेलें, तेव्हां त्यांना अरण्यांत जाऊन वनवास पतकरण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता, हा इतिहास त्यांच्या डोळ्यांपुढें उभा राही. आपण अरण्यांत जावें, आपण बैरागी व्हावें, आपण संन्यासी व्हावें, आणि फिरून दैवानें आपल्यावर दया केली तर त्या अर्जुनाच्याचप्रमाणें संन्यासाचा संन्यास करून स्वराज्यासाठीं तरवार गाजविण्याला पुढें यावें! अशा अनेक उंचसखल लाटा त्यांच्या मनस्साग-राला प्रक्षुब्ध करीत असत.

राजापुरच्या रामचंद्ररावांची कन्या ही भय्यासाहेबांची पत्नी होती, हें वाच-कांना आतां माहित झालेलेंच आहे. त्यांचें नांव गंगाबाई असें होतें; तरी पण त्यांना त्यांच्या सासरीं बहुतेक मंडळी वहिनीसाहेब या नांवानेंच हाक मारीत असत. भय्यासाहेबांच्या सहवासानें गंगूबाईनाही त्या वेळच्या राजकारणाची थोडी-बहुत गोडी लागली होती. परंतु झालेल्या गोष्टीला कांहीं इलाज नाहीं हें तत्त्व गंगूबाईच्या मनामध्यें जास्त समतोलपणा ठेवण्याला कारणीभूत झालेले होतें. त्यामुळें त्या वरचेवर भय्यासाहेबांना आपलें मन बिथरूं न देण्याविषयीं सदुपदेश करीत असत, व त्याचा त्यांच्या मनावर कधीं कधीं थोडाबहुत परिणामही होत असे. फसलेल्या राजकारणामधून भय्यासाहेबांचें मन काढून तें दुसरीकडे कोठें तरी लावावें, हा गंगूबाईच्या प्रयत्नांचा रोख असे. राजकारणामध्यें विटलेल्या मनाला विश्रांति देण्याला वेदांतविचार, तीर्थाटन, वगैरेसारखें दुसरें चांगलें साधन नाहीं, हेंही गंगूबाईच्या लक्षांत येऊन चुकलेलें होतें. त्याच वेळीं ‘ भेटीला पुष्कळ दिवस झाले आहेत, आपण उभयतांनीं एकदां इकडे येण्याचें करावें,’ अशा अर्थाचीं रामचंद्ररावांचीं पत्रें वरचेवर येत होतीं. त्याचा फायदा घेऊन गंगूबाईनीं वाटेंतील तीर्थक्षेत्रें पहात पहात एकदा कोंकणांत जाऊन येण्याविषयीं भय्यासाहेबांचें

महत्प्रयासानें मन वळविलें. व त्याप्रमाणें तीं उभयतां आपल्याबरोबर थोडासा जरूर तेवढा लवाजमा घेऊन प्रवासाला निघालीं होतीं.

त्या वेळीं प्रवासाचें काम अतिशय दुर्घट होतें. हल्लींच्यासारख्या तेव्हां सडका वगैरे क्वचितच असत. आणि डोंगर, घाट, जंगलें, या ठिकाणीं तर चांगल्या वाटेचा अभाव आणि संकटांचा सुकाळ अशी स्थिति असे. तारायंत्रें आणि पोस्ट ऑफिसें यांनीं हल्लींच्या काळांतील प्रवाश्यांवर किती उपकार केले आहेत, याची हल्लीं आपल्याला बरोबर कल्पना येण्याला फार कठिण पडतें; परंतु हीं साधनें शंभर वर्षांच्या पूर्वी अस्तित्वांत नव्हतीं; त्यामुळें त्या वेळच्या प्रवासाच्या अडचणींना पारावर नसे. आणि प्रवाश्यांच्या ज्या गैरसोयी, त्या त्या वेळच्या चोरांच्या सोयी असत. त्या वेळीं हिंदुस्थानामध्यें निरनिराळ्या प्रकारच्या चोरांचा अतिशय सुळसुळाट झालेला होता. आणि त्या सगळ्यांमध्यें ठग लोकांच्या टोळ्या अतिशय भयंकर असत. कोणी श्रीमंत वाटसरू प्रवासामध्यें आढळले, म्हणजे त्यांच्या पाळतीवर असावयाचें, त्यांच्या सोबतीसंगतीनें म्हणून प्रवास करण्याचा बहाणा करावयाचा, आणि कोठें तरी संधि सापडली म्हणजे त्यांना मारून त्यांची चीजवस्तु लुटून न्यावयाची, हा त्यांचा नेहमींचा क्रम असे. हल्लींच्याप्रमाणें जेथें जावें तेथें लहान लहान गांवांतूनसुद्धां मनिऑर्डरीनें किंवा हुंडीनें पैसे मिळण्याची त्या वेळीं सोय नसल्याकारणानें आपल्या लांबलांबच्या प्रवासाला लागणारी सर्व रोकड रक्कम प्रवाश्यांना आपल्याजवळ बाळगावी लागत असे. म्हणून दुसरा कांहीं ऐवज मिळाला नाहीं, तरी निदान वाटखर्चाची रक्कम तरी आपल्याला प्रवाशांपासून मिळालीच पाहिजे, अशी वाटमाऱ्यांना खात्री असे. आणि शिवाय या वाटमाऱ्या ठग लोकांनीं एखाद्या प्रवाश्याला लुटलें आणि मारलें, तरी त्याबद्दलची बातमीही कोणाला समजण्याला मार्ग नसे. कारण पत्राची किंवा तारेची ताबडतोब वर्दी देणारी सोय त्या वेळीं नसल्याकारणानें प्रवासी वाट चालत आहेत, का लुटले आणि मारले गेले आहेत, हें समजण्याला त्यांच्या घरच्या माणसांना कांहीं साधन नसे. त्यामुळें या ठग लोकांची फार चांगली सोय झाली होती. या लोकांचें मुख्य ठिकाण म्हटलें म्हणजे विंध्याचलाचे डोंगर, खोरीं, जंगलें, हें होतें. ते दुसरीकडे कोठें जात नसत असें नाहीं. उत्तरेकडे राजपुताना, माळवा, बुंदेलखंद, गंगथडी, बनारस व दक्षिणेकडे ब्ऱ्हाणपूर, नागपूर, उमरावती, हैदराबाद वगैरे अनेक ठिकाणीं त्यांचा सुळसुळाट असेच. पण त्यांचें मुख्य माहेरघर म्हटलें म्हणजे हिंदुस्थानच्या मध्यभागीं पूर्व-

पश्चिम पसरलेला विंध्य पर्वत हें होय. या आसऱ्याच्या जागीं राहून हे ठग लोक हजारों प्रवाश्यांना त्या वेळीं लुटीत आणि मारीत असत. त्यांच्या क्रूरपणाचीं कृत्यें हल्लीं वाचून आणि ऐकूनही अंगावर रोमांच उभे राहतात.

अशा प्रकारच्या ठग लोकांच्या एका टोळीच्या तावडीमध्यें भय्यासाहेब, त्यांचे कुटुंब, त्यांचे नोकर, वगैरे मंडळी आपल्या प्रवासांत एकदां सांपडली. त्या वेळीं जंगलांतून आणि डोंगरांतून एकेकट्यानें प्रवास करण्याची सोयच नव्हती. चोरांच्या भीतीमुळें बरेच निरनिराळे वाटसरू एकत्र जमा होऊन मग ते अडचणीच्या आणि धोक्याच्या वाटेंतून प्रवास करीत असत. सागरचा मुक्काम सोडून कांहीं मजला गेल्यानंतर त्यांना त्यांच्या सोबतीला म्हणून दुसरे कांहीं वाटसरू येऊन मिळाले. हे वाटसरू म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून, करीमबक्ष आणि त्याच्या टोळींतील इतर ठग लोक हेच होते. "आम्हांला व्यापारासाठीं जबलपूरला जावयाचें आहे, आमच्याजवळ थोडाबहुत ऐवज आहे, त्यामुळें आम्हांला चोरांची फार भीति वाटत आहे. आम्हांला कोणाच्या तरी सोबतीची फार जरूरी आहे, तुमच्याजवळ हत्यारबंद शिपाईप्यादे आहेत. तुम्ही आम्हांला या पुढल्या डोंगरांतून आणि जंगलांतून संभाळून नेलें तर आम्ही तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं!" वगैरे अनेक प्रकारच्या गोड गोड थापांनीं करीमबक्षानें भय्यासाहेबांच्या मनामध्यें आपल्या आणि आपल्या सोबत्यांबद्दल विश्वास उत्पन्न केला. भय्यासाहेब शूर, दिलदार आणि परोपकारी होते. आणि त्यांच्या पत्नी गंगाबाई यांचें अंतःकरण तर प्रत्यक्ष गंगेप्रमाणें निर्मळ आणि निष्पाप होतें. आपल्यापासून यांचें संरक्षण आणि कल्याण होत आहे तर आपण कां करूं नये, अशा खुल्या अंतःकरणानें भय्यासाहेब आणि गंगाबाई यांनीं त्या वाटसरूंना आपल्याबरोबर प्रवास करण्याची मोठ्या आनंदानें परवानगी दिली. आणि त्यानंतर दोन चार दिवसांच्या आंतच त्या ठगांनीं आपला पराक्रम गाजविला! धोतऱ्याच्या बियांची पूड अन्नांत कालवून देण्याची नकळत व्यवस्था करून त्यांनीं भय्यासाहेब आणि गंगाबाई यांना एके रात्रीं बेशुद्ध पाडलें. त्या धोतरांच्या बियांचा अम्मल गंगाबाईच्या शरीरावर अतिशयच झाला; परंतु भय्यासाहेबांच्यावर तितका परिणाम झालेला नव्हता. ते अर्धवट शुद्धींत होते. त्या अर्धवट शुद्धींत असतांना त्या दिवशीं मध्यान् रात्रीच्या सुमाराला आपल्या नोकरांपैकीं एकाची करुणस्वराची किंकाळी त्यांनीं ऐकिली. त्या नोकरांनाही धोतऱ्याचा रस चारण्यांत

आलेला होता. आणि तशा स्थितींत त्यांना जवळच जंगलांत उचलून नेऊन त्यांच्या गळ्याभोंवतीं रुमाल टाकून त्यांना ठार मारण्याचा प्रयत्न करण्यांत येत होता. ते नोकर एकंदर चौघेजण होते व ते मारले गेले म्हणजे त्यांना पुरून टाकण्याकरितां जवळच खड्डे खणून तयार करून ठेवण्यात आलेले होते. हे खड्डे एकंदर सहा होते. त्या चार नोकरांना गळे दाबून मारण्याचा प्रयत्न चालला असतां, गळयाला रुमालाचा फास बसल्याबरोबर तिघेजण तर ताबडतोबच गतप्राण झाले. परंतु चौथा शरीरानें मजबूत होता व त्याच्यावर धोतऱ्याचा रसाचा फारसा परिणाम झालेला नव्हता. त्यामुळें हे आपले वाटेचे सोबती,--पण खरोखरीचे वाटमारे ठग,--काय करीत आहेत, याचा त्याला बरोबर कल्पना आली. आतां आपण यांच्या तावडींतून आपण स्वतः सुटणें जरी शक्य नाहीं, तरी या संकटाची इशारत आपल्या धन्याला पोंचावी, अशा दूरदृष्टीच्या कृतज्ञतेनें त्या चौथ्या नोकरानें एक अतिशय मोठ्यानें किंकाळी फोडली. मध्यान् रात्रीच्या सुमाराला भय्यासाहेबांना जी किंकाळी ऐकूं आली म्हणून वर सांगितलें आहे, ती हीच होती. त्यांनीं आपल्या नोकराचा शब्द ओळखला. धोतऱ्याच्या परिणामानें त्यांचे हातपाय लटलट कांपत होते, तरी ते आपली तरवार उपसून उठले व जिकडून आपल्या नोकराची आरोळी त्यांना ऐकूं आली होती तिकडे ते तडक निघाले. परंतु आपल्या नोकराच्या मदतीला ताबडतोब धावून जाणें, ही गोष्ट त्यांना अप्रतिबद्ध रीतीनें करतां येण्यासारखी होती असें नाहीं. त्या ठगांनीं फारच चांगला बंदोबस्त केला होता. त्यांच्यापैकी कांहीं लोक खड्डे खणण्याला गुंतले होते. बाकीचे कांहीं लोक त्या चार नोकरांच्या तोंडांत बोळे भरून बेशुद्ध स्थितींत त्यांना जंगलांत उचलून नेऊन रुमालानें त्यांचे गळे दाबून मारण्यांत गुंतलेले होते, आणि या नोकरांना मारून झाल्यानंतर मग भय्यासाहेबांचा समाचार घेण्याचा त्यांचा विचार होता. गंगाबाई ही बायकोमनुष्य असल्यामुळें तिला ठार मारण्याचा प्रसंग आपल्यावर येऊं नये म्हणून तिला त्यांनीं धोतऱ्याचा रस जास्त प्रमाणांत चारला होता. भय्यासाहेबांना मारल्यानंतर गंगाबाईच्या अंगावरील व जवळील सर्व दागदागिने व भय्यासाहेबांच्या जवळील सर्व चीजवस्त लुटून नेण्याचा त्यांचा बेत ठरलेला होता. अशा प्रकारचा बेत ठरवून नोकरांना ठार मारीपर्यंत त्या कामांत काहीं अडथळा येऊं नये, म्हणून एकेक ठग भय्यासाहेब आणि गंगाबाई हीं जेथें निजलीं होतीं तेथें जवळच पहारा करीत बसलेला

होता. तिकडे चौथ्या नोकरानें साधारण शुद्धीवर येऊन आपल्या शक्तीच्या जोरावर त्या ठग लोकांशीं लढाई सुरू केली आणि आपल्या तोंडांतील बोळा काढून त्यानें मोठ्यांदा आरोळी दिली. ती आरोळी ऐकून भय्यासाहेब उठतांक्षणींच त्यांच्यावर पहारा करीत असलेला चोर पुढें सरसावला; तेव्हां या सगळ्या परिस्थितीचा खरा अर्थ काय, हें भय्यासाहेबांच्या लक्षांत आलें. ते अतिशय वेगानें आपल्या नोकराच्या संरक्षणासाठीं चालले असतां, त्यांच्यावर पहारा करणाऱ्या ठगानें त्यांना अडवलें; परंतु चवताळलेला वाघ एखाद्या कुत्र्याच्या अडवण्यानें कधींही अडवला जाणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें त्या वेळीं भय्यासाहेबांची स्थिति होती. भय्यासाहेबांनीं आपल्या पट्ट्याच्या एकाच घावानें त्या ठगाला यमलोकीं पाठवून दिलें, व थोड्याच क्षणांमध्यें ती आरोळी जेथून आली होती त्या ठिकाणीं ते येऊन दाखल झाले. ते इतक्या लवकर आले, तरी पण आपला इमानी नोकर जवानसिंग याचे प्राण वांचविण्यासाठीं येण्याला त्यांना उशीरच झाला. ते येण्याच्या पूर्वींच करीमबक्षाचा रुमाल जवानसिंगाच्या गळ्याभोवतीं पडून त्याचे पंचप्राण स्वर्गलोकाची वाट चालूं देखील लागले होते! तें पाहून भय्यासाहेबांचा क्रोध अनावर झाला व त्यांनीं आपल्या पट्ट्याचा हात इतक्या सफाईनें आणि जलदीनें चालूं केला कीं, ते एकटे असूनही त्यांच्यापुढें टिकाव धरण्याची त्या ठगांपैकीं एकाचीही छाती होईना. तेव्हां अखेरीस आपापला जीव बचावण्यासाठीं ते सगळे पळून गेले. फक्त गंगाबाईच्या जवळ जो ठग दबा धरून बसला होता, तोच काय तो मागें शिल्लक राहिला होता. भय्यासाहेब आपल्या नोकराची आरोळी ऐकून उठून गेलेले पाहून, आणि तिकडे कांहीं तरी गडबड चाललेली असली पाहिजे, असें त्यावरून ताडून, त्यानें गंगाबाईच्या अंगावरील दागदागिने व त्यांच्या आसपासची इतर सर्व चीजवस्त गोळा करण्याला सुरुवात केली. इकडे त्या बाकीच्या चोरांना पळवून लावून भय्यासाहेबांनीं आपले जे चारी नोकर मरून पडले होते, त्यांच्या कुडींत प्राण राहिलेला नाहीं असें पाहून दुःखाचे सुस्कारे टाकले! त्यांनीं आपल्या आसपास शून्य दृष्टीनें पाहिलें तों एका बाजूला जवळच चांदण्याच्या अंधुक प्रकाशामध्यें सहा खड्डे खणलेले त्यांच्या दृष्टीस पडले. ते पाहून त्यांच्या अंतःकरणामध्यें अतिशय भीति उत्पन्न झाली! हे सहा खड्डे ठगांनीं कोणाकोणाकरितां तयार केले होते, याची स्पष्ट कल्पना त्यांच्या डोळ्यांपुढें उभी राहिली. आणि आपण इकडे आलों असतां पाठीमागें तिकडे धर्म-

शाळेमध्यें आपल्या प्रियपत्नीची काय वाट झाली असेल, याविषयीं त्यांच्या मनामध्यें अत्यंत भय उत्पन्न होऊन, ते त्याच पावलीं माघारी वळले. गंगाबाईच्या अंगावरील दागदागिने काढून घेणाऱ्या चोराचें बाकीची चीजवस्त गोळा करण्याचें बहुतेक काम संपलें होतें व तोही आतां पळून जाण्याच्या बेतांत होता. इतक्यांत भय्यासाहेब परत येत असलेले त्यानें पाहिले. भय्यासाहेबांवर पाळत ठेवून, त्यांना अडथळा करणाऱ्या आपल्या सोबत्याची त्यांनीं एका घावामध्येंच कशी दशा करून सोडली होती, तें त्यानें थोड्या वेळापूर्वी प्रत्यक्ष पाहिलें होतें; म्हणून भय्यासाहेबांशीं तोंड न देतां जवळच कोठें तरी दडून बसून संधि सांपडल्याबरोबर नजर चुकवून पळून जाण्याचा त्यानें बेत ठरविला. इतक्यांत गंगाबाई जेथें निजलेल्या होत्या तेथें भय्यासाहेब येउन पोंचले, परंतु त्यांच्या मनामध्यें परत येतांना पावलोपावलीं जी भीति वृद्धिंगत होत होती ती भीति अगदीं तंतोतंत खरी झालेली त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली. गंगाबाईचें सगळें अंग गार पडलेलें होतें ! भय्यासाहेबांनीं त्यांचे डोळे उघडून पाहण्याचा प्रयत्न केला; परंतु गंगाबाईच्या तारवटलेल्या दृष्टीनें त्यांची निराशा केली ! त्यांनीं त्यांच्या नाकाशीं हात लावून पाहिलें; परंतु मंददेखील श्वासोच्छ्वास चालू असलेला त्यांना दिसला नाहीं ! त्यांनीं गंगाबाईच्या हृदयावर हात ठेवून कांहीं आशेचीं चिन्हें आहेत काय म्हणून पाहण्याचा प्रयत्न केला; परंतु तेथेंही त्यांची निराशाच झाली. आणि हातपायांच्या नाड्याही अगदीं बंद पडलेल्या त्यांना आढळून आल्या, तेव्हां तर त्यांच्या आशेचा अगदीं शेवटच झाला ! गंगाबाईच्या अंगावरचे सर्व दागदागिने काढून नेल्याचेंही त्यांनीं पाहिलें; परंतु त्याबद्दल त्यांना बिलकूल वाईट वाटलें नाहीं. त्यांनीं तसले आणखी दहाहजार दागिने आपल्या बायकोच्या अंगावरून ओवाळून टाकले असते; परंतु सगळ्या दागिन्यांचा दागिना जो शरिरांतील प्राण, तो दुष्ट आणि निर्दय चोरांनीं विनाकारण चोरून घेतला, याबद्दल भय्यासाहेबांना अनावर दुःख झालें व आपल्या बायकोच्या मानेवर मान टाकून, ते मर्द होते तरी, एखाद्या बायकोसारखे ढळढळां रडूं लागले. भय्यासाहेब रडण्यांत गुंतले आहेत, ही संधि चांगली आहे, असें पाहून तेथें जवळच दडून बसलेला ठग पळून जाऊं लागला. त्याची चाहूल ऐकून भय्यासाहेबांनीं कानोसा घेतला, तों तेथून कोणी तरी पळून जात असलेला त्यांना दिसला. याच अधमानें आपल्या प्रियपत्नीचे प्राण हरण केले असले पाहिजेत, अशी कल्पना मनामध्यें

येऊन भय्यासाहेब आपल्या हातामध्यें आपली तरवार घेऊन उठले, व रागाच्या आवेशांत आणि सूड घेण्याच्या भरांत आपल्या बायकोला तेथेंच टाकून ते त्या चोराचा पाठलाग करीत पुष्कळ दूरवर गेले.

चोर पुढें पळत आहे व भय्यासाहेब त्याच्या पाठीमागून धांवत आहेत, अशी धांवपळ आणि धरपकड पुष्कळ वेळपर्यंत चालली होती; परंतु या रीतीनें बरेच कोसपर्यंत पाठलाग चालला, तरी तो ठग भय्यासाहेबांच्या हातीं दुर्दैवानें सांपडला नाहीं; आणि भय्यासाहेब मात्र धावून धावून अगदीं थकून गेले. धोतऱ्याच्या पुडीनें आधींच त्यांचें डोकें भ्रमिष्ट झालेलें होतें, आणि त्यांतच त्या रात्रीच्या या भयंकर प्रकाराची भर पडली होती. अशा स्थितींत कित्येक कोसपर्यंत धांवून धांवून ते थकले, तर त्यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं. पाठलाग करतां करतां तो ठग रात्रीच्या काळोखांत कोठें दिसेनासा झाला; वाटेंत पाण्याचा एक ओढा मात्र भय्यासाहेबांना दुरून दिसूं लागला. त्या ओढ्याचें पाणी पिऊन पहाटेच्या प्रहरीं थोडी विश्रांति घेण्याकरितां म्हणून ते त्या ओढ्याच्या वाळवंटामध्यें क्षणभर पडले असतां, अतिशय थकल्यामुळें त्यांना इतकी गाढ झोंप लागली कीं, मध्यंतरीं त्यांचीं काय काय स्थित्यंतरें झालीं याचीही त्यांना शुद्ध राहिली नाहीं.

दुसरे दिवशीं ते जेव्हां जागे झाले तेव्हां त्यांना असें आढळून आलें कीं, आपले हातपाय जखडून बांधण्यांत आलेले आहेत. आपण कैद केले गेलेले आहों, आपल्याला एका उंटाच्या पाठीवर घालून घट्ट आवळण्यांत आलेलें आहे, आपल्याभोंवतीं नागव्या तरवारींचा पहारा आहे आणि आपल्यासह आपले पहारेकरी एका किर्र झाडीच्या डोंगराळ प्रदेशामधून जलदीनें कूच करीत आहेत !

• • •

: : ## रांग सातवी

भय्यासाहेबांच्या पट्ट्याच्या सफाईमुळें व हातचलाखीमुळें पूर्वी पराभव पावून पांगलेले ठग लोक फिरून एकत्र झाले व ते भय्यासाहेबांचा शोध काढीत चालले असतां वरील ओढ्याच्या कांठीं थकून निजलेले भय्यासाहेब त्यांना आढळले. त्या वेळीं त्यांना गळा दाबून ठार मारून टाकावें किंवा इतका शूर मनुष्य विनाकारण यमसदनाला न पाठवितां आपल्या टोळींत तो सामील झाल्यास प्रयत्न करून पहावा, अशाविषयीं त्यांच्यामध्यें कांहीं वेळ वादविवाद होऊन अखेरीस त्याला हातपाय बांधून आपल्या मुख्य छावणीमध्यें नेण्याचें त्यांनीं ठरविलें, व त्याप्रमाणें ते त्याला घेऊन चालले होते, हें वरच्या रांगेच्या शेवटीं सांगितलेलेंच आहे. बऱ्याच प्रवासानंतर ती टोळी आपल्या मुख्य छावणीच्या जागीं येऊन पोंचली. तेथें आल्यानंतर भय्यासाहेबांना भय्याखान असें नांव देण्यांत आलें व त्यांना ठार न मारतां तेथें जिवंत आणण्यामध्यें आपला किती उदारपणाचा हेतु आहे व त्या हेतूप्रमाणें भय्याखान वागल्यास त्याच्या अंगच्या पराक्रमाचें कसें चीज होणार आहे, वगैरे गोष्टी भय्याखानाला समजून सांगण्यांत आल्या; परंतु आपण ठग आणि चोर होण्याची कल्पना त्यानें साफ नाकारली; परंतु कांहीं दिवसांनीं कदाचित् त्याचें मन वळेल, अशा आशेवर त्यांनीं त्याला दररोज थोडेसें खावयाला देऊन छावणीजवळच्या एका झाडाला बांधून ठेवण्याचें ठरविलें. त्या बंदिवासाच्या स्थितीमध्यें असतांना हे ठग काय बेत करितात, त्यांच्या हालचाली कशा चालतात, हे छापे घालावयाला कसे जातात, त्यांच्या लुटींत त्यांना काय काय सांपडतें व तें ते कोठें ठेवतात आणि त्याची वांटणी कशी करितात, वगैरेसंबंधानें भय्याखानाला सर्व माहिती कळत असे. त्यावरून त्यांचा जो क्रूरपणा दिसून येई, त्यावरून त्यांच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याचें तात्पुरतें कबूल केल्यावांचून यांच्या हातून

जिवंतपणें आपली सुटका व्हावयाची नाहीं, अशी भय्याखानाची खात्री होऊन, त्यानें कांहीं दिवसांनीं त्या ठगांच्या म्हणण्याला बाह्यात्कारीं रुकार दिला, व अशा रीतीनें त्यानें आपले बांधलेले हातपाय मोकळे करून घेतले. त्यानंतर पुढें कांहीं दिवसांनीं तो त्या दुष्ट लोकांच्या कचाटींतून निसटून कसा बाहेर पडला याबद्दलची सर्व माहिती वाचकांना आतांपर्यंत मिळालेलीच आहे.

भय्याखान म्हणजे आपल्या कथानकांतील भय्यासाहेब अगर भाऊसाहेब. हे त्या ठग लोकांच्या छावणीमधून निघून बऱ्याच दूरवरच्या एका डोंगराच्या गुहेमध्यें येऊन राहिल्याचें वर्तमान या कथानकांतील पहिल्या रांगेच्या शेवटीं वर्णन करण्यांत आलेलें आहे. भाऊसाहेब हे त्या ठगांच्या छावणींतून निसटून आले खरे; परंतु तो क्रूरकर्म करीमबक्ष आणि त्याचे ते बिनहृदयाचे साथीदार हे आपल्याला कोठें गांठतील आणि कोठें आपला प्राण घेतील, ह्याबद्दल त्यांना एकसारखी दहशत वाटत होती. म्हणून आपला मागमूस त्या ठगांना कांहीं एक लागूं नये, या इरायानें त्यांनीं त्या डोंगरांत आणि त्या गुहेंत कांहीं दिवस कायमचा मुक्काम करण्याचें व तेथून न हलण्याचें ठरविलें. ठगांच्या छावणींत असतांना त्यांना आपल्या प्रियपत्नीच्या दुर्दशेची दिवसांतून दहा वेळां आठवण होत असली, तर आतां या नवीन डोंगरांत आल्यापासून त्या अपघाताच्या ठिकाणीं आपण समक्ष जावें आणि आपल्या प्रियेची पुढें काय स्थिति झाली हें पहावें असे विचार त्यांच्या मनांमध्यें दिवसांतून शंभर वेळां येऊं लागले; परंतु हा आपल्या मनाचा उतावीळपणा ते वरच्यावर आवरून धरीत असत.

ते आपल्या मनाशीं असें म्हणत असत कीं, ‘ मी त्या ठगांच्या हातावर तुरी देऊन तेथून निघून आलों आहे, या गोष्टीचा ते सूड घेतल्यावांचून कधींही राहणार नाहींत. ते मला पकडण्यासाठीं जागोजागीं दबा धरून बसले असतील. मी जेथें जेथें जाण्याचा संभव आहे, तेथें तेथें त्यांनीं गुप्त टेहळगी आणि गुप्त चौकीपहारे ठेविलेले असतील. आणि जेथें त्यांनीं आम्हांला लुटलें, तेथें मी पहिल्यानें आपल्या बायकोच्या तपासाकरितां खात्रीनें जाईन, अशी अटकळ बांधून तो करीमबक्ष एखाद्या वाघासारखा मला खाण्याकरितां तेथें आपला जबडा पसरून बसला असेल. त्याच्या तोंडांत मी आयताच जाऊन पडणें हें कधींही शहाणपणाचें होणार नाहीं. जी गोष्ट आपण करावी म्हणून आपला शत्रू इच्छित असतो, ती गोष्ट करावयाची टाळणें हें मनुष्याचें पहिलें कर्तव्यकर्म आहे. शत्रूच्या मनाप्रमाणें

वागणें ही मूर्खपणाची कमाल होय आणि शत्रूचा मनोभंग करणें यांतच मनुष्याचें सगळें शहाणपण आहे. शत्रू आपल्याकरितां जे खड्डे खणून ठेवितो, त्यांत आपणच होऊन जाऊन पडणें, हें डोळस माणसाच्या आंधळेपणाचें लक्षण आहे. तेव्हां करीमबक्षानें ज्या गांवीं, ज्या जंगलांत आणि ज्या धर्मशाळेंत आम्हांला लुटलें आणि मारिलें, त्या ठिकाणीं मी आपल्या प्रियेचा तपास करण्याकरितां इतक्या तावडतोबीनें मुद्दामच जाणार नाहीं !'

हे विचार भाऊसाहेबांच्या मनामध्यें येत होते आणि त्यांचा त्या चोरीच्या जागीं न जाण्याचा निश्चय ठरत होता, त्या वेळीं त्या डोंगराच्या निर्जन प्रदेशामध्यें दुसरें कोणीहि तेथें त्यांच्या जवळपास नसतांना त्यांना मध्येंच असा भास झाला कीं, आपल्याला उद्देशून या वेळीं कोणी तरी कांहीं तरी शब्द बोलत आहे; म्हणून त्यांनीं डोळे मिटून आणि चित्त स्थिर करून ऐकण्याचा प्रयत्न केला, तेव्हां पुढील शब्द ऐकूं आल्याचा त्यांना भास झालाः—

'काय प्रिया ! तुम्ही काय म्हणतां ? मीं आपल्या प्रियेचा तपास करण्याकरितां इतक्या तावडतोबीनें मुद्दामच जाणार नाहीं ? असे शब्द तुमच्या तोंडांतून निघत आहेत तरी कसे ! तुम्ही इतक्यांत इतके निष्ठुर कसे झालां ! तुम्ही इतके दिवस त्या ठगांच्या अटकेंत होतां, तोंपर्यंत तुम्हांला माझी वास्तपुस्त घेतां आली नाहीं, हें खरें आहे; पण आतां तेथून सुटल्यावर देखील मी आपल्या प्रियेचा तपास करण्याकरितां मुद्दाम तिकडे जाणार नाहीं असें म्हणतां हें मोठें आश्चर्य आहे !'

हे शब्द भाऊसाहेबांनीं ऐकले तर खरे; पण हे शब्द बोलावयाला तर येथें कोणीच नव्हतें ! त्या डोंगरांत तेथें दुसरें कोण असणार ? मग हे शब्द कोणीं उच्चारिले ? असे अनेक प्रश्न भाऊसाहेबांच्या मनामध्यें उद्भवून त्यांचें मन अगदीं गोंधळून गेलें; व आपली प्रिया कोठून तरी अंतरिक्षांतून आपल्या मनःसामर्थ्यानें आपल्याला बोलावीत असली पाहिजे, आणि त्या तिच्या दीन आणि करुण स्वराच्या विलापांचे प्रतिध्वनि आपल्या अंतःकरणाच्या यंत्रपुटावर पुसट पुसट रीतीनें उमटत असावेत, असा त्यांनीं तर्क बांधिला. अंतराळांतून जर तिचे विचार आपल्याला ऐकूं येतात, तर ती कोणत्याही अज्ञातस्थळीं असली आणि ती आपल्यापासून कितीहि दूर अंतरावर असली, तरी आपल्या प्रेमळ आणि निष्पाप अंतःकरणाचे विचार तिच्याही त्या प्रेमळ आणि निष्पाप अंतःकरणाच्या आरशामध्यें प्रतिबिंबित झालेच पाहिजेत, अशा भावनेनें इकडे तिकडे फिरत

असतां चालतां चालतां त्या पर्वताच्या शिखरावर येऊन उभे राहिलेल्या भाऊसाहेबांच्या तोंडून पुढील करुणरसाचे उद्गार निघाले:—

'प्रिये, मी तुझा गुन्हेगार आहें! तूं मला क्षमा कर! मीं अटकेंतून सुटल्याबरोबर पहिल्यानें तुझ्याकडे यावयाला पाहिजे होतें आणि तुझा शोध करावयाला पाहिजे होता! तुझी काय दशा झाली असेल, याचा विचार करावयाचा सोडून मी तेथें आलों तर माझी काय दशा होईल, याच विवंचनेमध्यें मी गुरफटून गेलों! जो करीमबक्ष मला धरण्यासाठीं तेथें टपून बसला असेल, त्या माझ्या शत्रूचा आशाभंग करण्यांतच माझा मोठा शहाणपणा आहे, अशी मी आपल्या मनाची भलतीच फसवणूक करून घेत असतां, आपल्या प्रियतमेचा आशाभंग करण्यांत किती मोठा वेडेपणा आहे, याची कल्पनाही माझ्या मनाला शिवली नाहीं. ह्याबद्दल, हे प्रियतमे, तूं मला क्षमा कर! तुझा शोध करण्याकरितां आणि तुला भेटण्याकरितां येऊन तेथें करीमबक्षाच्या स्वरूपानें प्रत्यक्ष मृत्यूनें मला गांठलें, तरी त्यांत काय वाईट आहे! तुझ्यापासून दूर राहून मी जगलों, आणि तुझ्यासन्निध येऊन मी मरण पावलों, तर तसल्या जिवंत राहण्यापेक्षां तुझ्याप्रीत्यर्थ मला मरण आलेलेंच जास्त चांगलें! प्रिये, पहा, झाला माझा निश्चय; थांब, हा पहा मी आलों तुझ्या शोधाकरितां आणि संरक्षणाकरितां!'

हे शब्द भाऊसाहेबांच्या तोंडून निघत असतांना प्रेमातिरेकाच्या कळवळ्यानें त्यांचें देहभान अगदीं नाहींसें झाल्यासारखें दिसत होतें. त्यांच्या सर्व अंगावर रोमांच उभे राहिले होते. त्यांचा कंठ दाटून आला होता, आणि त्यांचे डोळे पाण्यानें भरले होते. त्यांना वस्तुस्थितीचा पूर्ण विसर पडला होता आणि आपल्या पत्नीच्या प्रेमरसाच्या कारुण्याचा पूर्ण ताबा त्यांच्या मनावर बसला होता 'थांब, हा पहा मी आलों तुझ्या शोधाकरितां आणि संरक्षणाकरितां!' हे वरील भाषणांतील शेवटचे शब्द उच्चारतांना तर आपल्याला जणुं काय एखाद्या पांखराप्रमाणें पंख असून आपण हवेंतून उडून जाण्याचीच तयारी करीत आहों कीं काय, इतकी त्यांची चित्तवृत्ति उत्सुक झाली होती. ते ज्या पर्वताग्रावर त्या वेळीं उभे होते त्याच्याखालीं जर एकादा खोल कडा तुटलेला असता, तर त्यांत देखील त्या आवेशाच्या भरांत उडी घेण्याला त्यांनीं कमी केलें नसतें. त्याप्रमाणें आकाशांत

कोठें तरी भासमान होत असलेल्या आपल्या प्रियेकडे तटस्थ दृष्टि लावून खाली जमिनीकडे न पाहतां त्यांनीं एक दोन पावलें पुढे टाकलींही; परंतु त्याचा परिणाम असा झाला कीं त्यांचा एक पाय एका खळग्यांत जाऊन ते तेथें खालीं पडले.

त्या पडण्याच्या आघातानें ते फिरून शुद्धीवर आले. त्यांच्या डोळ्यांपुढे जें स्वप्न दिसूं लागण्याला सुरुवात झाली होती, तें सगळें स्वप्न मावळलें. आणि त्यांच्या सभोंवतालची ती निष्ठुर परिस्थिति त्यांना फिरून आपलें वास्तविक स्वरूप जाणवूं लागली. ते ज्या खळग्यांत पडले होते, तेथून उठून आपला पाय चोळीत चोळीत आणि आपले अश्रु पुशीत पुशीत त्या पर्वताच्या अग्रभागीं बसून त्यांनीं पुढील उद्गार काढले:—

' प्रिये, काय हें तुझ्या प्रेमाचें सामर्थ्य ? तें प्रेम आज अजीबात अस्तित्वांत नसूनही त्यानें माझ्या ठिकाणीं इतका सत्य आणि सात्त्विक आभास इतक्या हुबेहूब रीतीनें उत्पन्न केला ! अशा त्या प्रेमाला त्रिकाळ धन्यवाद असो ! पण प्रिये, तुझ्या गतकालीन प्रेमानें मला इतक्या निष्ठुरतेनें फसवून त्यांत त्यानें काय बरें मिळविलें ! प्रिये, मी तुला कोठें शोधूं आणि कोणापासून मी तुझें संरक्षण करूं ! हा मर्त्य प्राणी आपल्या आप्तइष्टांना शोधण्याकरितां या सजीव देहानें पर-लोकामध्यें जाऊं शकतो काय ? किंवा मृत्यूपासून तो आपल्या प्रिय माणसांचें संरक्षण करूं शकतो काय ? तसें नाहीं तर मी आतां तुला काय शोधूं आणि तुझें काय संरक्षण करूं ! तुझे हातपाय गार पडलेले माझ्या या अधम हातांनीं पाहिले. तुझ्या डोळ्यांचीं बुबुळें तारवटून उलटीं फिरलेलीं, या माझ्या अश्रूंनीं भरलेल्या डोळ्यांनीं मीं पाहिलीं. तुझ्या जीविताविषयींच्या साशंक भीतीनें धडधड उडत असलेला हा माझा हात त्या वेळीं मी तुझ्या छातीवर ठेवून पाहिला; पण तेव्हां माझा हातच उडत होता, तुझी छाती यत्किंचितही उडत नव्हती ! मीं तुझी बंद पडलेली नाडी पाहिली, मीं तुझा काळवंडलेला चेहरा पाहिला, मीं तुझे सुकून गेलेले ओठ पाहिले, आणि त्या सगळ्यांनीं मला त्या वेळीं काय सांगितलें ? आणि आतां मी तुझें काय संरक्षण करूं ! ज्या वेळीं त्या दुष्ट ठगांनीं तुझा गळा दाबून तुझा प्राण घेतला असेल, त्या वेळीं खरोखर मी तुझ्या संरक्षणाला धांवून याव-याला पाहिजे होतें ! परंतु त्या वेळीं मी आपल्या नोकराच्या हांकेसरसा त्याच्या

संरक्षणाला गेलों. त्याच संधींत तुझ्यावर इकडे असें संकट ओढवेल, ही कल्पना माझ्या मूढाच्या मनामध्यें आली नाहीं. नाहीं तर मी तुला टाकून तिकडे कधींही गेलों नसतों! ते दुष्ट यमदूतासारखे काळस्वरूपी ठग तुझा घात करण्याला उद्युक्त होत असतील, त्या वेळीं तुझें संरक्षण करण्याला मी धांवून यावयाला पाहिजे होतें! ती वेळ निघून गेल्यानंतर आतां मी भ्रमाच्या भरामध्यें पुष्कळ धावलों आणि धावतां धावतां एखाद्या खड्डयामध्यें पडलोंही, तरी त्याचा आतां तुला काय उपयोग आहे! तुझ्या संरक्षणाची वेळ आतां निःसंशय निघून गेलेली आहे! आतां फक्त तुझा शोध काढण्याचेंच काम माझ्या हातून व्हावयाचें शिल्लक राहिलेलें आहे. त्याकरितां हा देह टाकून तुला शोधण्यासाठीं मला परलोकांतच आलें पाहिजे! परंतु हे माझ्या पवित्र गंगे, तेथेंही मला एक अडचण आहे! तं खरो-खरीच पवित्र गंगा होतीस! हे गंगे, तूं स्वर्गातून आली होतीस आणि आतांही तूं तेथेंच गेली असशील! पण मी अधम, नीच, पापी आणि पातकी! माझा तुझ्या त्या पवित्र स्वर्गलोकामध्यें रिघाव कसा होणार! तरी पण मी हा देह टाकून त्याच्या मार्गाला तरी लागण्याचा प्रयत्न करून स्वर्गाच्या आंत पाऊल न टाकतां येथील दरवाजाच्या बाहेर तुझी वाट पहात उभा राहतों! तेथें एक क्षणभर येऊन तूं मला दर्शन दे!'

असें म्हणून भाऊसाहेब त्या पर्वताच्या शिरोभागीं जेथें बसले होते, तेथेंच ते मूर्च्छा येऊन पडले.

घरांत कोणी असें बेशुद्ध होऊन पडलें, तर त्याचीं मायेचीं माणसें त्याच्या सभोंवतीं धांवून येतात आणि त्याला कांहीं जरूर ते उपचार करितात. पण येथें भाऊसाहेबांच्या मायेचें कोण असणार? ते बिचारे एकटे तेथें बराच वेळ पडून होते. पण अनाथाच्या गाई देव राखीत असतो, या म्हणीमध्यें जो करुणरस भर-लेला आहे, तो पुष्कळ ठिकाणीं प्रत्ययाला येतो. सूर्याच्या आड सहजगत्या एक ढग येऊन त्यानें भाऊसाहेबांच्या मूर्च्छित शरीरावर छत्र धरिलें. त्याप्रमाणें शीतल आणि मंजुळ वाऱ्यानेंही येऊन सुखस्पर्शानें भाऊसाहेबांच्या अंगावरून आपला ममतेचा हात फिरविला. आणि त्या पर्वताग्रावरील वनस्थलीनें त्यांना आपल्या मांडीवर घेतलें असतांना त्यांची ती केविलवाणी स्थिति पाहून वर आकाशांत असलेल्या त्या सजल मेघाचें अंतःकरण दयेनें इतकें द्रवून गेलें कीं, त्याच्या

डोळ्यांतून खळखळ अश्रुधाराच वाहूं लागल्या. त्या उदकबिंदूंच्या सिंचनानें भाऊसाहेब हळुहळू शुद्धीवर आले. त्यांनीं डोळे उघडले, एक दोन जांभया दिल्या, आणि झोपेंतून जागे झाल्याप्रमाणें ते हळूहळू उठून बसले राहिले. त्या वेळीं त्यांची मूर्च्छना गेलेली पाहून त्यांच्या सभोंवतालची ती सर्व सौंदर्यसृष्टि संतोषित आणि हंसतमुख झाली !



: :

# रांग आठवी

मागल्या प्रकरणाच्या शेवटीं भाऊसाहेबांच्या अन्तःकरणवृत्तीच्या संबंधानें ज्या प्रसंगाचें वर्णन करण्यांत आलेलें आहे, तसले प्रसंग अनेक वेळां फिरून फिरून घडून येत असत. भाऊसाहेबांना आपली प्रियपत्नी गंगाबाई हिची आठवण व्हावी, त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागाव्या, त्या अश्रुधारांनीं त्यांच्या झांकलेल्या डोळ्यांपुढेंही एका गंगाबाईच्या शेकडों प्रतिमा जागोजागीं दिसूं लागाव्या, आणि अखेरीस या सगळ्या चित्तक्षोभाचें पर्यवसान मूर्च्छेमध्यें व्हावें, असे प्रकार वारंवार घडून येत असत. तरी पण भाऊसाहेबांनीं त्या डोंगरांतील त्या गुहेमध्येंच आणखी कांहीं दिवस काढण्याचा निश्चय ठरविला. करीमबक्षाच्या भीतीनें त्यांनीं हा निश्चय ठरविला होता, असें मुळींच नसून आतां कोठेंही जाऊन आपल्या प्रिय पत्नीला कितीही शोधिलें, तरी मृत्युमुखांत सांपडलेल्या त्या आपल्या प्रियकरणीचें फिरून दर्शन होणें शक्य नाहीं, या निराशेमुळेंच त्यांनीं त्या अरण्यांत राहण्याचा निश्चय कायम केला होता.

आणि शिवाय अशा उद्विग्न स्थितीमध्यें ते जाणार तरी कोठें? परत आपल्या घरीं झांशीला जावें असें त्यांच्या मनांत येई; परंतु ही कल्पना त्यांच्या मनामध्यें जेव्हां जेव्हां येई, त्या त्या वेळीं त्यांच्या मनाला अतिशय भीति वाटे, आणि त्यांच्या साऱ्या अंगावर रोमांच उभे राहात!

ते म्हणत: " मी घरीं कसा जाऊं! आम्ही दोघें ज्या घरांतून एकदम बाहेर पडलों, त्या घरांत आतां मी एकटाच कसा जाऊं! 'आमच्या वहिनीसाहेब कोठें आहेत?' म्हणून घरांतील सगळीं माणसें मला विचारतील, त्यांना मी काय सांगूं! पण माणसें विचारतील ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं; तर आमच्या घरांतील तिच्या परिचयाच्या सर्व निर्जीव वस्तु देखील मला एकटा आलेला पाहून

'आमच्या वहिनीसाहेब कोठें आहेत ?' असें विचारूं लागतील, त्या बिचाऱ्यांना मी काय सांगूं! ज्यांना बुद्धि आहे अशा सजीव माणसांना एक वेळ कांहीं तरी सांगतां येईल! पण ज्यांना कांहीं समजूत नाहीं अशा त्या निर्जीव वस्तूंची समजूत मी कोणत्या तऱ्हेनें घालूं! मी कितीहि सांगितलें तरी त्यांची समजूत पडावयाची नाहीं. आणि मी जेथें जेथें आणि जेव्हां जेव्हां आढळेन, तेथें तेथें आणि तेव्हां तेव्हां माझ्या प्रियपत्नीवर माझ्याप्रमाणेंच प्रेम करणाऱ्या त्या सगळ्या निर्जीव वस्तु 'आमची मैत्रीण कोठें आहे?' 'आमची धनीण कोठें आहे?' 'आमच्या बाईसाहेब कोठें आहेत?' असे अनेक प्रश्न मला विचारतील! त्या त्यांच्या भडिमारापुढें मी कसा आणि किती टिकाव धरणार! मला बाहेरून यावयाला फारसा उशीर लागला नसतांना देखील अति चिंताग्रस्त मुद्रेनें माझी प्रियसखी आपल्या डाव्या तळहातावर आपला कपोलप्रांत टेकून ज्या खिडकीमध्यें उभी राहून माझी वाट पहात असे, ती खिडकी येथूनही मला दिसत आहे! तिनें मला घरीं परत एकटाच येतांना दुरून पाहिला, म्हणजे ती मला पहिल्यानें अडवील! ती उंचावरची खिडकी माझ्या वाड्यापासून दूर अंतरावरून दिसूं लागली म्हणजे तिच्या फळ्या उघडया असतांना ती खिडकी आपले डोळे वटारून माझ्याकडे जेव्हां रोषानें पाहूं लागेल, तेव्हां माझ्याच्यानें माझ्या घराकडच्या रस्त्यावरसुद्धां एक देखील पाऊल पुढें टाकवणार नाहीं! आपल्या बागेंतील ज्या झाडांना आणि वेलींना तिनें पाणी घालून वाढविलें, तीं तिच्या विरहानें आधींच वाळून गेलेलीं असतील; परंतु आतां तिला बरोबर न आणतां मी एकटाच परत आलों आहे असें पाहून त्या वेली विरहदुःखानें खरोखर करपून जातील! पण त्यांच्यापेक्षां मला तिच्या प्रेमांतील झाडांची फार भीति वाटते! तीं माझ्यावर कडकडूनच पडतील कीं काय असें मला वाटतें! ज्या तुळशीवृंदावनांतील तुळशीची नित्य पूजा करून आणि तिला प्रदक्षिणा घालून ती माझी प्रियसखी आपल्या पतीकरितां दीर्घायुष्य आणि आपल्या स्वतःकरितां केवळ सौभाग्य यांची भक्तियुक्त अन्तःकरणानें याचना करीत असे, त्याची आतां कोणी पूजा करीत नाहीं, आणि त्याच्या भोंवतीं आतां कोणी प्रदक्षिणाहि घालीत नाहीं अशी स्थिति झालेली पाहून त्या शून्य वृंदावनालाही वाईट वाटल्यावांचून राहणार नाहीं! आमच्या घरांतील तिच्या त्या बसण्याउठण्याच्या निरनिराळ्या जागा शून्य आणि रिकाम्या पडलेल्या पाहून मला त्या घरामध्यें एक

क्षणभरही चैन पडणार नाहीं ! तें घर मला अरण्यासारखें भयाण होईल ! त्या घरापेक्षां हें अरण्यच पुष्कळ पटींनीं बरें ! येथें मी कोठेंही फिरलों, तरी पूर्व परिचयाच्या स्मृतींचे विंचू तरी मला येथें कोठें दंश करीत नाहींत ! आम्ही घरांतून दोघें उभयतां कोकणांत जाण्याकरितां निघालों, त्या वेळीं आमच्या घरच्या बायकांनीं माझ्या प्रियपत्नीच्या कपाळीं कुंकू आणि अक्षता लावून आणि मंगलदीपानें तिला ओवाळून तिची खणा-नारळानें ओटी भरून निरोप देतांना तिच्या गरोदरपणाला अनुलक्षून हंसत हंसत असें म्हटलें कीं, ‘ आतां तुम्ही दोघेंजण जात आहां; पण परत येतांना तुम्ही तिघेजण परत या, बरं कां ! ’ या त्यांच्या म्हणण्याप्रमाणें माझ्या प्रियपत्नीनें आपल्या चिमुकल्या बालकासह परत येण्याचें लांबच राहून खुद्द तिचाच पत्ता नाहीं, अशा स्थितींत मी एकट्यानें परत जाऊन त्यांना कोणत्या तोंडानें काय सांगूं ! त्याच्यापेक्षां या अरण्यांतील हीं झाडें बरीं ! माझी एक आवडती बायको होती आणि तिचा आतां नाश झाला आहे, या गोष्टीची येथील पुष्कळ झाडांना अद्यापि वार्ता नाहीं. ज्या कांहीं थोड्या झाडांच्या आणि वेलींच्या खालीं बसून मी आपल्या प्रियतमेबद्दल मनांतल्या मनांत शोक करीत असतों, तेवढ्यांनाच फार झालें तर ही कुणकुण कळलेली असेल. बाकीच्यांना याबद्दल कांहीं माहिती नाहीं. म्हणून माझ्यासारख्या दुःखी माणसानें ह्या झाडांच्यासारख्या अनोळखी लोकांमध्येंच राहणें फार चांगलें ! आम्ही प्रयाणाकरितां दोघेंजण बाहेर पडलों, त्या वेळीं आम्हांला चांगला शकुन झाला ! एक सुवासिनी पाण्याची घागर भरून घेऊन समोरून येत होती; घरांत मागें राहणाऱ्या लोकांना मोठा आनंद झाला, आणि ते सगळेजण म्हणाले कीं, ‘ जा, जा; चांगला शकुन झाला आहे; पाण्याची घागर भरून पुढें येत आहे; वहिनीसाहेबांना खात्रीनें मुलगा होणार; भय्यासाहेब, आतां तुम्ही स्वस्थ अन्तःकरणानें देवाचें नांव घेऊन प्रयाणाला निघा ! ’ त्याप्रमाणें मी देवाचें नांव घेऊन निघालों ! आणि भरलेली घागरही पुढें आली ! पण आतां मला वाटतें कीं, ती सगळी घागर दुःखानेंच कांठोकांठ भरलेली असावी ! शुभ शकुनाप्रमाणें वहिनीसाहेबांना मुलगा व्हावयाचा होता ! पण वेलच जाग्यावर उरली नाहीं, तर तिच्यावर फूल तरी कोठून येणार ! ”

अशा स्थितींत जें घर तें अरण्य आणि जें अरण्य तें घर, असें मनुष्याच्या मनाला वाटलें, तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. आणि भाऊसाहेबांच्या मनाचीही

अशीच स्थिति झालेली होती. त्यामुळें त्यांनीं त्या अरण्यामध्येंच कांहीं दिवस राहण्याचा निश्चय कायम केला.

त्या अरण्यांतील त्या पर्वतशिखरावर भाऊसाहेब वनवासी वृत्तीनें एखाद्या संन्याशासारखे राहत असत. अरण्यांतलि एखाद्या ओढ्याचें पाणी प्यावें आणि अरण्यांतलि कंद-मुळांचें सेवन करावें, जमिनीवर निजावें आणि आकाश पांघरावें. अशा स्थितीमध्येंही त्यांचे दिवस मोठ्या आनंदानें जात असत. फक्त त्यांच्या प्राणप्रियेची त्यांना आठवण झाली, म्हणजेच मात्र डोंगराच्यावर ते असूनही दुःखाचे डोंगर त्यांच्यावर कोसळत आणि ते जमिनीवर असूनही दुःखाच्या समुद्रामध्यें बुडून जात !

तेथें असतांना पूर्वीच्या—त्यांच्या मनांत सदोदित घोळणाऱ्या—राजकीय महत्त्वाकांक्षेचीं चित्रेंही मधून मधून त्यांच्या डोळ्यांपुढें प्रादुर्भूत होत असत. दक्षिणेंतील मराठ्यांच्या मर्दुमकीचे आणि मुत्सद्देगिरीचे पूर्वेतिहास त्यांना तेथें त्या विंध्य पर्वतावरही प्रत्यक्ष दिसत असत ! स्वदेशाच्या आणि स्वराज्याच्या प्रेमानें प्रज्वलित झालेली त्यांची कल्पनाशक्ति भूतकाळाला त्या विंध्य पर्वताच्या रंगभूमीवर वर्तमानकाळाचे पोषाख घालून नाचवीत असे ! दुसऱ्या बाजीरावाच्या दुराचरणानें आणि दुष्कृत्यानें आणि सर्व आर्यावर्ताच्या दुर्दैवानें दुर्गतीला जाऊन पोंचलेल्या स्वराज्याच्या नाशामुळें भाऊसाहेबांच्या मनांत उत्पन्न झालेली निराशा—मागील गोष्टींच्या स्मरणाच्या प्रांतामध्यें तरी कांहीं आनंद सांपडला तर पाहावा म्हणून—त्यांना तिकडे वारंवार नेत असे. पूर्वस्मृति त्या वेळचे महाराष्ट्राचे आणि पेशवाईचे वैभवशाली इतिहास आपल्या सोनेरी अक्षरांनीं त्या विंध्ये पर्वतावरील अंतरिक्षाच्या पानांवर लिहीत असे; आणि भाऊसाहेबांनीं ध्यानस्थ होऊन डोळे मिटले, म्हणजे सुवर्णाक्षरांनीं लिहिलेलीं त्यांच्या स्वदेशाच्या इतिहासाची तीं अक्षरें त्यांना दिसूं लागत ! आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या म्हणजे त्या इतिहासांतील तीं वर्णनें ते वाचीत आहेत, असें स्पष्टपणें व्यक्त होत असे !

विंध्य पर्वत कोणीकडे आणि सह्याद्रि कोणीकडे ! दोघांच्या मध्यें कितीं तरी अंतर ! परंतु आपल्या ह्या ऐतिहासिक समाधीच्या काळामध्यें आपल्या योगबलानें त्या एवढ्या विशाल आणि विस्तीर्ण सह्याद्रीलाही भाऊसाहेब, पूर्वी मारुतीनें द्रोणागिरि उचलून आणला होता त्याचप्रमाणें, त्या विंध्याद्रीवर उचलून

आणीत असत! अशा वेळीं तो सह्याद्रि जवळ येऊं लागला, त्याचीं उंच शिखरें दुरून पहिल्यानें दिसूं लागलीं, आणि मागाहून त्याच्या दऱ्या-खोऱ्यांतील निम्न भागामधून झुळझुळ वाहणाऱ्या त्या परमपावन पंचगंगांच्या—नव्हे हजारों पवित्र गंगांच्या—प्रवाहांचे मंजुळ आणि कर्णमधुर शब्द ऐकूं येऊं लागले, म्हणजे भाऊसाहेबांना अतिशय आनंद होत असे! त्या सह्याद्रिवरील तीं निबिड अरण्यें दिसूं लागलीं, म्हणजे भाऊसाहेबांच्या अंगावर रोमांच उभे राहत असत! त्या सह्याद्रीमधील लहान लहान निर्झरांचें तें कावळ्याच्या डोळ्यांसारखें स्वच्छ पाणी पाहून त्यांच्या डोळयांतून प्रेमाश्रूंचीं टिपें गळूं लागत आणि त्या शंखोदकाचें प्राशन करण्याकरितां त्यांचे ते तृषेनें नव्हे-तर प्रेमानें-आक्रान्त झालेले ओठ थोडेसे पुढें सरसावत आहेत कीं काय, असा भास होई. त्या सह्याद्रीच्या कटिप्रदेशाच्या सभोंवार धुक्याचें दाट आवरण पसरलेलें असून त्या धुक्याच्या आवरणामधूनही छाती पुढें करून उंच शिखरांच्या रूपानें हा सह्याद्रि आपलें डोकें वर काढीत आहे, हा देखावा पाहून, धैर्य धरिलें असतां संकटांना खालीं दडपून टाकून छाती पुढें करून आपल्या राजकीय उन्नतीचें डोकें वर काढण्याला आपणही समर्थ होऊं, असा आत्मविश्वास भाऊसाहेबांच्या मनामध्यें प्रतिबिंबित होत असे. अशा रीतीनें तो सह्याद्रि त्यांना भेटला, म्हणजे हा आपला जन्मांतरींचा प्रत्यक्ष भाऊच भेटला, असें त्यांना वाटे. ते त्याला भेटण्याकरितां आपले बाहू उभारून मनानें सामोरे जात असत, आणि मोठ्या आदरानें त्याचें स्वागत करीत असत. तो सह्याद्रि अशा वेळीं विंध्य पर्वतावर भाऊसाहेबांच्या भेटीला जेव्हां येत असे, तेव्हां तो दगडांचा आणि मातीचा एक मोठा थोरला गोळा म्हणून येत नसे. भाऊसाहेबांच्या ऐतिहासिक मनानें त्याला निमंत्रण पाठविलें असतां सगळा सह्याद्रि आपल्या राजकीय लवाजम्यानिशीं भाऊसाहेबांना भेटण्याकरितां येत असे. त्या राजाच्या स्वारीचें काय वर्णन करावें! सह्यपर्वताची स्वारी जवळ आली म्हणजे जिकडे तिकडे हत्तीच्या रांगांसारखे मोठाले किल्लेच किल्ले दिसूं लागत. त्यांच्यावर शिबंदीचे लोक गर्दीगर्दीनें चालले आहेत, चौघडे झडत आहेत, मंगल वाद्यें वाजत आहेत, भगवीं आणि जरीपटक्यांचीं निशाणें जिकडे तिकडे फडकत आहेत, देवळांचे सोनेरी कळस उन्हामध्यें चमकत आहेत, तोफांच्या सरबत्त्या होत आहेत, भालदार-चोपदार ललकारत आहेत, मंत्री आणि प्रधान मनसुबे करीत आहेत,

सैन्यें लढत आहेत, आणि राजे विजयश्री मिळवीत आहेत, असे अपूर्व समारंभ जिकडे तिकडे दृग्गोचर होऊं लागत! पण अशा राजकीय वैभवाच्या थाटामाटामध्यें मिरवीत येत असतांही तो सह्याद्रि आपल्या जवळपासच्या गरीब बिचाऱ्या मावळ्या शेतकऱ्यांना मात्र कधींही विसरत नसे. ते पावसाळ्यांतील शेतकरी आणि उन्हाळ्यांतील शिपाई, त्यांचीं तीं एकाखालीं एक जिन्याच्या पायऱ्यांप्रमाणें उतरत गेलेलीं शेतें, त्यांच्या आसपासचीं तीं हिरवीगार कुरणें, आणि त्या कुरणांमध्यें चरणाऱ्या आपल्या वांसरांच्या आणि दुसऱ्याही लहान लहान मुलांच्या आया, ह्या सगळ्यांना आपल्याबरोबर घेऊन सह्याद्रि भाऊसाहेबांच्या भेटीला येत असे!

तो आला म्हणजे आपल्या डोळ्याचें पारणें फिटेपर्यंत आणि आपल्या मनाचें समाधान होईपर्यंत ते त्या प्रिय पाहुण्याला आपल्या घरीं राहवून घेत असत. अशा ह्या त्यांच्या भेटी वरचेवर होत असत. भाऊसाहेबांनीं डोळे मिटले कीं त्यांचा जिवलग मित्र जो सह्याद्रि आपल्या सर्व उच्चतेनें आणि विशालतेनें त्यांच्यापुढें येऊन उभा राहत असे. आणि ते डोळे उघडून पाहूं लागले, म्हणजे तो दिसेनासा होई! असा प्रेममय आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ त्यांच्यामध्यें पुष्कळ वेळां चाले. अशा प्रसंगीं सह्याद्रीची ती प्रचंड मूर्ति त्यांच्या त्या अणुपरिमाणात्मक लहानशा मनामध्यें आपल्या पूर्ण विस्तारानें येऊन उभी राहिली असतां त्यांचें लक्ष साहजिकपणेंच त्यांच्या जवळच्या विंध्य पर्वताकडे जाई; त्या दोघांच्याबद्दलची तुलनात्मक बुद्धि त्यांच्या मनामध्यें उत्पन्न होई; आणि तुलनेच्या एका पारड्यामध्यें सह्याद्रि घालून आणि दुसऱ्या पारड्यामध्यें विंध्य पर्वताला बसवून आणि आपल्याला उभें राहण्याकरितां क्षणभर अंतरिक्षामध्यें कोठें तरी जागा शोधून काढून, त्या दोघांची तुलना करीत असतां मोठ्या कष्टानें ते त्या विंध्य पर्वताला असें म्हणत असत:—

"बा विंध्य पर्वता, फुकट तुझा जन्म! तूं एवढा लांबलचक पसरलेला असून तुझा काय उपयोग! तूं आपले लांबलचक हातपाय पसरून खुशाल उताणा निजला आहेस! ह्या आर्यावर्ताच्या प्रदेशासारखा सौख्यदायक मऊ बिछाना तुला मिळाल्यामुळें तूं या प्रदेशाच्या मार्गामध्यें विनाकारण आडवा मात्र पडून राहिला आहेस. पूर्वकाळीं रामानें किंवा भीमानें मारलेले राक्षस शंभर शंभर योजनेपर्यंतच्या लांबीचा आपला देह धरणीवर टाकीत असत, अशीं वर्णनें पुराणांतून आढळतात,

तसा हा बहुतकरून एखाद्या राक्षसाचा देह या ठिकाणीं पूर्वेपासून पश्चिम समुद्रापर्यंत आपले हातपाय पसरून पडलेला आहे, असा तुझ्याबद्दल भास होतो. हे विंध्य पर्वता, ह्या माझ्या सह्याद्रिकडे पहा. तूं आडवा निजलेला आहेस, पण तो उभा राहिलेला आहे. आपल्या आर्यावर्ताच्या किल्ल्याच्या दोन्ही तिन्ही बाजूंनीं जो समुद्राचा मोठा थोरला खंदक परमेश्वराच्या कारागिरांनीं खणून ठेविला आहे, त्यांतून नजर चुकवून जर कोणी एखादा गनीम येईल, तर त्याच्यापासून ह्या आपल्या आर्यभूमीचें संरक्षण करण्याकरितां किल्ल्याच्या तटबंदीच्या भिंतीप्रमाणें हा सह्याद्रि साऱ्या पश्चिम किनाऱ्याचा ताबा आपल्याकडे घेऊन उभा आहे! आणि तुझ्याकडे पहावें तर तूं विनाकारण मध्येंच सगळ्यांच्या वाटेंत आडवा पडला आहेस! त्यानें शत्रूंची वाट बंद केली आहे, तर तूं आपल्याच लोकांच्या जाण्यायेण्याच्या, दळणवळणाच्या आणि व्यापाराच्या वाटा अडवून बसला आहेस! भेद आपसांत पाडूं नये, दुसऱ्याच्यांत पाडावा, हें राजनीतीचें साधें तत्त्व देखील तुला समजत नाहीं, तेव्हां तुला काय म्हणावें! आपला हिंदुस्थान देश आयता एक होता, पण तें मध्यें पडून त्याचे एकाचे दोन तुकडे केलेस. जे एखादे मूर्ख आणि आत्मघातकी मुत्सद्दी आपसामध्यें भेद पाडून कलह माजविण्यांत आनंद मानतात, त्यांच्यांतील तूं शिरोमणि आहेस, यांत शंका नाहीं! या तुझ्या कृतीवरून तुझ्या ठिकाणीं खऱ्या उच्चतेचें वास्तव्य यत्किंचितही नाहीं, हें अगदीं स्पष्ट होत आहे; हा तुझा भाऊ सह्याद्रि; याच्याकडे पहा बरें! हा किती उच्च प्रतीचा आहे! याच्या डोक्यांतील विचार नेहमीं उच्च वातावरणामध्यें वावरत असतात. त्याचें डोकें नीच प्रदेशांतील संचाराला कधी स्वप्नांतसुद्धां प्रवृत्त होत नाहीं. आपल्या आर्यावर्ताच्या पोटांतून नांव घेण्यासारखे असे तुम्ही तीन पुत्र उदयाला आणि उन्नतीला आलां;—एक हिमालय, दुसरा तूं आणि तिसरा हा सह्याद्रि! या एका आर्य जननीच्या पोटांतून तुम्ही जे तिघे सख्खे भाऊ जन्माला आलां, त्यांपैकीं थोरला आणि धाकटा हे दोघे अत्युच्च पदवीला चढले; पण तूं मधला मात्र मधेंच अवनतीला जाऊन स्वस्थ हातपाय ताणून पडला आहेस. पश्चिम समुद्रांत उत्पन्न होऊन सह्याद्रिवरून हिमालय पर्वताकडे जाण्याला निघालेले मेघ तुझ्या अंगावरून निर्भयपणानें आणि तुजविषयींच्या तुच्छतायुक्त अन्तःकरणानें जातात! पाण्याच्या वजनानें ते कितीहि खालीं ओथंबलेले असले, तरी तुझ्या एखाद्या अतिशय उंच सुळक्याचें

टोंक आपल्या पखालींच्या पातळ पापुद्र्यांना लागून त्यांतील पाणी सांडेल ही भीति त्यांच्या मनामध्यें यत्किंचितही उत्पन्न होत नाहीं; इतकें ते तुला नीच आणि तुच्छ समजतात ! एखाद्या बहिरी ससाण्याप्रमाणें अतिशय उंच आकाशांत— म्हणजे सह्याद्रीच्या किंवा हिमालयाच्या उंच शिखरांच्या खालच्या अन्तरिक्षांत— गरगर घिरट्या घालण्यामध्यें आनंद मानणाऱ्या वाऱ्यांना तुझ्या ठिकाणीं चळवळ उत्पन्न करण्याकरितां यावयाचें म्हणजे किती तरी मजले खालीं उतरून यावें लागतें; आणि फिरून वर जातांना इतकी चढउतार झाल्याच्या योगानेंच जणूं ते धापा टाकूं लागले आहेत कीं काय, असा भास होतो ! आकाशांतील पावसाला तुझ्या ठिकाणच्या संतप्त लोकांवर कृपादृष्टि करण्याकरितां यावयाचें म्हणजे आपला कडेलोटच होत आहे कीं काय आणि आपण खोल खोल तरी किती चाललों आहों, असें त्या बापड्या पर्जन्यधारांना होतें, आणि म्हणूनच कदाचित् त्या अतिशय जोरानें अश्रु गाळूं लागत असतील ! बा विंध्य पर्वता, ह्या सर्व गोष्टींवरून सह्याद्रीशीं तुझी तुलना करून पाहतां तूं खरोखरच उच्चत्वामध्यें कमी ठरतोस ! ”

“ मला माहीत आहे कीं, तुझी एकदां फार मोठी महत्त्वाकांक्षा होती. या आपल्या आर्यभूमीच्या उदरामधून जन्मास आलेल्या प्रत्येक व्यक्तीची ‘ मी सर्वांमध्यें अतिशय उच्च पदवीला जाऊन पोंचेन, ’ अशा प्रकारची जशी योग्य महत्त्वाकांक्षा असावी, तशीच योग्य आणि उच्च महत्त्वाकांक्षा, हे विंध्य पर्वता, हे आर्यमातेच्या आर्यपुत्रा, एकदां तुझ्या मनामध्यें उचंबळत होती, हें मला माहीत आहे ! सह्याद्रि तर बोलून चालून धाकटाच भाऊ; त्याची कांहीं फारशी मोठी प्रतिष्ठा नाहीं; पण उंचीच्या श्रेष्ठत्वामध्यें जो माझा श्रेष्ठ भाऊ हिमालय त्यालाही मी उंचीच्या बाबतींत खालीं मान वांकवावयाला लावीन, अशी तुझी उडी होती ! खालच्या वातावरणामध्यें संचार करणारे यक्ष, गन्धर्व, किन्नर, अप्सरा आणि देवता, यांच्या सहवासानें हिमालयाला जी प्रौढी प्राप्त झालेली आहे, तिच्याही वर आपण कांहीं तरी कडी करूं, असें तुझ्या प्रचंड आणि प्रगल्भ मनाला वाटत होतें ! नंदीवर बसून संचार करणारा शंकर आणि इंद्राच्या मजलशीमध्यें गाण्याकरितां जाणारे गवय्ये आणि बजवय्ये असल्यासारख्या क्षुद्र देवतांच्या हिमालयावरील उंचीकडे अत्यंत तुच्छ मुद्रेनें आणि तिरस्कारानें पाहून तूं आपली दृष्टि सर्वांत आतिशय उंच संचार करणाऱ्या प्रत्यक्ष सूर्यावर लाविली होतीस ! सूर्य हा

सर्वांत उज्ज्वल आणि उच्च आहे, त्याच्याहिपेक्षां मी उंच होईन; मी इतका उंच होईन कीं, सूर्याचीही वाट मी अडवून टाकीन; अशी अद्‌भुत आणि अश्रुतपूर्व महत्त्वाकांक्षा तूं आपल्या मनामध्यें धारण केली होतीस ! ”

“ बा विंध्या, वातावरणांत उडावें लागणाऱ्या पक्ष्यांना पंख असतात यांत कांहीं विशेष नवल नाहीं. परंतु त्याशिवाय ब्रह्मदेवानें आपल्या सृष्टीच्या प्रारंभीं पंख वापरण्याचा अलौकिक आणि असामान्य हक्क फक्त दोघांनाच काय तो दिलेला होता !—एक कवींच्या कल्पनांना आणि दुसरा तुम्हां पर्वतांना ! या जोडीपैकीं इन्द्राच्या वज्रानें आणि तुमच्या दुर्दैवानें तुम्हां पर्वतांचा पंख वापरण्याचा हक्क काढून घेतला, याबद्दल तुमच्या बरोबरीचे हक्कदार आणि जोडीदार जे कवि त्यांचें अन्तःकरण भ्रातृदुःखाच्या कळवळ्यानें अतिशय दुःखित होत असलें पाहिजे. आपल्या भ्रातृजनांचे पंख देवांच्या राजाकडून जे तोडले गेले तशा प्रकारचा प्रसंग कवींच्या कल्पनांवर माणसांच्या राजांच्या भित्र्या स्वभावामुळें कधींही न येवो, अशी ते प्रार्थना करीत असतील !—परंतु कविकल्पनांचे पंख हे अजरामर आहेत. त्यांना कधींही नाश नाहीं. ते वेदांतील सूक्तांच्या प्रारंभापासून तों कालिदासाचीं काव्यें या भूमंडलावर यावच्चंद्र गायिलीं जातील तोंपर्यंत अक्षय टिकणारे आहेत. त्यांना कोणाच्याही—देवांच्या, माणसांच्या किंवा पशूंच्या—राजांपासून भय नाहीं ! राजे पाहिजे तर कवींचे हात तोडतील किंवा पाय तोडतील; परंतु त्यांच्या कल्पनेचे पंख तोडून टाकण्याचें सामर्थ्य ब्रह्मदेवानें कोणत्याही क्षुद्र राजांच्या शस्त्रामध्यें ठेविलें नाहीं ! हे विंध्य पर्वता, असलें अजरामरत्व तुमच्या पर्वतांच्या पक्षांमध्यें परमेश्वरानें ठेविलें असतें, तर आजच्या या नीरस आणि कंटाळवाण्या वाटणाऱ्या जगामध्यें किती तरी सरसपणा आणि नवीनपणा कायम राहिला असता ! आजमित्तीला आकाशांतून पर्वत उडत असते, तर या सृष्टीमध्यें किती तरी मौजा झाल्या असत्या आणि दुष्ट लोकांवर किती तरी दरारा बसला असता. थोड्याशा सैन्याच्या बळावर अतोनात बलाढ्यतेच्या गर्वानें फुगून गेलेल्या लोकांना ‘ आतां हा आकाशांतून उडणारा पर्वत आमच्या सैन्याच्या तळावर येऊन बसतो कीं काय ! ’ अशी भीति वाटून त्यांना चांगलाच वचक बसला असता. परंतु या सृष्टीमध्यें अलीकडे कांहींच अद्‌भुत होईनासें झाल्यामुळें सगळीं रेमीडोकीं माणसें त्या बिचाऱ्या सृष्टिदेवतेवर बेधडक रीतीनें आपला ताबा चालवूं लागलीं आहेत ! पण ते पर्वतांना पंख असण्याचे दिवस आतां गेले ! पण ते जेव्हां होते, जेव्हां तुम्हीं पर्वतांना

कविकल्पनांच्याप्रमाणें पंख होते, आणि जेव्हां कविकल्पनांच्या बरोबरीनें तुम्हीही आकाशांतील उंच समुद्रामध्यें लांबलांबच्या सफरी करीत होतां, त्या वेळीं, हे विंध्य पर्वता, मी सर्यापेक्षांही जास्त उंच होईन, ही महत्त्वाकांक्षेची भरारी तुझ्या मनामध्यें उत्पन्न झाली, हें अगदीं साहाजिकच होतें."

" पण हे महत्त्वाकांक्षी विंध्य पर्वता, ही महत्त्वाकांक्षा नुसती मनामध्यें आणूनच तूं थांबलास, असें नाहीं. ती महत्त्वाकांक्षा तूं बहुतेक शेवटासही नेऊन पोंचवली होतीस. तूं सूर्याच्याहीपेक्षां उच्च झाला होतास आणि सूर्याचीही वाट तूं आडविली होतीस. तुझ्याइतकी आपली महत्त्वाकांक्षा सफलतेच्या कळसाला कोणींही नेऊन पोंचविली नव्हती !—परंतु अगस्त्य ऋषीनें तुला फसविलें ! मत्सरी आणि परोत्कर्षासहिष्णु अशा सूर्यादिक देवांना आणि हिमालयादि पर्वतांना फितूर आणि सामील होऊन अगस्त्य ऋषीनें तुला फसविलें ! 'मी दक्षिणेकडे जाऊन परत येतों, तोंपर्यंत तूं अगदीं ठेंगणा होऊन राहा,' अशी तुला थाप मारून तो अगस्त्य ऋषि जो तेव्हांपासून दक्षिणेकडे गेला आहे, तो अजून परत येतोच आहे ! तूं मात्र, विचारा, आपला सगळा मोठेपणा त्या अगस्त्य ऋषीच्या वचनांत गुंतून घालवून बसला आहेस ! आणि आज तुझ्या कपाळीं नीचपणा आला आहे ! ह्या सगळ्या गोष्टी लक्षांत आल्या असतां तुझ्या पूर्वीच्या अद्वितीय महत्त्वाकांक्षेबद्दल आश्चर्य आणि हल्लींच्या ह्या नीच अवस्थेबद्दल खेद कोणाच्या मनांत उत्पन्न झाल्यावांचून राहणार आहे ? परंतु आश्चर्य आणि खेद यांच्याबरोबर, एक प्रकारचा संशयही उत्पन्न होतो; कारण पूर्वी, पर्वतांचे पंख कातरले गेले असले, तरी कवींच्या कल्पनांचे पंख शाबूद होतेच. तेव्हां ज्याच्या कल्पनेचे पंख शाबूद आहेत अशा एकाद्या कवीकडून तूं आपला हा स्वाभाविक ठेंगणेपणा झांकून टाकण्यासाठीं ही अगस्त्य ऋषीची गोष्ट कदाचित् बनवून घेतली नसशील कशावरून, अशी कोणाला शंकाही येईल ! पण त्या शंकेवर माझा विश्वास बसत नाहीं. आणि तूं पूर्वी मोठा असून अगस्तिच्या भिडेमुळेंच तूं लहान झालास, असेंच मला वाटतें."

" परंतु, तेव्हांपासून, हे विंध्य पर्वता, तूं खालीं खालीं जात चाललास तो चाललासच. आणि तूं शरीराच्या उच्चपणामध्यें जसा कमी झालास, तसा मनाच्या उच्चपणामध्येंही तेव्हांपासून कमी पडत चाललास. ह्या सह्याद्रीचें मन बघ आणि तुझें मन बघ. ह्यानें अलीकडच्या काळामध्यें किती थोर आणि उदात्त पुरुष उदयाला आणिले आहेत, ह्याची तुला कांहीं कल्पना तरी आहे ? अली-

कडच्या इतिहासामधील बहुतेक सगळे लढवय्ये आणि मुत्सद्दी याच्या पोटांतून जन्मास आले! बहुतेक सगळे लढायांतून गाजलेले किल्ले याच्या डोक्यांतून वर आले! आणि मोठमोठ्या राजांचीं सिंहासनें, गाद्या आणि तख्तें याच्या पायांशीं लोळत आहेत! या ऐतिहासिक वैभवापैकीं तुझ्यापाशीं दाखवावयाला काय आहे? तुझ्यापाशीं शिवाजी, बाजी प्रभू, तानाजी मालुसरे, येसाजी कंक, धनाजी, बाजीराव, भाऊसाहेब. त्रिंबकरावमामा, सखारामबापू, नाना फडनवीस, यांच्यापैकीं एखादा तरी कोणी आहे काय? तोरणा, सिंहगड, रायगड, प्रतापगड, विशाळगड, गगनबावडा, यांच्या तोडीचा एखादा तरी किल्ला तुझ्याजवळ आहे काय? तुझ्या विसरलेल्या आणि जगांत हल्लीं कोणालाही माहीत नसलेल्या इतिहासांत तूं पूर्वी कांहीं केलें असलेंस, न कळे; परंतु हल्लीं तर तुझ्या डोक्यांत केवळ माती आणि दगडच भरलेले दिसतात! स्वदेशासाठीं आणि स्वराज्यासाठीं ज्यांनीं आपले देह धारातीर्थी समर्पण केले, अशा असंख्य वीरपुरुषांच्या अंगांतून सांडलेल्या रक्तांनीं, त्यांच्या तुटलेल्या आणि मोडलेल्या पायांनीं, छिन्नविच्छिन्न झालेल्या शिरांनीं आणि वाळून गेलेल्या हाडांनीं, हा सगळा सह्याद्रि—उत्तर कोंकणच्या उत्तर टोंकापासून तों म्हैसूरच्या दक्षिण टोंकापर्यंत—अलंकृत झाला आहे! आणि हे विंध्य पर्वता, तुझ्याकडे पहावें, तर ह्यापैकीं तुझ्याजवळ काय आहे?—मला हें कबूल केलें पाहिजे कीं, तुझ्याही अंगावर रक्ताचे डाग पडलेले आहेत! आणि तुझ्याही आसमंतांतील भागांत तोडलेले हात, मोडलेले पाय आणि कापलेल्या माना, यांचे ढीग ठिकठिकाणीं उघडे पडलेले किंवा जमिनींत पुरलेले आहेत! पण ते कोणाचे? अनाथ आणि गरीब अशा वाटसरू लोकांचे! अरे, अत्यंत अवनतीला जाणाऱ्या विंध्य पर्वता, ह्या सह्याद्रीच्या जाळ्यांतून आणि जंगलांतून गनिमी काव्यानें आपल्या स्वराज्याच्या शत्रूंवर छापा घालण्याकरितां हजारों प्रामाणिक मावळे शिपाई दबा धरून बसत असतां आपल्यांतीलच गरीब वाटसरू लोकांवर छापा घालणाऱ्या दरोडेखोरांना, वाटमाऱ्यांना, डाकेखोरांना, ठगांना आणि इतर सर्व जातींच्या गळेकापूंना तूं आश्रय देतोस, त्या तुला काय म्हणावें! तुझ्यासारख्या अशा नीचाला त्रिवार धिक्कार असो! करीमबक्ष हा तुझा शिवाजी आणि गंगाप्रसाद हा तुझा तानाजी! अशा तुला फिरून एकदां धिक्कार असो! अरे, ह्या सह्याद्रींतील मावळे शिपायांनीं ज्याप्रमाणें स्वराज्याकरितां शिकस्त केली, त्याचप्रमाणें तुझ्या पोटांतून निर्माण

झालेल्या त्या करीबमक्षांनीं आणि गंगाप्रसादांनीं आपल्यांतीलच गरीब वाटसरूंचे बेसावधपणें गळे कापण्याचें टाकून इतिहासाच्या रणांगणावर प्रामाणिकपणाची समशेर चालविली असती, तर—तिकडून मराठे आणि इकडून पुरभय्ये, तिकडून सह्याद्रि आणि इकडून विंध्य,—यांच्या कचाटीमध्यें कोण चिरडून गेला नसता! पण जी भवितव्यता ठरलेली असते, तीच अखेरीस खरी ठरते! शिवाजींची स्वराज्यस्थापना फुकट गेली! पहिल्या बाजीरावांचा पराक्रम व्यर्थ झाला! राघोबादादांची उंच भरारी जमिनीवर गळून पडली! नाना फडनिसांचा मुत्सद्दीपणा कामाला आला नाहीं! आणि अखेरीस दुसऱ्या बाजीरावांचा मूर्खपणा विजयी झाला! आणि करीमबक्ष आणि गंगाप्रसाद यांच्या टोळ्यांची मात्र आज जिकडे तिकडे फत्ते होत चालली आहे!—प्रिये गंगाबाई, यांच्या तडाक्यामध्यें आपल्या मराठेशाहीच्या राज्यलक्ष्मीप्रमाणें तूंही आम्हांला सोडून गेलीस! आतां मी काय करूं!"

अशा प्रकारचे उद्गार भाऊसाहेबांच्या तोंडून निघत असत. आणि ते कोणत्याही गोष्टीसंबंधाचे विचार करीत असले, तरी त्या सगळ्याचें पर्यवसान त्यांच्या प्रियपत्नीच्या स्मृतीमध्येंच होत असे. पत्नीच्या नाशामुळें आपलें अर्धें अंग एखाद्या पक्षघात झालेल्या माणसाप्रमाणें गळून गेलेलें आहे, असें त्यांना वाटे. अशा दुःखदायक स्थितीमध्यें कसा तरी काळ कंठीत भाऊसाहेब त्या पर्वतावर कांहीं दिवस राहिले होते.



: : रांग नववी

भाऊसाहेब हे मूळचे जरी स्वरूपानें सुरेख आणि कांतीनें तेजःपुंज होते तरी अलीकडे कित्येक महिनेपर्यंत स्वच्छतेचे कोणतेही संस्कार त्यांना शक्य नसल्यामुळें ते त्या जंगलामध्यें एखाद्या जंगली प्राण्याप्रमाणें बनून गेलेले होते. दाढीमिशा वाढलेल्या, डोकीच्या केसांमध्यें जटा पडलेल्या, हातापायांच्या बोटांचीं नखें वाढलेलीं, आवाज कर्कश झालेला, डोळे लाल झालेले, गाल खालीं बसलेले, आणि वाघाची कातडीं पांघरावयाला घेतलेलीं, अशा स्थितीमध्यें ते एखाद्या बैराग्यापेक्षांही जास्त भयंकर दिसत असत; आणि त्यांचें स्वरूप त्यामुळें इतकें बदललें होतें कीं, त्यांना कोणी ओळखणें जवळ जवळ अशक्यच झालेले होतें. पण त्यांचें बाह्य स्वरूप बदलून जरी तें इतकें भयंकर झालें होतें, तरी त्या बाह्य स्वरूपाच्या आंतील त्यांचें तें कोमल मन कोमलपणामध्यें पूर्वीच्यासारखेंच कायम होतें व बाकीच्याही त्यांच्या सद्गुणांमध्यें यत्किंचित्सुद्धां बदल झालेला नव्हता. भाऊसाहेब हे पहिल्यापासूनच मोठ्या उदार आणि प्रामाणिक स्वभावाचे मनुष्य होते. त्यांना जरी कांहीं दिवसपर्यंत चोरांच्या टोळीमध्यें राहण्याचा प्रसंग आला होता, तरी त्या स्थितीमध्यें सुद्धां त्यांनीं कधीं कोणत्याही वस्तूचा अपहार केला नव्हता. चोरीच्या कृत्यांबद्दल त्यांना स्वतःला अतिशय तिटकारा वाटत होता, ह्यांत तर कांहीं विशेष नवल नाहींच नाहीं; परंतु दुसरे कोणी जे अशा कृत्याला प्रवृत्त होत असत, त्यांचाही त्यांना अतिशय द्वेष येत असे. चोरीच्या आणि दरवडेखोरीच्या कामालाही एक प्रकारचें धाडस लागतें, हें ते जाणून होते; परंतु या धाडसी स्वभावाचीही अनेक पराक्रमाच्या सत्कृत्यांमध्यें आपल्या देशाला इतकी जरूरी असतां त्या धाडसाचा दुरुपयोग आपल्या देशामध्यें चोरीसारख्या वाईट कामाकडे, व्हावा हें पाहून त्यांचें अंतःकरण तिळतिळ तुटत असे. ह्या स्वभावाच्या

ठगांच्या आणि दरवडेखोरांच्या लष्करी पलटणी बनविल्या, तर हे वाटेल त्या शत्रूला पादाक्रांत करून टाकतील, असें त्यांना एकदां वाटत असे. करीमबक्षाच्या टोळींत भाऊसाहेब असतांना त्यांनीं त्या दिशेनें थोडासा प्रयत्नही करून पाहिला होता. परंतु खेचरांचे घोडे आणि कोळशांचे हिरे करण्याच्या कारखान्याच्या या धंद्यामध्यें त्यांना मुळींच यश आलें नाहीं; त्यामुळें तर सगळ्या चोरांच्याबद्दलचा त्यांचा द्वेष दुप्पट जास्त वाढलेला होता.

अशा स्थितींत एके दिवशीं दोन प्रहरच्या सुमाराला भाऊसाहेब त्या डोंगरामध्यें आपल्याला खाण्याकरितां कांहीं फळें गोळा करण्यासाठीं दूरवर हिंडत असतां एका टेकडीच्या खिंडींतून एक बाई त्यांच्याकडे येत असतांना त्यांना दिसली. पुष्कळ दिवसांनीं मनुष्य प्राणी त्यांच्या दृष्टीस पडल्यामुळें त्यांना पहिल्यानें थोडासा आनंद झाला. परंतु पावसाळ्यांत सूर्य दिसतो न दिसतो, तोंच त्याच्यावर ढग येतात, त्याप्रमाणें भाऊसाहेबांच्या ह्या आनंदाची अवस्था झाली. त्यांच्या मनांत एक संशय उत्पन्न झाला. करीमबक्ष आणि त्याचे इतर ठग लोक हे आपल्या बायकामुलांचा उपयोग करून आणि त्यांना निरनिराळीं सोंगें देऊन त्यांच्याकडून टेहळणीचीं आणि गुप्त बातम्या काढण्याचीं कामें करवीत असत, हें भाऊसाहेबांनीं पुष्कळ वेळां प्रत्यक्ष पाहिलें होतें. तेव्हां तशांपैकींच कोणी तरी ही बाई असावी, असा त्यांचा साहजिकपणेंच समज झाला. व आतां अखेरीस करीमबक्षाला आपला सुगावा लागणार, अशी थोडीशी भीतिहि त्यांना वाटूं लागली. हे इतके विचार त्यांच्या मनांत घोळत आहेत, तों ती बाई भाऊसाहेबांच्या बरीच जवळ येऊन पोंचली. एकामागून एक डोंगर चढण्याच्या आणि उतरण्याच्या श्रमानें व ग्रीष्म ऋतूच्या शेवटच्या आणि वर्षा ऋतूच्या प्रारंभींच्या कडक उन्हाच्या तापानें आणि खाण्यापिण्याच्या अभावामुळें तिची मुद्रा इतकी बदललेली दिसत होती कीं, तिच्या पुष्कळ दिवसांच्या परिचयाच्या एखाद्या नातेवाइकानें तिला त्या स्थितीमध्यें पाहिलें असतें, तर तोही तिला ओळखूं शकला नसता. अशा स्थितींत ती बाई मोठ्या आशायुक्त अंतःकरणानें भाऊसाहेबांच्या जवळ आली. त्यांची ती क्रूर आणि रानटी आकृति पाहून तिला बरेंच समाधान वाटलें व इतके दिवस तपास करितां करितां अखेरीस आपल्याला एक तरी चोर भेटला, याबद्दल तिला थोडासा आनंद होऊन तिनें त्यांना " तुम्ही चोर आहां कां हो ? " असा मोठ्या आदरानें प्रश्न विचारिला.

हा विलक्षण प्रश्न ऐकून भाऊसाहेबांना मोठा राग आला. चोरांच्याबद्दल त्यांना जो तिटकारा वाटत होता, त्यामुळें त्यांना राग येणें साहजिकच होतें. परंतु राग येण्यापेक्षांही त्यांच्या मनामध्यें शंकाच जास्त आली व आपला पत्ता काढण्याकरितां करीमबक्षानें पाठविलेल्या ह्या बाईनें आपल्याला बरोबर ओळखिलें, असें त्यांना वाटलें.

" तुम्ही बोलत कां नाहीं ? " त्या बाईनें विचारिलें. " तुम्ही चोरच आहां ना ? "

अशा प्रकारचा फिरून तोच प्रश्न ऐकून भाऊसाहेबांचा संताप आणि संशय त्यांच्या मनामध्यें मावेनासा झाला. ते अतिशय निष्ठुरतेच्या आवाजानें जशास तशा रीतीनें म्हणाले, " बाई, तुम्ही वेड्या आहां कां हो ? तुम्ही बोलत कां नाहीं ? तुम्ही वेड्याच आहां ना ?—तुम्ही या माझ्या प्रश्नांचीं उत्तरें या अगर देऊं नका, पण तुम्ही वेड्या असलां पाहिजे, यांत संशय नाहीं. भलत्याच मनुष्याला तुम्ही एकदम चोर म्हणून म्हणतां, तेव्हां तुमचें डोकें खास बिघडलेलेंच असलें पाहिजे. "

" मी खरोखरच वेडी झालेली आहें. " ती बाई म्हणाली. " आणि माझें डोकें खरोखरच भ्रमिष्ट झालेलें आहे. "

" तें कशानें ? " भाऊसाहेबांनीं विचारिलें. " बाई, तुम्ही कशानें वेड्या झालां आहां ? आणि काय मिळाल्यानें तुमचें मन ताळ्यावर येईल ? "

" मला कोणी तरी चोर मिळावयाला पाहिजे आहे, म्हणजे माझें संकट दूर होण्याचा कांहीं तरी मार्ग सांपडेल; पण कोणाला माझी दया येईल तेव्हां खरें ! "

" दयाच म्हणशील, " भाऊसाहेबांचें अंतःकरण विरघळून जाऊन ते म्हणाले, " तर मलाही तुझी दया येत आहे. पण दुसऱ्यावर दया करण्यासाठीं आपण चोर व्हावयाचें, हें मात्र मला आवडत नाहीं; पण तुझें दुःख कांहीं कमी होत असेल, तर समज कीं मी एक चोर आहें ! मग पुढें काय ? "

" पण खरोखरच तुम्ही चोर आहां काय ? " बाईनें फिरून विचारिलें.

" होय, होय, खरोखरच मी चोर आहें. " तिच्या समजुतीसाठीं दयेनें प्रेरित होऊन भाऊसाहेबांनीं कबूल केलें.

" पण तुम्ही नुसते चोर असून काय उपयोग ? " ती बाई पुढें बोलूं लागली,

" तुमचा एखाद्या चोरांच्या किंवा ठगांच्या टोळीशीं संबंध आहे काय, किंवा होता काय ? "

हा तिचा प्रश्न ऐकून भाऊसाहेबांचा पहिला संशय जास्तच बळावला व ही करीमबक्षाच्या टोळींतूनच आपला सुगावा काढण्याकरितां पाठविण्यांत आलेली असली पाहिजे, असें त्यांना वाटूं लागलें, व दयार्द्रतेच्या भरामध्यें आपण या हेर बाईच्या जाळ्यामध्यें फसलों गेलों, अशा समजुतीनें त्यांचें मन त्यांना खाऊं लागलें. तरी पण त्यांनीं धीर धरून तिला विचारिलें. " चोरांच्या आणि ठगांच्या टोळ्यांशीं तुला काय करावयाचें आहे ? एखाद्या टोळींतल्या चोराची तूं बायको-बियको आहेस कीं काय ? "

" होय. " बाईनें उत्तर दिलें.

" काय ? होय ! " भाऊसाहेब घाबरत घाबरत म्हणाले; आणि आतां आपण फिरून करीमबक्षाच्या हातीं सांपडणार अशी त्यांची बहुतेक खात्री होऊन ते म्हणाले, " आणि तर मग तूं माझाच शोध करीत आली आहेस कीं काय ? "

" नाहीं. मी आपल्या नवऱ्याचा शोध करीत करीत इकडे आलें आहें. "

" म्हणजे काय ? " आपल्या समजुतीमध्यें कांहीं तरी निराधार चूक झाली आहे असें लक्षांत येत येत भाऊसाहेब म्हणाले, " तुझा नवरा कोणीकडे गेला आहे ? आणि त्याला शोधीत या जंगलामध्यें तूं कोणीकडे चालली आहेस ? "

" मी सांगतें ऐका. " असें म्हणून तिनें आपली हकीकत सांगण्याला सुरुवात केली. " माझा नवरा आतांशा कांहीं दिवस नाहींसा झाला आहे. त्याचा पत्ता लावण्यासाठीं मी अशी रानावनांतून हिंडत आहें. आम्हीं दोघें पूर्वी साधूचें काम करीत होतों; परंतु त्या साधूपणाच्या धंद्यांत आमचें पोट भरेनासें झालें. आमच्या मठांत आम्ही साधु होऊन उपाशी निजत असूं आणि चोऱ्यामाऱ्या करून आणि दरवडे घालून ठग लोक हजारो रुपये कंबरेला बांधून आमच्या मठांत वाटेनें जातां येतां उतरावयाला येत असत, हें आम्ही पहात होतों. तेव्हां माझा नवरा त्या प्रामाणिकपणाच्या साधूच्या धंद्याला अगदीं कंटाळून गेला आणि आपणही एखाद्या ठगांच्या टोळीमध्यें जावें असें त्याच्या मनानें घेतलें. मी या कुमार्गापासून त्याचें मन वळविण्याची शिकस्त केली. तरी पण तो एके दिवशीं रात्रीं उठून कोठें निघून गेला त्याचा पत्ता नाहीं. तेव्हांपासून मी त्याला सारखी

शोधीत फिरतें आहें."

"मग त्याला तूं करीमबक्षाच्या टोळीमध्यें पहावयाचें होतेंस कीं नाहीं?" असा प्रश्न मुद्दाम विचारून तिच्या चेहऱ्यामध्यें कांहीं फेरबदल होतो कीं काय, हें पाहण्याकरितां भाऊसाहेब तिच्याकडे टक लावून बघत राहिले.

"कोण करीमबक्ष?" चेहऱ्यामध्यें कांहीं एक बदल न होतां अगदीं साधे-भोळेपणानें तिनें विचारिलें.

"तुला माहीत नाहीं? भाऊसाहेबांनीं विचारिलें.

"नाहीं. खरोखरच मला कांहीं माहीत नाहीं. पण माझा नवरा कुठल्या तरी ठगांच्या टोळींतच सामील झाला असला पाहिजे, असा मला संशय आहे. म्हणून कोणी एखादा सालस आणि साळसूद चोर भेटला, तर त्याला विचारून शोध लागला तर पहावा, म्हणून मी हिंडत असतां तुम्ही या रानांत माझ्या दृष्टीस पडलां आणि तुम्हांला पाहिल्यावर मला थोडें समाधान वाटलें!"

"म्हणजे मी चोर आहें असेंच तुला वाटलें कीं काय?" भाऊसाहेबांनीं किंचित हंसत हंसत विचारिलें. "आणखी, बाई, तूं म्हणालीस कीं, कोणी सालस आणि साळसूद चोर भेटला, तर त्याला विचारावें. तर तुला वाटतें का कीं, चोरांच्या अनेक जातींमध्यें कोणी सालस आणि साळसूद चोर असतात?"

"कां? यांत काय मोठें तुम्हांला आश्चर्य वाटलें? चोरी हा एक धंदा म्हणून करून सुद्धां मनुष्याला सालस आणि साळसूद होतां येणार नाहीं, असें नाहीं; फार लांब कशाला, तुम्हीच नाहीं का सालस आणि साळसूद?" ती बाई म्हणाली.

"मी कदाचित् सालस आणि साळसूद असेन," भाऊसाहेबांनीं प्रत्युत्तर दिलें, "पण मी चोर मात्र खास नाहीं!"

"काय? तर मग तुम्ही चोर खरोखरच नाहीं? तुम्ही केवढी माझी निराशा केलीत!" ती बाई वाईट तोंड करून म्हणाली.

"काय!" भाऊसाहेब आश्चर्यानें आणि खिन्नतेनें म्हणाले, "मी चोर नाहीं म्हणून ह्या बाईची निराशा! आणि मी चोर झालों असतों तर मी लोकांच्या आशा सफल करण्याला कारणीभूत झालों असतों! केवढा हा विसंगतपणा!"

"सागरच्या मठापासून मी इतक्या लांब हे डोंगरांतील कांटेकुटे तुडवीत आलें, ते माझे सगळे श्रम तर मग फुकट गेले!" दीर्घ श्वास टाकीत ती बाई म्हणाली.

" काय ! सागरच्या मठापासून ? " हा प्रश्न विचारतांना असतां भाऊसाहेबांच्या चर्येमध्यें एकदम बराच फरक पडला व ते मनांतल्या मनांत कांहीं तरी मागची आठवण करीत असावेत, असें दिसलें. " सागर मुक्कामीं जो मोठा थोरला तलाव आहे, त्याच्या कांठीं एक मठ आहे, त्यांत तूं राहात होतीस ? "

" होय. "

" तर मग बाई, तुमचें नांव जमनाबाई आहे का ? " भाऊसाहेबांनीं तिला विचारिलें.

" तुम्हांला माझें नांव काय माहीत ? " जमनामाई आश्चर्यानें चकित होऊन म्हणाली, " तर मग तुम्हांला माझा नवराही माहीत असला पाहिजे. तर मग सांगा पाहूं. तो मला कुठें भेटेल ? "

" त्याचें नांव किसनप्रसाद का ? " भाऊसाहेबांनीं फिरून विचारिलें.

" होय होय. अगदीं तेंच नांव. तुम्ही अगदीं बरोबर ताडिलें. " जमनाबाई उत्सुकतेनें म्हणाली. " त्याची तुम्हांला अगदीं खडान्‌खडा माहिती दिसते. तेव्हां आतां उशीर लावूं नका. तो मला कोठें भेटेल सांगा. "

" तें मला मुळींच ठाऊक नाहीं. "

" हें तुमचें म्हणणें आतां कोण खरें मानील ? " जमनामाई अधिक भरंवशानें बोलूं लागली. " तुम्हांला त्याची सगळी माहिती असली पाहिजे. तो तुमच्याच टोळींत येऊन सामील झाला आहे काय ? तुमच्या टोळीचा मुक्काम हल्लीं कोठें आहे ? आणि तुम्ही आपल्या सगळ्या ठग लोकांना टाकून असे एकटेच कां फिरत आहां ? तुम्ही त्या टोळींतील एक चोर आहां, हें मी कोणाला देखील सांगणार नाहीं. माझ्यावर तुमचा विश्वास असूं द्या. पण माझा नवरा कोठें आहे, तेवढा मला दाखवा. "

" जमनामाई, मी तुम्हांला ओळखिलें, पण तुम्हीं मला ओळखिलें नाहीं. " भाऊसाहेब शांतपणानें बोलले.

" ओळखलें ! ओळखलें ! मी तुम्हांला पक्कें ओळखलें ! तुम्ही त्या टोळींतील एक चोरच असलां पाहिजे. माझ्या नवऱ्यानें तुम्हांला आपलें नांव, आपल्या बायकोचें नांव, आपल्या राहण्याचें ठिकाण, अशी सगळी माहिती सांगितली असली पाहिजे. एरव्ही तुम्हांला ही इतकी बित्तंबातमी दुसऱ्या कोठून कळणार ? तेव्हां माझा नवरा तुमच्या टोळींत आलेला असला पाहिजे. आणि हें जर खरें असेल,

तर तुमच्या चोरांच्या टोळींतील तुम्हीही एक चोरच असलां पाहिजे, यांत बिलकूल शंका नाहीं. तेव्हां सांगा आतां, मी तुम्हांला चोर म्हणून बरोबर ओळखलें कीं नाहीं ? "

" जमनामाई, तुमच्या भय्यासाहेबाला तुम्ही चोर म्हणतां ? " भाऊसाहेब खालीं मान घालून म्हणाले.

" कोण भय्यासाहेब ? कुठले भय्यासाहेब ? "

" झांशीवाले. "

" झांशीवाले भय्यासाहेब ! " जमनामाई एकदम दचकून म्हणाली, " कोण ? झांशीवाले भय्यासाहेब ! " असे फिरून उद्‌गार काढून ती त्यांच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पाहूं लागली. " मी तुम्हांला अगदींच ओळखलें नाहीं ! "

" कसें ओळखणार ? माझ्या एकंदर स्थितीमध्यें फारच फरक पडला आहे. "

" तो कशानें ? "

" माझ्या दुर्दैवानें ! "

" परमेश्वर तुमच्यावर इतका कसा कोपला ? असें झालें तरी काय ? तुमच्या-बरोबरचे ते सगळे शिपाई प्यादे कोठें आहेत ? आणि आमच्या वहिनीसाहेबांना तुम्ही कोठें पाठ—? "

जमनामाईच्या तोंडून वरील वाक्य अर्धवट उच्चारलें गेलें नाहीं, तोंच भाऊ-साहेबांच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले आणि त्यांचा कंठ गहिंवरून आला.

परंतु कांहीं वेळानें दुःखाचा हुंदका कमी झाल्यावर भाऊसाहेब तिला म्हणाले, " जमनामाई, मी तुम्हांला माझ्या कर्मकथेची सगळी हकीकत मग सांगेन. सध्यां अगदीं दुपारची वेळ झालेली आहे आणि तुमचे प्राण भुकेनें अगदीं व्याकुळ झालेले दिसत आहेत. तेव्हां हीं मी थोडींशीं फळें गोळा केलीं आहेत, तीं त्या पलीकडच्या माझ्या ओढ्याच्या कांठीं झाडाच्या सावलींत बसून आपण खाऊं आणि त्यावेळीं एकीकडे माझी हकीगत मी तुम्हांला सांगेन आणि तुमच्या नवऱ्याचा शोध लावण्याला काय उपाय योजिला पाहिजे याचाही आपण त्या वेळीं विचार करूं. "

असें म्हणून तीं दोघें भाऊसाहेबांच्या राहण्याच्या ठिकाणाकडे निघून गेलीं.

• • •

: : रांग दहावी

कोंकणांत जाण्याकरितां आपल्या पत्नीच्या सहवर्तमान भाऊसाहेब झांशीहून निघाल्यानंतर मध्यंतरींचीं प्रेक्षणीय स्थळें पहात पहात प्रवास करीत असतांना ते सागर येथें असलेल्या साधु किसनप्रसाद आणि जमनामाई यांच्या मठामध्यें कांहीं दिवस मुक्कामाला राहिले होते. व तेथें असतां या सर्व मंडळींचा एकमेकाशीं बराच चांगला स्नेह जमला होता. किसनप्रसाद यांचें तेथें एक गोपाळकृष्णाचें मंदिर होतें. आणि त्यांतच भाऊसाहेब आणि वहिनीसाहेब उतरलेल्या होत्या. परंतु भाऊसाहेब आणि जमनाबाई ह्या दोघांच्याही स्थितीमध्यें पुष्कळ फरक पडलेला असल्याकारणानें तीं दोघेहीं एकमेकांना ओळखूं शकलीं नाहींत, आणि त्यामुळें पूर्वीच्या रांगेंत सांगितल्याप्रमाणें त्या एकमेकांची ओळख पटतां पटतां बरेच घोटाळे उत्पन्न झाले. परंतु अखेरीस ओळख पटल्यानंतर आपण इतका वेळ एकमेकांना कसें ओळखलें नाहीं, याच्याबद्दल त्या दोघांनाही मोठें आश्चर्य वाटलें ! आणि भाऊसाहेबांच्या गुहेजवळील ओढ्याच्या कांठीं असलेल्या झाडाच्या सावलींतील दगडावर बसून तीं उभयतां फलाहार करीत असतां भाऊसाहेबांसारख्या सद्गृहस्थांना चोर म्हटल्याबद्दल जमनामाईनें भाऊसाहेबांची किती तरी वेळां क्षमा मागितली ! जम्नामाईचा नवरा किसनप्रसाद हा कोठें नाहींसा झाल्याबद्दल भाऊसाहेबांनाही मोठा अचंबा वाटला. आणि भाऊसाहेब व वहिनीबाई यांच्यावरील दुर्धर प्रसंगांची हकीकत ऐकून जम्नामाईला किती दुःख झालें याचें वर्णनही करितां येणें शक्य नाहीं. बायकांचें अंतःकरण जात्याच फार कोमल असतें. आणि त्यांतून जम्नामाईचा स्वभाव फारच प्रेमळ होता. सागर येथील थोड्या दिवसांच्या मुक्कामामध्यें तिचें वहिनीसाहेबांवर अतिशय प्रेम जडलें होतें. त्यामुळें वहिनीसाहेबांची झालेली अवस्था ऐकून तर तिचे दुःखाचे हुंदके कांहीं केल्यानें थांबतच ना !

" भय्यासाहेब," उत्तर हिंदुस्थानांतील रिवाजाप्रमाणें जम्नामाई भाऊसाहेबांना भय्यासाहेब या नांवानेंच उद्देशून बोलत असे. त्याप्रमाणें त्यांना संबोधून ती म्हणालीः—" मला वाटतें, तुम्ही वहिनीबाईचा पुढें फिरून शोध केल्यावांचून इतके दिवस राहिलां, हें बरोबर झालें नाहीं."

" जम्नामाई," भाऊसाहेब म्हणाले, " शोध करावयाचा कोणाचा! मनुष्य जिवंत असेल, तर त्याचा शोध करावयाचा. पण, जम्नामाई,–" इतकेंच अर्धवट शब्द उच्चारून भाऊसाहेबांनीं आपली मान गुडघ्यांमध्यें घातली आणि ते ढळढळां रडूं लागले. त्यांच्यानें पुढील शब्द उच्चारवेनात.

" भय्यासाहेब," जम्नामाई म्हणाली, " तुम्हीं चुकत आहां. मी या ठग लोकांच्या पुष्कळ गोष्टी ऐकल्या आहेत, त्यांवरून वहिनीबाईसंबंधाची ही तुमची कल्पना अगदीं बरोबरच असेल, असें माझ्यानें म्हणवत नाहीं. हे ठग लोक आपल्या रुमालानें एकाद्याला गळफास घालतात आणि तो मेला आहे असें समजून त्याची चीजवस्त लुटून घेऊन घाईघाईनें चालते होतात. अशा वेळीं ज्यांच्या आयुष्याची दोरी बळकट आहे असे कांहीं लोक जिवंत होऊन फिरून शुद्धीवर आल्याचीं उदाहरणें मला माहीत आहेत."

" जम्नामाई," भाऊसाहेब म्हणाले, " पण माझें भाग्य तितकें बलवत्तर नाहीं!'

" भाग्य बलवत्तर आहे किंवा नाहीं," जम्नामाई म्हणाली, " हें पाहिल्याशिवाय कसें समजणार? तुम्हीं ज्या वेळेला तिला पाहिलीत, त्यावेळीं कदाचित् ती नुसती बेशुद्ध होऊन पडलेली असेल. तिला टाकून तुम्ही गेलां, त्यानंतर फिरून तिला पाहण्यासाठीं तुम्ही परत आलां कोठें?"

" परत येऊं कसा?' भाऊसाहेबांनीं उत्तर दिलें. " त्या ठगांच्या तावडींत सांपडल्यानंतर तिच्या शोधाकरितां मी परत येणें शक्य कसें होतें?"

" पण, भय्यासाहेब," जम्नामाई म्हणाली. " तुम्ही त्यांच्या तावडींतून सुटल्यानंतर तरी तिच्या शोधाकरितां जावयाला पाहिजे होतें. माझीच गोष्ट घ्या ना! माझा नवरा घरांतून नाहींसा झाला, हें मला सकाळीं कळल्याबरोबर माझा पाय कांहीं घरांत टिकेना. मी त्याचा शोध लावण्याकरितां ताबडतोब घरांतून बाहेर पडलें."

" जम्नामाई," निराशेच्या स्वरानें भाऊसाहेब बोलले, " तुमची गोष्ट अगदीं निराळी आहे. तुमच्या सुदैवानें किसनप्रसाद हयात आहेत; तेव्हां त्यांना शोधणें हें ठीकच आहे. उलट तुम्ही त्यांना शोधण्याकरितां निघालां नसतां, तर तो दोष झाला असता. पण मी कोणाला शोधूं ! जम्नामाई, मी आतां तुमच्या मैत्रिणीला कोठें शोधूं ! या लोकांत ती आतां मला कोठें सांपडणार आहे ! "

" भय्यासाहेब, " जम्नाबाई त्यांची समजूत करीत करीत म्हणाली. " तुम्ही असे निराश होऊं नका. मला माहीत आहे कीं, कांहीं ठग देखील चांगले असतात. व कांहींचा तर असा नियम सुद्धां असतो कीं, बायकांच्या जिवाला कधीं धक्का लावावयाचा नाहीं. "

" तुम्हीं मला उगीच मृगजळाच्या पाठीमागें धांवावयाला लावूं नका. " भाऊसाहेब जम्नामाईंना म्हणाले.

" पण त्यांत तुमचें नुकसान तर कांहीं नाहीं ? " जम्नामाईनें विचारलें.

भाऊसाहेब म्हणाले, " जम्नामाई, तुम्हीं ही जी नवीन कल्पना माझ्या मनामध्यें भरवून देत आहां आणि माझी पत्नी कदाचित् जिवंतही असेल, अशी ही जी नवीन दिशा तुम्हीं माझ्या विचाराला लावून देत आहां, त्याच्या योगानें माझ्या मनाला एक नवीन प्रकारच्याच किती तीव्र वेदना होऊं लागल्या आहेत, याची तुम्हांला कल्पना नाहीं ! ती जिवंत असली, तर तिला काय काय यातना होत असतील ! जम्नामाई, तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें त्यावेळी ती खरोखरच बेशुद्ध पडलेली असली, तर शुद्धीवर आल्यावर तिथें तिची काय अवस्था झाली असेल ! मी तिच्या जवळपास कोठेंही नाहीं, असें पाहून तिला काय वाटलें असेल ! तिनें केवढ्यानें हंबरडा फोडला असेल ! आणि ती किती वेळ जमिनीवर लोळत पडली असेल ! तिचे अश्रु कोणी पुसले असतील आणि तिला कोण ' उगी रहा ' म्हणून म्हणालें असेल ! ती कोठें फिरली असेल आणि तिनें कोणापाशीं विचारपूस केली असेल ! जम्नामाई, तुमची जशी किसनप्रसादवर, तशीच माझ्या प्रियेचीही माझ्यावर निस्सीम आणि एकनिष्ठ प्रीति होती. आणि किसनप्रसाद नाहींसा झालेला समजल्यावर तुम्ही जशा त्याला शोधण्याकरितां चोहोंकडे ताबडतोब फिरूं लागलां तशी माझी प्रियाही मला शोधण्याकरितां चोहोंकडे फिरत असेल ! ती डोंगरांतून आणि रानांतून फिरत असतांना तिच्या पायांना किती तरी कांटे बोचत असतील ! त कांटे आतां कोण काढील !— जम्नामाई, तुमच्या सागरला आम्ही येऊन

पोंचण्याच्या आधीं एके दिवशीं संध्याकाळी आम्ही दोघेंजण हौसेनें मुद्दाम अनवाणी चालत असतां माझ्या प्रियेच्या पायाला असाच एक कांटा बोचला ! तेव्हां रस्त्याच्या कडेला थांबून एका दगडावर बसून मी तिचा पाय कांटा काढण्यासाठीं आपल्या मांडीवर घेतला ! तेव्हां ती किती तरी लाजली ! आणि कांटा पायांत सलत होता, तरी ' माझ्या पायांतला कांटा काढावयालाच नको ! ' असें ती लाजत लाजत आणि हंसत हंसत किती तरी वेळां म्हणाली ! तिचें तें कमलासारखें आरक्तवर्ण, लहानसे आणि गोजिरवाणें पाऊल मी आपल्या मांडीवर घेतलें आणि कांटा बोचल्याच्या जागीं फुंकर घालण्याकरितां म्हणून मी आपलें तोंड इतकें जवळ नेलें कीं, फुंकर घालतां घालतां त्या सुंदर पदकमलाचें चुंबन घेतल्यावांचून माझ्यानें राहवेना ! पुढें मी कांहीं वेळानें मागाहून कांटा काढला, पण माझ्या त्या प्रेमरसाच्या भरामध्यें आपल्या त्या कांट्याचें दुःख ती आधींच विसरून गेली होती !— जम्नामाई, ती मात्र मला सगळीकडे शोधीत असेल आणि मी मात्र तिला कोठेंही न शोधतां या ठिकाणीं स्वस्थ बसलों आहे ! किती मी कृतघ्न ! ”

हे विचार भाऊसाहेबांच्या मनामध्यें येत असतांना त्यांचें हृदय भरून आलें, त्यांचा कंठ दाटून आला, आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या; परंतु कांहीं वेळानें तो दुःखाचा उमाळा निघून गेल्यानंतर भाऊसाहेब फिरून म्हणालेः—“ जम्नामाई, तुमच्या म्हणण्याप्रमाणें ती जिवंत असली, तर कदाचित् ह्या जंगलामध्येंही ती मला शोधीत फिरत असेल ! किंवा कदाचित् मी येथें यण्याच्या पूर्वींच ती येथल्या झाडांना आणि वेलींना माझ्याबद्दलची माहिती विचारून येथून निराश होऊन गेली असेल !—हे या अरण्यांतील वृक्षांनो आणि वेलींनों, माझी प्रिया येथें आली होती काय ? तुम्हीं तिला पाहिलें काय ? तिनें तुम्हांला काय प्रश्न विचारिले ? नळराजानें दमयंतीला झोंप लागली असतां टाकून दिलें, त्याप्रमाणें मला टाकून गेलेला माझा प्रियपति तुम्हीं कोठें पाहिला काय, असें तिनें तुम्हांला नाहीं विचारिलें ?—पण या झाडांना बोलतां येत नाहीं, हें या उन्मादाच्या अवस्थेमध्यें मी अगदींच विसरून गेलों ! ”

भाऊसाहेबांची ही स्थिति पाहून जम्नामाईला अतिशय वाईट वाटलें व तिनें त्यांचें सांत्वन करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; परंतु तो सर्व व्यर्थ झाला. आणि फिरून भाऊसाहेब देहभान विसरून वहिनीसाहेबांच्याबद्दल नानाप्रकारचा शोक करूं लागले. आपण कोणापाशीं काय बोलत आहों याच्याबद्दलही कांहीं

सुद्धां सारासार विचार मनांत न राहून ते जम्नामाईला हांक मारून म्हणाले, " जम्नामाई, मी या विंध्य पर्वतावर पहिल्यानें विरहावस्थेमध्यें येऊन राहिलों, त्या वेळीं मी लहानपणीं पाठ केलेल्या आणि तरुणपणीं रसास्वाद घेतलेल्या कालिदासाच्या त्या 'मेघदूत'नामक अप्रतिम काव्याची मला पदोपदीं आठवण होत असे. त्या कालिदासाचा तो कांताविरहविधुर यक्ष याच विंध्य पर्वतावर कोठें तरी राहिलेला असावा. तो या विंध्य पर्वतावर विरहदुःखानें व्याकुळ होऊन वेड्यासारखा इकडे तिकडे फिरत असतांना त्याचीं जेथें पावलें पडलीं असतील, तेथेंच कदाचित् माझींही पावलें पडत असतील ! बायकोच्या विरहानें वेड्या झालेल्या त्या यक्षाच्या पावलांवर पावलें टाकीत मीही वेडयासारखा त्याच्या त्या मेघदूतांतील सगळे श्लोक पहिल्यापहिल्यानें रोज म्हणत असें !—परंतु आम्ही दोघें विरही या नात्यानें जरी सारखेच होतों, तरी त्याची बायको जिवंत होती ! आणि एक वर्षानें कां होईना, पण ती त्याला फिरून भेटावयाची होती ! परंतु माझी स्थिति त्याच्याहून अगदीं निराळी होती ! माझी कांता मरण पावलेली असून एकच काय, परंतु हजारों वर्षें लोटलीं, तरी तिचा आणि माझा फिरून समागम व्हावयाचा नाहीं, अशी माझी दृढ समजूत झालेली होती ! त्यामुळें मेघदूत हें इतकें उत्तम काव्य असूनही मला पुढें पुढें तें आवडेनासें झालें होतें ! पण, जम्नामाई, तुम्ही माझ्या पत्नीला आज फिरून जिवंतच केलें, असें मला वाटत आहे. माझी पत्नी जिवंत असेल, माझ्यावांचून दीन झाली असेल, आणि हाका मारीत ती रानावनांतून मला कदाचित् कोठें तरी हुडकीत असेल, असें मला आज वाटूं लागलें आहे ! आणि त्यामुळें आज सगळे मेघदूत मला फिरून नव्या स्वरूपामध्यें दिसूं लागले आहेत आणि त्यांतील प्रत्येक श्लोकाचा अर्थ आतां मला पाहिजे तसा सोईचा झाला आहे. त्यांतील गेलेली गोडी फिरून आली आहे ! कारण, काव्यांना गोड कोण करतें ? आपल्या मनाची स्थिति ! ती माझ्या मनाची स्थिति तुम्ही आज अनुकूल केली आहे. तेव्हां आतां लवकरच वर्षाकाल सुरू होणार असल्यामुळें जो मेघ या विंध्य पर्वताच्या आसपास मला पहिल्यानें भेटेल, त्याला मी आपल्या प्रियेच्या शोधाकरितां पाठवीन ! "

विरहदुःखाच्या अतिरेकामुळें उत्पन्न होणाऱ्या उन्मादाच्या आणि वेडेपणाच्या एकामागून एक उसळणाऱ्या या लहरी पाहून जम्नामाई अगदीं घाबरून जाऊं लागली ! त्या बिचारीला मेघदूत काय आणि यक्ष कोण हें काय माहीत ! आणि

हिला हें माहीत असणें शक्य नाहीं, इतकें देहभान असण्याइतकी भाऊसाहेबांची मनःस्थिति मुळींच उरलेली नव्हती. म्हणून अशा वेळीं भाऊसाहेबांच्या मनाला या गोष्टीचा विसर पडावा म्हणून जम्नामाईनें भाषणाचा ओघ बदलण्याचा प्रयत्न सुरू केला. आपल्या बायकोच्या अंगावरचे दागिने आपण आपल्याबरोबर कसे परत आणिले याची हकीकत भाऊसाहेबांनीं जम्नामाईला सांगितली होती. ते दागिने चोरांनीं पुरून ठेविलेल्या जागेमधून उकरून काढतांना तुम्हांला कोणी पाहिलें नाहीं कसें, असा जम्नामाईनें विषयांतराचा प्रश्न काढला. तो ऐकल्या-बरोबर भाऊसाहेब चटकन् उठून गुहेमध्यें गेले आणि त्यांनीं तें दागिन्यांचें गाठोडें जम्नामाईच्या पुढें आणून सोडिलें व त्यांतील एक एक दागिना हातांत घेऊन जम्नामाईपाशीं त्यांनीं बोलण्यास सुरुवात केली. "जम्नामाई, मी हे दागिने जेथून उकरून काढिले, तेथें दुसरेही पुष्कळ दागदागिने आणि सोनें नाणें पुरलेलें होतें. पण मी आपल्या स्वतःच्या दागिन्यांशिवाय दुसऱ्या कोणाच्या तनसडीला देखील हात लाविला नाहीं. मी येतांना घाईघाईनें हे दागिने तेथून उकरून काढून आपल्याबरोबर आणिले खरे; पण ते येथें आणून ठेविल्यावर मी शांतपणानें विचार करूं लागलों, तेव्हां माझ्या वेडेपणाचें माझें मलाच हसूं येऊं लागलें. मी हे दागिने कोणाकरितां आणिले! जिच्या अंगावर हे दागिने घालावयाचे, ती माझी प्रियतमाच जर जिवंत नाहीं, तर मग हे दागिने आणून मला काय करा-वयाचें होतें! हे मूळचे जरी माझे दागिने होते, तरी ते चोरीच्या हक्कानें करीम-बक्षाचे झालेले होते. त्याच्या ताब्यांतून त्याच्या नकळत हे दागिने उकरून काढून मी हें जें चोरीचें पातक केलें, तें कशासाठीं केलें? ज्यांत धड स्वार्थही नाहीं आणि परमार्थही नाहीं, असलें हें वेडेपणाचें कृत्य विनाकारण केल्याबद्दल मला पश्चात्ताप होऊं लागला व करीमबक्षाची आणि माझी फिरून गाठ पडली, तर त्याच्या अधमपणाच्या असंख्य कृत्यांबद्दल माझ्या तरवारीनें त्याला देहांत प्रायश्चित्त देण्याच्या आधीं हे त्याचे दागिने त्याच्या हवालीं करावे असा निश्चय करून मी या दागिन्यांचें हें गाठोडें त्या गुहेच्या एका कोपऱ्यामध्यें फेकून दिलें होतें! माझी प्रिया जर आतां दृष्टीस पडणें शक्य नाहीं, तर हे अपशकुनी दागिनेही माझ्या दृष्टीसमोर नकोत, असें मला आतांपर्यंत वाटत होतें! आणि म्हणून मीं ते दृष्टीआड करून ठेविले होते! पण, जम्नामाई, कदाचित् माझी प्रिया अजूनही जिवंत असेल, ही कल्पना माझ्या डोळ्यांपुढें ठेवून या दागिन्यां-

विषयीं तुम्ही मला प्रश्न केला, तेव्हांपासून पूर्वी निरुपयोगी वाटत असलेल्या या दागिन्यांची उपयुक्तता मला फिरून भासूं लागली! जम्नामाई, तुम्हीं माझ्या प्रियपत्नीला या वेळीं फिरून नवीन जन्म दिला आहे! आणि या दागिन्यांमध्यें फिरून नवीन महत्त्व उत्पन्न केलें आहे!—हे दागिने माझेच आहेत! आणि ते माझ्या आतां मला सांपडणाऱ्या प्रियतमेसाठीं मला पाहिजेच आहेत! माझा प्राण गेला, तरी करीमबक्षाला यांतील एक रजःकण देखील मी परत देणार नाहीं! जम्नामाई, मी या दागिन्यांना अपशकुनी म्हटलें?—माझी प्रिया जर जिवंत असेल, तर यांच्यासारखे शुभ शकुनाचे दागिने दुसरे कोणतेच नाहींत, असें म्हटलें पाहिजे! मी हे सगळे दागिने आपल्या हातानें फिरून आपल्या प्रियेच्या अंगावर घालीन!—हें हिऱ्याचें मंगळसूत्र मी फिरून तिच्या गळ्यामध्यें बांधीन!—ही नथ मी फिरून तिच्या नाकामध्यें घालीन!—ही नुसत्या नांवाची चंद्रकोर तिच्या मुखचंद्राच्या सन्निधभागीं ठेवून मी या दागिन्याचें नांव सार्थ करीन!—हें जडावाचें फूल मी आपल्या हातानें तिच्या त्या केश-कलापामध्यें घालीन!—जम्नामाई, तुम्हीं माझ्या प्रियेला फिरून जिवंत केलें आहे, हे तुमचे केवढे उपकार आहेत!"

"भय्यासाहेब!" जम्नामाई दुःखाचा सुस्कारा टाकून म्हणाली, "वहिनी-बाईंच्या शोकानें तुमचें डोकें अगदीं बेसुमार फिरून गेलेलें आहे असें दिसतें. त्यांच्या विरहानें तुम्ही अगदीं वेडे होऊन गेलेले आहांत! आणि तुमचा हा भ्रम अगदीं कळसाला जाऊन पोंचला आहे. तुम्ही काय बोलतां त्याला ताव ना तंत्र! मी वहिनीबाईंना कोठून जिवंत करणार? कदाचित् त्या जिवंत अस-तील, एवढेंच माझें म्हणणें. पण जिवंत असतीलच, अशी मला तरी काय खात्री आहे?"

"काय! तर मग जम्नामाई, माझी प्रिया जिवंत नाहीं!—हाय हाय जम्नामाई, मी समुद्रांत बुडत होतों, त्यांतून जरा वर काढून फिरून तुम्ही निष्ठुर-पणानें त्या अगाध समुद्रामध्यें मला बुडवून टाकीत आहां!—तर मग आतां पर्यंत मी जें बरळत होतों, तें सगळें मनोराज्यच होय?—काय? माझी प्रिया जिवंत नसेल?—आणि तर मग मी एवढा वेळपर्यंत निव्वळ एखाद्या आकाश-पुष्पाचाच वास घेत होतों?—तर मग हे सगळे दागिने फिरून निरुपयोगी झाले! आणि त्या मेघदूतामध्यें उत्पन्न झालेली गोडीही फिरून नाहींशी झाली!

प्रिये, तूं कोठें आहेस? इहलोकीं कीं परलोकीं?—जम्नामाई, काय करूं? माझ्या प्रियेचा विरह मला सहन होत नाहीं हो!"

"भय्यासाहेब," जम्नामाई डोळ्यांतील अश्रु पुशीत पुशीत म्हणाली, "कसा विरह सहन होईल? तुमची तर ती जन्माची मैत्रीण होती! पण माझा थोड्या दिवसांचा परिचय असूनही तिची अशी स्थिति झालेली पाहून मलासुद्धां हें दुःख सहन होईनासें झालें आहे. तिचे एकेक गुण आठवले, म्हणजे माझ्या पोटांत भडभडून येतें. स्वरूपानें तर त्या अप्रतिम होत्याच, पण त्यांच्या अंगचे गुणही अप्रतिम होते. त्यांनीं आमच्या देवळाच्या भिंतीवर रामवनवासाचें चित्र काढलं आहे, तें किती सुंदर निघालें आहे! तुम्हांला तें आठवतें ना?"

"माझें डोकें अगदीं भ्रमिष्ट होऊन गेलें आहे." भाऊसाहेब म्हणाल. "मला चांगलेंसें आठवत नाहीं. काय बरें त्या चित्रांत कथाभाग होता?"

"राम, लक्ष्मण, सीता" जम्नामाई सांगूं लागली, "दंडकारण्यांतलि एका आश्रमांत राहत असतां तेथें एक सुवर्णमृग आला आणि राम त्याच्या पाठीस लागून निघून गेल्यानंतर दुसरीकडून रावण तेथें आला, येथपर्यंतच्या कथाभागाचें चित्र गंगाबाईनीं आमच्या गोपालकृष्णाच्या मंदिराच्या भिंतीवर अतिशय सुरेख काढलें आहे! तुमचा ताबडतोब पुढें निघून जाण्याचा बेत झाला, म्हणून तें चित्र तितकेंच अर्धवट राहिलें; नाहीं तर गंगाबाईच्या मनांतून तें पुरें करावयाचें होतें. म्हणून जातांना त्यांनीं मला एकीकडे नेऊन हळूच सांगितलें कीं, मी परत येतांना मुद्दाम तुमच्या मठांत चार दिवस राहीन आणि हें अर्धवट राहिलेलें चित्र पुरें करून देईन!"

"पण जम्नामाई," शोकाचा उमाळा न आवरून भाऊसाहेब मध्येंच बोलूं लागले, "आतां तें चित्र अर्धवटच राहणार! आमच्या उभयतांच्या संसाराचेंही चित्र असेंच अर्धवट नाहीं का पडलें! आमच्या उभयतांच्या आयुष्याचाही कथाभाग असाच अर्धवट आणि अपुरा नाहीं का राहिला! तो आतां कसला पुरा होणार! जम्नामाई, कोठपर्यंत चित्र काढून अपुरें राहिलें म्हणून तुम्ही म्हणालां?—राम सुवर्णमृगाच्या पाठीस लागून निघून गेल्यानंतर दुसरीकडून रावण तेथें आला, इतकेंच तेथील चित्र झालें आहे?—हाय! हाय! आमच्याही रामायणाचें चित्र इतकेंच होऊन थांबलें! मी आपल्या नोकराचें रक्षण करण्याकरितां त्या चोरांच्या अंगावर धांवून गेलों आणि इकडे पाठीमागें दुसऱ्या

कोणी तरी चोरानें माझ्या प्रिय पत्नीचे प्राण हरण केले!—जम्नामाई, तुमच्या देवळांतील भिंतीवर माझ्या प्रियेनें काढलेलें चित्र सीतेला चोरून नेण्याला रावण आला येथेंच कां बरें थांबावें! तें त्या वेळीं तेथेंच थांबलेलें चित्र आणि पुढें थोड्याच दिवसांत तेथेंच थांबणारें आमच्या आयुष्याचें चित्र यांच्यांत किती तरी साम्य! भूतकाळ आपल्याकडून भविष्यकाळच्या आपत्तींबद्दल कितीतरी सूचना देत असला पाहिजे! पण अज्ञानी माणसाला त्या कांहीं कळत नाहींत! हाय! हाय! सीतेच्या विरहामुळें श्रीरामचंद्रांची जी अवस्था झाली होती, तीच हल्लीं माझी झाली आहे! पण सीतेला रावणानें चोरून नेलें, तरी पण सीता जिवंत होती म्हणून रामाची आणि तिची फिरून गांठ पडली! पण माझी प्रिया जिवंत नाहीं! मग माझी आणि तिची गांठ कशी पडणार? आणि आमचें हें अल्पवयांत अर्धवट राहिलेलें चित्र पुरें कसलें होणार!"

"भय्यासाहेब, अल्पवय म्हणून काय विचारितां?" जमनामाई म्हणाल्या. "गंगूबाईचें वय तर अगदींच लहान होतें!"

"अहो!" भाऊसाहेब म्हणाले, "तिचा पोरपणा आणि अल्लडपणा अजून मुळींच गेला नव्हता. माहेरचा ओढा कमी होणें आणि सासरच्या स्थितीकडे लक्ष लागणें ही जी स्त्रियांच्या तारुण्यांतील एक अवस्था असते, ती अद्यापि तिच्यापासून किती तरी दूर होती! तिची बाल्यावस्था अद्यापि गेलेली नसल्यामुळें ती माहेरीं जाण्यासाठीं अतिशय उत्सुक झालेली होती!—तिच्याकरितां ग्वाल्हेराहून मी एक भरजरीचा हिरवा शालू माहेरीं गेल्यावर डोहाळजेवणाचे वेळीं नेसण्यासाठीं मागविला होता. पण आमच्या निघण्याच्या दिवसापर्यंत तो कांहीं पुरा झाला नाहीं. म्हणून मी म्हटलें कीं, चार दिवस आपण आणखी थांबून मग निघूं. पण माहेरीं जाण्याला उत्सुक झालेल्या तिच्या मनाला चार दिवसांची देखील अवधि खपेना. ती म्हणाली, 'तो शालू तसाच अर्धवट राहूं द्या, आपण आल्यावर तो पुरा करून आणा, आणि मग मी तो तुम्हांला नेसून दाखवीन!' जम्नामाई, तुमच्या सागरच्या भिंतीवरच चित्रच अर्धवट पडलेलें आहे असें नाहीं, तर मी तिच्यासाठीं मुद्दाम काढावयाला सांगितलेला भरजरी हिरवा शालूही तिकडे त्या ग्वाल्हेरच्या मागावर अर्धवट पडलेला असेल! तो आतां कोणासाठीं पुरा करावयाचा! आणि तो आतां नेसणार तरी कोण!—चित्र अर्धवट! शालू अर्धवट! माझा संसार अर्धवट!—बोलावणें आलें म्हणजे सगळीं कामें अर्धवट टाकून

माणसानें गेलें पाहिजे!—" याच्यापुढें शोकावेगामुळें भाऊसाहेबांच्यानें मुळींच बोलवेना, म्हणून ते कांहीं वेळ अगदीं स्तब्ध राहिले; परंतु त्यांच्या आणि जम्नामाईच्या डोळयांतून अश्रुमात्र एकसारखे वाहत होते. अखेरीस कांहीं वेळानें आपले डोळे पुसून भाऊसाहेब फिरून बोलूं लागले, " हं, जम्नामाई, मी काय सांगत होतों? तिच्या माहेरीं जाण्याच्या उत्सुकतेबद्दल आणि उतावळेपणाबद्दल, नव्हे का? ती माहेरीं जाण्यासाठीं किती आतुर झाली होती म्हणून सांगूं! आपल्या आईबापांकडून आलेलीं पत्रें ती फिरून फिरून तीनतीनदां वाचीत असे! आणि लवकर निघावयाचें करावें, आई बाबा वाट पहात असतील, असें ती म्हणत असे! आणि आपलें तें कोंकणांतलें जन्मभूमीचें घर आपण केव्हां पाहूं, असें तिला झालें होतें!—लहानपणीं मुलींना आपल्या माहेरघराची मोठीच आवड असते! पण प्रिये, तुझें तें कोंकणांतील माहेरघर दूर राहून तुझा कोंकणचा आणि इहलोकचा प्रवास येथें ह्या विंध्य पर्वतांतच संपला!—तुझे आई बाप तूं आतां येणार म्हणून तुला पाहण्यासाठीं जर तेव्हां इतके उत्सुक झालेले होते, तर अजूनही तूं येत नाहींस म्हणून आतां ते किती निराश झाले असतील!--दुर्दैवानें त्यांची माझी गांठ पडली, तर मी त्यांना काय सांगूं! विवाहाच्या वेळीं अग्नीच्या आणि ब्राह्मणांच्या समक्ष जी आमची मुलगी तुमच्या स्वाधीन केली, ती आमची मुलगी कोठें आहे, म्हणून त्यांनीं विचारिलें, तर मी त्यांना काय उत्तर देऊं? आणि मी त्यांची भेट तरी कोणत्या तोंडानें घेऊं!—जसें मला माझ्या घरीं जातां येत नाहीं, त्याचप्रमाणें मला माझ्या प्रियेच्याही घरीं जातां येत नाहीं. त्यांनीं आम्हांला दोघांना भेटावयाला बोलाविलें होतें; आणि तीं आमची दोघांची वाट पहात असतील! अशा स्थितींत मी त्यांच्यापुढें एकटाच जाऊन उभा राहूं? पण मी यदाकदाचित् तिकडे जावयाला निघालों, तर मी त्यांच्यापर्यंत जाऊन पोंचणार कसा!—माझ्या प्रियेला, तिच्या त्या सह्याद्रिवरील अरण्यें आणि नद्या, उंच डोंगर आणि खोल दऱ्या हीं फार आवडत असत!--आणि ती आणि मी अशीं आम्ही दोघेंजण मिळून तिकडे जातांना त्या वनश्रीच्या सौंदर्याचा रसास्वाद घेणार होतों! त्या सह्याद्रीमधून कोंकणांत जाते वेळीं अमलांत आणावयाचे म्हणून आम्ही दोघांनीं मिळून किती तरी बेत करून ठेविले होते! त्या डोंगरांतल्या झाडांनीं आणि वेलींनीं ठिकठिकाणीं आपोआप बनविलेल्या नैसर्गिक

लताकुंजांमधून तेथीलच एखाद्या अगदीं लहानशा कां होईना, पण एकाच शिलातलावर, आपण दोघें अगदीं एकमेकांच्या जवळ जवळ बसूं; त्या डोंगरांतील खुरट्या झाडांनीं आणि वेलींनीं तिन्ही बाजूंनीं मंडप घालून सूर्याच्या किरणांना देखील आंत काय चाललें आहे हें दिसूं द्यावयाचें नाहीं इतकी जेथें गर्द दाटी करून ठेवलेली असते, अशा त्या डोंगराळ वाटांतून आणि बांधलेल्या घाटांमधून आपण दोघें बरोबर चालूं; जेथे झाडी नसेल, अशा डोंगराच्या एखाद्या उंच टोंकावर आपण दोघेंजण चढूं, आणि तेथून खालचीं उंच झाडें ठेंगणीं झालेलीं आणि मोठ्या नद्या लहान झालेल्या आणि सगळ्या जमिनीवर जिकडे तिकडे हिरव्यागार गवताचे आणि निरनिराळ्या रंगांच्या फुलांचे गालिचे पसरलेले, अशी दिव्य सृष्टिशोभा आपण दोघें बरोबर पाहूं; एखादी स्वच्छ आणि उथळ पाण्याची नदी आडबाजूला भेटली, म्हणजे आपल्या बरोबरच्या चाकरमाणसांना कांहीं तरी कामाच्या निमित्तानें जरा दूर कोठें तरी पाठवून आपण दोघेंजण त्या नदींत एकदम बरोबर स्नान करूं; रानांतील कुड्याच्या सुवासिक फुलांचे सुवासिक गुच्छ करून ते आपण एकमेकांना देऊं, आणि दुसऱ्या दुर्मिळ सुगंधयुक्त फुलांचा एकच गुच्छ करून त्याचा आपण दोघेंजण एकमेकांच्या तोंडाशीं गाल आणि गालाशीं तोंड आणून एकदम बरोबर वास घेऊं; असे अनेक प्रकारचे संकल्प या सह्याद्रीवरील निरनिराळ्या स्थळांच्या संबंधानें आम्ही मनामध्यें योजून ठेविले होते. तीं तीं स्थळें मला वाटेंत भेटलीं आणि माझी प्रिया त्यांना भेटली नाहीं, तर तीं स्थळें मला एक पाऊल तरी पुढें टाकूं देतील काय!—सारांश, माझ्या प्रियेच्या विरहानें मला कोठेंही जाण्याला जागा ठेवली नाहीं. माझी प्रिया असती आणि तिनें ते आपल्या पूर्वपरिचयाचे सह्याद्रीमधील नैसर्गिक सौंदर्याचे देखावे जिकडे तिकडे रानोमाळ पसरलेले पाहिले असते, तर तिचें अंतःकरण त्या सह्याद्रीच्या दऱ्यांतून स्वैरपणानें नाचणाऱ्या वाऱ्याप्रमाणें लहान वयांतील स्वाभाविक औत्सुक्यानें नाचूं लागलें असतें!"

"भय्यासाहेब," जमनामाई भीत भीत भाऊसाहेबांच्या जवळ कांहीं एक गोष्ट काढण्याच्या इराद्यानें म्हणाल्या, "गंगाबाई तर वयानें लहान होत्याच. पण—"

"पण काय?" जमनामाई काय म्हणत आहेत इकडे फारसें लक्ष न देतां भाऊसाहेबांनीं विचारलें.

" नाहीं. मी कांहीं दुसरें तिसरें म्हणत नाहीं." जमनामाई दीर्घ श्वास टाकीत म्हणाल्या, " पण मी म्हणतें, गंगाबाई लहान होत्या, आणि आपलें तरी वय काय फार मोठें का झालेलें आहे ?"

" नाहीं !" भाऊसाहेबांनीं खिन्नतेनें उत्तर दिलें, " जमनामाई, माझेंही वय फार नाहीं. बाल्य आणि तारुण्य यांच्या दरम्यानच कोठें तरी मी अजून प्रवास करीत आहे. तारुण्याच्या उंबरठ्यावर मी आपला पहिला पाय ठेविला असेल नसेल, तोंच दैवानें मला तेथून बाजूला ढकलून दिलें आहे ! तारुण्यांतील सौख्यरसाचा भरलेला पेला मी आपल्या ओंठाला लावून त्याचा पहिला घोट कोठें घेत आहे न घेत आहे, तोंच माझ्या निष्ठुर नशिबानें तो पेला माझ्या हातांतून हिसकावून घेऊन दूर फेंकून दिला आहे ! माझ्या किती तरी वासना अतृप्त राहिल्या आहेत !"

" म्हणूनच, भय्यासाहेब, मी म्हणतें,—" इतकेंच बोलून पुढें बोलण्याचें धैर्य होईना म्हणून आपला ओंठ चावून घेऊन जमनामाई मध्येंच थांबल्या.

" जमनामाई, तुम्ही काय म्हणतां ?" भाऊसाहेबांनीं मोठ्या उत्सुकतेनें विचारलें, " या दुःखाला कांहीं उपाय आहे काय ?"

" तुम्हांला पसंत पडेत असेल, तर—तर—"

" तर काय ? कांहीं उपाय असेल तर सांगा. मला असा कांहीं तरी उपाय पाहिजेच आहे."

भाऊसाहेबांचा साधेपणाचा आणि दुःखातिरेकाचा बोलण्याचा ओघ लक्षांत न येऊन जम्नामाई फसल्या. आणि आपल्या मनांत जो उपाय आलेला आहे, तोच भाऊसाहेबांनाही बहुतेक पाहिजे आहे, तेव्हां आतां बोलावयाला हरकत नाहीं, असें वाटून जमनामाई म्हणाल्या, " भय्यासाहेब, तुमचें वय अजून खरोखरच लहान आहे. तुमचें वय अजून कांहीं गेलेलें नाहीं. तेव्हां, मी म्हणतें, दुसरी एखादी—मु—"

" जम्नामाई !" भाऊसाहेब अतिशय त्वेषानें आणि अतिशय दुःखातिरेकानें म्हणाले, " जमनामाई ! तुम्ही काय म्हणतां ! दुसरी एखादी मुलगी पाहून तिच्याशीं मी लग्न करूं ? हाय हाय ! ही गोष्ट माझ्या हातून कालत्रयींही घडणार नाहीं. मी दुसरें लग्न करूं ? जम्नामाई, हीच का तुम्ही माझ्या स्वभावाची आणि प्रेमाची परीक्षा केली ?...प्रिये, मी तुझीच शपथ घेऊन सांगतों कीं, मी आपलें

प्रेम जें एकदां तुला दिलें, तें मी तुझ्यापासून कधींही परत घेणार नाहीं. हरिश्चंद्र आपलें वचन मोडील आणि श्रीरामचंद्र आपला प्रतिज्ञाभंग करील, पण मी हा तुझा अनाथ दास नेहमीं एकपत्नीव्रतानेंच राहीन! अढळ ध्रुव पाहिजे तर चंचल होवो, चंद्र पाहिजे तर उष्णतेचा अंगीकार करो आणि ही पृथ्वी पाहिजे तर आपल्या सहनशीलपणाला कंटाळून जावो, पण मी हा तुझा गरीब दास एकपत्नीव्रतानेंच राहीन!...जम्नामाई, माझी प्रिया मरण पावून आज इतके महिने झाले, तरीही मी अद्यापि मरण पावलों नाहीं, याच्याबद्दलच माझ्या या लोचट आयुष्याची मला लाज वाटत आहे! आणि अशा स्थितींत मी त्या आयुष्याचा अशा भलत्या कामाकडे दुरुपयोग करूं? माझी प्रिया मला पाहात असेल! मीं असें करूं लागलों तर ती वरून मला काय म्हणेल? ती सगळ्या पुरुषजातीला नांवें ठेवील. म्हणून म्हणतों, जम्नामाई, तुम्ही माझ्यावर रागावूं नका; पण मला ही गोष्ट मुळींच पसंत नाहीं. जाऊं द्या. या गोष्टीचा विसर पडण्याकरितां आपण दुसऱ्याच कांहीं तरी गोष्टी काढूं— आणि मला तुमच्या किसनप्रसादच्याबद्दल तुमच्याशीं बोलावयाचेंच होतें. जम्नामाई, तुमच्या नवऱ्याच्या मनांत असली ही कुकल्पना आली तरी कशी? आम्ही तुमच्या देवळांत राहात होतों, तेव्हां त्याच्या स्वभावामध्यें ही छटा असल्याचें मला कधीं आढळून आलें नाहीं!"

जम्नामाई दुःखाचा सुस्कारा टाकून म्हणाल्या, "गरिबी! गरिबी! ही गरिबी सगळ्यांना नाडते, आणि साधूंनाही चोर बनविते. खावयाला मिळेनासें झालें म्हणजे हें पोट जाळण्याकरितां बरें वाईट कांहीं तरी करावेंच लागतें. भय्यासाहेब, ही गरिबी मनुष्याचा सर्व सारासार विचार अस्ताला नेते!"

हें तिचें स्पष्टीकरण ऐकून भाऊसाहेब म्हणाले, "जम्नामाई, ह्या जगांतील चोर कमी व्हावेत आणि सावांची संख्या जास्त वाढावी असें मला वाटत होतें. आणि जे साधु आहेत ते देखील चोर बनतात, हें पाहून मला मोठें आश्चर्य वाटत होतें! पण तुम्ही हीं जीं कारणें सांगितलीं, तींही विचार करण्यासारखी आहेत. असे पोटासाठीं जर कोणी चोर होत असतील, तर त्यांच्याशीं द्वेष न धरितां त्यांच्यावर आपण दयाच दाखविली पाहिजे आणि त्यांना सुधारलें पाहिजे. तुमचा नवरा किसनप्रसाद हा इतक्या चांगल्या स्वभावाचा आहे कीं, त्याला अट्टल चोर होतांच यावयाचें नाहीं. म्हणून मी तुम्हांला खात्रीनें सांगतों कीं, तुमच्या नवऱ्याबद्दल तुम्हांला फारशी काळजी नको. तो पश्चात्ताप पावून लवकरच तुम्हांला कोठें

तरी परत घेऊन भेटेल. त्याचें काळीज काय त्या करीमबक्षासारखें उलटें आहे? करीमबक्षाच्यासारख्या टोळ्यांना नेहमीं आपलें शिर हातावर घेऊन या जंगलांतून राहावें लागतें. या डोंगरांतून वाघ, लांडगे वगैरे जे अनेक क्रूर पशु असतात, त्यांची नुसती आरोळी ऐकली, तरी देखील तुमच्या किसनप्रसादसारखीं साधुवृत्तीचीं माणसें घाबरून जावयाचीं; मग ते असल्या व्याघ्रादिक क्रूर पशूंच्या डोंगरांतून राहून चोरीचीं कामें काय करणार? आणि एखादा वाघ एखाद्या गाईला किंवा हरिणीला खाऊन टाकतो त्याप्रमाणें करीमबक्षानें माझ्या प्रियपत्नीचा जसा नाश करविला, तसलीं अघोरपणाचीं आणि निष्ठुरपणाचीं कामें तुमच्या नवऱ्यासारख्या लोकांकडून होतील, असें तुम्हांला—”

हे भाऊसाहेबांचे शब्द भाऊसाहेबांच्या तोंडांतल्या तोंडांतच आहेत, तोंच त्या डोंगराच्या एका बाजूनें अतिशय मोठ्यानें गुरगुरण्याची एक भयंकर गर्जना ऐकूं आली! त्या अरण्यांत असले भयंकर प्रसंग त्यांच्यांवर मधून मधून केव्हां तरी येतच असत. भाऊसाहेबांना या गर्जनेचा अर्थ तावडतोब समजला च ते एकाएकीं गुहेकडे धांवत गेले. ती गर्जना जास्त जास्त जवळ जवळ ऐकूं येऊं लागली आणि मोठाल्या उड्यांचे आवाजही स्पष्टपणें ऐकूं येऊं लागले. तेव्हां जमनामाईची पांचांवर धारण बसली. आणि भाऊसाहेब आपल्याला येथें एकटीला टाकून आपलें स्वतःचें संरक्षण करण्याकरितां गुहेमध्यें गेले असें वाटून तर तिचा धीर अगदींच सुटला. तेव्हां या संकटापासून आपली सुटका करून घेण्याकरितां उपाय योजण्यासाठीं या संकटाचें स्वरूप तरी काय आहे हें समजण्याच्या इराद्यानें तिनें आपली घाबरलेली दृष्टि त्या गर्जनेच्या दिशेकडे वळविली. तेव्हां एक गरीब बिचारी गर्भवती हरिणी अतिशय चपलतेनें पुढें धांवत आहे आणि एक प्रचंड वाघ तिच्या पाठीमागून मोठमोठ्या डरकाळ्या फोडीत आणि आपली शेपटी जमिनीवर आपटून लांबलांब उड्या मारीत तिचा पाठलाग करीत येत आहे, असें तिच्या दृष्टीस पडलें. ती गर्भिणी हरिणी आणि तो निष्ठुर वाघ जमनामाईच्या बरींच जवळ जवळ येऊं लागलीं; परंतु इतक्यांत भाऊसाहेबही आपली तलवार हातांत घेऊन जमनामाईच्या जवळ येऊन ठेपले. त्यांनीं ती गर्भिणी हरिणी पळतांना पाहिली तेव्हां त्यांचें अंतःकरण कालवून गेलें. त्या थोड्याश्या क्षणांमध्यें त्यांच्या मनांत काय काय विचार आले आणि ते तेथें उभे असतांना त्यांचें मन त्या थोड्याश्या क्षणांमध्यें कोठें फिरून आलें, हें सांगण्याला सध्यां अवकाश नाहीं. कारण, तें

पळणें आणि तो पाठलाग हीं अगदीं जवळ येऊन ठेपलीं. ती हरिणी अगदीं पूर्णगर्भ झालेली दिसत होती व त्या गर्भाच्या भारामुळें पळतां पळतां ती अगदीं थकून गेलेली दिसत होती. तिचा त्या श्रमानें आधीं प्राण जाईल किंवा वाघाच्या तडाक्यानें आधीं प्राण जाईल, हें सांगतां येण्यासारखें नव्हतें. इतक्या थकून गेलेल्या त्या गरोदर हरिणीनें वाघ अगदीं जवळ येत चाललेला पाहून एक लांब उडी मारण्याचा प्रयत्न केला. इकडून भाऊसाहेबही हातांत पट्ट्याचें पान घेऊन आपल्या जिवाची गुमान न राखतां व जम्नामाई नको नको म्हणत असतांही वाघाच्या अंगावर समोरून धावून जाऊं लागले. या वाघाला मारून या हरिणीचा प्राण आपण वांचवूं, असा आपल्या तरवारीचा रोख त्यांनीं धरला. इतक्यांत त्या गर्भिणी हरिणीनें आपल्या प्राणरक्षणासाठीं आपल्या अवसानाबाहेर जी उडी मारण्याचें साहस केलें, त्याच्या योगानें तिच्या गर्भाशयांतील तें कोमल हरिणशिशु बाहेर पडलें; आणि त्या हरिणीची लांब पल्ल्याची उडी जेथें पडली, तेथेंच तिनें आपला देह ठेविला ! वाघाला मारिलें म्हणजे हरिणी सुरक्षितच आहे, अशा समजुतीनें आणि तितका अवकाशही नसल्याकारणानें त्या हरिणीची काय स्थिति झाली आहे, इकडे लक्ष न पोंचवितां भाऊसाहेब वाघाच्या अंगावर समोरून धांवून गेले. वाघ आतां त्या हरिणीच्या पाठोपाठ उडी घालणार, इतक्यांत भाऊसाहेबांच्या तरवारीनें त्या वाघाच्या मानेवर नेमकी उडी घातली ! तो वाघ जबरदस्त असल्याकारणानें एकाच घावानें मरणें शक्य नव्हतें; तरी पण तो जखमी होऊन मागें हटलाच. त्यानें भाऊसाहेबांच्या अंगावर कांहीं पंजे उगारण्याचा प्रयत्न केला; पण भाऊसाहेबांनीं लवकरच त्याला हतबल केलें व पुढें कांहीं वेळ तडफडत राहून तो आपोआपच प्राण सोडता झाला.

वाघाला अर्धवट मारून भाऊसाहेब मागें वळून पाहतात, तों ती गरीब बिचारी हरिणी पूर्णपणें गतप्राण झालेली त्यांच्या दृष्टीस पडली, व जमनाबाई जमिनीवरून कांहीं तरी उचलून आपल्या हातांमध्यें घेत आहेत, असेंही त्यांना दिसलें. नंतर जवळ येऊन त्यांनीं पाहिलें, तों प्रसूत होऊन गतप्राण झालेल्या हरिणीचें तें बालक आहे असें त्यांना समजलें. तेव्हां त्याचें प्राणरक्षण जेणेंकरून होईल अशा प्रकारचे सर्व उपाय योजण्याच्या उद्योगाला तीं दोघें लागलीं. त्या हरिणीबद्दल दया, वाघाचा क्रूरपणा आणि भाऊसाहेबांचें शौर्य, यांच्याबद्दल जम्नामाई आळीपाळीनें मधून मधून बोलत होत्या; परंतु भाऊसाहेबांचें सगळें

लक्ष त्या हरिणबालकाकडे लागून राहिलें होतें. वाघ मारल्याबद्दल आनंदित होण्याच्या ऐवजीं तुम्ही असे विचारांत निमग्न झालेले आणि सचिंत कां दिसतां, असें अखेरीस जम्नामाईनें भाऊसाहेबांना विचारिलें. तेव्हां वात्सल्यातिरेकानें अंतः-करण सद्गदित होऊन भाऊसाहेब जम्नामाईना म्हणाले:—

' जम्नामाई, तुमच्या वहिनीसाहेब जिवंत असतील, असें मला वाटत नाहीं; पण कदाचित् जिवंत असण्याचा संभव आहे, असें तुमचें म्हणणे आहे. त्या वादांत मी आतां कांहीं पडत नाहीं. परंतु तुमच्या म्हणण्याप्रमाणें सुदैवानें ती जिवंत असेल, तर आम्ही झांशीहून निघालों, तेव्हां तिला तीन चार महिने झालेले होते, आणि तेव्हांपासून आतांपर्यंत दिवस मोजले, तर माझ्या अद-मासानें तिला या वेळीं सातवा आठवा महिना असावा, असें मला वाटतें. तीं माहेरीं गेल्यावर या महिन्यांत तिचीं निरनिराळया प्रकारचीं किती तरी डोहाळ-जेवणें व्हावयाचीं होतीं ! आतां ते सगळे सुखसोहाळे तर लांबच राहिले, पण तिची बाळंतपणाची वेळ आली, तर तिला निवाऱ्याची जागा तरी कोठें मिळेल ! तिचें बाळंतपण तरी कोण करील ! आणि तिच्या मुलाला न्हाऊं माखूं घालून पहिली चिरटोळी कोण घालील ? जम्नामाई, या हरिणीच्या पिलाकडे पाहून प्रसूति-वेदनांनीं विव्हल होणारी माझी प्रियपत्नी आणि तिचें भावी अनाथ बालक यांचें चित्र माझ्या डोळ्यांपुढें दिसूं लागलें आहे ! म्हणून मला वाटतें, मी या हरिण-बालकाचें सगळें संगोपन आपल्या हातानें करावें, म्हणजे या पुण्यानें माझी प्रिया जेथें कोठें दीनवाण्यासारखी फिरत असेल, तेथें तिच्या त्या अर्भकाचें संगोपन करण्याला परमेश्वर कोणाला तरी बुद्धि देऊन तेथें उभा करील ! "

असें म्हणून भाऊसाहेबांनीं तें मृगबालक जम्नामाईच्या हातांतून आपल्या हातांत घेतलें आणि त्याची शुश्रुषा करण्याला सुरुवात केली. जम्नामाई त्यांना मदत करूं लागल्या.

• • •

: : रांग अकरावी

जम्नामाईचा नवरा चोरांच्या टोळींत सामील होण्याकरितां आपल्या घरांतून नाहींसा झाला आणि त्याची बायको जम्नामाई ही त्याला शोधण्याकरितां आपल्या घरांतून बाहेर निघाली, त्याच्यापूर्वी असल्या चोरीसारख्या वाईट कामापासून त्याचें मन परावृत्त करण्याकरितां जम्नामाईनें त्याला पुष्कळ गोष्टी सांगून पाहिल्या; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या वेळीं या ठग लोकांच्या चोऱ्यांचा फारच सुळसुळाट झालेला होता. त्या लोकांनीं कांहीं राजांचे खजिनेही वाटेनें चालले असतां लुटले होते आणि कित्येक मोठमोठ्या संस्थानांच्या सावकारांच्या रोकडीच्या रकमाही त्यांनीं लांबविल्या होत्या. त्यामुळें या ठग लोकांच्या चोऱ्यांचा त्या वेळीं साहजिकपणेंच चोहोंकडे फार बोभाटा झाला होता. म्हणून त्यांच्या बंदोबस्ताकरितां शिंदे, होळकर, वगैरे उत्तर हिंदुस्थानांतील प्रमुख प्रमुख संस्थानिकांनीं आपापल्या सैन्यांतील कांहीं निवडक लष्करी लोक निराळे काढून आणि त्यांच्यावर एका मोठ्या सरदाराची नेमणूक करून तें सगळें सैन्य या चोरांचा नायनाट करण्याच्या कामावर नेमिलें होतें. या ठग लोकांची कोणाला कांहीं माहिती मिळाली, तर त्यांनीं ती ताबडतोब या सैन्यामधील अंमलदारांना कळवावी, अशा प्रकारच्या दवंड्या सर्व ठिकाणीं पिटविण्यांत आल्या होत्या. सागरमध्येंही अशा प्रकारची दवंडी पिटलेली जम्नामाईचा नवरा आणि जम्नामाई यांनीं ऐकिलेली होती. परंतु ती दवंडी चोरांच्याबद्दल अंमलदारांना माहिती कळविण्यापुरतीच होती असें नाहीं, तर जे कोणी ठग लोक हातीं सांपडतील, त्यांना ताबडतोब देहांतशासन करण्यांत येईल अशीही जरब बसण्याकरितां दवंडी पिटविण्यांत आली होती. ही दवंडी ऐकण्याच्या पूर्वीसुद्धां जम्नामाई आपल्या नवऱ्याचें मन चोरांच्या टोळींत न जाण्याच्या बाबतींत वळविण्याचा प्रयत्न करीत होतीच; परंतु ही देहांतशासनाच्या शिक्षेची दवंडी तिनें ऐकल्यापासून

तिला फार भीति वाटूं लागली व त्याबद्दल ती आपल्या नवऱ्यालाही भीति घालूं लागली. " लोकांना लुटून ठग लोक पैसे आणितात एवढें मात्र तुम्हांला दिसतें, परंतु त्याबद्दल शासन किती मोठें आहे याची तुम्हांला कांहीं कल्पना नाहीं. तुम्ही घी तेवढें पाहतां, पण अद्यापि बडगा पाहिलेला नाहीं. या चोरीच्या कामांत तुम्ही सांपडलां, तर फुकट प्राणाला मुकाल ! " अशा अनेक रीतींनें जम्नामाईनें त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला; पण उपड्या घागरींत पाण्याचा थेंबही शिरत नाहीं, त्याप्रमाणें किसनप्रसादच्या मनावर त्याचा काडीइतकाही परिणाम झाला नाहीं. तो म्हणे कीं, " शिंद्याच्या शिपायांनीं मला मारिलें, तर ते मला एकदांच मारतील. पण ही गरिबी आणि ही भूक मला प्रत्यहीं ठार मारीत आहेत; तें दुःख मात्र माझ्याच्यानें सहन होत नाहीं." यावर जम्नामाई त्याला सांगत असे कीं, गरिबी हें कांहीं साधु लोकांना दूषण नाहीं; आणि आपल्या पोटाला जें एक घांसभर अन्न लागतें, तें आपल्याला प्रामाणिकपणानें कोठेंही मिळवितां येईल; त्यासाठीं चोऱ्याच करावयाला पाहिजेत असें नाहीं. "

आणि आपलें पोट भरण्याकरितां दुसरी एक चांगली संधि त्या वेळीं जी सुदैवानें आलेली होती तिचाही तिनें किसनप्रसादपाशीं उल्लेख केला. ती संधि येणेंप्रमाणें होतीः हिमालयांतील एका पीठाचे शंकराचार्य संचाराकरितां आणि निग्रहानुग्रहाच्या कार्याकरितां प्रवास करीत करीत त्या वेळीं तेथें आले होते व प्रयाग, काशी, गया, जगन्नाथ, इत्यादि तीर्थक्षेत्रें पाहण्याकरितां त्यांना पुढें जावयाचें होतें. त्यांच्या मठामध्यें त्यांना पुष्कळ नवीन नोकर लोकांची जरूरी होती. आणि जे लायक लोक मिळत, त्यांची ते भरतीही करीत होते. ही बातमी जम्नामाईना कळलेली होती. व तेथें किसनप्रसादला कांहीं तरी काम मिळावें म्हणून जम्नामाईची खटपटही चालली होती. परंतु दैव देतें आणि कर्म नेतें अशांतला प्रकार झाला. शंकराचार्यांच्या मठांत चाकरी मिळाली असती ती सोडून दुर्दैवी किसनप्रसाद ठग लोकांच्या टोळींत दरवडेखोराचें आणि गळेकापूचें काम करण्याकरितां एके दिवशीं रात्रीं चोरासारखा आपल्या घरांतून निघून गेला. आणि म्हणून त्याला शोधण्यासाठीं साध्वी जम्नामाईलाही ठगांच्या टोळ्या कोठें राहतात याचा तपास करण्याचा प्रसंग आला. शंकराचार्यांच्या मठांत देवाधर्माचें काम करीत अनायासानें तीर्थयात्रा करावयास सांपडाव्या, असा ज्या जम्नामाईचा हेतु होता, तिच्या कपाळीं उरीं डोंगर आणि शिरीं कांटे घेऊन चोरांच्या गुहा आणि दरवडेखोरांच्या

मुक्कामांचे तळ कोठें आहेत हें रानावनांतून आणि उन्हातान्हांतून हुडकीत जाण्याचें आलें. परंतु अशा प्रसंगांतही तिचें सुदैव उदयाला आलें, म्हणून भाऊसाहेबांची आणि तिची पूर्वीच्या रांगेंत सांगितल्याप्रमाणें गांठ पडली.

हिमालयांतील उत्तरपीठाच्या शंकराचार्यांच्या स्वारीमध्यें नोकरी मिळण्याचा संभव आणि सुयोग प्राप्त झाला असतां तो घालवून किसनप्रसादनें ठग लोकांच्या कोणा तरी शंकराचार्यांच्या स्वारीमध्यें मिळणारी गळेकापूची नोकरी जास्त मानिली, ही जम्नामाईच्या तोंडची हकीकत ऐकून भाऊसाहेबांना अतिशय वाईट वाटलें; पण किसनप्रसादच्या हातून अज्ञानामुळें जरी ही चूक झाली, तरी त्या अज्ञानामध्येंच त्याला राहूं देतां कामा नये, असें भाऊसाहेब जम्नामाईपाशीं त्या अरण्यामध्यें असतांना वारंवार म्हणत असत. आपल्या नवऱ्याचा कोठें तरी हिंडून लवकर शोध लाविला पाहिजे, म्हणून जम्नामाईही उत्सुक झालेली होती. शिवाय भाऊसाहेबांसारख्या मनुष्यानें आपल्या प्रियपत्नीचा कांहीं एक शोध न करितां अरण्यामध्यें आपलें आयुष्य फुकट दवडीत विनाकारण कालक्षेप करावा, हेंही तिला पसंत नव्हतें. म्हणून ती भाऊसाहेबांना तेथून निघून दुसरीकडे कोठें तरी चलण्याविषयीं वरचेवर आग्रह करीत असे. परंतु भाऊसाहेब तिकडे फारसें लक्ष देत असावेत असें दिसेना. फक्त उत्तरपीठाच्या शंकराचार्यांच्या संचाराची गोष्ट निघे, तेव्हां आतां त्या शंकराचार्यांचा मुक्काम अदमासानें कोठें असेल, त्यांच्याजवळ लवाजमा किती मोठा आहे, ते विद्वान् आहेत किंवा नाहींत, असे मधून मधून कांहीं तुटक तुटक प्रश्न मात्र ते विचारीत असत. भाऊसाहेबांचा स्वभाव निवृत्तिपर होता, हें पूर्वी सांगितलेलेंच आहे. आणि त्यांना हल्लीं प्राप्त झालेल्या विधुरावस्थेमध्यें तर ती त्यांची वृत्ति फारच बळावलेली होती. आणि याच्यापुढें आपल्या आयुष्यांतील जे दिवस आपल्याला काढावयाचे असतील, ते आपण एखाद्या संन्याशासारखें राहून काढावे, असें त्यांना वाटत असे. आणि त्या दृष्टीनें या हिमालयांतील शंकराचार्यांच्या स्वारींतील मंडळींमध्यें आपला प्रवेश झाला तर ती एक उत्तम गोष्ट होईल असें त्यांना वाटूं लागलें होतें. आणि म्हणून ते त्यांच्या मुक्कामाविषयीं वगैरे विशेष चौकशी करीत असत. शिवाय, भय्यासाहेब झांशीवाले यांच्यासारख्या शौर्याचा, पराक्रमाचा, औदार्याचा, आणि स्त्रीसुखासक्ततेच्या पूर्वावस्थेमध्यें राहिलेला मनुष्य शोधावयाचा झाला, तर तो एखाद्या संन्याशाच्या मठामध्यें एखाद्या संन्याशासारखा राहात असलेला सांपडेल,

ही कल्पनाही करीमबक्षाच्या मनामध्यें येणें शक्य नाहीं, या दृष्टीनेंही असल्या एखाद्या मठामध्यें संन्याशासारखें राहणें फार सोइस्कर होईल, असेंही भाऊसाहेबांच्या मनामध्यें हळूहळू येऊं लागलें. आणि ही आपली कल्पना सफल होऊन उत्तरपीठाच्या शंकराचार्यांच्या आश्रयाखालीं एखाद्या संन्याशासारखें आपल्याला राहतां आलें, तर त्या मठामध्यें प्रवेश झाल्यानंतर पहिल्यानें जम्नामाईच्या नवऱ्याचा शक्य त्या रीतीनें आपण शोध लावण्याचा प्रयत्न करावा, अशाही कल्पना भाऊसाहेबांच्या मनामध्यें मधूनमधून येत होत्या; परंतु नक्की काय करावयाचें, याबद्दल भाऊसाहेबांच्या मनामध्यें अद्यापि कांहींच निश्चय झालेला नव्हता. तुमच्या पत्नी गंगाबाई यांना शोधण्याकरितां निघण्याला तुम्ही आतां विलंब करतां कामा नये, असें जम्नामाई म्हणत असत, आणि किसनप्रसादला शोधण्याकरितां आपण लवकरच कांहीं तरी तजवीज केली पाहिजे, असें भाऊसाहेब म्हणत असत; परंतु काय करावयाचें याविषयीं मनाचा निश्चय होत नसल्यामुळें हातून कांहींच घडून येत नव्हतें.

अशा स्थितींत त्या निर्जन अरण्यांतील त्या पर्वताच्या एका गुहेमध्यें त्यांचे कांहीं दिवस गेले. परंतु मनांतील कोणतेही हेतु फलप्रद्तेला आले नाहींत. भय्यासाहेबांच्या मनांतून तेथेंच राहावयाचें असेल, तर मी एकटीच आपल्या पतीच्या शोधाकरितां कोठें तरी फिरतें, असेंही जम्नामाईनें एकदां दोनदां म्हणून पाहिलें; तरीदेखील भाऊसाहेबांच्या मनाचा निश्चय होईना; तरी पण जम्नामाईच्या मनाला वाईट वाटेल म्हणून एकटीनें फार लांब न जातां जवळपासच्या डोंगरांतून कांहीं पत्ता लागला तर पहावा, असें भाऊसाहेबांनीं तिला सांगितलें. त्याप्रमाणें ती एखादे दिवशीं सकाळीं उठून कांहीं डोंगर फिरून संध्याकाळीं परत भाऊसाहेबांच्या गुहेकडे येत असे. जम्नामाई आपल्या पतीच्या शोधाकरितां जात असे, त्या वेळीं भाऊसाहेबही त्या डोंगरांत जवळपास कोठें कावेची तांबडी माती आहे काय म्हणून पाहण्याकरितां फिरत असत. त्यांनीं अशा रीतीनें आपल्या गुहेमध्यें कांहीं कावेचे चांगले चांगले खडे आणून ठेविले होते. परंतु त्यांचा मुख्य व्यवसाय म्हटला म्हणजे मागील रांगेमध्यें ज्या हरिणशावकाचा उल्लेख करण्यांत आलेला आहे, त्या बाल हरिणाला आपल्या मांडीवर घेऊन बसणें आणि आपल्या खांद्यावर घेऊन हिंडणें आणि आपल्या पोटच्या मुलाप्रमाणें त्या हरिणीच्या मुलाचें लालनपालन करणें हाच होता.

ते त्याला कोवळीं पानें आणि हिरवा चारा खावयाला घालीत असत. आणि आपल्या ओंजळीमध्यें ओढ्याचें स्वच्छ पाणी घेऊन ते त्याला आपल्या हातानें दुधाप्रमाणें घोट घोट पाजीत असत. आणि त्याच्या साऱ्या अंगावरून मायाममतेनें कुरवाळून त्याला आपल्याजवळ निजावयाला घेत असत. तें हरिणीचें अर्भक जागें होऊन डोळे उघडून त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागलें म्हणजे त्यांचे डोळे भरून येत असत आणि तें किंचित् ओरडूं लागलें, तर त्यांच्या अंतःकरणांत कालवाकालव सुरू होत असे. ते त्याला आपल्या पोटाशीं धरून रडूं लागत, आणि "बाळा, तूं कां रडत आहेस ? तुला काय होत आहे ? तूं उगी राहा ! तुझा तूंच उगी राहिला नाहींस, तर तुला दुसरें कोण उगी करावयाला आहे ? तुझी आई का येथें आहे ? तुझी आई असती, तर तिनें तुला आपल्या ममतेच्या दुग्धामृतानें तेव्हांच उगी केलें असतें ! पण काय करणार ? तुला आई नाहीं ! तूं या जगामध्यें एक पोरकें मूल आहेस !—तूं रडतां रडतां माझ्याकडे इतक्या कळवळ्यानें कां पहात आहेस ! मीच तुझी आई असें का बाळा तुला वाटत आहे ? नाहीं, बाळा, मी तुझी आई नाहीं. तुझ्या आईच्या हृदयांत तुझ्याविषयीं जें मातृवात्सल्य उत्पन्न झालें असतें, त्याच्या शतांशही, मी प्रयत्न आणि इच्छा करीत असतांनाही, माझ्या हृदयांत नाहीं ! बाळ, तुझी आई मेली आहे रे ! ती आतां या जगांत तुला दिसणार नाहीं ! पण ती मात्र तुला वरून आकाशांतून पहात असेल ! आम्ही तिचा मृतदेह जरी या ओढ्याच्या कांठच्या झाडाखालीं त्या पवित्र समाधीच्या आंत पुरून ठेविला आहे तरी तिचा तो अजरामर आत्मा या क्षणींही तुला वरून आकाशांतून पहात असेल, आपल्या अदृश्य हातांनीं या क्षणींही कदाचित् ती तुला कुरवाळीत असेल, आणि नंदनवनांतील कल्पलतांचे कोमल पल्लव आणि तेथील अमृतपुष्करिणींतील शीतल जलबिंदु ती कदाचित् या क्षणींही अदृश्य रूपानें तुझ्या मुखामध्यें घालीत असेल ! लहान अर्भकांच्या स्वर्गस्थ झालेल्या आया स्वर्गातून चोरून मारून मिळविलेले अमृतबिंदु आपल्या मुलांना चोरून मारून आणून देत असल्यावांचून पोरकीं मुलें या निष्ठुर पृथ्वीवर जगणार कशीं ? पण कसें तरी करून त्यांना जगवलें हें पाहिजेच. एरवीं परमेश्वरानें निर्माण केलेलीं हीं अर्भकें जगणार कशीं ? शकुंतलेला तिच्या आईबापांनीं टाकिलें, तर अरण्यांतील पक्ष्यांनीं येऊन तिचें संगोपन केलें; त्याचप्रमाणें मनुष्यांनींही अनाथ अशा पशुपक्ष्यांचें संगोपन केलें पाहिजे. एरवी हा

परमेश्वराचा प्रपंच चालणार कसा ! " असे करुणात्मक उद्गार भाऊसाहेबांच्या तोंडून अशा प्रसंगीं निघत असत.

असे कांहीं दिवस लोटले असतां जम्नामाई तिच्या रिवाजाप्रमाणें आपल्या पतीच्या शोधासाठीं एके दिवशीं सकाळीं बाहेर गेली; परंतु बरीच संध्याकाळ झाली तरी ती परत माघारी आली नाहीं. त्यामुळें भाऊसाहेबांना मोठी काळजी लागली व त्यांच्या मनामध्यें हजारों तर्ककुतर्क उत्पन्न झाले. जम्नामाई आपल्या पतीच्या शोधाकरितां रानांत फिरत असतां तिला कोणी चोरटे आढळले, तर कदाचित् ती आपल्या नवऱ्याला शोधून काढील; पण तसें ती करीत असतांना कदाचित् माझा त्या चोरांना शोध लागेल, ही भीति भय्यासाहेबांना होती. आणि म्हणून असा प्रसंग न येण्याविषयीं तूं दक्षता बाळगिली पाहिजेस, म्हणून भाऊसाहेबांनीं तिला वारंवार बजाविलें होतें. तरी पण ती बायकोमनुष्य असल्यामुळें केव्हां अन् कशी फसेल याचा नेम नाहीं, अशी भाऊसाहेबांना धास्ती वाटत होती. आतां बरीच रात्र पडत चालली आहे तरी देखील जम्नामाई अजून कां येत नाहीं म्हणून ते सचिंत होऊन तिची वाट पहात बसले होते. इतक्यांत अखेरीस जम्नामाई एकदाची येऊन दाखल झाली. तिनें येऊन थोडासा आराम केल्यानंतर भाऊसाहेबांनीं तिला विचारिलें, " जम्नामाई, आज तुम्हांला इतकी रात्र कां झाली ? किसनप्रसादचा कांहीं शोध लागला कीं काय ? "

" नाहीं. त्यांचा नाहीं शोध लागला. पण—" जम्नामाई इतकेंच बोलून मध्येंच थांबल्या.

" मग दुसऱ्या कशाचा तुम्हांला शोध लागला ? " भाऊसाहेबांनीं साशंक होऊन विचारिलें.

" भाऊसाहेब, " जम्नामाई सांगूं लागल्या, " मला कालच एक संशय आला होता. मी ज्या वाटेनें ह्या डोंगरावरून उतरून खालीं जातें, त्या वाटेवरील खडान्‌खडा आतां माझ्या माहितीचा झालेला आहे. आणि माझ्या वाटेवरच्या कोणच्या झाडाला किती खांद्या आहेत आणि त्यांची सावली कोठें किती पडते, हें सुद्धां माझ्या चांगलें लक्षांत आलेलें आहे. पण काल मी माझ्या रोजच्या एका झाडाच्या सावलींत बसून विश्रांति घेण्याकरितां गेलें, तों माझ्या नेहमींच्या बसावयाच्या जागेवर सावली नाहीं ! म्हणून माझी दृष्टि साहजिकपणें वर गेली. त्या झाडाच्या कांहीं खांद्या वाळून गेलेल्या होत्या, पण त्या वाळलेल्या असतांही बरच

दिवस त्या तशाच होत्या. पण काल पहातें, तों त्या खांद्या झाडावर नाहींत! मला वाटलें, वाऱ्याबिऱ्यानें मोडून कोठें उडून जाऊन पडल्या असतील, म्हणून मग तिकडे मी फारसें लक्ष दिलें नाहीं. पण मी थोडीशी पुढें गेलें, तों एके ठिकाणीं वाळलेलीं बरींच लांकडें जमा करून ठेवलेलीं माझ्या दृष्टीस पडलीं. तरीही मला त्याचें महत्त्व वाटलें नाहीं. आणि म्हणून मी काल तुमच्यापाशीं त्याच्याबद्दल कांहीं एक बोललें नाहीं.

" मग आज तुम्हांला तेथें कालच्यापेक्षां जास्त असें काय दिसलें ? " भाऊसाहेबांनीं प्रश्न केला.

" काल संध्याकाळच्यापेक्षां आज सकाळीं ती लांकडांची रास जास्त मोठी झालेली मला दिसली. हें कोणा तरी माणसाचें काम असलें पाहिजे, हें उघड होतें. परंतु तेथें तर कोणीच माणसें दिसत नव्हतीं. तेव्हां रात्रीं कोणी तरी येथें येऊन हीं लांकडें येथें कांहीं तरी उद्देशानें जमा करून ठेवीत असलें पाहिजे, असा मी तर्क केला. याच्याबद्दल जास्त खुलासा काढला पाहिजे, म्हणून मुद्दामच मी थोडी रात्र पडल्यावर त्या ठिकाणीं लपत छपत आणि पाऊल न वाजवितां परत आलें, तों मला तेथें माणसांची चाहूल लागली. ते कोणी तरी दोघे चोरटे असावेत. त्यांच्या भाषणावरून मला एकंदर हकीकत समजली ती अशी कीं, भय्याखान या नांवाचा कोणी तरी एक चोर त्यांच्या टोळींतून पळून गेला असून तो फितुरी करील अशी त्यांना भीति वाटत असल्यामुळें ते त्याचा तपास करीत असतां तो येथेंच कोठें तरी राहात असावा, असा त्यांना नुकताच पत्ता लागला आहे. त्यांच्या मनांतून त्याला ठार मारून टाकावयाचें आहे; परंतु तो फार तरवारबहाद्दर असल्यामुळें त्याच्यापुढें जाण्याला हे लोक भितात, आणि म्हणून तो आपल्या गुहेमध्यें रात्रीचा निजला असतां त्याच्या गुहेच्या तोंडाशीं हीं लांकडें रचून त्यांना आग लावून द्यावी आणि त्या आगीमध्यें तो भय्याखान आपोआप जळून जावा, असा त्यांचा बेत आहे." इतकें सांगून जम्नामाई फिरून पुढें म्हणाली, " हें त्यांचें बोलणें चाललें असतां काळोखांत त्यांचे कोणाचेच चेहरे मला दिसत नव्हते. परंतु माझ्या नवऱ्याच्यासारखा आवाज तरी कोणाचा आहे कीं काय, म्हणून लक्षपूर्वक रीतीनें मी ऐकत होतें; पण त्यांत माझ्या नवऱ्याच्या आवाजासारखा आवाज कोणाचाच नव्हता. तेव्हां या चोरांत आपला किसनप्रसाद नाहीं असें पाहून मोठ्या निराशेनें मी तेथून दूरच्या वाटेनें

त्यांची नजर चुकवून हळुहळु आलें, आणि म्हणून मला रात्र झाली. भाऊसाहेब, ही हकीकत तुम्हांला केव्हां येऊन सांगेन असें मला झालें होतें. कारण, हा सगळा बेत तुमच्या विरुद्धच चाललेला असावा असें मला वाटतें. त्या चोरांच्या टोळींत असतांना तुम्हांलाच ते भय्याखान म्हणून हाक मारीत असत, असें तुम्ही आपली हकीकत सांगतांना मला सांगितलें नाहीं का ? "

" होय. " भाऊसाहेब म्हणाले. " पण जम्नामाई, हा बेत कधीं अमलांत आणावयाचा, याबद्दल त्यांचें कांहीं बोलणें झालेलें तूं ऐकिलें नाहींस काय ? "

" त्यांची सगळी तयारी झालेली असून उद्यां मध्यरात्रीच्या सुमारास आपल्या गुहेला आग लावून देण्याचा त्यांचा विचार ठरला आहे. " जम्नामाईनें सांगितलें.

" बरें झालें, " भाऊसाहेब म्हणाले, " एक दिवसाची तरी फुरसत त्यांच्याकडून आपल्याला देण्यांत आलेली आहे; नाहीं तर हे ठग लोक कोणाचा प्राण घ्यावयाचा असला, तर त्याला एका क्षणाचाही विलंब लावूं द्यावयाचे नाहींत. "

ही बातमी ऐकल्यामुळें भाऊसाहेबांच्या मनामध्यें बरीच चिंता उत्पन्न झाली व या संकटाचें कसें निवारण करावयाचें, या विचाराला तीं दोघेंही लागलीं.

आपण या ठिकाणीं आहों ही करीमबक्षाला एकदां बातमी लागल्यानंतर तो हरप्रयत्नानें आपल्याला ठार केल्याशिवाय राहणार नाहीं, अशी भाऊसाहेबांना खात्री वाटूं लागली. तरी पण जम्नामाईनें धीर सोडला नव्हता, आणि त्या दोघांनीं मिळून शक्य ती खटपट चालविली होती. अखेरीस दुसऱ्या दिवशींची संध्याकाळ झाली, सूर्य अस्ताला गेला आणि जिकडे तिकडे दाट काळोख पसरला. सुमारें प्रहर रात्र झाल्यानंतर कोणी तरी एका इसमानें हळूच लपत छपत येऊन भाऊसाहेबांच्या गुहेपासून दूर अंतरावर उभें राहून कानोसा घेतला. कांहीं बोलण्या चालण्याचा आवाज ऐकूं येईना, तेव्हां गुहेंतील माणसांना गाढ झोंप लागली असावी, असा तर्क बांधून तो इसम थोडासा गुहेच्याजवळ गेला, तों आंतमध्यें कोणी तरी दोन माणसें निजलेलीं असावींत, अशा प्रकारच्या दोन आकृति त्याला त्या काळोखांत अर्धवट दिसल्यावरून भय्याखान आंत निजलेला असून त्याला गाढ झोंप लागलेली असली पाहिजे, अशी त्याच्या मनाची खात्री झाली. नंतर तो इसम तेथून नाहींसा झाला. पुढें कांहीं वेळानें लांकडांचे कांहीं लहानमोठे ओंडे त्या गुहेच्या तोंडाशीं येऊन पडूं लागले. कांहीं वेळानें ते व्यवस्थितपणें एकावर एक रचण्यांत आले. आणि शेवटीं त्यांच्यावर पाल्यासकट वाळलेल्या

कांहीं खांचा ठेवण्यांत आल्या. इतकी तयारी होईपर्यंत मध्यान् रात्रीचा सुमार झाला. त्या सुमारास त्या वाळलेल्या पाल्याला प्रथमतः आग लावून देण्यांत आली आणि ती आग पेटतां पेटतां सगळ्या लांकडांनीं पेट घेतला. वाऱ्याचा जोर बराच होता, त्यामुळें ती आग पेटण्याला जास्तच मदत झाली. बाहेरून वाऱ्याचा प्रवाह चालू असल्यामुळें धुराचा सगळा लोट त्या गुहेच्या पोटामध्यें शिरूं लागला. त्या धुरानें भग्याखान आणि त्याच्याबरोबरची बाई गुदमरून गेलीं असतील, आणि आगीच्या ज्वाळांनीं भाजून त्यांची राख झाली असेल, असें मानण्याला पुष्कळ जागा होती. परंतु इतकी खात्रीलायक स्थिति होती, तरीसुद्धां ज्यांनीं ती आग पेटविली होती, ते एका दगडाच्या आड दडूनच होते. त्यांना पुष्कळ वेळपर्यंत त्या गुहेच्यासमोर त्या आगीच्या उजेडांत येऊन उभें राहण्याचें धैर्य होईना. इतक्या धुरांतून आणि आगींतूनसुद्धां कदाचित् भग्याखान चवताळून बाहेर येईल आणि आम्हांला मारील, अशी त्यांना दहशत वाटत होती. परंतु अखेरीस कांहीं वेळानें भग्याखान जिवंत असण्याची बिलकूल शंका राहिली नाहीं, अशी त्यांची खातरी झाली, तेव्हां ते त्या दगडाच्या आडून समोर उजेडांत आले. ते दोघे इसम होते. ते त्या आगीच्या ज्वाळांकडे पाहून आपल्या युक्तीचें, कर्तबगारीचें, आणि पराक्रमाचें वर्णन करण्यांत गर्क होऊन गेले.

हे दोघे चोर त्या आगीच्या समोर उभे राहून आपली आपणच तारीफ करण्यामध्यें व एकमेकांची पाठ थोपटून घेण्यामध्यें गुंग होऊन गेलेले असतां त्या जागेपासून सुमारें एक कोसाच्या अंतरावरील त्याच डोंगराच्या दुसऱ्या एका टोंकावर दुसरीकडे कोणी तरी दुसरीं दोन माणसें उभीं राहून याच आगीच्या ज्वाळांकडे मोठ्या चमत्कारिक मुद्रेनें पाहात उभीं राहिलेलीं होती. तीं ज्या टोंकावर उभीं होतीं, तेथपर्यंतही त्या ज्वाळांचा प्रकाश गेलेला होता. पण तो प्रकाश बराच अंधुक होता. त्या गुहेच्या आगीजवळ जे दोन इसम उभे होते, ते आपली कामगिरी फत्ते झाल्याच्या आनंदामध्यें गर्क झालेले असल्यामुळें त्यांना आपल्या मागें पुढें पाहण्याचें भानच राहिलेलें नव्हतें; व जरी त्यांनीं पाहिलें असतें, तरी हीं दूरच्या टोंकावर उभीं राहिलेलीं दोन माणसें त्यांना इतक्या अंतरावरून दिसणें शक्य नव्हतें. तीं दोन माणसें या आगीकडे हात दाखवून आपसामध्यें कांहीं बोलत होतीं.

"पहा! पहा! हा केवढा जाळ पेटला आहे! ही आपली चिता आहे! आणि यांत आपण जळत आहों!"

" आणि त्यांत आपण जळत असूनही या ठिकाणीं आपण सुरक्षित आहों! ती आपली चिता त्या ठिकाणीं पेटविलेली असून या ठिकाणीं आपण जिवंत आहों! हे परमेश्वरा, तुझ्या कृपेचें काय वर्णन करावें? तारणारापुढें मारणाराचें कांहीं चालत नाहीं, अशी जी, हे भगवंता, तुला उद्देशून कोणीं म्हण केली आहे, ती अगदीं यथार्थ आहे. " जम्नामाई म्हणाली. आणि ती जमनामाईच होती आणि तिच्याजवळ उभा असलेला दुसरा इसमही भाऊसाहेबांशिवाय दुसरा कोणी नव्हता.

" जमनामाई, " भाऊसाहेब म्हणाले, " तुम्ही जे आपले दोघांचे मातीचे पुतळे करून त्या गुहेंतील जमिनीवर निजवून ठेविले होते, त्यांना ते ठग लोक त्या भट्टीमध्यें जाळून पक्के भाजून काढीत आहेत. पण तेवढ्यावरूनच जर ते खरोखर आपल्या दोघांना जाळून टाकीत आहेत, अशी त्यांच्या मनाची हौस पुरत असेल, तर ती खुशाल पुरो; पण जमनामाई, तुम्ही जर ही युक्ति काढिली नसती आणि वेळींच आपण या हरिणबालकाला घेऊन रात्रीच्या काळोखांतून चालून येथवर आलों नसतों, तर आज खरोखर आपण सर्वजण आपल्या प्राणाला मुकलों असतों."

" अहो भाऊसाहेब, " जमनामाई कांहीं आठवण झाल्यासारखें करून म्हणाल्या, " आपण सर्वजण त्या गुहेंतून सुरक्षित बाहेर पडलों हें खरें. पण-पण-आतां यापुढें आपण संन्याशासारखा वेष घेऊन फिरावयाचें, असा तुमच्या मनाचा निश्चय झाला आहे ना? " .

" होय, " भाऊसाहेबांनीं उत्तर दिलें, " पण त्याचें आतां काय? या गोष्टीची आत्तां तुम्हांला आठवण कशावरून झाली? "

" अहो, " जमनामाई म्हणाल्या, " संन्याशासारखा आपला पोशाख रंगविण्याकरितां तुम्ही आपल्या गुहेमध्यें ते कावेचे खडे गोळा करून ठेविले होते, ते गुहेंतून बाहेर निघतांना आपल्याबरोबर घ्यावयाची मला मुळींच आठवण झाली नाहीं! "

" मला झाली होती. " भाऊसाहेब म्हणाले.

" मग तुम्ही ते आपल्याबरोबर कां घेतले नाहींत? " जमनामाईनें विचारलें.

त्यावर किंचित हंसत हंसत भाऊसाहेबांनीं उत्तर केलें, " जमनामाई, मी ते कावेचे खडे त्या डोंगरांत गोळा करीत होतों, ते केवळ करमणुकीकरितां, संन्यासा-

करितां नव्हे! कावेनें कोणी संन्यासी बनतो असें मानणें हें अज्ञान आहे. ह्या प्रपंचा-विषयींची खरी निर्विण्णता मनुष्याला संन्यासी करिते. ती बिचारी काव त्या ठिकाणीं काय करणार? म्हणून मी ते कावेचे खडे बरोबर न घेतां संन्यासाविषयींचा निश्चय मात्र आपल्याबरोबर घेतला आहे. उत्तरमठाच्या शंकराचार्यांची आणि आपली सुदैवानें कोठें गांठ पडली, तर मी त्यांच्या मठांत संन्याशासारख्या वृत्तीनें मोठ्या आनंदानें राहीन. जमनामाई, एखाद्या दमडीची काव पाहिजे त्या बाजारामध्यें वेळ पडेल तेव्हां मिळेल. पण संन्यासोन्मुख अशी जी बिनमोल मनोवृत्ति, ती मात्र कोठल्याही बाजारामध्यें केव्हांही विकत मिळावयाची नाहीं. म्हणून ती मी आपल्या-बरोबर त्या गुहेंतून आणली आहे. आतां त्या गुहेंत आपलें कांहीं शिल्लक राहिलेलें नाहीं. हें आपलें चिमकुलें हरिणबालक आपण आपल्याबरोबर आणिलें आहे, आणि मी ही आपली तलवार सुद्धां आपल्याबरोबर घेतली आहे. तेव्हां आतां आपण त्या गुहेंत कांहीं एक विसरलों नाहीं. आतां या आपल्यासाठीं पेटविलेल्या चितेच्या उजेडामध्यें आपली वाट आपल्याला थोडथोडी दिसत आहे, तोंपर्यंत आपण आपल्या प्रवासाला सुरुवात करूं या. चला--आपण मागें कांहीं एक विसरलों नाहीं."

असें म्हणून तीं दोघें वाट चालूं लागलीं. परंतु इतक्यांत भाऊसाहेब मध्येंच थांबले आणि मागें वळून जम्नामाईला म्हणाले, "जम्नामाई, जरा थांबा, आणि याच टेकडीवर तुम्ही थोडा वेळ उभ्या राहा. आतां आपण मागें कांहीं एक विसरलों नाहीं, असें मी म्हटलें खरें; तरी पण अखेरीस मी एक गोष्ट करावयाची विसरलोंच. तेवढी मी करून येतों. माझा स्वभाव थोडा विसराळूच आहे. तुम्ही भिऊं नका, थोड्याच वेळांत मी तुमच्याजवळ परत येतों."

असें म्हणून आपली तरवार हातांत घेऊन भाऊसाहेब तेथून तडक निघाले. ते थोड्याच वेळांत त्या डोंगरांतील अर्धवट प्रकाशमय काळोखांतून हे वेड्यासारखे कोठ चालले आहेत म्हणून त्यांच्या वाटेकडे लक्ष लावून आश्चर्ययुक्त दृष्टीनें पाह-णाऱ्या जम्नामाईंना सुद्धां दिसेनासे झाले. तुम्ही कोठें जातां, तुमचें काय विस-रलें आहे, वगैरे प्रश्न जम्नामाई विचारणार, तोंच हे दिसेनासे झाले. फक्त जम्ना-माईंना त्या पेटलेल्या गुहेच्या उजेडांत उभे राहिलेले ते दोघे चोर मात्र अस्पष्ट-पणानें दुरून दिसत होते.

ते दोघे ठग त्या आगीच्या समोर उभे राहून आपल्याला धन्य मानून घत होते, हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्यांच्या आत्मश्लाघेच्या पुष्कळ गोष्टी बराच वेळ-पर्यंत एकमेकांच्या दरम्यान चाललेल्या होत्या.

त्यांतील पहिला म्हणाला, " ही कल्पना मी काढिली म्हणून करीमबक्षापासून मी मोठें बक्षीस मागून घेईन. "

" पण हीं सगळीं लांकडें येथें वाहून आणण्याच्या कामांत मीच मुख्य मेहनत घेतलेली आहे, म्हणून करीमबक्षापासून मी मोठें बक्षीस मागून घेईन. " दुसरा म्हणाला.

" तूं लांकडें मात्र पुष्कळ आणलींस खरीं." पहिला म्हणाला, " इतक्या लांकडांत हीं दोनच माणसें काय—पण आणखी दोन असतीं, तरी देखील हीं लांकडें पुरलीं असतीं. "

" पण, " दुसरा म्हणाला, " दोन माणसांना हीं चार माणसांचीं लांकडें जळावयाला मिळालीं, तर त्या दोन माणसांना दुप्पट जळण्याचा फायदा मिळून त्यांची मोठी चैन झाल्यासारखीच नव्हे का ? "

" होय, होय. " पहिला म्हणाला. " यांत काय संशय ? अशा रीतीनें दुप्पट आणि दुहेरी भाजलेल्या आणि जळून खाक झालेल्या भय्याखानाला म्हणावें कीं, ये आतां गुलामा, आम्हांला छळावयाला कसा येतोस तो ! "

" हा पहा मी आलों ! " पहिल्या ठगाच्या तोंडून पूर्वी सांगितलेले शब्द निघतात न निघतात, तोंच ' हा पहा मी आलों ' हे शब्द त्याच्या कानीं पडले ! तो आवाज ऐकतांक्षणींच ते दोघेही ठग गर्भगळित होऊन गेले. भाऊसाहेब आपल्या हातांतील पट्टा आपल्या सभोंवतीं गरगर फिरवीत त्यांच्यासमोर येऊन उभे राहिले. तेव्हां ह्या प्रत्यक्ष मूर्तिमंत काळ आपल्यासमोर उभा राहिलेला पाहून त्यांचे हातपाय लटलट कांपूं लागले आणि त्यांच्या तोंडांतून एकही अक्षर निघेना. अखेरीस पहिल्या चोरानें मोठा हिय्या करून बोलण्याला सुरुवात केली, " भय्या-खान, तूं भय्याखान नसून सैतान आहेस! भय्याखानाला आम्हीं या गुहेंत जाळून त्याची राख करून टाकिली आहे. तेव्हां तूं खरा भय्याखान नसून तूं केवळ त्याचें भूत आहेस. आम्हीं भय्याखानाला जाळलें आहे, इतकेंच नव्हे तर त्याचें भूत झालेलें देखील आम्हीं पाहिलें आहे, असें आतां करीमबक्षाला जाऊन सांगण्याला आम्हांला बिलकूल हरकत नाहीं !"

" पण, " भाऊसाहेब मोठ्यानें गर्जना करून म्हणाले, " मी तुम्हांला करीमबक्षाकडे जाऊं देईन तेव्हां ना? मी तुम्हांला येथून एक पाऊलभर देखील हलूं देणार नाहीं. मूर्खांनों, मी भग्याखानाचें भूत नसून भुतासारखा तुमच्या मानगुटीस बसण्यासाठीं हपापलेला मी प्रत्यक्ष जिवंत भग्याखान आहें—तुम्हांला मी जिवंत सोडलें, तर तुम्ही आणखी कोणा निरपराधी वाटसरूंचे गळे कापाल; यासाठीं तुमचे गळे कापणें फार जरूरीचें आहे. तेव्हां तुम्ही आपली तयारी करा. ही चिता तुम्हीं माझ्यासाठीं पेटविली होती; पण त्या चितेवर मी तुमची योजना करितों. अजून हीं सगळीं लांकडें जळालीं नाहींत. तुम्हां दोन माणसांना आणखी दोनदां—नव्हे दहादां—भाजून टाकण्याला सुद्धां हीं पुष्कळ पुरेशीं आहेत. तुम्ही माझ्या हातापायां पडूं नका, त्याचा बिलकूल उपयोग होणार नाहीं. तुम्ही कोणावर कधीं दया दाखविली होती काय? मग तुम्ही दुसऱ्यांपासून दयेची अपेक्षा कां करावी? माझ्यापासून तुम्हांला दया बिलकूल मिळणार नाहीं. तुम्हांला पाहिजे असेल, तर मी लढाई देण्याला तयार आहें. चला, तुम्ही दोघेही. इतकेंच नव्हे, तर तुमच्यापैकीं आणखी कोणी येथें असतील, तर ते सगळेही मिळून आपल्या तरवारी उपसून माझ्या अंगावर चालून या. ती लढाईची दया दाखविण्याला मी तयार आहें. पण त्या दयेचा फायदा घेण्याला तुम्ही तयार आहां, असें मात्र तुमच्या या हातांतून गळत चाललेल्या तरवारींवरून दिसत नाहीं. मला मारून टाकल्याबद्दलची खोटी बातमी करीमबक्षाला सांगण्याला मात्र तुम्ही मोठे उत्सुक झालेले दिसत आहां; पण मी बोलावीत असतां मला खरोखर मारण्याला मात्र तुम्ही उत्सुक नाहीं! करीमबक्षाला माझ्याबद्दल बातमी द्यावयाला तुम्ही नको आहां. त्याची माझी जेव्हां गांठ पडेल, तेव्हां मी जिवंत आहें किंवा मेलेला आहें, हें मी त्याच्या चांगलें प्रत्ययाला आणून देईन. म्हणून त्यासाठीं तुम्हांला उगीच या जगामध्यें तिष्ठत ठेवून काय करावयाचें आहे? चला, माझ्याबरोबर लढावयाला या;' नाहीं तर हें पहा, मी तुमच्या शरीराचे तुकडे करून या वखवखलेल्या अग्निनारायणाची क्षुधा शांत करितों!"

असें म्हणून आपली तरवार फिरवीत भाऊसाहेब त्या दोघां ठगांच्या अंगावर चालून गेले व एका क्षणामध्यें ते दोघेही गतप्राण होऊन जमिनीवर पडले. भाऊसाहेबांचे डोळे क्रोधानें त्या तेथें पेटलेल्या विस्तवाच्या निखाऱ्यांपेक्षांही लाल

झालेले होते. त्यांच्या हृदयाला या ठग लोकांच्या दुष्कृत्यांपासून जे चटके बसले होते, त्यांच्यापुढें या दोघांचीं प्रेतें त्या पेटलेल्या चितेमध्यें फेकून देतांना त्यांना कांहींच वाटलें नाहीं.

त्या दोघांच्या शरीरांची अशा रीतीनें विल्हेवाट लावून आणि त्या पूर्वीच्या रम्य, परंतु हल्लींच्या भयाण प्रदेशाचा निरोप घेऊन भय्यासाहेब निघाले, ते थेट जम्नामाई ज्या डोंगराच्या टोंकावर उभी होती, तेथें आले. आपलें काय काम विसरलें होतें, आपण कोठें गेलों होतों, व तेथें आपण काय केलें, ही सर्व हकीकत जम्नामाईला सांगून तीं दोघें हळूहळू आपली डोंगरांतली वाट चालूं लागलीं. वाट चालतां चालतां भाऊसाहेबांच्या मनामध्यें एक विचार प्रमुखत्वानें साऱ्या वाटभर उचंबळत होता. आणि तो विचार संन्याशासारखें राहण्याचा त्यांनीं जो निश्चय केला होता, त्यासंबंधींचा होता. आपल्या क्रोधामध्यें सूड घेण्याची इच्छा अद्यापि किती रखरखीत आहे, हें त्यांच्या जें नुकतेंच प्रत्ययाला आलें होतें, त्यावरून संन्यासी वृत्ति आपल्याला कितपत पाळतां येईल, याविषयीं त्यांच्या मनामध्यें वारंवार द्विधाभाव उत्पन्न होत होता. आणि अशा मनःस्थितींत ते आपल्या मार्गानें हळूहळू आक्रमण करीत चालले होते.

: :

# रांग बारावी

प्रयाग हे ठिकाण फार पुरातन काळापासून प्रख्यात आहे. पुष्कळ शहरें निरनिराळ्या कारणांसाठीं प्रख्यातीला आलेलीं असतात. कोठें मोठमोठाले राजे होऊन गेलेले असतात, म्हणून तीं शहरें प्रख्यातीला आलेलीं असतात, तर कोठें मोठमोठ्या लढाया झालेल्या असतात, म्हणून त्या ठिकाणांना महत्त्व आलेलें असतें. अशीं अनेक कारणें असतात; पण प्रयागच्या महत्त्वाचें कारण असल्या मनुष्यकृत कारणांपेक्षां फार भिन्न आहे. प्रत्यक्ष सृष्टिदेवतेनेच त्या ठिकाणाला रमणीयत्व आणण्याकरितां अतिशय परिश्रम घेतलेले आहेत. शेंकडों गांवें रानोमाळ पसरलेलीं असतात; परंतु त्यांपैकीं एखाद्या गांवालाच एखाद्या नदीच्या कांठीं वसण्याचा लाभ आणि मान मिळतो. ती नदी कितीहि क्षुद्र असली, तरी देखील तिच्या कांठीं राहणाऱ्या लोकांना—आणि विशेषतः तेथील लहान मुलांना ती आपल्या मातेप्रमाणें किती तरी प्रिय असते व ती त्या गांवाला किती तरी शोभा देते. एखादी क्षुद्र नदी देखील जर इतकी शोभादायक असते तर मग मोठाल्या नद्यांची शोभा काय वर्णन करावी! आणि जेथें एक देखील नदी मिळण्याची मारामार, तेथें दोन मोठाल्या नद्या एकत्र जमून त्यांचा संगम झाला, तर त्या देखाव्याच्या सौंदर्याला पारावारच उरणार नाहीं, हें सांगावयाला नको. आणि अशांतलाच प्रकार प्रयाग येथें झालेला आहे. गंगा आणि यमुना यांच्यासारख्या साऱ्या जगांतील अतिशय मोठ्या नद्या हिमालयरूपी आपल्या पित्याच्या घरून निघून दोन दोहोंकडून येऊन पुष्कळ दिवसांच्या वियोगानंतरच्या दोन सख्ख्या बहिणींप्रमाणें धांवत धांवत मोठ्या प्रेमानें एकमेकीला ज्यावेळीं येऊन भेटतात, त्या वेळचें त्यांचें तें प्रेम पाहून कोणाच्या मनामध्यें आनंद उत्पन्न होणार नाहीं? कोणाचें अंतःकरण सद्गदित होणार नाहीं, आणि कोणाच्या हृदयामध्यें परमेश्वराच्या लीलेचा मनोहरपणा प्रतिबिंबित होणार नाहीं? असल्या पवित्र मनो-

भावना तो गंगा-यमुनांचा संगम पाहून मनांत उत्पन्न होतात, यासाठींच तें ठिकाण एक पवित्र तीर्थ म्हणून मानण्यांत आलेलें आहे. अशा प्रकारच्या ह्या निसर्गदत्त सौंदर्यानें आणि पावित्र्यानें प्रथमतः बनविलेल्या ह्या तीर्थक्षेत्रामध्यें मागाहूनही पवित्रतेची थोडीथोडकी भर पडली आहे असें नाहीं. श्रीरामचंद्रांच्या चरणरजानें पवित्र झालेल्या जलाचे कण अद्यापिही येथें कोठें तरी असतीलच! भगवान् श्रीकृष्णाच्या अंगस्पर्शाची कालिंदी नदीनें वाहून आणिलेलीं संस्मरणेंही येथें अद्यापि कोठेंतरी अविस्मृत अवस्थेमध्यें शिल्लक असलीं पाहिजेत! भगवान् वेदोनारायण व्यास यांचें ब्रह्मज्ञान येथें मुरलेलें असलें पाहिजे. आणि त्यांच्याच-प्रमाणें इतरही असंख्य ऋषिजनांच्या तपश्चर्येचें उर्वरित तेज येथें चमकत असलें पाहिजे! अशा या पवित्रक्षेत्रीं नेहमीं साधुसंतांचे आणि यात्रेकरूंचे मोठमोठाले जमाव जमून येत असतात आणि गंगेच्या कांठीं वाळवंटांत चोहोंकडे त्यांचे तळ पडलेले असतात.

असे यात्रेकरूंचे तळ गंगेच्या वाळवंटांत पडलेले असतां एके दिवशीं संध्या-काळीं सूर्यास्ताची वेळ झाली. दिवस मावळण्याच्या पूर्वीं आपलें खाणेंपिणें उरकून घ्यावें म्हणून साधुलोकांनीं आणि यात्रेकरूंनीं आपल्या तंबू-डेऱ्यांच्या आणि राहु-ट्यांच्या बाहेर लहान लहान चुली पेटवून आपल्या चपात्या भाजण्याला सुरुवात केली होती. कोणी गंगेवरून आपले चंबू पाण्यानें भरून आणीत होते, कोणी फराळ करीत बसले होते आणि कोठें कोठें बैराग्यांच्या मोठमोठ्या आखाड्यांतून पुष्कळ बैरागी मंडळी जमून कबीराच्या आणि तुळशीदासाच्या प्रेमळ कवनांनीं भगवंताचें भजन उच्च स्वरामध्यें चाललें होतें. सूर्य जो थोडथोडा अस्तास जात होता, तो सगळा अस्ताला गेला. थोड्या वेळापूर्वीं पेटलेल्या चुलींचा वर जाणारा धूर जो थोडाथोडा दिसत होता, तो आतां जवळजवळ बहुतेक दिसेनासा झाला, आणि त्या चुलींतील विस्तव मात्र जास्त जास्त प्रज्वलित दिसूं लागला.

अशा वेळीं कोणी एक प्रवासी स्त्री प्रयागमधील गंगानदीच्या त्या वाळवंटा-जवळ येत होती. वर सांगितलेले धुरांचे बारीक बारीक लोट तिला दुरून दिसत होते, व त्यावरून येथें यात्रेकरू उतरले असले पाहिजेत, व त्यांच्याजवळ आपण गेल्यास आपल्याला कांहीं तरी खाण्यापिण्याला मिळेल, असा तिनें तर्क बांधला होता, आणि त्या धुराच्या अनुरोधानें ती आपला मार्ग काढीत काढीत चालली होती. तिच्या अंगांत शक्ति उरलेली नव्हती आणि वाटेच्या प्रवासानें तिचें सर्व

अंग अगदीं मलिन होऊन गेलेलें होतें. ती जरी वयानें तरुण दिसत होती, तरी ती ज्या स्थितींत सांपडली होती, त्या स्थितीमुळें तिचें अगदीं उतार वय झालेलें असावें, असा भास होत होता. तिच्या डोळ्यांमध्यें जरी शहाणपणाचें तेज असल्यासारखें दिसत होतें, तरी देखील तिची एकंदर चर्या वेड लागलेल्या बाईसारखी आढळून येत होती. तिला पाहिल्याबरोबर ही कोणी तरी एखादी वेडसर भिकारीण यात्रेकरू असावी, असा समज उत्पन्न होई. अशा प्रकारची ती बाई संध्याकाळच्या वेळीं गंगेच्या कांठच्या त्या यात्रेकरूंच्या मेळयामध्यें येऊन पोहोंचली. तेथें आल्यानंतर ती आधीं दुसरीकडे कोठेंही न जातां पहिल्या प्रथम ती गंगेच्या पाण्याजवळ गेली. तिला जरी अतिशय भूक लागलेली होती, व ती कोठेंही गेली असती तरी तिला जरी कोणीही खावयाला थोडेंबहुत कांहीं तरी दिलें असतें, तरीसुद्धां तिकडे न जातां ती प्रथमतः गंगेच्या कांठावरच गेली. तें गंगेचें पात्र तिला आधींपासूनच दुरून दिसूं लागलें होतें आणि तेव्हांपासूनच तिच्या मनामध्यें आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या होत्या. त्या गंगेच्या प्रवाहाचें तें अप्रतिम सौंदर्य पाहून तिची सर्व तहानभूक हरून गेली, आणि त्या गंगेच्या पाण्यावरून वाहत येणाऱ्या शीतल वाऱ्याचा तिच्या अंगाला स्पर्श झाल्याबरोबर आपले प्रवासाचे सर्व श्रम नाहींसे झाले असें तिला वाटलें. गंगेचें पात्र तिला दिसूं लागल्यानंतर ती आपल्या पायाखालच्या वाटेकडे क्वचितच पाहत होती. तिचें सारें लक्ष त्या गंगेच्या शुभ्र आणि विस्तीर्ण जलसंचयाकडे वेधून गेलें होतें. आणि आपण जमिनीवर चालत नसून त्या गंगेच्या लाटांवरच तरंगत आहों, असा तिला भास होण्याइतकी ती तल्लीन होऊन गेलेली होती. समान वस्तु ह्या नेहमींच एकमेकांना एकमेकांकडे ओढीत असतात. साम्यामध्यें नेहमींच आकर्षणाचें सामर्थ्य वास करीत असतें. दोन समानधर्मीय वस्तु ह्या मूळच्या जणू काय एकच असतात; परंतु कांहीं कारणानें त्या विभक्त झाल्या असल्यामुळें पुनरपि आपला संयोग आणि समागम होण्यासाठीं त्या जणु काय एकमेकांकडे अतिशय जोरानें ओढ घेत असतात, असेंच म्हणावें लागतें. कारण, ही बाई जी त्या गंगानदीच्या दर्शनानें इतकी तल्लीन होऊन गेली होती, तिच्याही अंतःकरणामध्यें तशाच प्रकारची दुसरी एक गंगानदी वाहत होती! त्या बाहेरच्या गंगानदी-इतकेंच हिचें अंतःकरण शुद्ध आणि पवित्र होतें; इतकेंच नव्हे, तर त्या दोघींच्या नांवांमध्येंही साम्य होतें. परंतु नांवाच्या साम्यापेक्षां ह्या दोन्हीही गंगाबाईंच्या

गुणधर्मामध्यें जास्त जोरदार असें साम्य होतें. आणि म्हणूनच ह्या गंगामाईला ती गंगाबाई पाहून इतका प्रेमाचा उल्हास उत्पन्न झाला. त्या उल्हासाच्या भरामुळें मी ह्या गंगानदीला केव्हां जाऊन भेटेन असें गंगाबाईला झालें होतें. म्हणून ती जो आली, ती प्रथम गंगेच्या कांठीं गेली, आणि गंगेला वंदन करून नंतर मग तिनें त्या गंगेच्या पवित्र जलानें नेत्रस्पर्श केला. आणि मग तिनें त्या गंगाजलाचें—त्या पृथ्वीवरील मर्त्य लोकांकरितां निर्मिलेल्या अमृताचें—यथेच्छ प्राशन केलें. नंतर कांहीं वेळ विश्रांति घेण्याकरितां ती तेथेंच बसली. तेथून त्या गंगेच्या पात्राकडे पाहत असतां त्या गंगेच्या पात्राप्रमाणें तिचें मन विस्तृत झालें, त्या गंगेच्या गांभीर्याप्रमाणें तिचें मन गंभीर झालें, त्या गंगेच्या लाटांप्रमाणें तिचें मन सात्त्विक प्रेमानें उचंबळून जाऊं लागलें, आणि त्या गंगा-यमुनांच्या संगमाप्रमाणें तेथें सर्वत्र पसरलेल्या त्या विश्वव्यापी सृष्टिदेवतेच्या सौंदर्याशीं तिचें तादात्म्य होऊन ती क्षणभर आपलें सर्व देहभान विसरून गेली. पुढें शुद्धीवर आल्यावर त्या यात्रेकरूंच्या मेळ्याकडे जाणाऱ्या वाटेनें ती हळू हळू चालूं लागली.

कोठें तरी भिक्षा मागावी आणि जें कांहीं मिळेल तें खाऊन चरितार्थ करावा, अशाच रीतीनें तिनें आजपर्यंत दिवस काढले होते. आणि कोठें कांहीं पुरेसें न मिळालें, तर अर्धपोटीं किंवा उपाशी राहाण्याचीही तिला आतां चांगली संवय झाली होती. आणि त्यामुळें चांगलें पवित्र अन्न मिळालें तरच तें खावयाचें, नाहीं तर आठ आठ दिवसपर्यंतही उपाशी राहावयाचें, असा तिनें क्रम ठेविला होता. डोंगरांतून आणि उन्हातान्हांतून चालण्याचेंही तिला अलीकडे कांहीं वाटत नाहींसें झालें होतें. ठग लोकांनीं लुटल्यापासून आणि भाऊसाहेबांची व गंगाबाईची ताटातूट झाल्यापासून तिचे सगळे दिवस अशाच रीतीनें जात होते. ठग लोकांनीं तिला धोत्र्याच्या फळांची पूड पुष्कळ चारलेली असल्यामुळें, त्या चोरीच्या रात्रीं त्या जंगलामध्यें त्या ठग लोकांनीं काय काय अनन्वित कृत्यें केलीं याची तिला कांहीं कल्पना नव्हती. दुसऱ्या दिवशीं पुष्कळ वेळानें ती शुद्धीवर आली, तेव्हां आपल्याजवळ कोणी नाहीं, आपले पति भय्यासाहेब हेही आपल्याजवळ नाहींत, आपलीं नोकरमाणसें कोणी आपल्याजवळ नाहींत, वगैरे स्थिति पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें; परंतु आपल्याबरोबर प्रवास करीत असलेले दुसरे वाटसरूही नाहींसे झालेले पाहून ते ठग आणि चोर असले पाहिजेत आणि त्यांनींच आपल्या नवऱ्याचें आणि नोकर-

माणसांचें कांहीं तरी बरेंवाईट केलें असलें पाहिजे ही कल्पना तिच्या मनामध्यें येऊं लागली. तिनें त्या अरण्यांत आणि त्या खेडेगांवच्या आसपास पुष्कळ शोध केला, परंतु कोणाचाच कांहीं पत्ता लागेना, तेव्हां ती अतिशय निराश झाली. हे गळेकापू ठग लोक स्वभावानें आयते इतके निष्ठुर असतां त्यांनीं आपल्यावर उगीच दया दाखविली, याबद्दल तिला फार वाईट वाटूं लागलें; आणि इतरांच्या आधीं त्यांनीं आपल्याला मारिलें असतें, तर फार बरें झालें असतें, असें ती म्हणूं लागली. तरी पण आपल्यापैकीं कोणी लोक जिवंत असतील, अशा आशेवर त्यांना शोधीत राहण्याचा तिनें निश्चय केला, व त्यासाठीं ती त्या विंध्य पर्वताच्या डोंगरांतून आणि दऱ्याखोऱ्यांतून चोहोंकडे फिरूं लागली. परंतु तिच्या हरवलेल्या मंडळीपैकीं कोणाचाच तपास लागला नाहीं ! तेव्हां आतां पुढें एखाद्या क्षेत्राच्या ठिकाणीं जाऊन तेथून सोबत मिळाल्यास कोंकणांत जावें, नाहीं तर तेथेंच देवाचें नांव घेत कालक्षेप करावा, अशी मनामध्यें योजना करून ती वाट विचारीत विचारीत या वेळीं प्रयागला येऊन पोंचली होती. तिचे अलीकडचे कित्येक महिने अशा संकटावस्थेमध्यें गेले असल्याकारणानें तिची शरीरप्रकृति अगदीं क्षीण होऊन गेली होती. त्यांतच ती गरोदर असल्यामुळें आणि तिला बरेच दिवस गेलेले असल्यामुळें तिला फार त्रास होत असे. अशा स्थितीमध्यें आपल्याला कोणाचा तरी आश्रय पाहिजे, म्हणून तिनें झांशीस आपल्या सासरीं किंवा राजापुरास आपल्या माहेरीं जाण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केले. परंतु त्या विंध्याद्रीच्या डोंगरामध्यें तिची ही इच्छा सफल होण्याला कांहींच साधन नव्हतें. हल्लींच्यासारखी टपालाची सोय त्या वेळीं नसल्यामुळें पत्र पाठवून आपली हकीकत कोणाला कळवावी, तर तसें करणेंही शक्य नव्हतें. आणि तिला तेथें त्या अरण्यांत पत्रें नेणारा जासूद तरी कोण भेटणार ! तिच्यावर कोसळलेल्या प्रसंगासारख्या स्थितीमध्यें झांशीस आपल्या सासरीं आपल्या फुटक्या कपाळानें परत जावें, हें तिला प्रशस्त वाटेना. आणि माहेरीं जाण्यांतही तिला फारसा आनंद वाटत होता असें नाहीं. तरी पण आपली मुलगी कशीहि असली आणि ती कोणत्याही प्रसंगामध्यें सांपडलेली असली, तरी ती आपल्या आईबापांना सदोदित प्रियच असते, हें नैसर्गिक तत्त्व लक्षांत आणूनच गंगाबाई सासरच्या अभावीं आपण माहेरीं जावें असे विचार कधीं कधीं मनांत योजीत असे. पण त्या विंध्याद्रीच्या डोंगरांतून इतक्या लांब दूरवर कोंकणांत तिनें जावयाचें कसें ! त्या गोष्टीची अशक्यता तिच्या लक्षांत येऊन ती पुष्कळ वेळां निराशेनें दीर्घश्वास

टाकीत असे ! त्या डोंगरांतून फिरतांना ती एखादे वेळीं दमून जाऊन एखाद्या टेकडीच्या शिखरावर बसलेली असतांना तिला आपल्या माहेरची आठवण झाली, म्हणजे तिच्या मनाची स्थिति फारच विलक्षण होत असे. तिला इतक्या लांबूनही आपलें कोंकणांतील घर दिसूं लागे. ती तेथून दक्षिणेकडे तोंड वळवून आणि हातानें बोट दाखवून म्हणत असे कीं, "असें असें गेलें म्हणजे तें त्या ठिकाणीं माझें घर आहे ! मी जर पांखरूं असतें, तर आत्तां उडून आपल्या घरीं गेलें असतें आणि आपल्या आईबापांना भेटलें असतें ! इथून कोंकण फार लांब का आहे ! मला वाटतें ह्या डोंगराच्या उंच शिखरावरून आमच्या त्या राजापुरच्या जवळच्या समुद्राचें पाणीसुद्धां दिसत आहे ! मला खात्रीनें भ्रम होत नाहीं ! तें त्या क्षितिजाजवळ जें पाण्यासारखें दिसत आहे तें आकाश नसून तें समुद्राचें पाणीच असलें पाहिजे, ह्यांत संशय नाहीं ! आणि तेथेंच आमचा गांव आहे ! माझे आईबाप तेथें आहेत ! माझें घर तेथें आहे ! माझ्या मैत्रिणी तेथें आहेत ! त्या सर्व आनंदांत असतील ! लहानपणीं माझ्याबरोबर त्या जशा आनंदानें फुगड्या आणि झिम्मा घालीत होत्या तशाच त्या अजूनहि घालीत असतील ! फक्त मीच काय ती त्यांच्यामध्यें नाहीं ! माझ्या कपाळीं त्यांच्यामध्यें मिसळून आनंदानें फुगड्या, झिम्मा, हुतुतू वगैरे खेळ खेळण्याचें नसून उलट या निर्जन अरण्यांतील अनेक संकटांशीं हुतुतू घालण्याचें माझ्या नशिबीं आलें आहे ! यांतून मी कशी सुटणार ? यांतून मला कोण सोडवील ? आणि येथून मला माझ्या माहेरीं कोण नेईल ! आपल्या मुलीची अशी अवस्था झालेली आहे, असें माझ्या बाबांना किंवा आईला कळलें, तर तीं जेवीत असलीं तर आंचवावयाला येथें येतील आणि हर प्रयत्न करून मला येथून घेऊन जातील ! पण त्यांना ही माझी अवस्था कळणार कशी ? त्यांना वाटत असेल कीं, "आमची मुलगी आनंदांत असेल ! ती जहागिरदारीण आहे ! तिला काय कमी आहे ? तिच्यापाशीं नोकरचाकर असतील, तिच्या तैनातीला शिपाईप्यादे असतील, आणि ती मोठ्या इतमामानें सुरक्षितपणें प्रवास करीत येत असेल !' पण बाबा, नाहीं हो नाहीं ! तुमच्या मुलीजवळ यांपैकीं कांहींहि नाहीं ! आणि तुमची ही जहागिरदारीण मुलगी—शिपाईप्याद्यांची मालकीण मुलगी—या विंध्याद्रीच्या अरण्यामध्यें अतिशय हतभाग्य स्थितीमध्यें वनवाशासारखी अगदीं एकटी फिरत आहे ! बाबा, ही माझी स्थिति तुम्हांला दिसत नाहीं का हो ! पण तुम्हांला ती कशी दिसणार ? तुम्ही अंतरसाक्ष का

आहांत? मी तुम्हांला ती कळविली नाहीं, तर तुम्हांला ती कशी कळणार? पण मी तरी तुम्हांला येथून आपली ही स्थिति कशी कळवूं? इथून तुमच्याकडे कोणाबरोबर निरोप पाठवूं? इथून तुमच्याकडे चटकन् एखाद्या पांखरासारखें उडून कोण जाईल! हें इथें एक पांखरूं उडत आहे, हें जाईल काय?—अरे पांखरा, तूं माझ्यासाठीं माझ्या घरीं माझा निरोप घेऊन जाशील काय?—जा जा!—

**झुण झुण पांखरा॥ जा माझ्या माहेरा॥**
**कमानी दरवाजा॥ त्यावर बसा जा॥**
**सांग माझ्या आईला॥ न्या मला माहेरा॥**

अशा प्रकारचें नेहमींचें मुलींचें गाणें म्हणून गंगाबाई त्या विंध्य पर्वतांतील एखाद्या पांखराला विनवीत असे. पण कोठें विंध्य पर्वत आणि कोठें कोंकण! आणि तेथें तें बिचारें पांखरूं काय निरोप घेऊन जाणार! पण प्रेम वेडें असतें! गंगाबाईला त्या निर्जन अरण्यामधील परक्या मुलखामध्यें आपल्या कोंकणांतील घराची वरच्यावर फार आठवण येई. समुद्राच्या बाजूनें नुसता वारा वाहत आला, तरी देखील हा आपल्या कोंकणांतील वारा आहे, असें तिला वाटत असे. आणि म्हणून ती त्याचें मोठ्या प्रेमानें स्वागत करीत असे. संध्याकाळचा सूर्य आकाशांतून वरून खालीं खालीं येऊं लागला म्हणजे आतां हा सूर्य घाटावरून खालीं उतरणाऱ्या एखाद्या वाटसरूप्रमाणें घाटमाथ्यावरून आपल्या तळकोंकणांत खालीं उतरत असला पाहिजे, व आपल्या गांवावरूनच हा सूर्य तसाच पुढें समुद्राकडे अस्तसमयीं जाईल, असें तिला वाटत असे, आणि त्या वेळीं तिला समुद्रकांठच्या सूर्यास्ताची नेहमीं आठवण होई. तिनें लहानपणीं समुद्रकांठच्या वाळवंटावर बसून समुद्रांत बुडणाऱ्या संध्याकाळच्या सूर्याची शोभा अनेक वेळां पाहिलेली होती. आणि तो ठसा तिच्या मनावर इतका बिंबला होता कीं, तो विसरणें कधींही शक्य नव्हतें. त्या देखाव्याची तिला विंध्य पर्वतांतील प्रत्येक सूर्यास्ताचे वेळीं आठवण होई. त्या विंध्य पर्वतांतील डोंगराच्या एखाद्या कड्यावर बसून ती अस्तास जाणाऱ्या त्या सूर्याकडे पाहत असतां त्या विंध्य पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांतून जिकडे तिकडे समुद्राचें पाणी पसरूं लागे, आणि समुद्रांतील लाटांचा खळखळाट तिला ऐकूं येऊं लागे. मोठमोठालीं पांढरीं शुभ्र वाळवंटें लांबच लांब जिकडे तिकडे पसरलेलीं तिला दिसूं लागत. नारळी-पोफळींच्या ओळीनें लाविलेल्या सुंदर

वृक्षवाटिका जमिनीपासून उगवून त्या विंध्य पर्वतावर आकाशांत उंच जाऊं लागत. समुद्राचें सर्व पाणी लाल होई आणि त्याचें प्रतिबिंब आकाशांत पडून आकाशही लाल झाल्यासारखें दिसे. अशा त्या सर्वत्र सुवर्णमय झालेल्या राजमार्गावरून ती सूर्याला समुद्रामध्यें नेहमीं अस्ताला नेत असे. तिनें त्या विंध्य पर्वतामधील कोरड्या ठणठणीत जागेमध्यें सूर्याला एक दिवसही अस्ताला जाऊं दिलें नाहीं. अशा रीतीनें तो सूर्य कोंकणच्या बाजूला समुद्राकडे जाऊं लागला, म्हणजे रोज ती त्याच्याबरोबर आपल्या माहेरीं पोंचता करण्याकरितां आपल्या करुणास्पद स्थितीचा निरोप सांगत असे, आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्य उगवण्याची वेळ झाली म्हणजे यानें कांहीं तरी उलट जबाब आणला असेल, अशा आशेनें प्रातःकाळीं पूर्वेकडे तोंड करून आणि हात जोडून ती दररोज त्याची वाट पाहत असे, आणि दररोज तिची निराशा होत असे!

गंगाबाईवरचीं संकटें जितकीं जितकीं जास्त वाढूं लागलीं, तितकी तितकी निराधारपणामुळें माहेरीं जाण्याची तिची उत्कंठा जास्त जास्त वृद्धिंगत होऊं लागली. परंतु त्याचा कांहीं उपयोग नव्हता. तिनें रानांतल्या पांखरांबरोबर आणि आकाशांतल्या सूर्याबरोबर पुष्कळ निरोप पाठविले, तरी तिच्या माहेराहून तिला नेण्याकरितां कोण येणार होतें! तरी पण ती बिचारी दुःखानें इतकी वेडी झाली होती कीं, तिला इतका हा सारासार विचार कोठून सुचणार? अशा दुःखामुळें उत्पन्न झालेल्या भ्रमाच्या भरांत ती आपल्या माहेरीं नुसते निरोप पाठवूनच थांबत नसे, तर माहेरच्या संबंधींच्या प्रेमातिरेकानें अगदीं थबथबलेल्या अशा अनेक ओंव्याही ती त्या अरण्यांत अनेक वेळां मोठमोठ्यानें अतिशय मंजुळ, पण अतिशय करुण, अशा स्वरानें म्हणत असे! लहान वयांत मुलींना झोंपाळ्यावर बसून ओंव्या म्हणण्याची फार हौस! आणि गंगाबाईच्याही अंगांतिल लहानपणा अद्यापि गेलेला होता असें नाहीं. पण बिचारीला त्या अरण्यांत झोंपाळे कोठून मिळणार! पण देवाची कृपा अशी उदार असते कीं, मनुष्याला या जगांत अनपेक्षित स्थळीं अपेक्षित वस्तु प्राप्त होतात! अरण्यांत कोणी झोंपाळे बांधून ठेविलेले नसतात, हें खरें. पण गंगाबाईची कल्पना त्या विंध्य पर्वतांतील कोणत्याही वनराजीमध्यें वाटतील तितके झोपाळे निर्माण करीत असे! त्या अरण्यांत ठिकठिकाणीं मोठाले वृक्ष होते आणि त्यांच्यावरून पुष्कळ वेली खालीं लोंबत असत. त्या वेलींना घट्ट गांठी मारून गंगाबाई आपल्याकरितां हां हां म्हणतां झोपाळे

बनवीत असे, आणि त्यांवर बसून ती माहेरच्या संबंधींच्या अनेक प्रकारच्या आणि अनेक प्रसंगांच्या पुढीलप्रमाणें ओंव्या म्हणून आपल्या मनाला विरंगुळा करून घेत असे:—

पाऊसपाण्याची, धरणी वाट पाहे ॥
तशी मला आस आहे, माहेराची ॥ १ ॥
दिवस मावळला, कदळीआड झाला ॥
मला माघारी कां न आला, माहेरींचा ॥ २ ॥
दसऱ्यापासोनी, दिवाळी विसां दिशीं ॥
मला माहेरीं कधीं नेशी, मायबाई ॥ ३ ॥
फुलांमधें फूल, फुल हुंगावें जाईचें ।
सुख भोगावें आईचें, बाळपणीं ॥ ४ ॥
निरोप मी धाडीं, निरोपासरसं यावं ॥
मला घेवोनियां जावं, मायबाई ॥ ५ ॥
काळी चंद्रकळा, धुऊधुऊनी विटली ॥
नाहीं हौस फीटली, माहेराची ॥ ६ ॥
धाडा माघारी पाहुणा, साखर साईचा ॥
भाऊ माझ्या हो आईचा, मामाराया ॥ ७ ॥
माझ्या धांवण्याला, कोण धांवेल दूरिचा ॥
राजा पंढरपूरिचा, पांडुरंग ॥ ८ ॥
मजला नाहीं कोणी, तुजला आहे माहीत ॥
यावें गरुडासहित, पांडुरंगा ॥ ९ ॥

अशा प्रकारच्या करुणरसाच्या ओंव्या ती वारंवार म्हणत असे. त्या ओंव्या म्हणतांना त्या वेलींच्या झोपाळ्यावर ती बसलेली असतांना तिच्या सौंदर्यामुळें आणि मोहकपणामुळें त्या वेलींवर हें एक विलक्षण प्रकारचें सुंदर आणि मोहक असें चमत्कारिक फूलच आलें आहे कीं काय, आणि त्या फुलावर मोहून गेलेले भ्रमरच हा गुंजारव करीत आहेत कीं काय, असा भास होई. ती त्या वेलींच्या झोंपाळ्यावर बसून झोंके घेत असतांना, आणि गाणीं म्हणत असतांना, तिच्या

स्वल्प भारानें किंचित् लवणाऱ्या आणि हलणाऱ्या बाजूच्या वृक्षांवरील फुलें गळून तिच्या अंगावर पडत; तेव्हां तिच्या त्या मधुरस्वरानें संतर्पित झालेल्या त्या तेथील तरुदेवता तिच्यावर जणूं काय पुष्पवृष्टीच करीत आहेत, असें वाटे. तिचे ते प्रेमळ आणि करुण आलाप ऐकून ही कोणी गंधर्वकन्याच आकाशांतून विंध्य पर्वतावर खालीं उतरून विलाप करीत आहे कीं काय, असा भास होई. आणि ती अशा प्रकारच्या ओंव्या म्हणूं लागली, म्हणजे आसपासच्या त्या डोंगरांत राहणाऱ्या भिल्लांच्या स्त्रिया तिच्याभोंवतीं जमत, आणि तिचें दुःख ऐकून तिच्याबरोबर त्यांनाही अनावर रडूं कोसळत असे.

अशा रीतीनें तिनें डोंगरांत अनेक दिवस घालविले. पुढें कोणी तरी यात्रेकरूंची सोबत पाहून आपल्या माहेरीं जातां आलें तर पहावें, म्हणून तिनें प्रयत्न आरंभिला, व येतां येतां ती अखेरीस पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रयागास येऊन पोंचली.

इतक्या अवधींत गंगाबाईला तिच्या नवऱ्याचा कांहीं एक शोध लागला नाहीं. तरी पण ती कधींही निराश झाली नाहीं. तिची मनोदेवता तिला असें सांगत असे कीं, तुझा पति कोठें तरी जिवंत असला पाहिजे! असें वाटण्याला तिच्यापाशीं कांहीं मोठेसें जबरदस्त साधन होतें असें नाहीं, तरी पण तिला आपल्या अहेवपणाचा आत्मविश्वास वाटत असे. तिच्या पत्रिकेमध्येंही तूं आपल्या नवऱ्याच्या आधीं मरशील असा योग असल्याचें तिला कोणी ज्योतिष्यानें सांगितलेलें होतें, त्यावरही तिचा दृढ विश्वास होता. म्हणून ती नेहमीं सुवासिनी स्त्रीप्रमाणें वागत असे. आणि आपल्या सदाचरणानें आणि भगवदाराधनेनें आपल्या पतीला आयुष्य आणि आरोग्य चिंतीत असे.

: :

# रांग तेरावी

प्रयागमध्यें त्या वेळीं गंगेच्या कांठीं असलेल्या एका मोठ्या वाड्यामध्यें कोणी एक श्रीमान गृहस्थ रहात असे. तो द्रव्याच्या बाबतींत फार श्रीमंत होता. पण स्वतःच्या कुटुंबाच्या माणसांच्या बाबतींत तो अगदीं कंगाल दशेला येऊन पोहोंचलेला होता. त्याच्या कुटुंबांत कांहीं दिवसांपूर्वी पुष्कळ माणसें होतीं, परंतु दुर्दैवाच्या विचित्र गतीमुळें तीं सर्व मृत्युमुखीं पडून हल्लीं फक्त तो आणि त्याची बायको अशीं दोनच माणसें त्याच्या घरांत शिल्लक राहिलीं होतीं. परंतु ही संख्या लवकरच वाढण्याचा संभव होता. कारण त्याची बायको गरोदर होती, व तिला अगदीं नऊ महिने भरत आलेले होते. याकरितां त्याला माणसांची फार जरूर होती. पुरुष नोकरमाणसें त्याच्या पदरीं बरींच होतीं; परंतु बाळंतपणाच्या वेळीं उपयोगीं पडण्यासारख्या कोणा तरी बायका माणसाच्या मदतीची त्याला फार अपेक्षा होती.

गंगाबाई विंध्य पर्वतांतून फिरतां फिरतां प्रयागास आल्याचें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. तेथें आल्यानंतर कांहीं दिवस संभावितपणाच्या याचनेवर कसा तरी गुजारा केल्यावर आपण कोठें तरी कष्ट करून स्वकष्टार्जित अन्न खाल्लें पाहिजे, ह्या गोष्टीची आवश्यकता तिच्या मनाला फार वाटूं लागली. त्या उद्देशानें शोध करितां करितां कांहीं दिवसांनीं वरील सावकाराच्या घरीं तिची नोकरीची सोय झाली.

त्या वेळीं आतांच्यासारखे सार्वजनिक दवाखाने, औषधपाण्याच्या सोई, किंवा बाळंतपणाच्या जागा, अशा कांहीं एक तजविजा नसत. त्यामुळें प्रत्येकास आपापल्याकरितां निरनिराळी सोय वेळ आली म्हणजे आपापल्या घरीं करून घ्यावी लागत असे. त्या सावकाराच्या कुटुंबाची बाळंतपणाची ही पहिलीच खेप होती, व त्याची बायको त्याची फार आवडती होती; त्यामुळें आपली बायको हातींपायीं सुरक्षित-

पणानें कशी सुटेल याच्याबद्दल त्याला फार काळजी लागली होती. आणि म्हणून अडचणीच्या प्रसंगीं जरूर लागणारी सर्व कांहीं तजवीज त्यानें करून ठेवण्याची सुरुवात केली होती. अशा स्थितींत गंगाबाई तेथें नोकरीला राहिली. पण तिलाही बाळंतपणाच्या वेळीं काय अडचणी येतात आणि काय औषधोपचार केले पाहिजेत, याची कांहीं कल्पना नव्हती. तरी पण तिला सांगितलेलें काम ती व्यवस्थित रीतीनें करीत असे.

अशा रीतीनें त्या सावकारपत्नीच्या बाळंतपणाची निरनिराळ्या प्रकारची पूर्व तयारी गंगाबाईच्या हातून एकीकडे चाललेली असतांना दुसरीकडे गंगाबाईच्या मनाला काय वाटत होतें, याची कल्पना कोणाला येणार आहे? ती आपल्या मनांत म्हणे कीं, " ही सरस्वतीबाई फार भाग्यवान आहे. हिला सर्व कांहीं अनुकूल आहे आणि म्हणून हिच्या बाळंतपणाची इतकी तरतूद चाललेली आहे. हिच्याकरितां बाज, पाळणा वगैरे सर्व तयार ठेवण्यांत आलेलें आहे. हिला अजून मूल झालें नाहीं, तोंच त्याच्याकरितां किती तरी आंगडीं, टोपडीं आणि कुंचडीं शिवून ठेवण्यांत आलेलीं आहेत. मी हिच्याकरितां आणि हिच्या मुलाकरितां केशर खलून ठेविलें आहे आणि मधाच्या कुप्या भरून ठेविल्या आहेत. हिंग, सागरगोटा, एरंडेल, दशमूळांच्या काढ्यांच्या पुड्या—अशा एक ना दोन, किती तरी तयाऱ्या मी हिच्याकरितां करून ठेविल्या आहेत. पण, देवा, माझ्या बाळंतपणाची वेळ आली, तर माझ्याकरितां कोण अशी तयारी करणार आहे? मी जर चांगल्या स्थितींत असतें, तर माझ्या सासरीं काय किंवा माझ्या माहेरीं काय, मला कांहीं कमी नव्हतें. एक पाट सात ठिकाणीं नाचविला गेला असता आणि मी म्हटलें असतें तसें तसें झालें असतें; पण तें सगळें जाऊन मी हल्लीं या दुर्धर स्थितीमध्यें सांपडलेली आहे. जिच्या बाळंतपणाची तयारी करण्याकरितां दहा बायका खपल्या असत्या ती मी आज दुसऱ्याच्या बायकोच्या बाळंतपणाची तयारी करण्याची नोकरी करीत आहें! ती बिचारी हातीं पायीं सुरक्षितपणानें सुटो! मी कांहीं तिचा हेवा करीत नाहीं. परमेश्वर करो आणि ती बिचारी खुशाल आनंदांत नांदो!—अथवा तीचशी काय, सर्व जग आनंदामध्यें नांदावें अशीच माझी इच्छा आहे, आणि अशीच माझी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे. फक्त मी हतभाग्य आहें, म्हणून मला वाईट वाटत आहे, आणि बाळंतपणाच्या वेळीं माझें

कसें होईल याची मला काळजी वाटत आहे. हीं सरस्वतीबाई बाळंतीण झाली म्हणजे ह्यांचें काम संपल्यावर हीं मला जा म्हणून म्हणतील. आणि माझे बाळंतपणाचे दिवस जवळ आले म्हणजे माझ्यानेंही मग काम होणार नाहीं; तेव्हां माझें कसें होईल? मला या ठिकाणीं जेथें घरादाराची देखील पंचाईत, त्या ठिकाणीं मला बाळंतपणाला बाज, पलंग किंवा शेकशेगडी हीं कोठून मिळणार? आणि मला जें मूल होईल त्याला पाळण्यांत घालण्याला मी पाळणा तरी कोठून आणणार? भय्यासाहेब! तुमच्या बायकोवर असा प्रसंग यावा काय हो? भय्यासाहेब, तुम्हांला मुलगा झाला तर त्याच्या तोंडाला मधाचें बोट लावून त्याचें पुत्रावण करण्याला मुलाच्या बापानें आलें पाहिजे!—पण भय्यासाहेब, तुम्ही कोठें आहांत?"

अशा प्रकारच्या अनेक शोकतरंगांमध्यें ती वारंवार बुडून जात असे. सेवाधर्माप्रमाणें त्या घरांतील कामकाज करीत असतांना कोणी जवळपास नाहीं अशी स्थिति पाहून ती आपलें हें दुःख आठवून रडत असे. आणि दुसरें कोणी मनुष्य आपलेकडे येत आहे अशी तिला चाहूल लागल्याबरोबर ती आपल्या डोळ्यांचें पाणी पुसून आपल्या उद्योगधंद्याला लागत असे.

गंगाबाईनें सरस्वतीबाईसाठीं सर्व कांहीं तयारी करून ठेविली होती, आणि बारीकसारीक गोष्टींकडे सुद्धां तिनें दुर्लक्ष केलें नव्हतें. सरस्वतीबाईचें पोट दुखूं लागलें आणि ती लवकर बाळंतीण झाली नाहीं, तर तिला शेवयांची खीर देण्याकरितां शेवया काढून ठेविल्या होत्या, बाळंतपणांत वाताचा विकार होऊं नये म्हणून हेमगर्भाची मात्रा तयार ठेविली होती; मूल झाल्याबरोबर तें भिऊं नये आणि दचकूं नये म्हणून विहिरींत दगड टाकण्याकरितां तिनें एक दगडही आणून ठेविला होता, आणि मूल बहिरें होऊं नये म्हणून तें उपजल्याबरोबर थाळा वाजविण्याकरितां तिनें एक थाळाही तयार करून ठेविला होता. आणि यदाकदाचित् मुलाला अंगावरचें दूध मिळालें नाहीं, तर घरच्या गाईचें खात्रीचें दूध मिळावें म्हणून सरस्वतीबाईच्या नवऱ्यानें—गणपतिभय्यानें—एक चांगली अगदीं व्यायला झालेली मोठी थोरली सोरटी गाय आणून ठेविली होती. ती लवकर व्याली विऊन सरस्वतीबाईच्या मुलाला दूध मिळावें याकरितां गंगाबाईनें—गाईकरितां निराळा नोकर होता तरी आपल्या हातून गाईच्या सेवेचें पुण्य घडावें म्हणून—

तिची चांगली जोपासना चालविली होती, आणि त्या वेळच्या जुन्या समजुतीप्रमाणें गाय लवकर विण्याचे तिनें कांहीं तोडगेही केले होते.

पण ह्या सगळ्या गोष्टी करीत असतांना तिचें सारें लक्ष आपल्या स्वतःच्या भावी स्थितीकडे लागलेलें असे. तिला वाटे कीं, "मी दुसऱ्याच्याकरितां हें इतकें सगळें करीत आहे; पण माझ्याकरितां या गोष्टी कोण करील! कर्मधर्मसंयोगानें मी जर अडलें, तर माझी लवकर सुटका होण्यासाठीं मला शेवयांची खीर करून कोण देईल! मी आपल्या बाळंतपणासाठीं आपल्या माहेरीं चाललें होतें. तेथें मी गेलें असतें, तर माझ्या आईनें मोठ्या ममतेनें मला नुसती शेवयांची खीरच काय, पण आणखी दुसरीं दहा औषधें दिलीं असतीं; पण आतां मला माझ्या मायेचें असें कोण आहे? त्या भावी प्रसववेदनांनीं माझ्या दुर्दैवामुळें मला जर कदाचित् वातविकारानें मूर्च्छा आली, तर मला शुद्धीवर आणण्याकरितां आल्याच्या रसांत खडीसाखर घालून मला हेमगर्भाची मात्रा कोण उगाळून देईल? दैवयोगानें मला जर मुलगा झाला, तर झाल्याबरोबर तो रडूं लागेल आणि त्याला त्या अनाथ स्थितींत पाहून मलाही रडूं आल्यावांचून राहणार नाहीं. मग अशा स्थितींत त्याला कोण उचलून घेईल! त्याला कोमट पाण्यानें आंघोळ कोण घालील? आणि तो भीतीनें दचकूं नये म्हणून त्याच्याकरितां विहिरींत दगड कोण टाकील? आणि तो बहिरा होऊं नये म्हणून त्याच्याकरितां थाळा तरी कोण वाजवील? मला सुईण कोण भेटेल? आणि मी सुइणीवांचून एकटी काय करूं!"

अशा प्रकारचे विचार तिच्या मनामध्यें दररोज व्यग्रता उत्पन्न करीत असत. एके दिवशीं याच व्यग्रतेनें उद्विग्न होऊन एकांतांत ती रडत बसली होती, आणि "देवा, माझ्यावर काय प्रसंग हा? माझें कसें होईल! माझ्या बाळंतपणाच्या वेळीं मला कोण सोडवील!" याप्रमाणें ती आपल्या मनांतल्या मनांत विलाप करीत होती; इतक्यांत "अहो, येथें जवळ कोणीच नाहीं कसें? ही गाय व्यायली आहे! आणि हिचें वासरूं येथें तिच्याजवळ जमिनीवर पडलें असून त्याला ती चाटीत आहे!" असे शब्द त्या गाईच्या गोठ्याच्या बाजूनें निघालेले गंगाबाईच्या कानांवर आले. त्याबरोबर तिच्या चित्तवृत्तींत एकदम फरक पडला. तिचे दुःखाचे हुंदके थांबले आणि तिचे दुःखाचे अश्रु मागच्या मागें परतले. तिच्या हृदयांत एकदम प्रकाश पडला आणि तिच्या चर्येवरील उद्विग्नतेची छटा नाहींशी

होऊन आशा, आधार आणि आत्मविश्वास, यांचीं स्पष्ट चिन्हें तेथें चमकूं लागलीं, व या दैवी भावनांच्या भरामध्यें तिच्या तोंडून पुढीलप्रमाणें उद्गार निघाले:—

" काय! आपली गाय व्यायली! आणि ती आपल्या वासराला चाटीत आहे! आणि तिच्याजवळ कोणी नाहीं!—देवा, तुझी लीला किती तरी अगाध आहे! मी वेड्यासारखी ' माझें कसें होईल? आणि माझ्या बाळंतपणाच्या वेळीं मला कोण सोडवील?' म्हणून शोक करीत बसलें होतें! देवा, माझ्याजवळ माझें कोणी नाहीं म्हणून मी रडतें; पण, देवा, ह्या बिचाऱ्या गाईजवळ तिचें कोण होतें? आणि तिला हातींपायीं सुरक्षितपणें कोणी सोडविलें? तिला कोण सुईण होती? संकटांत सांपडलेल्या सगळ्यांच्याजवळ, देवा, तूंच असतोस आणि तूंच सगळ्यांना संकटांतून सोडवितोस! तुझ्यावांचून दुसरा कोण समर्थ आहे! तूं जवळ नसलास आणि मग तुझ्याविरहित शेंकडों माणसें जवळ असलीं, तरी त्यांचा काय उपयोग? देवा, मी विनाकारण काळजींत पडलें होतें; पण तूं मला या वेळीं या गाईच्या उदाहरणानें आश्वासन दिलेंस, त्यामुळें मला धीर आला आहे. देव बोलत नाहीं म्हणून अज्ञानी माणसें समजतात; पण, देवा, तूं किती तरी मार्गांनीं बोलत असतोस! तूं विश्वतोमुखीं बोलतोस; पण तुझें बोलणें कसें ऐकावें, हेंच पुष्कळ माणसांना समजत नाहीं. आणि त्यामुळें देव माणसांशीं बोलत नाहीं, असा अज्ञानी लोकांनीं विनाकारण गैरसमज करून घेतलेला आहे. ह्या प्रसंगीं ह्या गाईच्या रूपानें तूं माझ्याशीं बोललास आणि तूं मला आश्वासन दिलेंस कीं, ' तूं भिऊं नको! मी तुझ्या पाठीशीं उभा आहे! ह्या गाईला जसें सोडविलें, तसेंच मी तुलाही सोडवीन!' देवा, हाच तुझ्या भाषणांतील अर्थ होता ना?—आम्ही माणसें प्रत्यक्ष शब्दांनीं बोलतों; पण देवतादिकांना आमच्यासारखीं स्थूल आणि जड जिव्हादि इंद्रियें नसल्या कारणानें सादृश्यें, स्वप्नें, शकुन, उपश्रुति, इत्यादि गूढ साधनांचाच, देवा, तुम्हांला नाइलाजास्तव आणि मोठ्या नाखुषीनें अवलंब करावा लागत असेल, असें मला वाटतें. नाहीं तर, देवा, तुम्ही आमच्या-सारखे प्रत्यक्ष शब्दांनीं बोलून देखील आम्हां अनाथ लोकांवर अनुग्रह केला असता.—पण मी तरी आपल्या बाळंतपणाच्या सुरक्षिततेसाठीं इतकी कां घाबरलें? बाळंतपणासाठीं म्हणून ह्या सरस्वतीबाईच्याकरितां जितके थाटमाट आणि आयास-सायास होत आहेत, तितके तरी या जगांत दुसऱ्या किती थोड्या बायकांचे होत

असतील! बाकीच्या बहुतेक सगळ्या गरीब अवस्थेंतीलच! तेव्हां या जगांत माझ्या इतक्या सोबतिणी असतांना मी कां बरें घाबरावें! शिवाय त्यांतून आम्ही माणसासारखीं माणसें! आम्ही जर इतकें घाबरावें, तर मग ह्या गाईसारख्या मुक्या जनावरांनीं आणि इतर पशुपक्ष्यांदिकांनीं काय करावें? पण परमेश्वर अनाथांचा सहकारी आहे; तो कोणाचेंही अडूं देणार नाहीं!"

हे लिहिलेले विचार वाचण्याला जरी कांहीं वेळ लागला, तरी आकाशांत वीज एका निमिषार्धांत चमकून जाते त्याप्रमाणें गंगाबाईच्या मनांत हे सगळे विचार अतिशय थोड्या वेळामध्यें स्फुरण पावून गेले. तरी पण तो थोडा वेळ देखील तिला पुष्कळ वेळासारखा वाटला, आणि ती आपल्या मनाशीं म्हणाली, "मी हे आपल्या दुःखाबद्दलचेच काय विचार करीत बसल्यें आहे! त्या बिचाऱ्या गाईला, त्या मुक्या जनावराला—मदत करावयाला जाण्याचें टाकून मी आपल्याच दुःखाचें रडगाणें गात बसल्यें आहें, हें कांहीं मी बरोबर करीत नाहीं. माझ्या दुःखाचें कसेंही होईल; पण दुसऱ्याच्या दुःखाचें मी आधीं निवारण केलें पाहिजे!" असें म्हणून ती घाईघाईनें त्या गाईकडे निघून गेली.



: : ## रंग चौदावी

भय्याखान हा करीमबक्षाच्या छावणींतून पळून गेल्यानंतर त्याला पकडण्यासाठीं करीमबक्षानें आणि गंगाप्रसादानें कसकशा तजविजी चालविल्या होत्या, याच्याबद्दलची हकीगत मागील निरनिराळ्या प्रकरणांतून सांगितलेलीच आहे. भय्याखानाला विंध्यारण्यांत ज्या ठिकाणीं लुटलें, त्या ठिकाणीं आपल्या बायकोचा शोध करण्याकरितां तो फिरून गेला असतां तेथें त्याला पकडण्याकरितां चांदबिबीचे बाहुपाश करीमबक्षानें तयार करून ठेविले होते. परंतु भय्याखान तिकडे न जातां त्या विंध्य पर्वतांत दुसरीकडेच जाऊन गुप्तपणानें राहिला होता. परंतु तो गुप्तपणाही करीमबक्षाच्या हेरांच्या टेहळणीपुढें गुप्त राहूं शकला नाहीं. भय्याखानाच्या आणि जमनामाईच्या एकांतवासाची गुहा त्या हेरांच्या आढळण्यांत येऊन त्यांनीं त्या दोघांना रात्रीच्या प्रहरीं त्या गुहेमध्यें जाळून टाकण्याविषयीं कसा प्रयत्न केला, हें मागें सांगितलेंच आहे. भय्याखानाचा आणि त्याच्याबरोबर असलेल्या कोणा तरी एका बाईचाही आम्हांला अमुक अमुक ठिकाणीं शोध लागला आहे, पण त्याच्यासारख्या शूर आणि धाडसी मनुष्याला जिवंत पकडणें आम्हांला शक्य आणि सुरक्षितपणाचें वाटत नसल्यामुळें आम्हीं त्या दोघांनाही निजल्या जागीं रात्रीच्या वेळीं त्याच्या गुहेंत जाळून टाकण्याचा विचार केला आहे, ही खबर त्या ठगांच्या हेरांनीं करीमबक्षाला दिलेली होती. तसें करण्याबद्दल करीमबक्षानें त्यांना संमति दिल्यानंतर आतां थोड्याच दिवसांत ते दोघे ठग आपली कामगिरी फत्ते करून परत येतील, अशा आशेनें करीमबक्ष कित्येक दिवसपर्यंत त्यांच्या वाटेकडे डोळे लावून बसला होता. मध्यंतरीं दरवडे, खून, चोऱ्या, वाटमाऱ्या, लुटालूट, विषप्रयोग, वगैरे किरकोळ नित्यकर्में तो आपल्या नित्याच्या रिवाजाप्रमाणें करीत होता आणि करवीतही होता. पण त्याच्या मनाला आंतून खरी स्वस्थता नव्हती. जे

दोघे ठग भय्याखानाला जागच्या जागीं जाळून टाकण्याला गेलेले होते, ते अजून परत कां येत नाहींत, याबद्दल त्याच्या मनाला फार काळजी लागून राहिलेली होती. परंतु बरेच दिवस झाले तरी ते परत येईनात, तेव्हां त्यांच्या शोधाकरितां आणि भय्याखान जिवंत जाळला गेला किंवा नाहीं याबद्दलही नक्की तपास लावून आणण्याकरितां त्यानें आपल्या टोळीपैकीं आणखी दोघांना भय्याखानाच्या गुहेची खूण सांगून पाठविलें होतें.

हे दोन हेर ज्याप्रमाणें या कामगिरीवर पाठविले होते, त्याचप्रमाणें दुसरेही कित्येक गुप्त हेर करीमबक्षानें निरनिराळ्या प्रकारच्या कामगिऱ्यांवर पाठविलेले होते. एखाद्या राजाला आपलें राज्य चालविण्याला आपल्या पदरीं जसे पुष्कळ गुप्त हेर ठेवावे लागतात, त्याचप्रमाणें करीमबक्षानेंही ठेविलेले होते. एक वेळ प्रत्यक्ष दरवडे घालणारे लोक त्याच्यापाशीं कमी असतील, पण दरवडा कोठें घालावा याविषयींची टेहळणी करून बातमी काढून आणणारे गुप्त हेर त्याच्या पदरीं पुष्कळ होते. आणि त्यांनीं आणलेल्या गुप्त बातम्यांवरच करीमबक्षाची पुढली सगळी कर्तबगारी अवलंबून असे. द्रव्याचा संचय अतिशय पुष्कळ आणि संरक्षणाची तजवीज अतिशय थोडी, अशी ज्या ठिकाणाबद्दल ते सोदेपणाचा धंदा करणारे गुप्त हेर बातमी आणीत असत, तींच ठिकाणें करीमबक्ष पसंत करीत असे. थोडक्या श्रमानें आणि पुष्कळ लुच्चेगिरीनें जेथें पुष्कळ फायदा होण्याचा संभव असे, त्याच कामांत तो आपलें सगळें लक्ष मुख्यत्वेंकरून घालीत असे. हा त्याचा नेहमींचा रिवाज असल्यामुळें ते सोदे गुप्त हेर त्याच्या धंद्यांतील त्याचे अगदीं पंचप्राण होते, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. त्या सोद्या लोकांचें दुसरें तिसरें कांहीं काम नसे. ते फक्त निरनिराळीं सोंगें घेऊन चोहोंकडे फिरत असत, आणि कोठें एखादें सावज आढळलें, तर त्याला गांठून आणावयाचें आणि त्याची वर्दी करीबमक्षाला द्यावयाची, हेंच त्यांचें बहुतकरून काम असे. ते सावज शोधून काढीत असत, म्हणूनच त्यांना सोदे ( सोधे ) असें म्हणत असत. प्रसंग पडला असतां आपल्या जिवाचें रक्षण करण्याकरितां अगर आपल्या धन्याला मदत करण्याकरितां हातांत शस्त्र घेऊन ते कधीं खून करीत नसत किंवा दरवडे घालीत नसत, असें नाहीं. पण बहुधा ते आपली सर्व अक्कल या सोदेगिरीच्या कामामध्येंच खर्च करीत असत.

या सोद्या गुप्त हेरांनीं एकदां करीमबक्षाला एक अतिशय महत्त्वाची अशी गुप्त बातमी आणून दिली. उत्तरपीठाचे शंकराचार्य तीर्थयात्रेच्या निमित्तानें पर्यटन

करीत उत्तरेकडील हिमालयाच्या प्रदेशांतून निघून दक्षिणच्या बाजूला काशी-वाराणशीकडे चाललेले होते, हें मागें निराळ्या एका प्रसंगानें जम्नामाईच्या हकीकतीमध्यें आलेलें आहे. त्यांच्या इतमामाच्या मानानें त्यांच्यापाशीं माणसें बरींच होतीं. परंतु त्यांत हुजरे, शागीर्द, कारकून, कारभारी, शास्त्री, पंडित, संन्यासी, वगैरे प्रकारच्या लोकांचाच भरणा जास्त होता. वेळप्रसंग पडल्यास चोराचिरट्यांपासून संरक्षण करण्याला उपयोगी पडतील असे शिपाईप्यादे, घोडेस्वार, वगैरे प्रकारचे लोक त्यांच्यापाशीं फारच थोडे होते. आणि त्या संरक्षणाच्या कमकुवतपणाच्या मानानें पाहिलें असतां आचार्यांच्या स्वारीच्या बरोबर द्रव्य-निधि फार मोठा होता, असें म्हटल्यास हरकत नाहीं. शंकराचार्यांच्यासारख्या संन्यासवृत्तीमध्यें राहणाऱ्या लोकांच्या स्वारीमध्यें इतका द्रव्यनिधि कोठून असणार याबद्दल कोणालाही साहजिकपणें शंका येईल. परंतु ते आचार्य जरी स्वतः संन्यासी असून निस्पृह आणि निर्लोभ अंतःकरणाचे होते, तरीही सस्थानदेवतेच्या आणि गादीच्या मानमरातबासाठीं गादीचें म्हणून राजवैभव जवळ बाळगण्याचा जो संप्रदाय होता त्याला अनुसरून त्यांच्या स्वारीमध्यें पुष्कळ सोनें, चांदी, हिरे, मोतीं, रत्नें, वगैरे फार मौल्यवान किमतीचें सामान होतें. देवांकरितां चांदीचीं घंगाळें, सोन्याच्या समया, रत्नजडित सोन्याचे देव्हारे, देवांच्या अंगावरील हिऱ्या-मोत्यांचे हार, आणि शिवाय पाच, पुष्कराज, इंद्रनील, स्फटिक, वगैरे-सारख्या अनेक दुर्मिळ रत्नांच्या बनविलेल्या देवतांच्या सुंदर मूर्ति, इत्यादि अनेक अमूल्य जिनसांच्या किंमती केल्या, तर लाखों रुपयांचा माल स्वामींच्या स्वारीबरोबर होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

इतकी मोठी संपत्ति बरोबर घेऊन कोणी एक शंकराचार्य विंध्य पर्वतांतून प्रवास करीत करीत काशी, गया, वगैरे ठिकाणांकडे संचार करण्याकरितां जात आहेत, अशी कुणकुण करीमबक्षाच्या गुप्त हेरांना मिळाल्यावरून ते त्याबद्दलचा पुरा छडा लावण्याकरितां उद्युक्त झाले. त्यांनीं निरनिराळीं सोगें घेतलीं आणि आचार्यांच्या छावणीमध्यें आपला प्रवेश करून घेतला. त्यांतील कांहींजण ब्राह्मण बनले आणि आपल्या हातून कांहीं पातक घडलें आहे त्याकरितां ब्रह्मदंडाबद्दल बरीचशी दक्षिणा देऊन आपल्याला प्रायश्चित्त घ्यावयाचें आहे, असा त्यांनीं बहाणा केला; आणि अशा निरनिराळ्या युक्त्यांनीं आंत शिरून स्वामींच्या मठांत कोठें कोठें काय काय आहे याविषयीं सर्व बातमी मिळविली आणि त्याबद्दलची वर्दी त्यांनीं

करीमबक्षाला कळविली. तेव्हां सगळी तयारी करून ह्या शंकराचार्याच्या छावणीवर लवकरच एकादे रात्रीं छापा घालावा, असें करीमबक्षानें ठरविलें, व त्यासाठीं तो आपल्या निवडक माणसांची जमवाजमव करूं लागला. भय्याखानाला जिवंत जाळून टाकण्याला त्यानें पहिल्यानें जे दोन ठग पाठविले होते ते व त्यांच्या शोधासाठीं म्हणून त्यानें पाठीमागून आणखी दोघे जण ठग जे पाठविले होते, ते चौघेहीजण चांगल्या इरसाल चोरांपैकीं होते. छापे आणि दरवडे घालण्याच्या कामांत त्यांचा फार उपयोग होत असे. म्हणून शंकराचार्यांच्या छावणीवर छापा घालण्याचा नक्की दिवस ठरविण्याच्या पूर्वी करीमबक्ष भय्याखानाच्या कामगिरीवर पाठविलेल्या ठगांची वाट पहात होता.

इतक्यांत सुदैवानें मागाहून पाठविलेले दोघे ठग परत आले. त्यांना घेऊन गंगाप्रसाद करीमबक्षाकडे आला. तेव्हां करीमबक्षानें त्यांच्यांतील पुढाऱ्याला विचारलें,

" काय झालें ? तुम्हांला पाठविलें होतें, त्या कामगिरीचें काय झालें ? "

" तुम्ही खूण सांगितलेल्या जागीं आम्ही बरोबर गेलों. सगळ्या खुणा बरोबर पटल्या. डोंगरांतील गुहा, गुहेच्या जवळचा तो ओढा, ओढ्याच्या कांठचें तें एक मोठें झाड, वगैरे सर्व खुणा तुम्ही सांगितल्या, तशा तेथें होत्या. पण या सगळ्या खुणांपेक्षां मोठी खूण तेथें होती, ती ही कीं, त्या गुहेच्या तोंडाशीं जळून खाक झालेल्या लांकडांच्या पुष्कळशा कोळशांचे ढीग पडलेले होते. "

" ह्या कोळशांच्या ढिगांवरून त्या भय्याखानाच्या गुहेचा तुम्हांला बरोबर तपास लागला असला पाहिजे, ह्यांत शंका नाहीं. पण खुद्द त्या भय्याखानाचा तुम्हांला कांहीं तपास लागला का ? "

" नाईकसाहेब, आतां त्या भय्याखानाचा कोठून तपास लागावयाचा ! मनुष्य जिवंत असेल, तर त्याचा तपास ! मेलेल्या माणसाचा काय तपास लावावयाचा ? "

" पण तो मेला हें कशावरून ? "

" नाईकसाहेब, इतक्या आगींतून तो जिवंत राहील असें तुम्हांला वाटतें ? तेथें कोळशाचे केवढाले तरी ढीग पडलेले आहेत ! त्यावरून ती आग अतिशय मोठी असली पाहिजे, आणि इतक्या मोठ्या आगींतून तो भय्याखान आणि—

त्याच्या बरोबरची दुसरी कोण ती बाई—जिवंत राहिलीं असतील, हें मला शक्य वाटत नाहीं."

"तुला शक्य वाटत नाहीं, हें मला नको आहे. मला पुरावा पाहिजे आहे."

"मला वाटलेंच होतें कीं, प्रत्यक्ष पुराव्यावांचून आमच्या धनीसाहेबांची कधीं खात्री व्हावयाची नाहीं."

"मग असा कांहीं प्रत्यक्ष पुरावा तुला सांगतां येईल काय?"

"सांगतां येईल इतकेंच नव्हे तर दाखवितांही येईल." असें म्हणून त्या ठगानें आपल्याबरोबर कांहीं हाडें बांधून आणिलीं होती, तीं सोडून दाखवूं लागला.

"हें काय?" करीमबक्षानें विचारिलें.

"ह्यांत त्या भग्याखानाचीं हाडें आहेत!" असें म्हणून त्या ठगानें त्या हाडां-पैकीं एक हाड करीमबक्षाच्या हातांत दिलें, आणि फिरून तो पुढें बोलूं लागला, "या आम्ही गोळा करून आणलेल्या हाडांत दोन कपाळांच्या कवट्या आहेत. गुहेच्या बाहेरच्या तोंडाशीं कोळशांच्या थराखालीं आम्हांला ह्या सांपडल्या. या दोहोंपैकीं जी एक मोठी आहे तीच मला वाटतें त्या भग्याखानाची असली पाहिजे." असें म्हणून तें कवटीचें हाड करीमक्षाच्या हातांत देत देत तो ठग पुढें म्हणाला, "मला वाटतें, भग्याखान आणि त्याची ती बाई अशीं दोघें आगीच्या डोंबामुळें झोंपेंतून जागीं होऊन गुहेच्या दारांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत असतां तेथेंच तीं जळून खाक झालीं असलीं पाहिजेत. आतां या पुराव्यानें तर धनीसाहेब, आपली खात्री होईल ना?"

"होय." असें त्याला उत्तर देऊन तें आपल्या हातांतील हाड आपल्या दृष्टीसमोर धरून त्याच्याकडे पहात पहात करीमबक्ष म्हणाला, "हे हाडा! हे माझ्या शत्रूच्या हाडा! हे माझ्या हाडवैऱ्याच्या हाडा! तूं जर खरोखरच त्या भग्याखानाच्या शरीरांतील हाड असशील, तर तूं मला अतिशय प्रिय आहेस. तूं त्याच्या शरीरांत असतांना मी तुझा अतिशय द्वेष करीत होतों, परंतु आतां जर त्याच्या शरीरांतील सगळीं हाडें तुझ्यासारखींच मोकळीं होऊन चार चोहोंकडे पडलीं असतील, तर तीं सगळीं मला प्रिय आहेत—भग्याखान नुसता मेला, इतकेंच नव्हे, तर तो मेल्याचा पुरावाही या घटकेला माझ्या हातामध्यें आहे!—पण त्याच्या मरणाचा असाच पुरावा मागेंही एकदां माझ्या लोकांनीं माझ्याकडे आणला होता—माझ्या शिपायांनीं डोंगरांतलीं कोठलीं तरी हाडें गोळा करून

आणून हींच वाघानें खाल्लेल्या भय्याखानाचीं हाडें आहेत, असें मला फसविलें होतें. पण वाघानें खाल्लेला भय्याखान फिरून जिवंत झाला! त्याचप्रमाणें आतां तर व्हावयाचें नाहीं ना?— काय रे? आतां फिरून गुहेंत जळून मेलेला भय्याखान जिवंत होणार नाहीं ना?"

"छे, छे, धनीसाहेब, असें कधीं झालें आहे? जळून खाक झालेलीं माणसें फिरून कोठें जिवंत होत असतात?"

"नाहीं, नाहीं! मेलेलीं माणसें जिवंत होत नाहींत, आणि त्याचप्रमाणें भय्याखानही आतां जिवंत होणार नाहीं, ही मलाही पक्की खात्री वाटत आहे. बरें तुमच्यापूर्वी मीं ज्या दोघां जणांना या कामगिरीवर पाठविलें होतें, आणि ज्यांनीं ही कामगिरी इतक्या उत्तम रीतीनें पार पाडली, ते कोठें आहेत?"

"धनीसाहेब, त्यांचा मात्र कोठें पत्ता लागला नाहीं. मला वाटतें, भय्याखानाला मारून परत येत असतांना त्यांना वाटेंत दुसरी कांहीं तरी शिकार सांपडली असावी, आणि तिच्या पाठीमागें लागून ते कोठें तरी भटकले असावेत. ते सावकाश परत येतील. त्यांच्याबद्दल आपल्याला काळजी नको."

"ते परत येतील याबद्दल मला शंका नाहीं. पण एका शंकराचार्यांच्या छावणीवर लवकरच आपल्याला छापा घालण्याला जावयाचें आहे, त्या वेळीं आपलीं सगळीं चांगलीं चांगलीं माणसें आपल्याजवळ असलीं पाहिजेत, असें मला वाटत आहे. आणि म्हणून मी त्यांची वाट पहात होतों. पण आतां ते येतील तेव्हां येवोत. त्यांच्याकरितां न थांबतां या छापा घालण्याच्या तयारीला आतां आपण लवकर लागलें पाहिजे."

असें बोलून करीमबक्ष गंगाप्रसादाला घेऊन शंकराचार्यांच्या छावणीवर छापा केव्हां घालावयाचा, कसा घालावयाचा, वगैरे बेत ठरविण्याकरितां निघून गेला. पण हे दुष्ट लोक इकडे अशा प्रकारचे बेत करीत असतां तिकडे त्या शंकराचार्यांच्या छावणींतील लोकांना याची कांहीं कल्पनाही नव्हती. हे हरामखोर इकडे आपल्या बंदुका आणि तलवारी साफ करीत होते, त्या वेळीं तिकडे ते बिचारे गरीब ब्राह्मण आपल्या पोथ्या-पुस्तकांवरील वाटेच्या प्रवासांत उडालेली धूळ साफ करीत होते. हे छापा घालण्याकरितां विंध्याचलाच्या अरण्यांतून कोणत्या वाटेनें जावें याविषयीं खलबत करीत होते, त्या वेळीं शंकराचार्यांच्या मठांतील शास्त्री आणि पंडित देवयान आणि पितृयान या मार्गांची चर्चा करीत होते. हे ठग लोक कोणी गळे दाबून कोणाला

मारावयाचें याविषयीं वाटाघाट करीत होते, त्या वेळीं उत्तरपीठाच्या मठांतील संन्यासी मंडळी 'अच्छेद्यो ऽयं, अभेद्यो ऽयम्' या भगवद्गीतेच्या वचनांतील आत्म्याचें अजरामरत्व प्रतिपादन करीत होते! जगांतील व्यवहार पुष्कळ वेळां अशा प्रकारच्या अन्योन्यविरोधानें चाललेले असतात! कोणी लोक आपल्या हातून एक रतिभर देखील पातक होऊं नये म्हणून अतिशय जपत असतात, आणि कोणी आपण कदाचित् एरवीं नरकांत दडपले जाणार नाहीं म्हणून आपल्या डोक्यावर असंख्य पातकांचे पर्वत रचून घेत असतात. जैन लोकांसारखे कोणी आपल्या तोंडांत कदाचित् आपल्या सभोंवतालच्या वातावरणांतील अदृश्य व सूक्ष्म जंतु शिरतील या भीतीनें आपल्या तोंडावर फडकीं बांधतात, तर कोणी या जगांतील जितके प्राणी असतील तितक्या सगळ्यांना मारून आपल्या तोंडांत कोंबून घेण्याला उद्युक्त होतात! कोणी लोक अतिशय पापभीरुता बाळगीत असतात, तर कोणी कदाचित् आपल्याला कोठें चुकून आपल्या इच्छेविरुद्ध पुण्य लागेल कीं काय या भीतीनें ग्रस्त होऊन गेलेले असतात! आणि त्यासाठीं ते नेहमीं दुराचरणामध्यें रत झालेले असतात! आणि अशाच प्रकारची स्थिति त्या करीमबक्षाच्या टोळीची झालेली होती. त्या टोळींतील लोक एकत्र जमून अतिशय अघोर कर्में करण्याचे बेत करीत होते, पण आचार्यांच्या मठांतील लोकांना त्याची कल्पनाही नव्हती. आपल्यावर केव्हां तरी असा प्रसंग येईल, हें त्यांच्या स्वप्नांतही आलेलें नव्हतें. मठाच्या मुख्य कारभाऱ्याला एवढें मात्र वाटलें होतें कीं, आपल्यापाशीं सोनें, चांदी, जडजवाहीर वगैरे पुष्कळ आहे आणि त्या मानानें आपल्या संरक्षणाला पुरण्याइतके शिपाई-प्यादे आपल्यापाशीं नाहींत. म्हणून त्यानें शिंदेसरकाराकडे एक थैली पाठविली होती, व कांहीं थोडासा फौजफांटा आपल्या मदतीला पाठविण्याविषयीं त्यांत विनंति करण्यांत आलेली होती.

शंकराचार्यांच्याकडील त्या आज्ञापत्राला मान देऊन शिंदेसरकारांनीं एक मोठी लष्करी तुकडी पाठविण्याचें ठरविलें होतें. शंकराचार्यांच्या कारभाऱ्यांच्या पत्रांत थोडेसेच लोक पाठविण्याविषयीं लिहिलें होतें. तरी पण शिंदेसरकारांनीं आपली एक चांगलीच मोठी फौज तयार करून पाठविण्याचें योजिलें होतें. व तसें करण्याला कारणेंही होतीं. ठग लोकांच्या टोळ्यांचा सुळसुळाट त्या वेळीं मध्य हिंदुस्थानामध्यें अतिशय झालेला होता. सुरक्षितता म्हणून कोठेंच राहिलेली नव्हती आणि प्रवासाचे रस्ते अगदीं बंद पडण्याच्या बेतांत आलेले होते. कोण ठग आणि कोण साव

याच्याबद्दल कांहींही विधिनिषेध उरलेला नव्हता. सामान्य प्रवासी लोकांनाच या ठगांच्या टोळ्यांपासून त्रास होत असे असें नसून उत्तर हिंदुस्थानांतील राजे-रजवाड्यांचे खजिनेही कित्येक वेळां लुटले गेले होते. त्यामुळें या स्थितीचा बंदोबस्त करण्याचें सर्वच संस्थानिकांनी मनावर घेतलें होतें. त्यांत ग्वाल्हेरच्या शिंद्यांना प्रमुखत्व देण्यांत आलेलें होतें. या कामाकरितां सर्व संस्थानिकांनीं आपापल्या मानानें थोडे थोडे लष्करी लोक दिलेले होते. पण त्यांत शिंद्यांचें लष्कर मात्र पुष्कळ मोठें होतें. यांपैकींच कांहीं लोकांनीं शंकराचार्यांच्या तैनातीला जावें, आणि बाकीच्यांनीं अतिशय गुप्तपणानें ठग लोकांच्या टोळ्यांचा पत्ता काढून त्यांचा नायनाट करावा, असे गुप्त हुकुम त्या एकत्र जमलेल्या लष्कराला देण्यांत आलेले होते; आणि अशा रीतीनें तें लष्कर उत्तर हिंदुस्थानांतून दरकूच दरमजल करीत दक्षिणेकडे यावयाला निघालें होतें.



: :

# रांग पंधरावी

ठग लोकांच्या टोळ्यांचा बीमोड करण्याच्या कामावर शिंदेसरकारच्या लष्कराची योजना झालेली होती, हें मागें सांगितलेंच आहे. त्या लष्करावर गोपाळभय्या या नांवाच्या एका सरदाराची नेमणूक करण्यांत आली होती. गोपाळभय्यांना या ठगांच्या मोहिमेवर जाण्याचा हुकुम मिळाल्यानंतर ते आपल्या तयारीला लागले. एकदां मोहिमेवर गेल्यावर परत येण्याला किती दिवस लागतील याचा कांहीं नेम नसल्याकारणानें त्यांनीं आपल्या खाजगी शिलकी कामांची घाईघाईनें विल्हे-वाट लावून टाकण्याला सुरुवात केली. लष्करांतील गोपाळभय्या व झांशीचे भय्या-साहेब जहागीरदार यांचा पुष्कळ ऋणानुबंध होता. त्यामुळेंच भय्यासाहेबांनीं आपल्या कुटुंबाकरितां डोहाळजेवणाच्या वेळीं उपयोगांत आणण्यासाठीं म्हणून एक हिरवा जरीचा शालू ग्वाल्हेरीहून तयार करून पाठविण्याविषयीं बरेच दिवसांपूर्वी गोपाळ-भय्यांना सांगितलें होतें, याचा उल्लेख मागील एका प्रकरणामध्यें आलेलाच आहे. तो शालू भय्यासाहेब प्रवासाला निघाले त्या वेळींच तयार व्हावयाला पाहिजे होता. परंतु कारागिरांच्या दिरंगाईमुळें तो तेव्हां तयार होऊं शकला नाहीं. परंतु नंतर कांहीं दिवसांनीं तो शालू तयार होऊन गोपाळभय्याकडे आला. तेव्हां तो उशीरानें कां होईना, पण जिकडच्या तिकडे पोहोंचता व्हावा, म्हणून गोपाळ-भय्यांनीं आपल्या मनुष्याबरोबर ठगांच्या मोहिमेवर जाण्याच्यापूर्वी तो शालू झांशीस भय्यासाहेबांच्या घरीं त्यांच्या मातोश्रीकडे पाठवून दिला. तो शालू आलेला पाहून भय्यासाहेबांच्या आईला परमावधीचें दुःख झालें. ती साध्वी आपल्या मुलाच्या आणि सुनेच्या विरहानें आधींच खिन्न झालेली होती, अशा स्थितींत तो अतिशय सुंदर रीतीनें बनविलेला कलाबतूचा शालू आलेला पाहून तिला अनावर रडूं कोसळलें; आणि 'जो शालू नेसावयाला आपली सून नाहीं

आणि जो शालू ती नेसलेली पाहावयाला आपला मुलगा नाहीं, तो शालू आतां येऊन काय करावयाचा आहे ! ' असे उद्गार रडतां रडतां तिच्या तोंडून निघाले. हा प्रकार चालला असतांना भय्यासाहेबांच्या घरचे पिढीजाद स्वामिनिष्ठ कारभारी जवळच होते. त्यांनीं तो सर्व प्रकार पाहिला व ऐकिला, तेव्हां त्यांच्याही पोटांत भडभडून आलें. परंतु त्यांनीं विवेक करून तो शालू उचलून बाजूला ठेवून दिला, आईसाहेबांची समजूत घातली, आणि लष्करांतून आलेल्या जासुदाला जेवणखाण घालून त्याच्याबरोबर उलट एक पत्र देऊन त्यांनीं त्याची रवानगी करून दिली. त्या पत्रांत कारभाऱ्यांनीं भय्यासाहेबांच्या घरच्या स्थितीचें जें वर्णन केलें होतें, तें फार हृदयद्रावक होतें. तें पत्र असें:—

श्री

श्रीमंत सरदार गोपाळभय्यासाहेब, मु. लष्कर-ग्वाल्हेर,

स्वामींचे सेवेसी

पोष्य कारभारी नि॥ श्रीमंत भय्यासाहेब जहागीरदार, मु. झांशी

यांजकडून—

कृतानेक साष्टांग नमस्कार, विनंति विशेष. आजतागायत सुखरूप असों विशेष. आपण ठग लोकांच्या मोहिमेवर लवकरच जाणार असल्यामुळें आपलेकडे तयार होऊन आलेला हिरवा कलाबतूचा शालू आपण आपल्या जासुदाबरोबर पाठविला, तो पोहोंचला. आमचे इकडील वर्तमान आपणांला विदितच आहे. आमचे यजमान श्रीमंत भय्यासाहेब आपल्या कुटुंबासह आणि नोकरमाणसांसह येथून गेल्याला कित्येक महिने होऊन गेले; परंतु अद्यापि त्यांचें कांहीं एक पत्र नाहीं, किंवा त्यांचा कांहीं पत्ता नाहीं. त्यांना पोहोंचवून जीं चाकरमाणसें परत यावयाचीं होतीं, त्यांचाही ठिकाण नाहीं. त्यामुळें आमच्या येथील स्थिति काय झाली आहे, हें पत्रीं लिहितां येत नाहीं. विंध्य पर्वताच्या घाटांतून हल्लीं चोरट्यांचा फार सुळसुळाट झालेला आहे, त्यामुळें या मंडळींना वाटेंत ठग लोकांपासून कांहीं तरी दगाफटका झालेला असावा, असा सगळ्यांस संशय येत आहे. आम्ही इकडूनही शोधाकरितां माणसें पाठविलीं आहेत. परंतु अजून कांहीं एक तपास येत नाहीं; त्यामुळें आईसाहेब नेहमीं दिलगीर असतात. त्यांनीं अन्न वर्ज्य केलें आहे आणि त्या सारा दिवसभर रडत बसलेल्या असतात ! आमचा सगळा वाडा उदास

आणि भयाण दिसतो! आईसाहेबांच्या उद्विग्नतेमुळें आमच्या येथील सर्व गृहकृत्यें बंद पडलीं आहेत! रामनवमीच्या उत्सवांत आमच्या वाड्यांत दहा दिवस केवढा मोठा उत्सव व्हावयाचा, हें आपल्याला माहीतच आहे. परंतु यंदां साऱ्या रामनवमींत सगळ्या वाड्यांत जिकडे तिकडे अगदीं शुकशुकाट होता. अक्षय्यतृतीयेचा उदककुंभ देखील यंदा वाड्यांत दिला गेला नाहीं. उघडच आहे कीं, भय्यासाहेब नाहींत, तर उदककुंभ तरी कोण देणार? त्यांच्या आणि वहिनीसाहेबांच्या दिवाणखान्यांना जीं कुलपें पडलीं आहेत, तीं अद्यापि तशींच आहेत! तेथील केरसुद्धां कोणी काढला नाहीं. त्या उभयतांची स्वतःची म्हणून जी एक लहानशी बाग आहे, त्या बागेंतील झाडांना आज कित्येक दिवसांत पाणी नाहीं. त्यामुळें तीं सगळीं झाडें अगदीं वाळून गेलीं आहेत; आणि जीं झाडें थोड्या दिवसांपूर्वी हिरवीं गार होतीं, त्यांच्यावर आतां एकसुद्धां पान उरलेलें नाहीं. शेजारपाजारच्या मुली वाड्यांत खेळण्याकरितां येतात, तेव्हां झोपाळ्यावर बसून त्यासुद्धां आमच्या वाड्यांतील दुःस्थितीचें वर्णन करणाऱ्या ओंव्या बालभावसुलभ अशा कळवळ्यानें आणि कोमलतेनें पुढीलप्रमाणें म्हणतातः—

**कचेरीच्या पुढें, काय गुलाबा तुझी हवा ॥**
**वास घेणारे गेले गांवा, भय्याराया ॥ १ ॥**

**आमच्या वहिनीबाई, गंगाबाई कोठें गेल्या ॥**
**उन्हांनीं कोमेजल्या, जाईजुई ॥ २ ॥**

अशा ओंव्या त्यांनीं म्हटलेल्या ऐकल्या, म्हणजे आमच्या आईसाहेब मोठमोठ्यानें रडूं लागतात. त्या वेळीं त्यांची समजूत करणें फार दुर्घट होतें. भय्यासाहेबांचीं आवडतीं हत्यारें, ते असत त्या वेळीं दररोज पुसून साफ ठेविलेलीं असत. पण आतां त्यांच्यावर किती तरी गंज चढला आहे! आणि तीं निर्जीवपणानें खुंटीला टांगून पडलेलीं आहेत. त्यांचा घोडा देखील अगदीं खराब होऊन गेला आहे. त्यांची बाग, त्यांचीं हत्यारें, त्यांचा घोडा इत्यादि त्यांच्या जिनसांबद्दलची मी दुरुस्ती करण्याचा प्रयत्न करितों, पण आईसाहेब मला तें कांहीं एक करूं देत नाहींत. त्या म्हणतात, 'माझा मुलगा नाहीं, माझी सून नाहीं, मग या बाकीच्या गोष्टी असून नसून सारख्याच! जाऊं द्या! दिवाणजी, झाडें वाळून जाऊं द्या! हत्यारें गंजून जाऊं द्या आणि घोडा खराब होऊन जाऊं द्या!' अशा स्थितींत

काय करावें हें मला समजत नाहीं. ‘ आपण अशा उद्विग्न होऊं नका, भय्यासाहेब आज नाहीं उद्यां खुशाल घरीं परत येतील, ’ अशी मी त्यांची समजूत घाल-ण्याचा पुष्कळ प्रयत्न करितों; परंतु त्यावर त्यांचा विश्वास बसत नाहीं; तर उलट त्यांना होणाऱ्या अपशकुनांवर आणि त्यांना पडणाऱ्या दुष्ट स्वप्नांवरच त्यांचा अधिक विश्वास बसतो. त्या म्हणतात, मी आपल्या मुलाबद्दल आपल्या मनांत कांहीं विचार आणूं लागलें कीं, माझा उजवा डोळा लवूं लागतो ! त्या म्हणतात, मी आपल्या मुलाबद्दल कांहीं हेतु मनांत धरून कोठें बाहेर जावयाला निघालें, तर मला हटकून मांजर आडवें जातें ! अशा अनेक बारीकसारीक कारणांनीं त्यांचा धीर अगदीं सुटून गेलेला आहे ! शिवाय त्यांना भयंकर स्वप्नेंही पडत असतात. रात्रीचे खड्डे खणले जात आहेत आणि त्यांत मारलेलीं माणसें पुरलीं जात आहेत, असें आपल्याला झोंपेंत दिसतें असें त्या म्हणतात ! त्या रात्रीच्या झोंपेंतून दचकून जाग्या होतात, आणि आपल्या नोकरमाणसांना घाबऱ्या घाबऱ्या हांका मारूं लागतात ! तेव्हां काय झालें म्हणून विचारिलें असतां त्या सांगतात— “ मीं आत्तां आपल्या भय्याला पाहिलें. तो आणि सूनबाई आणि त्यांच्या बरो-बरचीं चाकरमाणसें रानांत रात्रीचीं निजलीं होतीं, इतक्यांत पुष्कळसे चोर तरवारी पाजळून त्यांना लुटावयाला आले. आणि त्यांची आणि आपल्या भय्याची चकमक सुरू झाली, असें मी पाहिलें ! आणि कांहीं वेळानें ‘ आई ! आई ! ’ अशा त्यानें मला हांका मारिलेल्याही मीं ऐकल्या ! याचा अर्थ काय असेल ! हें स्वप्न खरें असेल, तर माझ्या भय्याची पुढें काय वाट झाली असेल ! ”—आपल्या सूनबाई गरोदर होत्या, त्यांना पुत्र होईल, आणि आपल्याला नातवंड होईल, असें त्यांना फार वाटत होतें; पण आतां ती आशा त्यांच्या मनामध्यें क्वचितच उरलेली आहे. ‘ आतां आपली सून कोठें असेल ? ती बिचारी जिवंत असली, तर तिला आतां किती महिने झाले असतील ? ’ असे आपल्या सुनेबद्दलही विचार त्यांच्या मनांत वरचेवर येतात ! आणि त्यांच्या वार्धक्यजन्य विस्मरणशीलत्वाच्या कारणामुळें फिरून फिरून बोटें घालून आणि मोजून पाहून आपल्या सुनेला आतां किती महिने झाले असतील, हें त्या दररोज नव्यानें ठरवीत असतात ! आणि आतां गर्भारपणाचे दिवस जवळ जवळ भरत आलेले असले पाहिजेत, असें त्यांच्या मनाला वाटून अशा स्थितींत सुनेचें कसें होईल, या चिंतेनें त्यांच्या डोळ्यांतून

अश्रुधारा वाहूं लागतात ! आणि मग कांहीं वेळानें डोळे पुसून आणि दीर्घश्वास टाकून त्या एकीकडे दुसरें कांहीं काम करितां करितां तोंडानें हळू हळू पुढील प्रकारच्या सीतेच्या वनवासाच्या वेळेच्या ओंव्या म्हणूं लागतातः—

**सीतेला वनवास, झाडांमाडांशीं सांगे गोष्टी ॥**
**अंकूश बाळ पोटीं, वाढताहे ॥ १ ॥**
**सीतेला वनवास, दगडाची केली उशी ॥**
**अंकूश बाळ कुशीं, जलमलें ॥ २ ॥**
**सीतेला वनवास, दगडाची केली बाज ॥**
**अंकूश बाळा नीज, वनामध्यें ॥ ३ ॥**

असे दुःखदायक प्रकार एक का दोन म्हणून मी आपल्याला लिहूं ! अथवा इतर गोष्टी कशाला पाहिजेत ? आपण पाठविलेल्या शालूची गोष्ट मी आपल्याला सांगितली म्हणजे पुरे आहे. आपण पाठविलेला शालू फार उत्तम आहे; पण त्याच्यावर जरीचे जितके बुंदके आहेत, त्याच्या शंभरपट अश्रुबिंदु आईसाहेबांच्या डोळ्यांतून त्या रडत असतांना त्याच्यावर पडलेले आहेत ! आणि तो शालू जरी मूळचा बिनमोल होता, तरी आईसाहेबांच्या रडण्यानें तो आतां अगदीं कवडीमोल होऊन गेला आहे. मातृप्रेमाला सीमा नसते ! तेव्हां अशा स्थितींत काय करावयाचें ? मी काय करावें, हें मला तर कांहीं सुचत नाहीं. पण आपण काय करावें ह्याविषयीं मला एक कल्पना सुचल्यावरून मी ती आपल्याला लिहीत आहें. हल्लीं आतां पावसाचे दिवस अगदीं जवळ येत चालले आहेत. अशा वेळीं आपण विंध्य पर्वतांतील ह्या मोहिमेवर ज्या अर्थीं निघत आहां त्या अर्थीं शक्य झाल्यास बरसात सुरू होण्याच्या आधीं आपण ही मोहीम आटोपून याल, असा संभव दिसत आहे. म्हणून आपल्याशीं विनंति अशी आहे कीं, आपण या मोहिमेमध्यें ठग लोकांचा पुरा शोध लावालच. परंतु त्याच्याच बरोबर आमचे यजमान भय्यासाहेब यांचाही शोध लावण्याकडे आपलें लक्ष असावें. भय्यासाहेबांच्या संबंधानें आपणांला पूर्ण कळकळ आहेच. त्यांत मी आपणाला विशेष लिहावें असें नाहीं; परंतु आईसाहेबांनींही आपल्याला ही गोष्ट लिहावयाला सांगितल्यावरून मी लिहीत आहे. आईसाहेब स्वतःच आपल्या चिरंजीवांचा शोध करण्याकरितां आपल्या स्वारीबरोबरची सोबत बरी आहे असें पाहून निघावयाची तयारी करावयाला लागल्या

होत्या; परंतु मी मोठ्या प्रयासानें त्यांना थांबवून ठेविलें आहे. तरी ही सर्व स्थिति लक्षांत आणून भय्यासाहेबांसंबंधींचा सर्व खुलासा काढून तो इकडे जरूर कळवावा. याहून जास्त माझ्यानें कांहीं लिहवत नाहीं. कळावें."

आपला,

कारभारी नि॥ श्री. भय्यासाहेब जहागिरदार, मु. झांशी

याप्रमाणें पत्र लिहून देऊन कारभाऱ्यानें लष्करचा जासूद त्याच दिवशीं ताबडतोब परत रवाना केला.

• • •

: : रंग सोळावा

गोपाळभय्यांच्या हुकमतीखालीं जें लष्कर ठग लोकांचा पाठपुरावा करण्याकरितां तयार झालें होतें, त्यांत लछमनसिंग या नांवाचा एक शिपाई होता. त्याची नेमणूक इतर कांहीं लोकांबरोबर पुढें जाऊन बातमी काढण्याच्या कामावर झालेली होती. त्या लोकांना असा हुकूम होता कीं, मुख्य लष्कर हलण्याच्या आधीं महिना दीड महिना त्यांनीं पुढें निघावें; दोन दोन तीन तीन माणसांच्या लहान लहान टोळया कराव्या; निरनिराळ्या टोळ्यांनीं निरनिराळे वेष पालटावे, आणि निरनिराळ्या बहाण्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं फिरावें; विंध्य पर्वतांतील निरनिराळ्या वाटा कोणीकडून कशा जातात हें पहावें, व चोरांना राहण्यासारख्या चोरजागा, गुहा, जंगलें, वगैरे कोठकोठें आहेत, याचें टिपण करावें; विंध्य पर्वतांतील खेड्यापाड्यांतील पाटलांना भेटून तेथें वहिमी लोक कोण कोण आहेत, ते आपल्या गांवांतून बाहेर केव्हां जातात आणि परत केव्हां येतात, याबद्दल माहिती मिळवावी; विंध्य पर्वताच्या जंगलांतून झरे, ओढे, विहिरी, तळीं वगैरे पाण्याच्या सोई कोठकोठें आहेत, याबद्दलची नोंद करावी; आडरानांतून गैरवाटेच्या रस्त्यानें घोड्याचीं पावलें लागलेलीं असलीं तर तीं कोठें गेलेलीं आहेत, याचा अखेरपर्यंत माग काढावा; जेथें कोणीही प्रवासी जाण्याचा संभव नाहीं, अशा आड जंगलांत कोठें कोठें सैंपाक केले गेलेले आहेत, हें धुरानें जळून काळ्या झालेल्या दगडांच्या खुणांवरून शोधून काढावें; ज्यांना ठग लोकांनीं लुटलें आहे, असे कोणी लोक जिवंत भेटल्यास त्यांच्याकडून सर्व माहिती ऐकून घ्यावी, व त्यांच्यापैकीं जे लोक मारले गेलेले असतील, त्यांना जेथें पुरलें असेल, त्या जागा उकरून पहाव्या; ठगांनीं लुटीचें द्रव्य कोठें पुरून ठेविलें असल्याचा तपास लागल्यास तेंहि उकरून काढावें; मोठमोठ्या गांवांतून आणि शहरांतून हे ठग लोक कोणकोणत्या सावकारांच्या

दुकानांतून चोरीचा माल विकतात याचा तपास ठेवावा. देवळें, धर्मशाळा, सराया ह्यांतून संशयास्पद प्रकारचे असे दिसणारे कोणकोण प्रवासी रात्रीचे उशीरां निजावयाला येतात, आणि पहांटेचे लवकर उठून जातात, त्यांच्यावर टेहळणी ठेवावी; गांवांतून किंवा जंगलांतून जेथें धोत्र्याचीं झाडें उगवतात, तेथें त्यांचीं फळें तोडून नेण्याकरितां कोण येतात, त्यांच्यावर पहारे ठेवावे; खेड्यांतील आणि शहरांतील वेश्यांना पैसे देऊं करून त्यांच्याकडून त्यांच्याकडे येणाऱ्या, आणि चोरीचे असल्यामुळें वाटतील तसे पैसे उधळून टाकणाऱ्या लोकांचीं नांवें मिळवून घ्यावीं; चोरांमध्यें आपले लोक चोर म्हणून मिसळून द्यावे; आणि याशिवायही ज्या ज्या मार्गानें आणि युक्तीनें ठगांचा शोध लागेल आणि त्यांचा नायनाट करतां येईल, असे सर्व उपाय उपयोगामध्यें आणावेत. हे हुकुम केवळ मार्गदर्शक म्हणून होते; पण यांच्याशिवाय अन्य साधनानें आणि आपल्या कर्तबगारीनें जो कोणी या मोहिमेंतील हेतु फत्ते करण्याला कारणीभूत होईल, त्याला योग्य बक्षीस दिलें जाईल, अशींही आश्वासनें होतीं. त्यामुळें जे हुशार आणि हरहुन्नरी लोक होते, त्यांची भरती या कामगिरीमध्यें करण्यांत आली होती. हे लोक बिनीच्या लोकांच्याही पुढें जात असत व लष्करानें कोणत्या रस्त्यानें यावें, कोठें उतरावें, रसद व अन्नसामग्री कोठून मिळवावी, वगैरेबद्दलचीही माहिती हे लोक बिनींतील लोकांना आधीं पुरवीत असत आणि मग बिनीच्या सरदारांच्या सहाय्यानें मागच्या मुख्य सैन्याच्या हालचाली होत असत. यावरून लछमनसिंगाच्या हाताखालील लोकांच्याकडे किती नाजुक आणि किती महत्त्वाचें काम होतें, याची कोणालाही कल्पना करतां येण्यासारखी आहे.

अशा प्रकारच्या कामगिरीवर बिशून लछमनसिंगाला कांहीं दिवस लोटले होते. ह्या कामगिरीवर आपली नेमणूक झाली, याबद्दल लछमनसिंगाला मोठा आनंद झाला होता. असल्या महत्त्वाच्या कामाला लछमनसिंगासारखा मनुष्य आपल्याला मिळाल्याबद्दल श्रीमंत सरदार गोपाळभय्या यांनाही मोठें समाधान वाटलें. असा हा लायक मनुष्य असल्यामुळें झांशीचे भय्यासाहेब जहागीरदार यांच्या पूर्व चौकशीचें कामही गोपाळभय्यांनीं याच्याकडेच सोंपविलें होतें. भय्या-साहेबांच्या मातोश्रींनीं आणि कारभाऱ्यांनीं आपल्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें गोपाळभय्या तर स्वतः तें काम पूर्ण लक्ष घालून करणारच होते. परंतु त्यांच्या आधीं या प्रकरणाच्या संबंधानें कोठें कोठें काय काय गुप्त बातम्या लागतात त्या

काढल्या जाव्या, आणि त्याबद्दलचे सर्व धागेदोरे एकत्र जुळवून ठेवण्याची पूर्वतयारी केलेली असावी, या हेतूनें गोपाळभय्यांनीं लछमनसिंगला ही कामगिरी सांगितली होती; पण लछमनसिंगाला या कामगिरीचा हुकूम मिळाला नसता, तरीही तो हें काम आपल्या इतर कामांबरोबर करणारच होता. कारण, झांशीचे जहागिरदार भय्यासाहेब यांच्याबरोबर कोंकणांत जाण्याकरितां जीं थोडीशीं नोकरमाणसें निघालीं होतीं, त्यांत जवानसिंग या नांवाचा एक शिपाई होता, हें वाचकांना स्मरतच असेल. विंध्य पर्वताच्या डोंगरांत एके रात्रीं ठगांनीं भय्यासाहेबांच्या मंडळींना लुटलें, त्या वेळीं ठग लोकांशीं लढतां लढतां मरणाच्या पूर्वी मोठमोठ्यानें हांका आणि आरोळ्या मारून ज्यानें भय्यासाहेबांना जागे केलें तोच हा जवानसिंग होय. याचें मूळचें नांव रामसिंग असें होतें. तो लहानपणापासूनच फार उमदा, जोरदार आणि जवान दिसत असे, म्हणून त्याच्या गांवांतील लोक त्याला जवानसिंग असें म्हणूं लागले व तेंच त्याचें नांव पुढें बाहेरच्या कागदोपत्रीं व्यवहारांत लागत असे. पण घरीं त्याची आई, त्याचा भाऊ, हीं त्याला रामसिंग अशीच हाक मारीत असत. त्याच्या हाकांनीं आणि आरोळ्यांनीं भय्यासाहेब जागे झाले, जिकडून तो आवाज येत होता तिकडे ते धांवत गेले. ज्या ठग लोकांनीं आपल्या नोकरांना ठार मारिलें त्यांपैकीं जे तावडींत सांपडले त्यांना भय्यासाहेबांनीं आपल्या तरवारीला बळी दिले, आणि बाकीच्यांना पळवून लाविलें. नंतर गंगाबाईच्या स्थितीविषयीं त्यांना एकदम स्मरण होऊन ते तिकडे परत गेले असतां त्या अवधींत ठगांनीं आधींच जे पांच सहा खड्डे खणून ठेविले होते त्यांत आपल्या ठग लोकांपैकीं त्या झटापटींत मेलेले लोक आणि भय्यासाहेबांच्या बरोबरचे मारलेले नोकर लोक यांचा पाठीमागें कांहीं मागमूस उरूं नये म्हणून घाईघाईनें लपत छपत परत येऊन त्यांना पुरून टाकून त्या रात्रीं ते ठग लोक पळून गेले, तेव्हांपासून रामसिंगाचाही त्याच्या घरच्या माणसांना कांहीं पत्ता लागला नव्हता. भय्यासाहेबांची आई जशी आपल्या वाड्यांत रडत बसली होती, त्याच-प्रमाणें रामसिंगाची आईही आपल्या झोंपडीमध्यें रडत बसलेली होती. तिचा आतां पाठीमागें एकुलता एक जिवंत राहिलेला धाकटा मुलगा लछमनसिंग हा लढाईवर जाऊं लागला, तेव्हां ती त्याला आपल्यापासून दूर पाठविण्याला बिल-कुल खुशी नव्हती. 'म्हातारपणीं मला आतां एकच मुलगा राहिला आहे तो तरी देवा, तूं माझ्यापासून नेऊं नको! तेवढा तरी माझा माझ्याजवळ असूं दे.' असें

म्हणून ती शोक करूं लागली होती. परंतु 'तूं रडूं नको, तूं माझ्याबद्दल काळजी करूं नको; माझ्या स्वतःसाठीं नाहीं तरी पण तुझ्यासाठीं मी आपल्या जिवाला जपेन, आणि आपल्या रामसिंगाचा तपास लावून त्याला मी परत घरीं घेऊन येईन !' अशी लछमनसिंगानें तिची समजूत घातली तेव्हां कोठें त्याला जाण्याची त्याच्या आईनें परवानगी दिली होती. म्हणून मातृभक्तीसाठीं आणि बंधुप्रीतीसाठीं लछमनसिंगाला या कामांत फार काळजीपूर्वक रीतीनें चौकशी करावयाचीच होती. त्यांतच धनीसाहेबांचाही जादा हुकूम त्याच कामगिरीबद्दलचा मिळाल्यामुळें स्वामिभक्ति दाखविण्याचाही सुयोग आल्याकारणानें या कामीं लछमनसिंगाच्या मनामध्यें विशेषच हुरूप उत्पन्न झालेला होता.

लछमनसिंगाच्या हाताखालीं शिंदेसरकारच्या व इतर राजांच्या लष्करांतलि गुप्त हेरांची टोळी ज्याप्रमाणें ठग लोकांच्या हालचालींच्या गुप्त बातम्या काढण्याकरितां गुप्त रीतीनें निघाली होती, त्याचप्रमाणें करीमबक्षाच्या टोळींतीलही गुप्त हेर आपल्याला अनुकूल असणाऱ्या किंवा प्रतिकूल असणाऱ्या अशा सर्व प्रकारच्या गुप्त बातम्या काढण्याकरितां नेहमीं चोहोंकडे फिरत असत, हें पूर्वी अनेकदां सांगण्यांत आलेलेंच आहे. दोन्हीही पक्षांतील लोक नेहमीं एकमेकांकडील गुप्त बातम्या काढीत असल्यामुळें एकमेकांच्या बहुतेक गुप्त गोष्टी एकमेकांच्या उघडकीस आलेल्या असतात. पुढें खेळले जावयाचे बहुतेक सर्व डाव एकमेकांना आधींच जवळ जवळ कळलेले असतात; व त्यांजवर काय काय तजविजी योजावयाच्या ह्याबद्दलही आधीं विचार योजून ठेविलेले असतात. बुद्धिबळाच्या पटावर तांबड्या रंगाची मोहरीं कोणतीं आहेत व हिरव्या रंगाचीं मोहरीं कोणतीं आहेत, आणि त्यांतील शिपाईप्यादे, हत्ती, घोडे, किंवा वजीर आणि राजे, हे कसकशा हालचाली करून येणार, आणि कोणीकडून येऊन कोणावर हल्ला चढविणार, हे सगळे पुढें होणारे डाव अप्रबुद्ध प्रेक्षकाला जरी नवीन वाटत असले, तरी ते बुद्धीच्या पटावर आणि बुद्धीच्या प्रांतामध्यें कांहीं नवीन किंवा गुप्त असतात, असें नाहीं. मोहरीं मांडलेला बुद्धिबळांचा पट हा बुद्धीच्या बळाला नेहमीं उघडाच असतो. त्यांत गुप्त, झांकलेलें किंवा पुढें होणारें, असें क्वचितच कांहीं असतें. जें सामान्यदृष्टीनें पुढें म्हणून व्हावयाचें असतें, तें बुद्धीच्या दूरदृष्टीला घडलेलें दिसत असतें किंवा कदाचित् घडून गेलेलेंही दिसत असतें. प्रत्येक पक्ष आपलें कृत्य कोणालाही समजूं नये किंवा दिसूं नये म्हणून तें तो फार फार गुप्त रीतीनें

करीत असतो. परंतु त्याच्या एकेका गुप्त कृत्यावर उलट पक्षाचे इतके गुप्त हेर, इतके गुप्त डोळे आणि इतक्या गुप्त टेहळण्या असतात कीं, या सगळ्यांच्या मान्यामधून आपलें कृत्य गुप्त राहिलें असेल, असें जो राजा किंवा प्रधान किंवा सामान्य मनुष्य समजत असेल, त्याच्यासारखा मूर्ख या जगामध्यें दुसरा कोणीही नसेल! दोन पक्षांमधील एकमेकांच्या गुप्त गोष्टी एकमेकांना नेहमीं थोड्याबहुत प्रमाणानें समजतच असतात. अशा स्थितींत आपलीं गुप्त कारस्थानें फार मोठ्या गुप्त रीतीनें चालतात, अशी कोणीही प्रौढी मिरविण्याचें कारण नाहीं. जें गुप्त गुप्त म्हणून अतिशय खोल खोल कळ्याकुलपांतून कोंडून आणि झांकून ठेविलेलें असतें, तेंही त्या सगळ्या आवरणांमधून आणि आच्छादनांमधून बुद्धिवान् माणसाच्या बुद्धिमत्तेला स्पष्टपणें दिसत असतें. अशा स्थितींत खरा गुप्तपणा क्वचितच असतो. बाकीचे हे सारे गुप्तपणाचे भ्रम होत. या सामान्य तत्त्वाला अनुसरून आपल्या शत्रूंच्या हालचालींच्या कांहीं कांहीं बातम्या करीमबक्षाच्याही कानावर येऊं लागल्या होत्या. उत्तरमठाच्या शंकराचार्यांच्या संचाराची बातमी करीमबक्षाला कळल्याचें मागें सांगितलेंच आहे. त्यानंतर कांहीं थोड्या दिवसांनीं शिंद्यांच्या लष्करांत ठग लोकांचा नायनाट करण्याकरितां कांहीं फौजा गोळा होत आहेत, अशी कुणकुण करीमबक्षाच्या कानावर आली. ही कांहीं तरी बाजारगप्प नसून अगदीं खरी बातमी आहे, अशी जेव्हां त्याची खात्री झाली, तेव्हां तो थोडा घाबरला आणि चिंतातुर दिसूं लागला. पण त्याच्या चिंतातुरपणाचें ही शिंद्यांच्या लष्कराची बातमी हें मुख्य कारण नव्हतें. असल्या संकटांना जुमानणारा तो माणूस नव्हता. याच्यापेक्षां अधिक मोठाल्या फौजा जमा झाल्या, तरी त्यांच्या नाकावर तुरी देऊन त्यांच्यामधून निसटून जाण्याची त्याच्या अंगांत ताकद आणि त्याच्या डोक्यांत बुद्धि पाहिजे तितकी होती. परंतु यावेळीं त्याची एक बायको आपल्या आजारी असलेल्या लहान मुलाला घेऊन छावणीमध्यें करीमबक्षाच्या जवळ येऊन राहिली होती. त्या मुलावर करीमबक्षाचें आणि त्याच्या त्या मानलेल्या बायकोचें फार प्रेम होतें व त्याला बरें वाटून तो त्या आजारीपणांतून उठावा म्हणून तीं दोघेंही फार खटपट करीत होतीं. पण कांहीं केल्यानें त्या मुलाच्या प्रकृतीला बरें वाटत नव्हतें. त्यामुळें करीमबक्ष थोड्या फिकिरींत पडल्यासारखा झाला होता. त्यांतच ही शिंद्यांच्या लष्कराची बातमी कळल्यामुळें तो थोडा

अधिक गोंधळून गेल्यासारखा झाला; पण याच्यापेक्षां जास्त कांहीं त्याचा धीर खचला होता, असें मुळींच नाहीं.

अशा प्रकारचे करीमबक्षासारखे निधड्या छातीचे किती तरी चोर आणि ठग, किती तरी पठाण आणि पेंढारी, त्या विंध्य पर्वताच्या रांगांमधून धुडावा करीत राहिलेले होते. अशा सगळ्या लोकांचा पूर्ण उच्छेद करून टाकण्याची अतिशय जबाबदारीची कामगिरी गोपाळभय्यांच्या अंगावर येऊन पडलेली असल्याकारणानें लछमनसिंगासारखे विश्वासु आणि अंतःकरणाला पीळ पडणारे लोक निवडून काढून त्यांना त्यांनीं पुढें पाठविलें होतें. त्यांपैकीं बाकीच्या लोकांच्या निरनिराळ्या टोळ्या निरनिराळ्या मार्गांनीं रवाना करून लछमनसिंग आपल्या स्वतःच्या हाताखालीं कांहीं थोडे निवडक लोक घेऊन विंध्याचलाच्या रांगा धुंडीत चालला होता. आणि वाटेनें जातांना तो आपल्या हुकुमांतील कलमांप्रमाणें सर्व प्रकारची शक्य तेवढी माहिती मिळवीत होता. परंतु आपल्या सेनापतीच्या हुकुमापेक्षां आपल्या मनाच्या आणि आपल्या मातोश्रींच्या हुकुमाचा अम्मल त्याच्यावर जास्त बसलेला होता. आणि म्हणून स्वाभाविकपणेंच आपला वडील भाऊ रामसिंग आणि त्याचे यजमान भय्यासाहेब यांच्याबद्दलची माहिती मिळविण्याकडे त्याचा ओढा जास्त होता. परंतु त्यानें जरी अवांतर माहिती थोडीबहुत मिळविली होती, तरी रामसिंग, भय्यासाहेब, वगैरे मंडळींना कोणी लुटलें कीं काय, आणि लुटलें असल्यास कोणीं लुटलें, कोठें लुटलें, वगैरे संबंधानें त्याला कांहींच माहिती मिळाली नाहीं. परंतु अशा निराशाजनक स्थितीमध्येंहीं लछमनसिंगनें तपासाचें काम जोरानें चालू ठेविलें असतां कर्मधर्मसंयोगानें लछमनसिंगाच्या टोळीचा मुक्काम, ज्या खेड्याजवळील जंगलामध्यें भय्यासाहेबांच्या मंडळीवर करीमबक्षानें छापा घातला होता, त्या खेड्यामध्येंच एके दिवशीं संध्याकाळीं पडला ! हे नवीन प्रवासी गांवांत आल्याबरोबर गांवांतील लोक त्यांच्याकडे तुम्ही कोण, कोठील, वगैरे चौकशी करण्याकरितां येऊं लागले. त्यांमध्यें त्या गांवांतील पूर्वी सांगितलेली चांदबिबी हीही येऊं लागली. तिच्या चालचालणुकीवरून ही लबाड बायको असावी, हें लछमनसिंगाच्या हाताखालील शिपायांनीं तेव्हांच ताडलें व त्यांनीं तिच्याकडे जाण्यायेण्याचा क्रम सुरू केला. बदमाष आणि बदफैली चोरटे लोक आपलीं घरेंदारें आणि बायकापोरें टाकून बहुधा नेहमीं जंगलांत राहत असतात. त्यामुळें आपल्या कामवासना तृप्त करून घेण्या-

साठीं ते जंगलाच्या आसपासच्या खेडेगांवांतील असल्या बदमाष बायकांचा उपयोग करून घेत असले पाहिजेत, ह्याकरितां चोरांच्याबद्दलच्या बित्तंबातम्या बाहेर काढण्याला असल्याप्रकारच्या वेश्या ह्या फार उपयोगी असतात, म्हणून त्यांचा होईल तितका उपयोग करून घेतला पाहिजे, हें लछमनसिंगाच्या हाताखालीं काम करणाऱ्या शिपायांच्या कायद्यांतील अगदीं मुख्य तत्त्व होतें. आणि त्याप्रमाणें त्यांनीं तिच्याशीं सलगी ठेवण्याला सुरुवात केली. हे त्यांचे श्रम व्यर्थ गेले नाहींत. आपणही चोरच आहों, असा त्यांनीं प्रथम बहाणा केला. आणि एवढ्यावर चांदबिबीकडून जसजशी माहिती मिळत गेली, तसतशी तेही आपली बनावट हकीकत बनवीत आणि बदलीत गेले. इतक्या युक्तीनें आणि मेहनतीनें बातमी काढण्याचा जरी त्यांनीं प्रयत्न केला, तरी त्यांना जी बातमी मिळाली, तिची गोळाबेरीज अगदीं थोडी होती. ती अशी: करीमबक्ष या नांवाचा एक चोरट्यांचा नाईक आहे, तो चांदबिबीकडे मधून मधून येत असतो. त्यानें भग्याखान या नांवाच्या एका इसमाच्या खाणाखुणा तिला सांगितलेल्या आहेत, व तो आपल्या बायकोचा शोध करीत करीत त्या गांवीं आलेला तिला आढळला तर त्याला थांबवून घेऊन ती बातमी आपल्याला कळविण्याविषयीं करीमबक्षानें तिला सांगून ठेविलेलें आहे. याच्यापेक्षां जास्त कांहीं बातमी तिच्यापासून निघना. कारण, करीमबक्षानेंहि चांदबिबीला याच्यापेक्षां जास्त कांहीं सांगितलेलेंच नव्हतें. कारण तोही वस्तादच होता, व असल्या बदमाष वेश्यांचा आपल्या कामापुरताच उपयोग करून घ्यावा, त्याच्यापेक्षां जास्त विश्वास त्यांच्यावर कधीं ठेवूं नये, हें सामान्य धोरण करीमबक्षही जाणत होता. आणि म्हणून त्यानेंही तिला याच्यापेक्षां ज़ास्त कांहीं कळूं दिलें नव्हतें. परंतु एवढ्या माहितीवरून लछमनसिंगाला कांहीं धोरण बांधतां येईना. भग्याखान हा कोण व तो आपल्या बायकोचा शोध करीत तेथें कां येणार याविषयीं लछमनसिंगाला कांहीं एक अटकळ करतां येईना. तेव्हां भग्याखानाच्या खाणाखुणा तरी करीमबक्षानें चांदबिबीपाशीं काय सांगितल्या आहेत, याच्याविषयीं लछमनसिंगानें आपल्या शिपायांच्या मार्फत चांदबिबीकडून माहिती काढविली. त्या वेळीं चांदबिबीनें सांगितलेल्या भग्याखानाच्या खाणाखुणा आणि लछमनसिंगानें आपल्या भावाच्या यजमानांना पुष्कळ वेळां पाहिलें असल्यामुळें त्याच्या खाणाखुणा कांहीं कांहीं बाबतींत जमतात, असें लछमनसिंगाला वाटूं लागलें. त्यावरून भग्याखान म्हणजे कदाचित् झांशीचे

जहागीरदार भय्यासाहेब हेच असतील, अशी कल्पना त्याच्या मनांत आली. तेच भय्यासाहेब असतील तर ते आपल्या बायकोला शोधीत त्या ठिकाणीं याव-याचे असल्यास त्याच ठिकाणीं भय्यासाहेब आणि त्यांची बायको यांची ताटातूट झालेली असली पाहिजे, असें अनुमान लमछनसिंगानें बांधिलें. आणि अशी या नवराबायकोची ताटातूट या ठिकाणीं झालेली करीमबक्षाला माहीत असणें, म्हणजे त्यानें आणि त्याच्या टोळीनें भय्यासाहेबांना याच ठिकाणीं कोठें तरी आसपास लुटलेलें असावें, असाही तर्क लछमनसिंगानें बांधला. पण करीमबक्षानें त्यांना जरी या जंगलांतच कोठें तरी लुटलें असलें, तरी भय्यासाहेब आपल्या बायकोला शोधण्याकरितां येथें येण्याचा करीमबक्षाला संभव वाटत असल्यावरून भय्यासाहेब आणि त्यांची बायको हीं करीमबक्षाच्या हातून ठार मारलीं गेलेलीं नसून तीं कोठें तरी जिवंत खास असलीं पाहिजेत, ही कल्पना जेव्हां लछमन-सिंगाच्या मनामध्यें आली, तेव्हां त्याला मोठा आनंद झाला. एवढी बातमी जरी गोपाळभय्यांकडून भय्यासाहेबांच्या मातोश्रीला तूर्त कळविली गेली, तरी देखील तिला पुष्कळ समाधान होईल, असें त्याला वाटलें. पण हे भय्यासाहेबां-च्या आईच्या समाधानाचे विचार लछमनसिंगाच्या मनामध्यें घोळत असतां त्याला त्याच्या स्वतःच्या आईची आठवण झाली. तो दीनवाणीनें आपल्याशीं म्हणालाः—“ मी बांधलेलीं सगळीं अनुमानें खरीं असतील, तर भय्यासाहेबां-च्या आईला समाधान वाटेल, हें खरें. पण माझ्या आईची वाट काय ! तीही आपल्या मुलाच्या शोधासाठीं उत्सुक होऊन वाट पहात बसली असेल ! तिचें समाधान मी कसें करूं ? तिच्या मुलाच्या—मी आपल्या भावाच्या—माझ्या रामसिंगाच्या शोधासाठीं मी अजून कांहींच तजवीज केली नाहीं. आणि मला त्याचा कोठें कांहीं सुगावाही लागत नाहीं. तेव्हां आतां काय करावें ? ”

अशा रीतीनें लछमनसिंग आपल्या भावाच्या विवंचनेमध्यें पडलेला होता. भय्यासाहेबांना जर येथेंच लुटलें होतें तर त्यांच्या नोकरांनाही करीमबक्षानें येथेंच लुटलें असलें पाहिजे, हें उघड होतें. पण त्यांना फक्त लुटून घेऊन करीमबक्षानें जिवंत मोकळें सोडलें, किंवा ते आपल्या धन्याच्या संरक्षणासाठीं चोरांपाशीं लढतां लढतां मारले गेले, याच्याबद्दल लछमनसिंगाला कांहींच कळेना. त्यानें त्या खेड्यां-तील लोकांपाशीं वेड्यासारखा पुष्कळ शोध केला, पण त्याच्या रामसिंगाची हकी-कत त्याला कोणी सांगेना. ती कोणाला माहितच नव्हती, तर ती कोण सांगणार!

चोरांच्याकडून लूट आणि लढाई जर याच ठिकाणीं आसपास कोठें तरी झालेली असली, तर या फार तर पांच सहा महिन्यांच्या पूर्वी झालेल्या गोष्टींच्या कांहीं तरी खाणाखुणा येथें सांपडल्याच पाहिजेत, असा निश्चय ठरवून लछमनसिंगानें आपल्या हाताखालच्या नोकरांना त्या आसपासच्या जंगलांत फार बारकाईनें तपास करण्याविषयीं हुकूम केला. लूट व्हावयाची म्हणजे आधीं लढाई झालीच पाहिजे; कारण लढाईत कांहीं तरी लोक मारले जाऊन निरुपाय झाल्यावांचून भय्यासाहेबांसारखे पाणीदार लोक आपल्याला कधींही लुटूं द्यावयाचे नाहींत, हें उघड होतें; आणि लढाईत मारलेल्या किंवा रुमाल टाकून गळे दाबून मारलेल्या लोकांना ठग लोक जवळपास कोठें तरी खड्डे खणून जमिनींत पुरून टाकतात, ही ठग लोकांची वहिवाट सर्वांना महशूरच होती; म्हणून लुटालुटीच्या आणि लढाईच्या इतर खाणाखुणांबरोबर या खड्ड्यांच्या खाणाखुणाही कोठें सांपडल्या तर पहाव्या, म्हणून लछमनसिंगानें आपल्या नोकरांना सूचना दिल्या होत्या; त्या सूचनांप्रमाणें तो स्वतःही त्या जंगलामध्यें शोध करीत फिरत होता. पण कोणाला कशाचाही पत्ता लागेना. पांच सहा महिन्यांपूर्वी एका रात्रीच्या एका अर्ध्या घटकेमध्यें झालेल्या गोष्टीचा पांच सहा महिन्यांनीं काय पत्ता लागणार ? पण लछमनसिंग आपल्या भावाकरितां अगदीं वेडा होऊन गेला होता. त्यानें आसपासचे सारे डोंगर धुंडाळले, तुटलेल्या कड्यांच्या माथ्यांवर चढून पाहिलें, खोल दऱ्यांच्या पायथ्यांशीं जाऊन शोधिलें, नद्यांच्या पाण्यांत बुडया मारून पाहिल्या, ओढ्यांच्या वाळवंटांतून उकरून पाहिलें, पोकळ झाडांच्या ढोलींतून आंत शिरून पाहिलें; पण कोठें कांहीं पत्ता लागेना. माणसांचीं प्रेतें जमिनींत कोठें पुरलेलीं असलीं, तर तीं माणसांना जरी शोधून काढितां आलीं नाहींत, तरी कोल्हीं आणि कुत्रीं यांना वासावरून त्या जागा सहज शोधून काढितां येतील, या अटकळीनें गांवांतील कुत्रे आणि रानांतील कोल्हे धरून आणवून त्यांना कोठें वास येतो व तीं कोठें जमीन उकरूं लागतात, यावरूनही लछमनसिंगानें तपास करून पाहिला; पण कांहीं एक पत्ता लागेना. तेव्हां बाकीचे लोक निराश झाले, व आतां या शोधाचा नाद सोडून देऊन आपण दुसरीकडे जावें, असें म्हणूं लागले. पण लछमनसिंगाला तें पटेना. जर कोठें शोध लागण्याचा संभव असेल, तर तो याच ठिकाणीं असला पाहिजे, असें त्याच्या डोक्यानें पक्कें घेतलें; आणि असें असून माझ्या भावाचा शोध मला येथें कां लागूं नये, याच्याबद्दल त्याच्या मनाला फार खिन्नता वाटूं लागली. " या

गोष्टीचा पांच सहा महिने होऊन गेलेले असले म्हणून काय झालें? मनुष्याचें मन हें जर देवाचाच अंश आहे, तर देवांच्याप्रमाणेंच त्यालाही आजच्या गोष्टी जशा दिसतात तशाच पांच सहा महिन्यांच्या पूर्वींच्याही गोष्टी कां दिसूं नयेत? जमिनीच्यावर फिरणारीं माणसें जर मनुष्याच्या मनाला डोळ्यांच्यामार्फत पहातां येतात, तर माझा भाऊ येथें कोठें चोरांनीं पुरला असला, तर तो माझ्या या मनाला जमिनीच्या खालूनही कां दिसूं नये? मनुष्य हा जर देवाचाच अंश आहे, तर मनुष्याचें मन जेव्हां देवाच्याप्रमाणें व्यापक होईल, तेव्हां त्याला पूर्वी होऊन गेलेल्याही गोष्टी कां दिसूं नयेत? " अशा प्रकारचे वेडगळपणाचे आणि भ्रमिष्ट-पणाचेही कित्येक विचार त्याच्या मनामध्यें येऊं लागले. त्याचें डोकें भडकून गेलें. मनुष्याचें मन व्यापक झालें आणि सृष्टीशीं तादात्म्य पावलें, तर स्थळ आणि काळ यांचें व्यवधान त्याला तोडतां आलेंच पाहिजे, आणि मग त्याला फार दिवसांच्या पूर्वींचें किंवा फार लांबच्या अंतरावरचें असें कांहींच उरणार नाहीं, तर सर्व कांहीं आजच्या आजचें आणि जवळच्या जवळचें होऊन जाईल, असें त्याच्या मनानें घेतलें. आणि त्याप्रमाणें तो आपलें मन विस्तृत आणि व्यापक करण्याचा खरोखर प्रयत्न करूं लागला. आजचें जर दिसतें तर कालचें कां दिसूं नये, आणि जवळचें जर दिसतें तर लांबचेंही कां दिसूं नये, हे प्रश्न त्याला अगदीं साहजिक वाटूं लागले. दूरदर्शनाच्या अशक्यतेचे अगदीं जाडे जाडे पडदे सुद्धां त्याच्या मनानें असल्या विचारसरणीनें फाडून टाकले आणि त्या फाडलेल्या पडद्यांच्या भोंकांतून तो काळाच्या आणि स्थळाच्या दूरवरच्या प्रदेशामध्यें डोकावूं लागला. मनुष्याचें मन जसें बनवावें तसें बनतें. लछमनसिंगानें आपल्या मनाला सांगितलें कीं, तूं जितक्या दूर-वरचें पाहूं इच्छिशील, तितकें तुला दिसेल; आणि तूं ज्याच्याशीं तन्मय होशील तें तुझ्याशींही तन्मय होईल! ही त्याच्या मनांत त्या वेळीं जागृत झालेली भावना एके दिवशीं संध्याकाळच्या वेळीं अतिशय वृद्धिंगत होऊन त्या भरांत त्याला त्या अरण्यांतील आसपासचीं व दूरदूरचीं अशीं सगळीं जंगलें, झाडेंझुडें, दऱ्याखोरीं, नद्याओढे, उंचसखल प्रदेश, लहानमोठ्या वाटा, हीं सर्व प्रत्यक्ष दिसूं लागलीं, व त्या प्रदेशांतून आपला भाऊ रामसिंग आपल्या धन्याच्याबरोबर प्रवास करीत चालला आहे, असेंही त्याला दिसत असल्याचा भास होऊं लागला! आणि ही त्याची तदाकारतेची वृत्ति उत्तरोत्तर जास्त जास्तच विशद आणि वृद्धिंगत होत चालली. परंतु या तल्लीनतेच्या प्रपंचानें त्याच्या डोक्यांतील मेंदूच्या शिरांना

अतिशय ताण पडूं लागला आणि त्यामुळें थकवा येऊन तो अगदीं म्लान झाला. अशा स्थितींत अत्यंत निराशेच्या वेदनांनीं विव्हल झालेल्या लछमनसिंगाच्या तोंडून पुढीलप्रमाणें उद्गार निघाले:—

" रामसिंग! रामसिंग! तूं जंगलांतून आपल्या यजमानांच्याबरोबर प्रवास करीत असलेला हा मला दिसत आहेस. पण त्याच्यापुढें तूं कोणीकडे गेला आहेस, हें मला कांहीं एक दिसत नाहीं. मी तुला सगळीकडे पहात आहें, पण तूं मला कोठें दिसत नाहींस! तुझ्यासाठीं मी सगळ्यांना विचारीत आहे, पण तुझी माहिती मला कोणीही सांगत नाहींत! पण दुसऱ्यांनीं कोणीं तुझी माहिती सांगितली नाहीं, तर तें एक वेळ शोभेल; पण मी तुझा भाऊ तुझ्यासाठीं या जंगलांत तळमत असतां आणि ती तुझी आई तुझ्यासाठीं आपल्या घरीं हळहळत असतां तं आपण होऊन पुढें येऊन आपली माहिती मला सांगूं नयेस, हें तुला शोभतें काय? तूं आणि मी हे सख्खे भाऊ! मग माझा आत्मा तुझ्यासाठीं जर तळमळत आहे, तर त्याची ती तळमळ निवविण्याकरितां तुझ्या आत्म्यानें—तो येथें किंवा दुसरीकडे कोठें असला तरी तेथून—माझ्याजवळ यावयाला नको काय? तूं पूर्वी इतका निष्ठुर नव्हतास! तूंच येऊन जर मला आपली हकीकत सांगितली नाहींस, तर ती मला कशी कळणार? आणि तूं येऊन मला भेटला नाहींस तर मी आतां तुला याच्या पलीकडे कोठें शोधूं!"

हे शब्द लछमनसिंगाच्या तोंडून निघत होते, तेव्हां त्याची चर्या अगदीं पालटून गेलेली होती, त्याचे डोळे लाल आणि भेसूर दिसत होते, आणि हे शब्द तो बोलत असतां त्याच्या हृदयांतील मर्मस्थानांचे तंतु तटातट तुटून जात असले पाहिजेत, असें वाटलें! आणि अशा स्थितींत त्या तिनसांजांच्या वेळीं त्याला गुंगी येऊन तो पडला! त्याच्याजवळ त्याचे जे नोकर होते, त्यांना तर असें वाटलें कीं, याला ही अंतकाळच्या अगदीं शेजारची भयंकर मूर्च्छा आलेली आहे! आणि त्यामुळें ते अतिशय घाबरून गेले व त्याला कांहीं उपचार करण्याच्या उद्योगाला ते लागले. परंतु कांहीं वेळानें लछमनसिंग आपोआपच शुद्धीवर आला व आपल्या नोकरांना जवळ बोलावून त्यानें त्यांना पुढील हकीगत सांगितली:—

" गड्यांनो, माझ्या भावाबद्दल मी आतां शोक करीत असतां माझा थोडा वेळ डोळा लागला आणि तितक्यांत मला एक चमत्कारिक स्वप्न पडलें! त्या स्वप्नांत

मी असें पाहिलें कीं, माझा भाऊ रामसिंग आणि त्याच्या बरोबरचे दुसरे नोकर हे या जंगलांत निजले असतां पुष्कळ चोर आले आहेत; ते त्यांच्या तोंडांत फडक्यांचे बोळे कोंबून त्यांना दूर उचलून नेत आहेत, आणि तेथें त्यांच्याकरितां त्यांनीं पांच सहा खड्डे खणून ठेविलेले आहेत! त्या चोरांपाशीं रामसिंग झटापट करीत आहे आणि मोठमोठ्यानें ओरडत आहे! पण सगळ्या चोरांनीं मिळून त्याचे हातपाय ध ले आणि एकानें त्याच्या गळ्याभोंवतीं रुमाल टाकून त्या रुमालानें त्याचा गळा इतक्या जोरानें आंवळला कीं, त्याच्या मानेला करकोचा पडून ती त्याची मान वांकडी देखील पडली! ती पहा, अजूनसुद्धां त्याची मान अगदीं वांकडी होऊन डाव्या खांद्यावर पडलेली दिसत आहे! आणि ज्या रुमालानें चोरांनीं त्याच्या मानेला फांस लाविला, तो रुमाल देखील अजून त्याच्या मानेभोंवतीं तसाच आहे!"

"कोठें आहे? आम्हांला कांहीं दिसत नाहीं!"

"तुम्हांला दिसत नाहीं? मला तर स्पष्ट दिसत आहे!"

"तुम्हांला हा भ्रम होत असला पाहिजे."

"मुळींच नाहीं, मी माझ्या भावाला आपल्यासमोर अजूनसुद्धां पहात असतां हा सगळा भ्रम असला पाहिजे, ही गोष्ट मी कधींहि कबूल करणार नाहीं. शिवाय याला दुसरेंही एक प्रत्यंतर सांपडेल, असें मला वाटतें आणि तें आपण करून पाहूं."

"तें काय?"

"स्वप्नांत माझा भाऊ जसा मला दिसला, त्याचप्रमाणें त्याच्या गळ्याला चोरांनीं जेथें फांस घातला तेथें पांच सहा खड्डे खणलेले मला दिसले; आणि त्यांच्याजवळच टेकडीच्या उतरणीवर आंब्याच्या एका झाडाला एका मोठ्या थोरल्या पिंपळाच्या खांद्यांनीं वेढून टाकल्यामुळें दोन्ही मिळून एकच झालेलें असें एक झाड मला तेथें स्वप्नांत दिसलें. ही खूण जर पटली, तर मग माझें स्वप्न खरें, असें तुम्ही कबूल कराल ना?"

"आपण हे सगळे डोंगर फिरलों आहों; पण त्यांत असें झाड आपल्याला कांहीं कोठें आढळलें नाहीं!" लछमनसिंगाच्या शिपायांपैकीं कांहीं जण म्हणाले.

पण त्यांना थांबवून दुसरा एकजण म्हणाला, "असें नाहीं. मला वाटतें, ह्या जवळच्या डोंगराच्या उतरणीवर असें एक झाड आहे!"

" वाटतें कशाला ? कोणत्या डोंगराच्या उतरणीवर तें झाड आहे म्हणून तूं म्हणतोस, तिकडे आपण सगळेजण जाऊं आणि प्रत्यक्षच पाहूं म्हणजे झालें !" बाकीचे शिपाई म्हणाले आणि ते सर्वजण तिकडे जाण्याकरितां निघाले. वाटेनें जातांना ज्याला तें झाड कोठें तरी पाहिल्यासारखें वाटत होतें, तो शिपाई मध्यंतरीं थोडासा घुटमळला, व आपण वाट चुकत आहों कीं काय असें म्हणून कांहींसा बुचकळ्यांत पडून तो किंचित् थांबला. तो थांबल्यामुळें अर्थातच त्याचेमागून जाणारे बाकीचे लोकही थांबले. तेव्हां लछमनसिंग पुढें होऊन म्हणाला, " कांहीं शंका नको ! आपण मुळींच वाट चुकत नाहीं ! हीच तिकडे जाण्याची वाट असली पाहिजे ! कारण, तो पहा, माझा भाऊ रामसिंग ह्याच वाटेनें पुढें चालला आहे ! आणि मागें वळून पाहून आपल्याला इकडूनच येण्याविषयीं तो पहा हातानें खुणा करीत आहे ! कारण, चोरांनीं त्याच्या मानेभोंवतीं तो आपला रुमाल इतक्या जोरानें आंवळलेला दिसत आहे कीं त्यामुळें त्याला आपल्या निर्जीव होऊन वांकड्या पडलेल्या मानेनें कांहीं खुणा करणें शक्य नसावें, असें मला वाटतें ! "

प्रत्यक्ष रामसिंगाची आकृति अजूनही लछमनसिंगाला दिसत आहे, व तीच आकृति आपल्याला वाट दाखविण्याकरितां आपल्यापुढें चालत आहे, हें लछमनसिंगाच्या तोंडचे उद्गार ऐकून बाकीच्या सर्वजणांना मोठें आश्चर्य वाटलें व त्यांना एक प्रकारची भीतीही वाटूं लागली. आधींच तेथील जंगल अगदीं भयाण होतें. त्यांत ती अगदीं करकरीत तिनसांजाची वेळ झालेली होती. उजेडाचा कोठें मागमूस देखील राहिलेला नव्हता. जवळपास त्या वेळचें कुत्र्यांचें तें कर्कश भुंकणें त्या भयाण प्रदेशाला अधिकच भेसूरपणाचें स्वरूप देत होतें. पण लांबलांबच्या डोंगरांतील आणि जंगलांतील वाघांच्या डरकाळ्यांच्या भयंकर गर्जना दुरून अस्पष्टपणें ऐकूं येत होत्या, त्यांच्या योगानें तर त्या प्रदेशाचा भयंकरपणा अतिशयच वाढला होता. अशा स्थितींत एखाद्या मेलेल्या माणसाच्या भुताच्या मार्गदर्शकत्वाखालीं वाट चालत जाण्याचा ज्यांच्यावर प्रसंग आला असेल, त्यांनाच त्या वेळच्या त्या भयंकर भीतीची पूर्णपणें कल्पना येईल. त्या भीतिप्रदतेमुळें त्या सगळ्यांचे हातपाय लटलट कापूं लागले होते, आणि त्यांच्या तोंडावर डेबडबून घाम आला होता. आणि शिवाय भीतीमुळें ते इतके गांगरून गेले होते कीं, त्यांच्या पायांखालची वाट काळोखाच्याप्रमाणें भयाच्याहि कारणानें त्यांना

मुळींच दिसेनाशी झालेली होती. तरी पण ते कशीं तरीं पावलें टाकीत पुढें चालले होते. अशा रीतीनें एका डोंगराच्या उतरणीवरून ते हळूहळू खालीं उतरत असतां लछमनसिंग मध्येंच थांबला व तेथील आसपासच्या जागेकडे त्या काळोखाच्या उजेडांतून जितकें न्याहाळतां येईल तितकें न्याहाळून पाहून बाकीच्यांना म्हणालाः—" थांबा, येथेंच थांबा. पुढें जाऊं नका. मला वाटतें, स्वप्नांत मला जी जागा दिसली, ती अगदीं येथल्यासारखी होती ! मला वाटतें, हीच ती जागा असावी ! "

हें लछमनसिंगाचें बोलणें ऐकून आपण पिंपळाचें आणि आंब्याचें झाड एकांत एक मिसळलेलें पाहिल्यासारखें ज्याला वाटत होतें, तो शिपाई त्या झाडाची खूण तेथें कोठें सांपडतें काय, हें पाहण्यासाठीं पुढें होऊन आजूबाजूला न्याहाळूं लागला, तों तेथून जवळच त्याला तें पिंपळाचें झाड दिसलें. तें त्यानें बाकीच्यांना दाखविलें, तेव्हां ही अचूक खूण इतक्या बरोबर रीतीनें पटल्याबद्दल सर्वांना मोठा अचंबा वाटला. पण लछमनसिंगाला त्याच्याहीपेक्षां आणखी एक त्या जागे-बद्दलची खात्री पटण्यासारखी गोष्ट दिसली. ती अशी कीं, तें पिंपळाचेंच झाड आहे किंवा नाहीं, हें ठरविण्यासाठीं लछमनसिंगानें जेव्हां त्या झाडाकडे आपली दृष्टी वळविली, तेव्हां त्याचा भाऊ रामसिंग याची जी आकृति त्याला एवढा वेळपर्यंत मधून मधून दिसत होती, तीच त्याला फिरून या पिंपळाच्या झाडाशीं दिसली व ती वर चढत चढत त्या पिंपळाच्या झाडावर गेलेली त्यानें पाहिली ! तेव्हां लछमनसिंगालाही भीति वाटली खरी; पण हीच ती जागा असली पाहिजे, अशी त्या योगानें त्याच्या मनाची पूर्ण खात्री मात्र झाली, यांत शंका नाहीं. तो पुरावा लछमनसिंगानें जेव्हां आपल्या सोबत्यांना सांगितला, तेव्हां त्यांनाही संशय उरला नाहीं व त्या जागेजवळच कोठें तरी खड्डे असले पाहिजेत, व त्यांतच लछमनसिंगाचा भाऊ पुरला असला पाहिजे, असें त्यांना खास वाटूं लागलें. हे खड्डे उकरून पाहिले, म्हणजे त्यांत आपल्याला मुद्देमाल सांपडेल, अशी त्यांना आशा उत्पन्न झाली.

लछमनसिंगाचा वत्सलपणा आणि उतावीळपणा तेव्हांच्या तेव्हां आणि त्या रात्रींच्या रात्रीं ते खड्डे शोधून काढून उकरण्याविषयीं बाकीच्यांना आग्रह करीत होता. परंतु ती जागा आणि तें झाड हीं जरी रात्रीच्या वेळीं सांपडलीं, तरी पांच

सहा महिन्यांच्या कालावधीनें बुजून गेलेल्या खड्यांच्या नेमक्या जागा त्या रात्रींच्या काळोखामध्यें नेमक्या सांपडणें शक्य नव्हतें. त्यामुळें दुसऱ्या दिवशीं उजाडल्यानंतर ते खड्डे शोधून काढून उकरावे, असें बाकीच्याचें मत होतें. पण लछमनसिंगाला तें पसंत पडेना. त्यानें मशाली पेटवून आणण्याकरितां आपल्यापैकीं कांहीं लोकांना पाठविलें आणि लछमनसिंगासह बाकीची मंडळी तेथेंच बसली.

कांहीं थोड्या वेळानें मशाली आणि खड्डे उकरण्याचीं हत्यारें येऊन ते लोक परत आल्यावर मशालींच्या उजेडाच्या साधनानें त्या खड्ड्यांच्या जागा शोधून काढण्या-साठीं बारकाईचा प्रयत्न सुरू झाला. परंतु पांच सहा महिन्यांच्या कालगतीमुळें खड्ड्यांच्या जागा आणि बिनखड्ड्यांच्या जागा ह्या सगळ्या एकसारख्याच होऊन गेलेल्या होत्या. त्यामुळें खड्ड्यांच्या जागा निश्चित होईनात. तेव्हां अखेरीस ती जागा सरसकट खणून पाहण्याचा त्यांनीं निश्चय केला, व त्याप्रमाणें खणण्याला सुरवात केली. खणतां खणतां एके ठिकाणीं थोडी भुसभुशीत जागा लागल्याचा भास झाला, म्हणून तेथेंच ते जास्त खोल खणूं लागले. खळगा जसजसा जास्त खोल जाऊं लागला, तसतशी आंतून थोडी थोडी कुजट घाण वर येऊं लागली व आणखी थोडीशी माती काढल्यानंतर आंतून मातीच्या बरोबर माणसांच्या कुजलेल्या मांसाचे आणि तुटलेल्या हाडांचे तुकडे सांपडूं लागले. तेव्हां त्या खणणाऱ्या लोकांना अगदीं किळस येऊं लागली. पण आतां तें काम अर्धवट टाकण्याची सोय नव्हती. त्यांनीं त्या खड्ड्यांतून तुकडे केलेले हातपाय, मुंडकीं, पोटाच्या बरगडया, पाठीच्या हाडांचे सांपळे, कंबरेचीं माकडहाडें, वगैरे अनेक जिनसा बाहेर काढल्या व त्यांचा बाहेर एक मोठा थोरला ढीग केला. आतां त्या खड्ड्यांत आणखी खालीं कांहीं नाहीं, असें जेव्हां ठरलें, तेव्हां लछमनसिंगाची मोठी निराशा झाली. तो म्हणाला, " त्या दुष्ट ठग लोकांनीं त्या रात्रीं मारलेल्या सगळ्या लोकांचे असे तुकडे तुकडे करून जर या खड्ड्यांत एके ठिकाणींच पुरले असतील, तर ह्यांत माझ्या भावाच्या शरीराचे तुकडे कोणते, हें ओळखणें शक्य नाहीं, आणि म्हणून हा इतका सगळा खटाटोप करून फुकट जाणार ! " हे उद्‌गार त्याच्या तोंडून निघत आहेत, तोंच आपण स्वप्नांत पांच सहा खड्डे ओळीनें पाहिल्याचें त्याला स्मरण झालें. म्हणून त्यानें त्या पहिल्या उकरलेल्या खड्ड्याच्या शेजारींच दुसरा खड्डा शोधून काढून उकर-ण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें दुसऱ्या खड्ड्याचीही जागा शोधाअंतीं सांपडली व तो खड्डा पुरा उकरला गेला. तेव्हां त्यामध्यें एक सबंध माणसाचें प्रेत पुरलेलें

आढळलें, पण तें लछमनसिंगाच्या भावाचें नव्हतें. असे आणखीही दोन तीन खड्डे उकरून पाहिले. पण जो मुडदा पाहिजे होता, तो त्या खड्ड्यांपैकीं कोणत्याही खड्ड्यांत सांपडला नाहीं. अखेरीस पाहतां पाहतां त्या पिंपळाच्या झाडाजवळ एका खड्ड्याची जागा असली पाहिजे, असें दिसून आलें व तो खड्डा उकरण्याला सुरुवात झाली. लछमनसिंगाला आतां तेवढीच काय ती आशा राहिलेली होती. या खड्ड्यांत आपला भाऊ आपल्याला सांपडला नाहीं, तर त्या पहिल्या खड्ड्यांतच चोरांनीं आपल्या भावाच्या शरीराचे तुकडे करून टाकले असले पाहिजेत, असें लछमनसिंगाच्या मनानें ठरविलें. पण त्याचें मन ही गोष्ट ठरवीत होतें, त्या वेळीं त्याचे सगळे डोळे या शेवटच्या थडग्यांत काय सांपडतें, हें पाहण्याकडे लागले होते. खड्डा खोल खोल होऊं लागला, सगळी माती निघाली, आणि आंतील आकृति मातीपासून मोकळी होऊन मशालींच्या उजेडांत स्पष्ट दिसूं लागली. ही त्या खड्ड्यांत दिसणारी आकृति आणि लछमनसिंगानें आपल्या स्वप्नांत पाहिलेली आकृति यांच्यांत अगदीं तंतोतंत साम्य होतें. गळफांसाच्या रुमालानें मानेला पडलेला करकोचा, आणि ती डाव्या खांद्यावर मोडून पडलेली मान अगदीं तशीच होती. फार काय, त्याचा गळा आवळण्याकरितां त्याच्या गळ्याभोंवतीं टाकलेला रुमालही अद्यापि तेथेंच होता! इतक्या खाणाखुणा जमल्यावर कोणालाही संशय उरला नाहीं, व सर्वांना अतिशय आश्चर्य वाटलें. लछमनसिंग आपल्या भावाची ती अवस्था पाहून ढळढळां रडूं लागला. त्या रुमालानें आपल्या भावाची मान फार घट्ट आवळली गेली असेल, ती लवकर मोकळी व्हावी म्हणून लछमनसिंगानें तें आपल्या भावाचें शरीर खड्ड्यांतून बाहेर काढवून त्याच्या गळ्याभोंवतीं टाकलेला तो रुमाल आपल्या हातानें आधीं सोडविला. रुमाल आपल्या हातांत घेऊन लछमनसिंग एकदां त्या रुमालाकडे आणि एकदां त्या मृत शरीराच्या गळ्याकडे पाहूं लागला. तो रुमाल बरेच दिवस जमिनींत पुरून राहिल्यामुळें त्यांतील मधला मधला कांहीं भाग कुजून गेलेला होता, आणि बाकीचा जो भाग कायम राहिला होता, तो सगळा रक्तानें भरलेला होता व त्याच्या एका टोंकाला कांहीं तरी खुणेची आकृति काढलेली दिसत होती. अशा त्या रुमालाकडे पाहून लछमनसिंगला काय वाटलें असेल, आणि त्याच्या मनांत काय कल्पना येऊन गेल्या असतील, याची कोणालाही कल्पना करतां येणें शक्य नाहीं. अखेरीस, त्या भयाण जंगलांत, त्या रात्रीं काळोखांत त्या मशालींच्या रक्त-सारख्या लाल उजेडांत, त्या मृत्यूच्या जबड्यासारख्या 'आ' पसरलेल्या थडग्याच्या

जवळ, त्या पिंपळाच्या झाडाच्या अग्रभागाच्या अगदीं शेवटच्या पानावर उंच उंच उभे राहून आपल्या भावाचें भूत खालीं पहात असतां, त्या खड्ड्यांतून उकरून बाहेर टाकलेल्या मातीच्या ढिगावर आणून ठेविलेल्या आपल्या भावाच्या प्रेताला उद्देशून लछमनसिंग म्हणाला:—

"रामसिंग, मी तुझ्या गळ्याभोंवतालचा या रुमालाचा फांस सोडविला, म्हणून मी कांहीं तुला खरें सोडविलें, असें नाहीं! अशानें हें तुझें भूत तृप्त होणार नाहीं, आणि तें या पिशाच्चयोनींतून मुक्त होणार नाहीं, हें मी जाणतों. तुझा गळा मोकळा करण्याचा खरा उपाय म्हटला म्हणजे ज्यानें तुझा गळा दाबून तुला ठार मारलें, त्याचाही असाच गळा दाबून त्याला ठार मारलें पाहिजे. वासना तृप्त झाल्या नाहींत, तोंपर्यंत पिशाच्चयोनींतून कोणत्याही आत्म्याची सुटका होणें शक्य नाहीं. आणि तूं रजपूत असल्यामुळें आपल्या शत्रूचा सूड घेतला जावा, हीच तुझी वासना अवशिष्ट राहिली असली पाहिजे, यांत संशय नाहीं. पण रामसिंग, तूं याबद्दल काळजी करूं नको. ज्यानें ह्या रुमालानें तुझ्या गळ्याला फांस घातला त्या फांसेगाराला या रुमालाच्या खुणांवरून ओळखून काढून मी मृत्यूच्या मुखांत त्याला ढकल्यावांचून कधींही राहणार नाहीं!—आई, आपल्या जवानसिंगाला शोधून काढून घरीं आणण्याकरितां मी घरांतून बाहेर निघालों होतों. त्यापैकीं याला मी शोधून काढलें खरें, पण याला आपल्या घरीं परत आणणें शक्य नाहीं! हा देवाच्या घरीं जावयाला निघाला! हा आतां आपल्या माणसांच्या घरीं परत कसला येणार!—आई, आपला हा मुलगा परत येऊन आपल्याला केव्हां भेटेल, अशी उतावीळ होऊन तूं याची वाट पहात बसली असशील, पण ही पहा येथें याची काय अवस्था झालेली आहे ती!"

असा अनेक रीतीनें लछमनसिंगानें आपल्या भावाबद्दल पुष्कळ विलाप केला, तरी पण त्याचा शोकावेग कांहीं केल्यानें शांत होईना. त्याच्या बरोबरच्या लोकांनींही त्याला पुष्कळ समजावून सांगितलें, परंतु त्याच्या डोळ्यांचें पाणी कांहीं केल्यानें खळेना. अखेरीस त्याचें त्यालाच वाटलें कीं, रडत बसणें हें मर्दाचें काम नव्हे. या विचारानें तो शुद्धीवर आला व पुढील जरूर ती व्यवस्था करण्याविषयीं त्यानें आपल्या हाताखालच्या शिपायांना हुकूम केला.

• • •

: :

# रंग सतरावी

झांशीचे जहागीरदार भय्यासाहेब आपल्या पत्नी गंगाबाई यांना घेऊन कोंकणांत राजापुरास आपल्या सासुरवाडीस जाण्याकरितां निघाले असतां, मध्यंतरीं त्या उभयतांवर काय संकटें कोसळलीं, हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्या संकटांत सांपडल्यानंतर मग तीं कोंकणांत कसलीं जातात! त्यांच्या येण्याची वाट पाहून पाहून गंगाबाईचे वडील रामचंद्रराव आणि गंगाबाईच्या वृद्ध मातोश्री सीताबाई हीं दोघेंही अगदीं कंटाळून गेलीं. आणि अखेरीस तीं आपल्या लेकीचा व जांवयाचा वाटेनें शोध करीत करीत काशीयात्रेला जाण्याला निघालीं, हेंही मागें सांगितलें आहे. राजापुरापासून सावकाश सावकाश अशा रीतीनें त्यांनीं प्रयागापर्यंत प्रवास केला, व जागोजागीं भय्यासाहेब आणि गंगाबाई यांच्याबद्दल त्यांनीं चौकशी केली; पण त्यांना कोठेंही त्यांचा तपास लागला नाहीं. त्यामुळें त्यांची फारच निराशा झाली. तेव्हां त्यांनीं प्रयागवरून आपली कुलस्वामिनी जी विंध्यवासिनीदेवी तिचें दर्शन घेऊन आणि काशीमध्यें गंगास्नान करून आपण परतून थेट सागरलाच जावें, असें ठरविलें होतें. त्याप्रमाणें एके दिवशीं प्रयागहून निघून जवळच दोन चार कोसांवर गंगेच्या कांठीं एका देवळामध्यें कित्येक यात्रेकरू उतारू उतरले होते, त्यांच्यामध्येंच उतरून त्यांनीं एका कोपऱ्यामध्यें आपला चौका तयार केला. उभयतांनीं गंगेचें स्नान केलें आणि नंतर एकीकडे रामचंद्ररावांनीं त्या देवळांतील देवावर रुद्राचा अभिषेक केला आणि दुसरीकडे सीताबाईनीं सर्व पाकनिष्पत्ति केली. रामचंद्रराव या वेळीं ज्या ठिकाणीं उतरले होते, तेंही एक लहानसें क्षेत्रच होतें. प्रयागापासून काशीपर्यंतची सर्वच पुण्यभूमि आहे व जेथें जेथें गंगाबाई आहे, तेथें तेथें सर्व क्षेत्रेंच आहेत. रामचंद्रराव हे मोठे भाविक आणि श्रद्धाळु असल्यामुळें ते ज्या क्षेत्रीं उतरले होते,

तेथेंही त्यांनीं त्या दिवशीं पाकसिद्धि झाल्यानंतर घटावर एक तीर्थश्राद्ध केलें. श्राद्ध करीत असतांना रामचंद्ररावांच्या आणि तें पहात असतांना सीताबाईंच्या डोळ्यांचें पाणी कधीं थांबलें नाहीं ! एकीकडे तोंडानें श्राद्धाचे मंत्र म्हणत असतां, दुसरीकडे त्यांच्या मनामध्यें नाना प्रकारचे विचार घोळत होते. ते आपल्या मनांत म्हणाले कीं, " धर्मशास्त्रांत सांगितलें आहे आणि आपल्या ब्राह्मणांचें विहित कर्म आहे, म्हणून हीं श्राद्धें करावयाचीं ! बाकी आमच्या कपाळीं श्राद्धाचें फळ कांहीं एक नाहीं ! श्राद्धें करून आणि पितरांना संतुष्ट करून त्यांच्यापासून पुढें संतति मागून घ्यावयाची हेंच श्राद्धांचें फळ ! पण आमच्या कपाळीं संतति नाहीं ! आम्ही आमच्या पितरांचीं श्राद्धें करितों; पण आमचीं श्राद्धें कोण करील ? आम्हांला कोणी नाहीं. आमचीं श्राद्धें करण्याला देवानें आम्हांला कोणी दिलें नाहीं ! आम्ही हतभागी ! आमच्या पोटीं पुत्रसंतति नाहीं ! देवानें दयाळू होऊन आम्हांला एक कन्यारत्न दिलें, आणि तिच्या पोटीं पुत्र झाले, म्हणजे त्यांतलाच एखादा आम्ही आपल्याला ठेवून घेऊं, आणि तो आम्हांला स्वर्गात पाणी पाजील, अशी आम्हांला आशा होती; पण आमच्या दुर्दैवानें ती कन्याच कोठें नष्ट झाली कोण जाणें ! ती गरोदर होती ! आणि तिचा पहिला मुलगा आम्ही मागितला असता, तरी तो देखील तिनें आम्हांला दिला असता ! पण जेथें तिचाच पत्ता नाहीं, तेथें तिच्या मुलाची आशा धरून काय उपयोग ! "

हे विचार मनांत येऊन रामचंद्ररावांच्या डोळ्यांतील पाणी त्यांच्या पंचपात्रीमध्यें पडत होतें आणि त्याच पाण्यानें ते पितृतर्पण करीत होते. हे रामचंद्ररावांच्या डोळ्यांतून गळून खालीं पडणारे अश्रुबिंदु काय शब्द बोलत आहेत, हें सीताबाईंना सगळें ऐकूं येत होतें ! आणि त्यामुळें त्यांचाही रडण्याचा हुंदका थांबत नव्हता ! अशा स्थितींतच रामचंद्ररावांनीं कशी तरी श्राद्धसमाप्ति केली आणि पिंडदानाचा भात गोळा करून तो गंगेंतील माशांना घालण्याकरितां ते निघाले.

ते बाहेर पडत आहेत, तों इतक्यांत समोरून एक लहान मूल घेतलेली एक बैरागीण आली, आणि हात जोडून म्हणूं लागली कीं, " बाबा, गरिबावर दया करा ! मी भुकेलेली आहे. माझा बच्चा भुकेनें तडफडत आहे ! तो भात गंगेंत न सोडतां मला द्या. तेवढा घांसभर भात मी खाल्ला, तर माझे प्राण वांचतील ! आणि माझे प्राण वांचले, तर या बच्चाचेही प्राण वांचतील; नाहीं तर आम्ही

दोघेंही मरतों!" असे तिच्या तोंडचे उद्गार ऐकून रामचंद्ररावांना तिची फार करुणा आली आणि त्यांनीं तिला सांगितलें कीं, "तूं कांहीं काळजी करूं नको; तूं जरा थांब. हा पिंडांचा भात आहे, हा मी तुला कसा देऊं? तूं जरा थांब. हे पिंड मी गंगेंत सोडतों आणि आमच्याकरितां आम्ही येथें या देवळांत भात शिजविला आहे, तो सगळा आम्ही आधीं तुलाच देऊं आणि आमच्याकरितां आम्ही मागाहून अन्न शिजवूं. तूं काळजी करूं नकोस!" असें म्हणून रामचंद्रराव गंगेमध्यें पिंड सोडून आणि फिरून स्नान करून देवळांत परत आले व त्यांनीं आपल्या कुटुंबाला त्या भिकारणीची करुणास्पद हकीकत सांगितली. तेव्हां सीताबाईचेंही अंतःकरण सद्गदित झालें व नवऱ्यानें सांगण्यापूर्वींच त्यांनीं तें सगळें शिजविलेलें अन्न त्या भिकारणीला देण्याची तयारी चालविली.

"बाई, तूं खरोखरच फार भुकेलेली दिसत आहेस! हें घे तुला अन्न!" सीताबाई म्हणाल्या. "हा भात घे आणि ह्या पोळ्या घे, म्हणजे तुझी दोन दिवसांची बेगमी होईल."

"पण हा भात आणि ह्या पोळ्या," रामचंद्रराव मध्येंच म्हणाले, "यांचा त्या मुलाला काय उपयोग?"

"त्याला मी" सीताबाईनीं उत्तर दिलें, "हें आपण आणलेलें दूध देत्यें आहे ना! माझ्या लक्षांत आहे."

"लहान मुलांचें सगळें जीवन बायकांच्या काळजीवरच अवलंबून असतें!" रामचंद्रराव म्हणाले. "तेव्हां बायकांच्या लक्षांत ही गोष्ट न येऊन कसें चालेल? देवाला हें करणेंच आहे. आणि म्हणूनच त्यानें स्त्रियांच्या अन्तःकरणामध्यें इतकी वत्सलता उत्पन्न करून ठेविली आहे!"

हें रामचंद्ररावांचें बोलणें चाललेलें आहे, तों सीताबाईनीं दुधाचें भांडें पुढें आणिलें व त्या भिकारणीला त्या म्हणाल्या, "हें मूल फार भुकेलेलें असेल. त्याला तूं येथें थोडेंसें दूध पाज आणि मग बाकीचें तूं आपल्याबरोबर घेऊन जा."

हें म्हणणें त्या गोसावणीला पटलें व तिनें त्या मुलाला दूध पाजण्याची तयारी केली. त्या वेळीं तें मूल पाहून रामचंद्रराव आणि सीताबाई ह्या दोघांनाही फार विस्मय वाटला. तीं दोघेंही एकदां त्या मुलाच्या तोंडाकडे पहात आणि एकदां त्या गोसावणीच्या तोंडाकडे पहात, आणि मग फिरून आश्चर्यानें चकित होऊन तीं एकमेकांच्या तोंडाकडे पहात. ती बैरागिण त्या मुलाला दूध पाजीत असतां

हा असला प्रकार किती तरी वेळ चालला होता! अखेरीस सीताबाईंच्यानें धीर धरवेना; तेव्हां त्यांनीं त्या बैरागिणीला विचारिलें, " बाई, हें मूल तर अगदीं महिन्या दीड महिन्याचें दिसत आहे. मग हें तुझ्या अंगावर पीत नाहीं का?"

हा प्रश्न ऐकून ती बैरागीण थोडीशी घोटाळली; परंतु इतक्यांत तिला एक सयुक्तिक उत्तर सुचलें. ती म्हणाली, " माई, आम्ही गरीब बैरागी लोक. आम्हांला कधीं एक दिवसदेखील पोटभर खायला मिळत नाहीं. मग आईच्याच पोटांत अन्न नसेल, तर तिच्यापासून मुलाला दूध कोठून मिळणार?"

" तुला पोटभर अन्न नसेल हें तुझ्या पोटाला पडलेल्या भाकाळ्यांवरून स्पष्ट होत आहे, हें खरें." रामचंद्रराव मध्येंच बोलूं लागले. " पण ह्या कारणासाठीं तूं त्या मुलाला अंगावर पाजीत नसावीस, असें दिसत नाहीं. ह्याचें कारण अगदीं निराळें असलें पाहिजे, असें मला वाटतें."

" तुझ्या आणि ह्या मुलाच्या चेहऱ्यांत," सीताबाईनीं शंकेच्या मुद्रेनें विचारिलें, " पुष्कळ फरक दिसतो, नाहीं का? ह्या मुलाचें तोंड किती गोड दिसत आहे! त्याच्या डोळ्यांत किती पाणी खेळत आहे! ह्याचें कपाळ किती भव्य आणि मोठें दिसत आहे! आणि आतां दूध प्याल्यामुळें ह्याच्या तोंडावरील टवटवी आणि याचें बाललीलेचें हंसणें किती मोहक वाटत आहे! मला नाहीं वाटत कीं, हा तुझा मुलगा आणि तूं त्याची आई यांच्या तोंडावळ्यांत कांहीं सारखेपणा आहे!"

" माई," त्या बैरागिणीनें उत्तर दिलें, " मी या मुलाला घेऊन आतांशा बऱ्याच ठिकाणीं भिक्षा मागावयाला जातें; पण ही अशी तुमच्यासारखी शंका कोणी काढली नाहीं!"

" दुसऱ्या कोणी काढली नसेल." सीताबाई म्हणाल्या " पण मी जी शंका काढिली आहे, ती बरोबर आहे कीं नाहीं, हें तूं मला सांग."

" तें ऐकून तुम्हांला काय करावयाचें आहे?" बैरागिणीनें विचारिलें.

" मला पक्की खात्री वाटत आहे कीं," सीताबाई म्हणाल्या, " हें मूल तूं दुसऱ्या कोणापासून तरी घेतलें असावेंस. कसें चांगलेंचुंगलें आणि एखाद्या ब्राह्मणाच्या मुलासारखें अगदीं गोरेंभुरकें दिसत आहे! आणि त्याच्या गालावरचा हा तीळ तरी कसा शोभिवंत दिसत आहे!"

" बरें मग?"

" बरें मग, असें नव्हे;" सीताबाई म्हणाल्या; " पण मला वाटलें, तुम्हांला भिकाऱ्यांना देखील जर अशीं मुलें मिळतात, तर आम्हांला देखील असें एखादें मूल मिळालें तर पहावें म्हणून मी विचारतें ! बाई, देवानें आम्हांला मुलगा दिला नाहीं ! म्हणून मुलासाठीं आम्ही वेडीं झालों आहों ! आमचें घर धन-धान्यानें भरलेलें आहे; पण त्यांत एक मुलगा नसल्याकारणानें तें सगळें अरण्या-सारखें झालें आहे. आम्हांला एक मुलगी होती, पण तिचाही अलीकडे कोठें पत्ता नाहींसा झाला आहे ! तिला तरी मुलगा होईल आणि तो आमचे पांग फेडील अशी आम्हां उभयतांना फार फार आशा होती ! पण तीही आशा आतां उरली नाहीं. आम्ही मुलासाठीं अगदीं वेडीं झालों आहों. आपलें मूल नाहीं तर निदान दुसऱ्याचें तरी मूल घेऊन खेळवावें आणि त्याला लहानाचें मोठें करून वाढवावें, असें आम्हांला फार वाटतें ! म्हणून, बाई, मी तुला विचारतें ! "

" माई, तुम्ही काय विचारतां आणि मी तुम्हांला काय सांगूं ! " ती बैरा-गिण एका हातानें त्या मुलाला मांडीवर सांवरून धरून दुसऱ्या हातानें डोळ्यांत आलेलीं टिपें पुशीत पुशीत म्हणाली, " आम्ही गरीब लोक, आपलीं पोटें कशीं जाळतों ह्याची तुम्हांला कल्पनाही येणें शक्य नाहीं ! आणि ती शक्य नाहीं, तेंच बरें आहे. आमच्या या कर्मकथा ऐकून तुम्हांला काय करावयाचें आहे ? "

" तुझ्या ह्या उद्गारांवरून, " रामचंद्ररावांच्यानें मध्येंच बोलल्यावांचून राहवेना. " तूं आमची उत्सुकता जास्तच वाढवीत आहेस ! तेव्हां तुझ्या गरिबीचा आणि ह्या मुलाचा काय संबंध आहे, हें तूं आम्हांला सांगितलेंच पाहिजेस. "

" बरें तर सांगतें, ऐका ! " असें म्हणून बैरागीण बोलूं लागली. " तुमच्या घरांत जसें मूलबाळ नाहीं, तसें आमच्या गरिबांच्या घरांत कधीं अन्न मिळावयाचें नाहीं. आणि तें मिळविण्यासाठीं आम्हांला हर प्रयत्न करावे लागतात. ह्या जगांत दयाळू लोक फार थोडे आहेत. कोणाची गरिबी पाहिली तर त्याबद्दल सहजगत्या कींव यावी अशीं कोमल अंतःकरणें अलीकडे तरी निदान जगांत फार दुर्मिळ झालेलीं आहेत. त्यामुळें अशा कठोर, उदासीन किंवा निद्रिस्त अंतःकरणांना जोराचे धक्के देऊन कांहीं तरी खऱ्या किंवा खोट्या युक्तीनें आणि उपायानें त्यांच्यामध्यें कृत्रिम आणि तात्पुरती दया उत्पन्न करावी लागते. एरवीं आम्हांला

गरिबांना कोण पैसा किंवा अन्न देणार! लोकांचीं मनें या दयेच्या बाबतींत पराकाष्ठेचीं निगरगट्ट झालेलीं आहेत. त्यामुळें रोज अफीण खाणाराच्या जिभेला जेव्हां नागीण चाववावी तेव्हां कोठें त्याला दाद लागते, त्याप्रमाणें आमच्यावर कांहीं तरी भयंकर संकट गुदरलें आहे, असें दाखविल्यावांचून आमच्यावर कोणी दया करीतच नाहीं! फकिरांनीं त्रागा करून आपल्या जिभेंत दाभण टोंचून रक्त काढावें, तेव्हां कोठें दुकानदार त्यांना एक पैसा देतात! आणि माडभर उंचीच्या एखाद्या बांबूच्या बारिक टोंकावर एखादा भोरपी हातपाय मोकळे सोडून खालीं पडला तर मरेल अशी अवस्था करून सोडतो, तेव्हां कोठें तमाशा पहाणारांच्या खिशाला पाझर फुटतो! सारांश, सामान्य सबबी सांगून आम्ही पोटाकरितां घांसभर अन्न मागितलें, तर आम्हांला कोणी शीत देखील देत नाहीं! म्हणून आम्हांला खोटीं, भयंकर संकटें बनवावीं लागतात; तेव्हां कोठें आमचा ओलाकोरडा उदरनिर्वाह होतो. असें करतांना आमचा खोटेपणा आणि आमचीं खोटेपणाचीं बनावट संकटें उघडकीस आलीं, म्हणजे आम्ही गरीब लोक मोठे लबाड असतों, असें सगळे लोक म्हणतात! पण साध्या आणि खऱ्या गोष्टींनीं लोकांना दया येत नाहीं म्हणून आम्हांला लबाड्या कराव्या लागतात, हें ते कांहीं लक्षांत घेत नाहींत! त्यांना आमचा लबाडपणा तेवढा दिसतो, पण आपल्या स्वतःचा निर्दयपणा मात्र दिसत नाहीं. मनुष्याला दुसऱ्याचे दुर्गुण तेवढे दिसतात. त्याचप्रमाणें माझी हकीगत ऐकलीत, म्हणजे तुम्ही मलाच लबाड म्हणून म्हणाल! म्हणून मी आपली हकीगत तुम्हांला न सांगावी हेंच बरें." असें म्हणून ती बैरागीण पुढें कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें स्तब्ध बसली.

परंतु रामचंद्रराव आणि सीताबाई ह्यांनीं तिला फारच आग्रह केल्यावरून व पैशाचीही विशेष लालूच दाखविल्यावरून कांहीं वेळानें फिरून ती बैरागीण बोलूं लागली. "महाराज, काय सांगूं मी तुम्हांला! मी मोठी अन्यायी आहे!—नव्हे, आम्ही सगळेच गरीब लोक मोठे अन्यायी आहों!—पण असेंही नव्हे—तर आमचीं हीं पोटें फार मोठीं अन्यायी आहेत! हीं आमचीं पोटें जर आमच्या पाठीशीं लागलेलीं नसतीं, तर आम्ही खात्रीनें मोठे साधु झालों असतों! माझीच गोष्ट घ्या ना!—मी ह्या पोटासाठीं आजपर्यंत किती तरी लबाड्या केल्या आहेत! आणि माझ्यावर भयंकर संकटें कोसळलीं आहेत, असें भासवून दगडांमध्येंही मी दया उत्पन्न करवून आपल्या पोटाला पैसे मिळविले आहेत! माझा नवरा

मेला आहे, त्याच्या कफनाला वस्त्र पाहिजे आहे, असें सांगून मीं माझ्या ढुंगणाची लाज राखण्याकरितां फाटकींतुटकीं वस्त्रें गोळा केलेलीं आहेत! आणि माझी मुलगी बाळंतीण झाली आहे, तिला औषधपाण्याला पैसे पाहिजे आहेत, असें सांगून मी मोठ्या शहरांतल्या रस्त्यांतून दमडी-टोली याप्रमाणें पैसे गोळा केले आहेत!"

"तसें या मुलाच्या बाबतींत तूं काय केलें आहेस, तें आम्हांला सांग." रामचंद्रराव म्हणाले.

"हें मूल किती गोंडस आणि गोजिरवाणें दिसत आहे!" सीताबाई त्याच्याकडे टक लावून पहात पहात म्हणाल्या, "कसें बाळ हंसतें आहे! याचा तोंडावळा अगदीं ओळखीच्यासारखा दिसतो! मी याच्या तोंडाकडे पाहून केव्हांची मनामध्यें योजितें आहे कीं याचा तोंडावळा कोणासारखा दिसतो बरें! हा तुझा मुलगा नव्हे खास. मग तूं हा कोणाचा आणला आहेस?"

"माई," ती बैरागीण बोलूं लागली, "मी कोठें भिक्षा मागावयाला गेलें तर 'तूं धट्टीकट्टी आहेस, तुला भीक मागावयाला काय झालें आहे!' असं जे ते मला म्हणत. तेव्हां मला वाटूं लागलें कीं, आपल्याजवळ एखादें तान्हें मूल असेल, तर त्याच्या नांवावर आपल्याला भिक्षा मिळवितां येईल. पण आतां मूल आणावयाचें कोठून? अशा विवंचनेमध्यें मी असतां मला एक ब्राह्मणाची गरीब भेटली. तीही माझ्यासारखीच भिकारीण होती. तिला बाळंत होऊन फार तर एक महिना झाला असेल. बाळंत झाल्यापासून ती आजारी पडलेली आहे. तिला खावयाला कांहीं मिळत नाहीं, आणि तिचें मूल तर नेहमीं अंगावर तोंडीत असे. तेव्हां ती अगदीं वैतागून जात असे, आणि कोणी हें मूल घेईल तर त्याला मी तें देऊनसुद्धां टाकीन, इतक्या निकरापर्यंत ती त्रासलेली होती. मी पाहिलें कीं आपला मुलगा दुसऱ्याला देण्याला ही आई बरी आहे! मी तिच्यापाशीं गोष्ट काढिली आणि तिनें ती कबूल केली. 'मी हें तुझें मूल दररोज थोडा वेळ तुझ्यापासून मागून घेऊन भिक्षेला जात जाईन. आणि ह्या मुलाच्यामुळें दया येऊन लोक मला जें कांहीं येतील, त्यांतील निम्में मी आपल्याला ठेवून घेऊन बाकीचें निम्में मी तुला देईन, आणि त्याच वेळीं तुझें उसनें घेतलेलें मूल तुझें तुला दररोज परत करीत जाईन.' असें मी तिला सांगितलें. तेव्हां ती कबूल झाली; आणि तेव्हांपासून हें तिचें मूल घेऊन 'हें माझें महिन्याचें कोंवळें मूल

आहे! वनवासी आहे! त्याचा बाप मरून गेला आहे! ह्याला दुधाला कोणी एक पैसा द्या हो!' असें म्हणत मी या मुलाच्या नांवावर आपलें पोट भरीत असतें!"

"हाय! हाय!" ही हकीकत ऐकून सीताबाई म्हणाल्या, "देवा, काय ही दशा! आणि काय ही गरिबीची पराकाष्ठा!—बाई, ह्या मुलाच्या आईच्यानें हें सोन्यासारखें मूल असल्या कामाकरितां तुझ्याजवळ देववतें तरी कसें!"

"देववतें कसें?" ती बैरागीण म्हणाली, "ती माझ्याजवळ हें मूल भिक्षेकरितां देते, यांत कांहींच आश्चर्य नाहीं! कोणी कायमचें सांभाळावयाला घेईल, तर त्याला हें द्वाड कार्टें—हा रडवा परशुराम—देऊन टाक, असें देखील ती मला नेहमीं म्हणत असते. पण माझें पोट त्यावर भरत असतें, म्हणून मीच तें कोणाला देत नाहीं."

"नको ग या बाळाला द्वाड कार्टें असें म्हणूं!" त्याच्या हनुवटीला प्रेमानें हात लावीत लावीत सीताबाई म्हणाल्या. "कुठें ग तो रडतो आहे?—परशुराम का याचें नांव? किती तरी चांगलें नांव आहे!—बाळा परशुरामा, रडूं नको हां बाबा!"

"आतां त्याला दूध प्यावयाला मिळालें आहे, म्हणून रडत नाहीं." त्या बैरागिणीनें ताबडतोब उत्तर दिलें. "नाहीं तर एकसारखा टाहो फोडीत असतो! आणि आपल्या आईला तो इतका नकोसा जीव करून सोडतो कीं, उद्यां त्याला कोणाला तरी देऊन टाक, असें ती बिचारी रोज मला सांगत असते."

"मग हें मूल तुम्हांला इतकें जड झालें असलें, तर तें तूं आम्हांला देतेस का? आम्ही त्याचें पालनपोषण करूं." रामचंद्रावांनीं विचारलें.

"हें माझ्या उपजीविकेचें साधन तुम्हांला देऊन मग मी काय खाऊं?" बैरागिणीनें नकारार्थी मान हलवून म्हटलें.

"तुला आम्ही शंभर रुपये देतों." रामचंद्रराव म्हणाले.

"आणखी त्या मुलाची आई काय खाईल?" बैरागिणीच्या तोंडाला पाणी सुटत चाललें.

"तिच्याकरितां आणखी निराळे शंभर रुपये आम्ही देतों; पण हें मूल तूं आम्हांला दे." सीताबाई त्या बैरागिणीच्या मांडीवरून तें मूल उचलून घेत घेत म्हणाल्या.

दोनशें रुपयांवर सौदा ठरला. रामचंद्ररावांनीं रुपये दिले. सीताबाईंनीं तें मूल आपल्या मांडीवर घेतलें आणि ती बैरागीण ते दोनशें रुपये घेऊन निघून गेली.

जें मूल त्या बैरागिणीनें रामचंद्ररावांना विकलें, तें कोणाचें मूल आणि त्याची आई कोण, याची कल्पना वाचकांना थोडीबहुत आलीच असेल. त्या मुलाची आई बाळंतपणाच्या क्लेशानें, दुखण्याच्या यातनेनें आणि गरिबीच्या उपासमारीनें अगदीं कंटाळून गेलेली होती. आणि त्यामुळें तिचा स्वतःचा जीव देखील तिला नकोसा झाला होता. अशा मानसिक अवस्थेच्या झटक्यामध्यें "हें मूल माझ्यानें संभाळवत नाहीं, हें तूं परत आणूं नकोस; कोठें चांगल्या ठिकाणीं पडत असेल, तर कोणी घेतल्यास देऊन देखील टाक !" असे उद्‌गार तिच्या तोंडून कधीं कधीं निघत असत. आपल्या अनाथ दशेमुळें या बिचाऱ्या अर्भकाचे प्राण जाऊं नयेत, आणि आपल्यापाशीं नाहीं तर नाहीं, पण दुसरीकडे कोठें तरी तें बिचारें मूल जिवंत आणि सुरक्षित रहावें, या अगदीं शेवटच्या आणि निकराच्या विचारा-मुळेंच त्या आईच्या तोंडून वर दिल्याप्रमाणें उद्गार निघत असत. नाहीं तर एरवीं कोणती आई आपलें मूल अशा रीतीनें दुसऱ्याला देऊन टाकण्याला तयार होणार आहे ! पण केवळ दुःखाच्या कडेलोटाच्या भरामध्यें उच्चारले जाणारे असले हे वैतागाचे शब्द नेहमींच अगदीं अक्षरशः पाळले जावेत, अशी बोलणा-राची कधींही खरी इच्छा नसते, ही गोष्ट त्या बैरागिणीच्या लक्षांत बिलकूल आली नाहीं. वैतागलेलें मन आणि शांत झालेलें मन हीं दोन मनें अगदीं निरनिराळीं असतात. तीं जरी एकाच मनुष्याच्या देहामध्यें वास्तव्य करीत असलीं, तरी देखील तीं दोन निरनिराळ्या मनुष्यांचींच मनें जणूं आहेत कीं काय, अशी त्यांची वर्तणूक असते. रागावलेलें, खवळलेलें आणि वैतागलेलें मन जें काय करतें, तें शांत झालेलें मन कबूल करीत नाहीं; किंबहुना कित्येक प्रसंगीं तें त्याला खरोखर आठवतसुद्धां नाहीं ! एका मनुष्यानें केलेली गोष्ट दुसऱ्या मनुष्याला जशी मान्य होणें किंवा आठवणें शक्य नसतें, त्याचप्रमाणें ह्या एकाच माणसाच्या देहांतील, पण भिन्न भिन्न अवस्थांतील मनांची कित्येक वेळां स्थिति होते. पण त्या स्थितीची बिचाऱ्या बैरागिणीला यत्किंचितही कल्पना न येऊन, तिनें तें मूल रामचंद्ररावांना दिलें. आपण आपल्या जोडीदार भिकारणीचें एक मोठें काम केलें, आणि आपण तिला एका मोठ्या संकटांतून सोडविलें, अशा भावनेनें उत्पन्न होणाऱ्या आनंदाच्या भरामध्यें ते तिच्या वांटणीचे शंभर रुपये

घेऊन ती बैरागीण रोजच्याप्रमाणें संध्याकाळीं त्या मुलाच्या आईकडे—गंगाबाई-कडे—गेली. आणि ते रुपये तिच्यापुढें ठेवून तिनें गंगाबाईला झालेली सर्व हकीकत सांगितली !

आपलें मूल बरोबर परत आणल्यावांचून ती बैरागीण एकटी आलेली पाहून पहिल्यानेंच गंगाबाई अगदीं कावरीबावरी झाली. आणि जरी ती आजारीपणामुळें जमिनीवर पडून होती, तरी मुलाशिवाय ती आलेली पाहून गंगाबाई ताडकन् उठून ' माझा परशुराम कोठें आहे ? ' असें विचारूं लागली. आणि जेव्हां त्या बैरागिणीनें सांगितलेली हकीकत तिनें ऐकिली, तेव्हां तर ती एखाद्या वाघिणी-प्रमाणें त्या बैरागिणीच्या अंगावर चवताळून जाऊं लागली व पुत्रवात्सल्याच्या अतिरेकामुळें खवळून जाऊन ही तिला फाडून खाते कीं काय, असें क्षणभर वाटलें. आपण हिला हिच्या मुलाच्या त्रासांतून सोडविल्याबद्दल असा परिणाम होईल; आणि ही एखाद्या नागिणीप्रमाणें आपल्यावरच उलटून येईल, ही त्या बैरागिणीला कधीं कल्पनाही आलेली नव्हती. आणि असें होणें अगदीं साहजिक होतें. कारण, तिला अद्यापि कधीं मूलबाळ कांहीं झालेलेंच नव्हतें !

गंगाबाई तिला म्हणूं लागल्या, " तूं माझें मूल मला आणून दे ! माझें बाळ—माझा परशुराम—तूं दुसऱ्याला देऊन कां टाकलास ? "

" अग, " ती बैरागीण म्हणाली, " मी तुझ्यापासून तुझें मूल घेऊन जात असें, तेव्हां रोज तूं मला असें म्हणत असस कीं, हें मेलें रडवें कार्टे कोणी घेतलें, तर त्याला देऊन टाक ! म्हणून मी दिलें ! "

" मी असें म्हटलें ? " गंगाबाई डोळे लाल करून आणि देहभान विसरून जाऊन म्हणाल्या. " मी तुला कधीं असें सांगितलें नाहीं ! आणि एखादे वेळीं त्रासून मी असें म्हटलें असलें, म्हणून तूं लगेच माझ्या बाळाला लोकाला देऊन टाकावेंस, असें माझ्या मनांत कधीं नव्हतें ! अग, आया आपल्या मुलांना वाटेल तसें बोलतात; म्हणून तें काय सगळें जसेंच्या तसें अगदीं खरेंच मानावयाचें असतें कीं काय ? आया आपल्या मुलांना ' अरे मेल्या ' असें प्रत्येक शब्दगणिक म्हणत असतात; पण त्याच वेळेला त्या आपल्या मनांतून त्याच्यावर आपल्या जीवापेक्षांही जास्त प्रेम करीत असतात, हें तुला माहीत नाहीं ?—अथवा तुला तें कोठून असणार ! तूं बोलून चालून वांझोटी ! आयांचें प्रेम तुला वांझोटीला कोठून माहीत असणार ? तूं कधीं कोणाला व्यालीसच नाहींस, तर आपल्या मुलाकरितां

त्याच्या आईचें मन कसें तिळ तिळ तुटत असतें, याची कल्पना तुझ्या पाषाण-हृदयाला कोठून येणार? तूं माझें सोन्यासारखें मूल देऊन टाकलेंस, आणि त्याच्या मोबदला मला हे शंभर रुपये आणून देतेस याची तुला लाज कशी वाटत नाहीं? आपलें पोट फाडून आलेल्या मुलाची कोणत्या आईला किंमत होत असते? मला कोणी सगळें त्रिभुवन देऊं लागलें, तरी त्याच्यापेक्षां माझें बाळ—माझा परशुराम—हाच मला जास्त आहे! लाखों रुपये त्याच्यावरून ओंवाळून टाकावेत, इतकी माझ्या मुलाची मला किंमत आहे. तो माझा मुलगा तूं मला परत आणून दे—माझा परशुराम आतां कोठें असेल? त्याला कोणी घेतलें असेल? त्याला दूध कोण पाजील? त्याला अंगावर प्यावयाला कोण घेईल? त्याला भूक लागली तर तो कोणाच्या तोंडाकडे पाहून रडेल? आणि तो हंसूं लागला तर त्याचें कोण कौतुक करील? माझ्यासाठीं तो यावेळीं सुद्धां रडत असेल! मला वाटतें, मला त्याचें रडणें येथें सुद्धां ऐकूं येत आहे! चल, तूं या पावलीं माझ्याबरोबर चल. आणि जेथें तूं माझ्या मुलाला देऊन टाकलेंस, तेथें मला घेऊन चल. मी त्यांच्या हातींपायीं पडेन, आणि माझें मूल मला परत द्या, अशी मी त्यांची विनवणी करीन. ज्यांनीं माझें मूल घेतलें असेल, त्यांना मुलाची आवड असेल, म्हणूनच त्यांनीं तें घेतलें असलें पाहिजे. त्यांनीं माझें आईचें मागणें ऐकिलें, तर आईची आणि मुलाची ताटातूट त्यांच्यानें कधींही करवणार नाहीं! तें माझें मूल खात्रीनें मला परत देतील. त्यांचे हे शंभर रुपये आणि त्यांनीं तुला दिलेले शंभर रुपये हे सगळे बरोबर घेऊन चल. तुला मी शंभर रुपये मिळवून देईन, पण आपण हे त्यांचे पैसे त्यांना देऊन आपलें मूल आपण परत आणूं; चल!"

असें म्हणून गंगाबाईनें अतिशय हट्ट धरिला, तेव्हां त्या बैरागिणीचाही निरुपाय झाला. आणि त्या दोघीजणी त्या तिनसांजच्या अंधारांतून बाहेर निघाल्या, आणि गंगेच्या कांठच्या ज्या देवळांत रामचंद्रराव दुपारच्या प्रहरीं उतरले होते, तेथें त्या दोघीजणी आल्या. पण तेथें त्या वेळीं कोण होतें? तेथें कोणीही नव्हतें! दुपारचें तीर्थश्राद्ध आणि जेवणखाण झाल्यावर रामचंद्रराव आणि इतर मंडळी तेथून दुसऱ्या मुक्कामावर केव्हांच निघून गेली होती! त्या देवळांत कोणी नाहीं, आणि तेथें उतरलेले उतारू पुढें कोठें गेले हें समजण्याला दोघींनाही कांहीं मार्ग नाहीं, अशा स्थितीत आतां आपल्याला आपलें मूल परत मिळण्याची

कांहीं एक आशा नाहीं, असें पाहून गंगाबाईची अतोनात निराशा झाली; तिचे दुःखाचे उमाळे तिच्या पोटांत मावेनातसे झाले; त्या रात्रीच्या वेळीं गंगेच्या कांठच्या त्या ओसाड आणि भयाण देवळामध्यें एखाद्या पिशाच्चाप्रमाणें ती मोठ्या-मोठ्यानें रडूं लागली; आणि त्या देवळाच्या उंबरठ्याच्या दगडावर ती आपलें डोकें आपटून घेऊं लागली. तिचा संताप अनावर झाला. तिचें डोकें फिरून गेलें, आणि मुलासाठीं ती वेडी झाली. त्या उन्मादाच्या भरांत ती जेव्हां अगदीं वेड्यावेड्यासारखें करूं लागली, गंगेंत जीव द्यावयाला जाऊं लागली, आणि रागाच्या आवेशामध्यें त्या बैरागिणीच्या अंगाचे खरोखरच लचके तोडूं लागली तेव्हां ती बिचारी बैरागीण अगदीं घाबरून गेली, आणि आतां हिच्यापासून कोठें तरी दूर पळून गेल्यावांचून आपला निभाव लागावयाचा नाहीं, असे मनांत आणून ती त्या रात्रीच्या काळोखांत कोठें नाहींशी झाली त्याचा पत्ता लागला नाहीं. गंगाबाई मात्र त्या काळोखांतून आक्रोश करीत आणि आपल्या मुलाला शोधीत इकडे तिकडे फिरत होती ! अशा स्थितींत फिरतां फिरतां तिचें भटकलेलें मन जरी थकलें नाहीं, तरी तिचे भटकणारे पाय थकले आणि ती तेथेंच त्या देवळांत झोंप लागून पडली !

सकाळ झाल्यावर ती जागी झाली, पण तिचें मन कांहीं जागें झालें नाहीं; तें अर्धवट वेडाच्या लहरीत कायम होतें ! तेव्हांपासून पुढें ती कोठें तरी भटकूं लागली आणि वेडाच्या भरामध्यें कांहीं तरी बरळत असे. पण तिचें तें सगळें वेड मुलाच्याच संबंधाचें होतें आणि त्यामुळें तिच्या बोलण्याचालण्यांत जेव्हां तेव्हां तिच्या मुलासंबंधींचेंच विचार येत असत. तिचें मूल आतां वास्तविक तिच्यापासून नाहींसें झालेलें होतें; परंतु बरेच वेळां वेडाच्या भरामध्यें तिची अशी लहर लागे कीं, त्यामुळें—आपले मूल आपल्याजवळच आहे,--अशी भावना तिच्या मनांत उत्पन्न होई आणि मग त्या मुलाला उद्देशून ती वेळोवेळीं निरनिराळ्या प्रसंगाचीं गाणीं म्हणे. तिचीं तीं पुत्रवात्सल्याच्या रसानें ओतप्रोत भरलेलीं गाणीं मूळचींच फार प्रेमळ होतीं; पण जवळ नसलेल्या मुलाला तो जवळ आहे असें वेडाच्या भरामध्यें मानून म्हटलीं जाणारीं तिचीं तीं गाणीं जास्तच हृदयद्रावक होत असत. आणि त्या शोकदायक प्रसंगांतील विप्रलंभानें वाढविलेला करुण रस इतक्या पराकाष्ठेला जाऊन पोंहोचत असे कीं, हृदयाचें झालेलें पाणी डोळ्यांतील अश्रूंच्या रूपानें कितीही बाहेर आलें, तरी तें थोडेंच वाटत असे ! तिचें मूल तिच्या-

जवळ होते, तोंपर्यंत त्याच्या कपाळीं कधीं फाटक्या फडक्याच्या झोळीचा देखील पाळणा लागला नाहीं! परंतु तिचें मूल नाहींसें होऊन ती जेव्हां वेडाच्या साम्राज्यामध्यें शिरली, तेव्हांपासून मात्र तेथें तिला कशाचीही उणीव उरली नाहीं! एकदां तिनें आपल्या मुलाच्या जन्माचा आजचा बारावा दिवस आहे, असें कल्पून वेडाच्या भरांत त्याला पाळण्यांत घालण्याची तयारी केली; आणि " **गोविंद घ्या कुणि गोपाळ घ्या !** " हें प्रेमळ गाणें अतिशय प्रेमळ स्वरानें म्हणण्याला तिनें सुरुवात केली! जवळ मूल नाहीं, पाळणा नाहीं, पाळण्यांत घालणाऱ्या बायका नाहींत आणि नुसते " **गोविंद घ्या कुणि गोपाळ घ्या** " ह्या गाण्याचे कोरडे प्रेमळ प्रवाह मात्र फुकट वाहत चाललेले आहेत, असें पाहून कोणाच्या अंतःकरणामध्यें कालवाकालव होणार नाहीं! तरी पण आपल्याजवळ मूल नाहीं किंवा पाळणा नाहीं, असें गंगाबाईला कधीं वाटलें नाहीं. आपण पाळण्याची दोरी धरून आपल्या मुलाला निजवीत आहों, अशा पूर्ण भावनेनें ती पुढील पाळणाही कधीं कधीं मोठ्या प्रेमळ स्वरानें म्हणत असेः—

**जोजो जोजोरे कुळभुषणा ॥ दशरथनंदना ॥ निद्रा करिं बाळा मनमोहना ॥ रामा लक्ष्मणा ॥ पाळणा लांबविला अयोध्येसी ॥ दशरथाचे वंशीं ॥ पुत्र जन्मला हृषिकेशी ॥ कौसल्येचे कूशीं ॥ १ ॥ रत्नजडित पालख ॥ झळके अमोलिक ॥ वरते पहुडले कुळदिपक ॥ त्रिभुवननायक ॥ हलवी कौसल्या सुंदरी ॥ धरुन ज्ञानदोरी ॥ पुष्पें वर्षती सुरवरी ॥ गर्जति जयजयकारी ॥ जोजो ॥ २ ॥**

कल्पनेच्या साम्राज्यांतील श्रीमंतीचा यथेच्छ उपभोग घेणाऱ्या गंगाबाई-सारख्या बाईला कशाचा तोटा असणार? तिनें एकदां आपल्या मुलाकरितां—आपल्या परशुरामाकरितां—मोत्यांचा पाळणा निर्माण केला! आणि आपण कामांत गुंतल्याकारणानें आपल्या हाताखालच्या दासींना सांगण्यासाठीं तिनें एकदां पुढील गाणें म्हणण्याला सुरुवात केली!

**पंढरपूर परगणा ॥ विठूच्या दरवाज्यावर मोत्यांचा पाळणा ॥ हलवा ग बायांनो ॥ हलवा ग सख्यांनो ॥ माझ्या परशूरामाला ॥ मी गुंतलें कामाला ॥**

जवळ परशुराम नाहीं, मोत्यांचा पाळणा नाहीं, आणि तो हलवावयाला जवळ कोणी आयाबायाही नाहींत! पण वेडाच्या भरांत हें समजतें आहे कोणाला!

एकदां एक गाय वाटेनें येतांना गंगाबाईच्या दृष्टीस पडली. लगेच तिला आपल्या मुलाला दूध पाजण्याची आठवण होऊन गंगाबाई त्या गाईला उद्देशून म्हणाली,

**ये ग तूं ग गाई, वासराचे आई ॥**
**माझ्या तान्ह्याला दूध देई, परशुरामा ॥**

ही प्रेमळ ओंवी गंगाबाईच्या प्रेमळ हृदयांतून निघाल्याबरोबर त्या गाईलाही पान्हा फुटला. पण गंगाबाईचें तें तान्हें बाळ—तो तिचा परशुराम—कोठें आहे! त्याच्यावांचून त्या गाईलाही फुटलेला पान्हा फुकट गेला!

आपला मुलगा मोठा झाला आहे, त्याच्या पायांत घागऱ्या घातलेल्या आहेत, आणि तो कोठें तरी जवळपास खेळत असून त्या घागऱ्यांचा आवाज आपल्याला प्रत्यक्ष ऐकूं येत आहे, असा तिला एखादे वेळीं भास होई, आणि एकीकडे तोंडानें—

**घागऱ्या घुळूघुळू, दणाणला माझा सोपा।**
**खेळतो प्राणसखा, परशुराम ॥**
**घागऱ्यांचा नाद, पडतो माझ्या कानीं।**
**खेळतो वृंदावनीं, परशुराम ॥**

अशा प्रकारच्या ओंव्या म्हणत म्हणत, ती लक्ष लावून आणि उजव्या कानामागें उजवा हात लावून, बराच वेळपर्यंत कानोसा घेत असे. आणि घागऱ्यांचा आवाज खरोखरच ऐकूं येईल काय, अशी आशा धरून इकडे तिकडे कावरीबावरी होऊन ती पहात असे. पण जेथें मुळीं मूलच जाग्यावर नाहीं, तेथें घागऱ्यांचा आवाज तरी कोठून ऐकूं येणार! आणि खुराखुरा परशुराम तरी कोठून दृष्टीस पडणार! येथून तेथून सगळा भ्रमाचा आणि दुःखाचा समुद्र पसरलेला! आणि त्यांत गंगाबाई आकंठ बुडून गेलेली, अशी स्थिति होती!

एखादे दिवशीं संध्याकाळची वेळ झाली असतां आपला मुलगा कोठें तरी वाटेंत खेळत आहे, असा भास होऊन ती त्याला उद्देशून--

**तिनसांजा झाल्या, गुराबासरांची वेळ।**
**वाटे निराळा सख्या खेळ, परशुरामा ॥**

अशी ओवी म्हणत असे. आणि दिवे लागल्यावर दृष्ट काढण्याची वेळ झाली म्हणजे

**जळो जळो दृष्ट, मिठाचें झालें पाणी ॥**
**बाळ माझें फुलावाणी, कोमेजलें ॥**
**पापिणीची दृष्ट, चुलीमध्यें पडो ॥**
**माझा कडूलिंब वाढो, परशुराम ॥**

अशा ओंव्या म्हणून ती आपल्या मुलाची दृष्ट काढण्याची तयारी करीत असे. पण जेथें मूल नाहीं आणि त्याची दृष्ट काढण्याला मीठ-मोहऱ्या देखील नाहींत, तेथें अखेरीस अश्रुपुरावांचून दुसऱ्या कशाची प्राप्ति व्हावयाची आहे !

रात्र झाली म्हणजे वेडाच्या भरांत गंगाबाईला असें वाटे कीं, आतां आपण आपल्या मुलाला निजविलें पाहिजे. आणि म्हणून ती आपल्या मुलाला निजविण्याच्या ओंव्या पुढीलप्रमाणें अतिशय सुंदर आणि गोड गळ्यावर म्हणत असेः—

**अंथरूण केलें, जाई मोगऱ्याचें ।**
**बाळ गोजिऱ्याचें, परशूराम ॥**
**निजेस रे आले, तान्हुल्या तुझे डोळे ।**
**भोंवरे विसावले, पाळण्याचे ॥**

पण जेथें पाळणा नाहीं आणि परशुरामही नाहीं, तेथें झोंप तरी कोणाला लागावयाची आहे ! बिचारी गंगाबाई देखील पुत्रशोकामुळें साऱ्या रात्रभर वेडाच्या भरांत तळमळत पडत असे. अशा ताटकळलेल्या स्थितीमध्यें तिला एखादे वेळीं आपल्या नवऱ्याची आठवण झाली, म्हणजे तर तिच्या शोकाला पारावारच उरत नसे. अशा स्थितींत एकदां तिच्या मनांत पुढील विचार प्रादुर्भूत झाले. ती आपल्या मनांत आपल्या प्रिय पतीला आठवून त्याला म्हणालीः— " हे माझ्या प्रियकरा, तुम्ही कोठें आहां ? माझी ही अवस्था तुम्ही पहात नाहीं काय ? आणि मी अशा स्थितींत असतांनाही तुम्ही मला कांहींच साहाय्य करीत नाहीं, हें कसें ? अहो, आपलें बाळ कोठें नाहींसें झालें आहे ! मला तें कोठें सांपडत नाहीं ! तुम्ही त्याचा कांहीं शोध करूं नये काय ? तुमची माझी ताटातूट झाल्यापासून मी माझ्या गर्भांत असलेल्या या बाळाच्या आशेवर दिवस काढले !

पुढें मी बाळंत झालें, आणि मला देवाच्या दयेनें मुलगा झाला! मला मुलगा झाला, तर त्याचें काय नांव ठेवावयाचें, आणि मुलगी झाली तर तिचें काय नांव ठेवावयाचें, हें आपण दोघांनीं एके रात्रीं ठरविलें होतें, तें तुम्हांला आठवतें ना? त्यांत मुलाचें नांव परशुराम ठेवावें, असें आपलें म्हणणें होतें. त्याप्रमाणें मी त्या मुलाचें नांव परशुराम असेंच ठेविलें. नांव ठेवावयाच्या वेळेला देखील दुसरें कोणी जवळ नव्हतें! माझें मीच एकटीनें नांव ठेविलें! तुमच्या इच्छेप्रमाणें मी त्याचें परशुराम असें नांव ठेविलें! तुम्हांला परशुराम हें नांव फार आवडत असे. ब्राह्मणांमध्यें परशुराम हा अतिशय शूर होता, आणि त्यानें सगळी पृथ्वी जिंकून फिरून ती ब्राह्मणांना दान दिली. ह्या गुणासाठीं परशुराम हें नांव तुम्हांला फार आवडत होतें. आईच्या दृष्टीनें परशुराम हें नांव मला फारसें आवडलें नव्हतें; पण माझी आवड ही तुमच्या आवडीपेक्षां कांहीं निराळी का असूं शकणार आहे? तुम्हांला जें नांव आवडलें, तेंच मला आवडलें! आणि म्हणून मीं त्याचें परशुराम असेंच नांव ठेविलें! त्याचा तोंडवळा अगदीं माझ्या तोंडावळ्यासारखा आहे. आणि माझ्या गालावर जसा तीळ आहे, तसाच त्याच्या गालावरही आहे! असा तो आपला परशुराम किती गोड दिसतो आहे म्हणून सांगूं! त्याचें कौतुक करण्याला आपण दोघें आणि तो यांची एकत्र गांठ पडेल तो सुदिन! तो रात्रंदिवस माझ्या डोळ्यांसमोर प्रत्यक्ष दिसत आहे; पण माझ्या हाताला मात्र त्याचा स्पर्श होत नाहीं. मी हल्लीं वेडी झाल्यें आहे, असें लोक मला म्हणतात! पण मी तरी दुसरें काय करूं? माझा जीव जाईल तर बरें! पण तोही जात नाहीं! इतके दिवस मला फक्त तुमचाच शोध करावयाचा होता; पण आतां तुमचा आणि तुमच्या मुलाचा असा दोघांचाही शोध करण्याचें काम माझ्यावर येऊन पडलें आहे. आतां मी तुम्हांला कोठें शोधूं!"

असे विचार तिच्या मनामध्यें रोज उत्पन्न होत असत; आणि ते तिला अतिशय दुःख देण्याला कारणीभूत होत असत.

• • •

: : # रांग अठरावी

गंगाबाईना वेड लागण्याच्या पूर्वी आणि त्या बाळंत होण्याच्या पूर्वी प्रयागामध्यें गणपतिभय्याच्या घरीं त्या राहत होत्या, हें वाचकांना माहीतच आहे. आणि त्या तेथें राहत असतांना त्यांची तेथील वागणूक इतकी सरळपणाची, इतकी सज्जनपणाची आणि इतकी मनमिळाऊपणाची होती कीं, गणपतिभय्याच्या कुटुंबांतीलच त्या एक जण आहेत, असें सर्वांना वाटूं लागलें होतें. व त्यांच्या बाळंतपणाच्या वेळीं त्यांची सर्व तरतूद करण्याचें गणपतीभय्याच्या घरांतील मंडळींनीं ठरविलें होतें. तरी पण गंगाबाईचें नशीब फार खडतर! तिच्या कपाळींच जर सुख लिहिलेलें नाहीं, तर तें त्या बिचारीला कोठून मिळणार? गणपतीभय्याची बायको अल्पवयीच होती; पण ती स्वभावानें फार प्रेमळ आणि निष्कपटी अशी होती. तिचेंही प्रेम गंगाबाईवर फार बसलेलें होतें, व 'तूं कांहीं काळजी करूं नको, तूं माझ्या बहिणीसारखी आहेस, मी तुझें बाळंतपण करीन, आणि तुला मी कांहीं कमी पडूं देणार नाहीं!' असें गणपतीभय्याची बायको गंगाबाईला वारंवार म्हणत असे; परंतु हा त्या दोघींच्यामधील प्रेमभाव फार दिवस टिकला नाहीं.

गणपतीभय्याची पत्नी जरी अशा रीतीनें प्रेमळ स्वभावाची आणि पवित्र आचरणाची होती, तरी खुद्द गणपतीभय्या हे कांहीं तसे नव्हते. त्यांच्या पाठीमागें पुष्कळ कुलंगडीं असत. त्यांतच ते एका वेश्येच्याही नादीं लागलेले होते. ती वेश्या गणपतीभय्याच्या बायकोचा तर द्वेष करीतच असे; परंतु त्यांच्या घरांत गंगाबाई रहावयाला आल्यापासून तिच्या मनांत गंगाबाईच्या विषयींही अतिशय मत्सर उत्पन्न झाला. गंगाबाई ही स्वाभाविकपणेंच स्वरूपानें अतिशय सुंदर होती. त्यामुळें तिच्यावर मन बसून गणपतीभय्याचें आपल्यावरील प्रेम कमी होईल,

अशी त्या वेश्येला साहाजिकपणेंच भीति वाटूं लागली. म्हणून ही बाई गणपती-भय्याच्या घरांतून जितक्या लौकर निघून जाईल तितक्या लवकर ती जावी, अशा हेतूनें तिचे नेहमीं प्रयत्न चाललेले होते. त्या धोरणाला अनुसरून ती वेश्या गणपतीभय्याच्या बायकोचें मन हळुहळू कलुषित करूं लागली होती. तरी पण गणपतीभय्याची बायको बाळंत होईपर्यंत गंगाबाईला कोणी घरांतून घालवून देण्याला कबूल होणार नाहीं, हें त्या वेश्येला पक्कें माहीत असल्यामुळें तिनें तोंपर्यंत कसेबसे दिवस काढले. परंतु गणपतीभय्याची बायको बाळंत झाल्यानंतर तिजपाशीं ती वेश्या गंगाबाई आणि गणपतीभय्या यांच्या दरम्यान कांहीं संशयास्पद संबंध असावा, अशाबद्दल मधून मधून अस्पष्ट रीतीनें बोलूं लागली. आणि त्या मत्सराच्या विषाचा परिणाम गणपतीभय्याची बायको—सरस्वतीबाई—हिच्या मनावर हळूहळू होऊं लागला. पूर्वी जेथें भगिनीप्रेम होतें तेथें आतां सवती-मत्सर वाढूं लागला. गंगाबाईनें आपल्या येथें वाटेल तितके दिवस रहावें, असें सरस्वतीबाईला जें वाटत होतें, तें पार नाहींसें होऊन, ही अवदसा आपल्या घरांतून केव्हां जाईल, असें सरस्वतीबाईला वाटूं लागलें होतें. सरस्वतीबाईच्या ह्या मत्सरी वेडगळपणामुळें तिच्याबद्दलचें गणपतीभय्याचें मनही अगदीं बदलून गेलें. गणपतीभय्या हा जरी चांगल्या चालीचा मनुष्य नव्हता, तरी गंगाबाईच्या संबंधानें त्याच्या मनामध्यें पापवासना बिलकूल नव्हती. आणि गंगाबाईची मूर्तीही इतकी शांत, पवित्र आणि पुण्यकारक होती कीं, ती मूर्ति कोणीं पाहिली, तर ज्याच्या मनामध्यें दुर्वासना असतील, त्या मनुष्याचेही अंधकारमय विचार तिच्या पातिव्रत्याच्या तेजानें पार धुऊन जात असत. मग नवीन कुविचार उत्पन्न होण्याची गोष्ट तर लांबच राहिली. अशा कारणामुळें गंगाबाईसंबंधानें गणपतीभय्याचें मन गंगाजलाप्रमाणें अगदीं निर्मल होतें. आणि असें असून आपली पत्नी आपल्याबद्दल भलभलते संशय मनांत आणते, हें पाहून तिच्याबद्दल त्याला अतिशय वाईट वाटत असे, आणि एखादे वेळीं अतिशय रागही येत असे. पण ह्यामुळें गणपतीभय्याच्या वेश्येचे हेतु मात्र बरेच तडीस जाण्याचा रंग दिसूं लागला. सरस्वतीबाईच्या बाळंतपणाचे पहिले कांहीं दिवस संपले, कीं गंगाबाईची घरांतून हकालपट्टी केल्यावांचून सरस्वतीबाई रहात नाहीं, हें अगदीं ठरल्यासारखेंच झालें होतें. ही त्या वेश्येच्या मनाप्रमाणें होणारी पहिली गोष्ट होय. आणि दुसरी गोष्ट अशी कीं, गणपतीभय्याच्या घरांतून गंगाबाई निघून गेली, आणि गणपतीभय्याचें आपल्या बायको-

वरील प्रेम तिच्या निष्कारण आणि निराधार संशयी स्वभावामुळें उडून गेलें, म्हणजे आपल्या प्रेमाच्या वांटेंतील ही दोन्हींही विघ्नें एकमेकांचा घात करून स्वतः विराम पावल्यानंतर गणपतीभय्याचें सगळें प्रेम आपल्या एकटीकडेच वळेल आणि मग त्याच्या प्रेमाचा आणि त्याच्या संपत्तीचा अविच्छिन्न उपभोग आपल्याला घ्यावयाला मिळेल, अशी तिला आशा उत्पन्न झाली; परंतु ती तिची आशा सफल झाली नाहीं. व तिनें केलेल्या अंदाजापैकीं जरी कांहीं भाग बरोबर जमला, तरी बाकीचा तिचा सगळा अंदाज चुकला.

सरस्वतीबाईचें मन अगदीं मत्सरग्रस्त होऊन गेलेलें होतें. त्यामुळें गणपतीभय्या आणि गंगाबाई यांच्या प्रत्येक कृत्यामध्यें अन्योन्य प्रेमाची सावली पडलेली तिला कोठें तरी दिसतच असे. त्यामुळें कोणालाही त्या कुटुंबामध्यें सुख लागेनासें झालें. आणि सरस्वतीबाई गंगाबाईला आपल्या घरांतून घालवून देण्याविषयींचा आपला हेतु स्पष्टपणें आपल्या नवऱ्यापाशीं बोलूं लागली. सरस्वतीबाई आतां बाळंतीण होऊन कांहीं दिवस झाले होते, व गंगाबाईला घरांतून घालविलें तरी आतां तिचें फारसें अडण्यासारखें होतें असें नाहीं. तरी पण तिला गंगाबाईची मदत आणखी कांहीं दिवस असती तर पाहिजे होती. कारण सरस्वतीबाई बाळंत झाल्यापासून अगदीं फिक्कट दिसूं लागली होती. तिला नेहमीं बारिक ताप येत असे, व त्यामुळें मुलाला अंगावर प्यावयालाही कधीं मिळत नसे. आणि तिच्यावर बाळंतरोगाची छाया पडलेली असावी असें पुष्कळ आयाबायांना वाटूं लागलें होतें. अशा स्थितींत तिची आणि तिच्या मुलाची जोपासना करण्याला गंगाबाई घरामध्यें असती तर खरोखरच चांगलें झालें असतें. गंगाबाईची सरस्वतीबाईवर ममता होतीच; पण तिच्या त्या नवीन झालेल्या मुलाला तर ती अगदीं जीव कीं प्राण करीत असे. आणि तो जणूं काय आपलाच मुलगा आहे, इतक्या प्रेमानें ती त्याला वागवीत असे. अशा त्या प्रेमळ बाईला—जिनें संकटसमयीं आपल्यावर उपकार केले त्या गंगाबाईला—तिच्या बाळंतपणाच्या संकटसमयीं अतिशय निष्ठुरपणानें आपण आपल्या घरांतून बाहेर घालवून द्यावें, ही गोष्ट गणपतीभय्याच्या मनाला बरोबर वाटेना. परंतु बायकोच्या मत्सरी स्वभावाच्या पुढें त्याचा कांहीं इलाज चालेना. आणि गणपतीभय्या कृतज्ञतेनें आणि परोकारबुद्धीनें गंगाबाईला तिच्या आपत्काळीं आपल्या घरीं राहवून घेण्याविषयीं जों जों आग्रह करी तों तों आपला नवरा एका परस्त्रीच्या प्रेमाच्या पाशामध्यें पुरा सांपडून गेला आहे, हा सरस्वती-

बाईचा गैरसमज अधिक अधिकच वाढत जाई! अशा स्थितीमध्यें ह्या नवरा-बायकोच्या प्रेमांत आपल्यामुळें बिघाड येऊं नये, अशा उदार आणि उदात्त बुद्धीनें आणि परमेश्वर आपल्या बाळंतपणाच्या संकटातून आपल्याला कसें तरी पार पाडील, अशा दृढ विश्वासानें गंगाबाईनें आपला जाण्याचा निश्चय सरस्वतीबाईला कळविला. तेव्हां तो तिचा जाण्याचा निश्चय ऐकून गणपतीभय्याला अतिशय वाईट वाटलें, आणि सरस्वतीबाईला अतिशय आनंद झाला. ती जावयाला निघाली, तेव्हां तिनें जाऊं नये म्हणून गणपतीभय्यानें मनापासून आणि सरस्वतीबाईनें वरकरणी तिची विनंती केली; परंतु ती विनंति मान्य न करितां जातेवेळीं त्या लहान अर्भकाचें मुखचुंबन घेऊन आणि डोळ्यांत पाणी आणून गंगाबाई तेथून निघाली. गंगाबाई जशी एक भिकारीण या नात्यानें त्या घरीं आली होती, तशीच भिकारीण त्या घरांतून बाहेर पडली! साऱ्या जगांत या वेळीं तिला कोणाचा आसरा नव्हता! संकटकाळीं आश्रयासाठीं म्हणून जें घर जोडण्याचा तिनें प्रयत्न केला, तें घर तिला सोडावें लागलें, यामुळें सगळें आकाश तिला फाटल्यासारखें दिसूं लागलें! आतां आपण कोठें जावें हें तिला कांहीं एक सुचेना! तिच्या डोळ्यांपुढली वाट तिला दिसेना! सगळीकडे अंधकार पसरल्यासारखा झाला! नवऱ्याची तिला आठवण झाली; आणि मला कांहीं कमी नसतां आज माझ्यावर असा प्रसंग आला, असें म्हणून ती रडूं लागली! मी नऊ महिन्यांची गर्भार, आतां मी कोणाच्या दाराशीं जाऊं, आणि कोण मला आश्रय देईल, असें म्हणून ती विलाप करूं लागली; आणि अशा रीतीनें रडत रडत ती वाट चालूं लागली! परंतु ती पुढें कोठें गेली, आणि तिचें पुढें काय झालें, हें त्या वेळीं कोणालाही कळलें नाहीं.

गंगाबाईनें सरस्वतीबाईचें घर सोडलें, तेव्हां गंगबाईला बरेंच वाईट वाटलें. कारण सहवासाचा हा असा परिणाम होतोच. वाटसरू दुपारच्या वेळीं एखाद्या ओढ्याच्या कांठच्या झाडाखालीं क्षणभर उतरला, तर त्या जागेवर सुद्धां त्याचें किती तरी प्रेम बसतें! आणि जुन्या आठवणींच्या उजळणीच्या वेळीं तो त्या प्रदेशाची आठवण किती तरी प्रेमानें आपल्या मनांत घोळीत असतो! मग गंगाबाई तर या घरांत किती तरी दिवस मोठ्या आनंदानें आणि मोठ्या आशेनें राहिलेली होती. तेव्हां अगदीं नववा महिना टेकल्यावर ती जागा सोडून जातांना तिला वाईट वाटलें, तर त्यांत नवल तें काय! फिरून तेथें जावें असें तिला वाटे, आणि

त्या तान्ह्या मुलासाठीं तर तिचा जीव त्या जागेवर इतका गुतून गेला होता कीं, बाळंत झाल्यावर आपण फिरून केव्हां तरी परत येऊन त्या मुलाला पाहूं, असें तिच्या मनाला वाटत होतें. सरस्वतीबाईच्या मनांत गंगाबाईविषयीं मत्सर आणि हेवादावा होता; परंतु गंगाबाईच्या मनांत सरस्वतीबाईच्याबद्दल नेहमीं निष्कलंक प्रेमच वसत होतें. आणि सरस्वतीबाईच्या मुलाबद्दल तर गंगाबाईला इतकें प्रेम वाटत होतें कीं त्याला आपल्या अंगावर घेतलें, तर मला प्रेमातिरेकानें प्रत्यक्ष पान्हा देखील फुटेल, असें गंगाबाई म्हणत असे आणि त्यामुळें तिच्या मनाचा ओढा या जागेकडे फार होता.

पण हा ओढा विशेष बळकट होण्याला आणखीही एक कारण होतें. तें असें:—सरस्वतीबाई बाळंतीण झाल्या आणि त्यांना मुलगा झाला, तेव्हां गणपतीभय्यांनीं त्याचें पुत्रावण मोठ्या थाटानें केलें. त्या वेळीं गंगाबाई बाळंतिणीच्या खोलींत सर्व तयारी करीत होत्या, आणि जें काम पडेल तें करण्याला तयार होत्या. बाहेर ब्राह्मण जमले, गणपतीभय्यांनीं मंगलस्नान केलें, वाजंत्र्यांचे सुस्वर ध्वनि कानावर येऊं लागले, आणि त्यांच्याहीपेक्षां अधिक गोड असे ब्राह्मणांचे पुण्याहवाचनाचे मंत्र सुरू झाले. नंतर दुसरींही कित्येक कृत्यें झालीं, आणि उपाध्यायांच्या सांगण्याप्रमाणें गणपतीभय्यांनीं एका चांदीच्या वाटींतून एका हिऱ्याच्या आंगठीनें थोडीशी मध घेऊन ती आपल्या त्या अचिरप्रसूत पुत्राच्या मुखाला लाविली. हें सगळें कृत्य होत असतांना गंगाबाई बाजूला उभ्या होत्या व त्या हें सगळें पहात होत्या. तें पहात असतां ती हिऱ्याची आंगठी जेव्हां त्यांच्या नजरेस पडली, तेव्हां त्यांच्या चर्येमध्यें एकदम फार बदल झाला! पण तो कोणी पाहिला मात्र नाहीं!

झालें! पुत्रावण झालें! साखर वांटली! ब्राह्मण आपापल्या घरोघर गेले! गंगाबाईनीं साऱ्या सामानाची जिकडच्या तिकडे आवरासावर केली. भांडीं-कुंडीं जेथल्या तेथें लावून ठेविलीं, आणि त्यांतच इतर जोखमीच्या सामानाबरोबर ती मधानें लडबडलेली वाटी आणि हिऱ्याची आंगठी धुऊन स्वच्छ करून गणपतीभय्याच्या जवळ त्यांनीं नेऊन दिली. वाटी आणि आंगठी विसळावयाला कितीसा वेळ लागणार? पण ती आंगठी धुऊन साफ करण्याला गंगाबाईना पुष्कळच वेळ लागला! ती आंगठी त्या फिरून धुवीत आणि फिरून तिच्याकडे पहात, आणि फिरून धुवीत आणि फिरून तिच्याकडे पहात! इतकी त्या आंगठीला मध

कसली लागली होती कोण जाणें ! पण अखेरीस ती आंगठी चांगली स्वच्छ करून मोठ्या कष्टानें त्यांनीं गणपतीभय्यापाशीं दिली, आणि त्या आपल्या दुसऱ्या कामाला लागल्या. पण त्या दिवशीं त्यानंतर त्यांच्या हातून फारसें कांहीं काम झालें नाहीं. त्या आपल्या विचारांतच मग्न होत्या; परंतु घरांतील सगळीं माणसें पुत्रोत्सवामध्यें निमग्न झालीं असल्यामुळें ही गोष्ट कोणाच्याही लक्षांत आली नाहीं. त्या आंगठीसंबंधानें गंगाबाईच्या मनामध्यें नेहमीं कांहीं तरी घोळत असे; परंतु ती त्या घरांत होती तोंपर्यंत तिला त्याविषयीं कांहीं उलगडा करून घेतां आला नाहीं. म्हणून त्यासाठीं आपण फिरून येथें आलें पाहिजे, असें तिला वाटत होतें.

परंतु जरी तिला गणपतीभय्याचें घर सोडते वेळीं असें वाटत होतें, तरी गणपतीभय्याच्या बायकोच्या मत्सरी स्वभावामुळें तिला त्या वेळीं तेथून जाण्याशिवाय दुसरा मार्गच उरलेला नव्हता. म्हणून त्या वेळीं जिकडे वाट फुटली तिकडे ती बिचारी दीन अबला निघून गेली.

दैवगति मोठी विचित्र असते ! गंगाबाई निघून गेली, आणि तिच्याचबरोबर गणपतीभय्याच्या घरांतील आनंदाची स्थितिही निघून गेली ! सरस्वतीबाईच्या तोंडावर पंडु रोगाची आणि क्षयरोगाची छाया दिवसेंदिवस जास्त वाढूं लागली. ओठ काळे पडूं लागले, बोटांच्या नखांतील रक्त नाहींसें झालें, तोंडाला आणि पायांला मधून मधून थोडी सूज येऊं लागली, कफ वाढला, आणि थोड्याच दिवसांत आपला नवरा आणि आपलें लहान मूल यांना सोडून इहलोकची यात्रा संपवून सरस्वतीबाई परलोकवासी झाल्या ! गणपतीभय्यावर हा फारच मोठा दुःखाचा डोंगर कोसळला. आणि त्यांत अंगावरचें लहान मूल पाठीमागें राहिल्यामुळें तर त्यांची फारच पंचाईत झाली. लहान मुलांची जोपासना बायकाच करूं जाणत. तें बायकांचें काम बायकांनींच करावें; आणि तें त्या इतक्या निःसीमपणानें करतात म्हणूनच त्या धन्य होत ! आणि म्हणूनच आईची योग्यता कोणालाही यावयाची नाहीं. तें पुरुषांचें काम नव्हे. त्या कारणामुळें गणपतीभय्या हे अशा अडचणीमध्यें सांपडले कीं, यांतून आतां आपण कसे सुटूं, हें त्यांना कांहीं एक कळेना. त्यामुळें ते ह्या एकंदर संसारासंबंधानें फारच उद्विग्न आणि विरक्त होऊन गेले.

त्यांची जी वेश्या होती, तिनें गंगाबाई त्यांच्या घरांतून गेलेली पाहिली, तेव्हां आपल्या वाटेंतील एक कांटा नाहींसा झाला असें वाटून तिला मोठा आनंद झाला; व आतां गणपतीभय्याचें लक्ष आपल्याकडे वळेल म्हणून ती वाट पाहूं लागली. परंतु पुढें लगेच गणपतीभय्याची बायको आजारी पडली, तेव्हां तिच्या आजारीपणामुळें गणपतीभय्याला आपल्याकडे यावयाला बनत नसलें पाहिजे, असा तिनें तर्क बांधला; परंतु गणपतीभय्याची बायको सुदैवानें मरण पावल्याची आनंदाची बातमी जेव्हां तिनें ऐकिली, तेव्हां तर तिला फारच आनंद झाला. आणि आतां आपल्या वाटेंतील हा दुसराही कांटा नाहींसा झाला, म्हणून तिनें ईश्वराचे धन्यवाद गाइले. आतां गणपतीभय्याची प्रीति आणि संपत्ति हीं दोन्हीही आपल्याच ताब्यांत येणार, अशी ती खात्री बाळगून राहिली. परंतु तिचा आणि गणपतीभय्याचा जरी पूर्वीचा संबंध होता, तरी हल्लींच्या या संकट-परंपरेनें उत्पन्न झालेल्या वैराग्यामुळें तिचा त्याला इतका तिटकारा आलेला होता कीं, तो तिच्याकडे ढुंकूनही पाहीनासा झाला. त्यामुळें पुढें पुढें तिच्या मनांत त्याच्याविषयींच्या प्रेमाच्या जागीं हळुहळू द्वेषाचें बीजारोपण होऊं लागलें. परंतु त्या तुच्छ, हलकट आणि धनलोभी वेश्येचे मनोविकार कसकसे बदलत आहेत, आणि ते आपल्याला अनुकूल होत आहेत किंवा प्रतिकूल होत आहेत याची गणपतीभय्या मुळींच पर्वा करीत नव्हता. आपल्या गळ्यांत पडलेल्या लहान मुलाचें संगोपन आपल्या हातून कसें होईल, या मुख्य विवंचनेमध्यें तो पडलेला होता. या विचाराशिवाय दुसरें कांहीं त्याला सुचतही नव्हतें.

अशा काळजीच्या स्थितीमध्यें कांहीं दिवस लोटत आहेत, तों प्रयागच्या किल्ल्याच्या खालील त्रिवेणीसंगमाच्या जवळील विस्तीर्ण वाळवंटामध्यें इकडून तिकडे भटकत फिरणारी आणि यात्रेकरूंच्याजवळ भिक्षा मागत असलेली अशी एक वेडी बाई गणपतीभय्याच्या नजरेस पडली ! गणपतीभय्याचें तें तान्हें मूल घरांत आई नसल्यामुळें दुसऱ्या कोणापाशीं कधीं रहात नसे. त्यामुळें गणपती-भय्या कोठें बाहेर निघाला, तरी त्याला तें मूल आपल्याबरोबर नेहमीं बाळगावें लागत असे; व तें या वेळींही त्याच्याबरोबर होतें. त्या मुलाला घेऊन गंगेवर जात असतां वर सांगितल्याप्रमाणें एक वेडी बाई त्याच्या नजरेस पडली. तिला पाहिल्याबरोबर ही गंगाबाई म्हणून गणपतीभय्यानें तिला ताबडतोब ओळखलें; पण तिनें मात्र गणपतीभय्याला ओळखलें नाहीं. आणि ती कशी ओळखणार ?

दिवसांतून बहुतेक वेळ तिचें डोकें ठिकाणावर नसे; मधून मधून ती शुद्धीवर येई व शुद्धीवर आली म्हणजे ती चांगल्या रीतीनें वागत असे. अशा वेळीं तिला कोणी पाहिलें तर ही वेडी असेल, असें कोणाच्या मनांतही येत नसे. पण तिच्या मुलाच्या संबंधानें कोठें कांहीं गोष्ट निघाली किंवा कांहीं लांबच्या संबंधावरून तिला तिच्या मुलाची आठवण झाली, म्हणजे तिचें वेड जोरानें उसळत असे. तिची या वेळीं फारच वाईट स्थिति झालेली होती. गणपतीभय्याच्या घरीं ती होती, तेव्हां खाणेंपिणें, वस्त्रपात्र वगैरे सगळें जेथल्या तेथें वेळच्या वेळीं तिला मिळत असल्यामुळें, ती त्या वेळीं साधारणपणें बऱ्या स्थितींत होती; परंतु मध्यंतरीच्या दिवसांत तिच्या फार हालअपेष्टा झाल्या. कित्येक दिवसांत तिला खावयालाही कांहीं मिळालें नाहीं. तिचें वस्त्रावरणही इतकें फाटून गेलेलें होतें, कीं तिच्या अंगावरील त्या लकतऱ्या तिच्या लज्जेचें संरक्षण करण्यालाही समर्थ नव्हत्या! शिवाय बाळंतपणानें आणि आजारीपणानें तर तिचा पहिला नूर कांहींच राहिला नव्हता. आणि त्यांतच तिचा मुलगा नाहींसा होऊन तिला वेड लागल्यामुळें तर तिच्या एकंदर परिस्थितीमध्यें इतका फरक पडला होता कीं, ही गंगाबाईच असेल, असें सुद्धां कोणाला वाटणें शक्य नव्हतें. तरी पण गणपतीभय्यानें तिला ताबडतोब ओळखलें; व तो तिला आपल्या घरीं घेऊन गेला. तिला घरीं नेल्यानंतर तिला स्नान, वस्त्रप्रावरण, जेवणखाण आणि विश्रांति या गोष्टी ताबडतोब मिळाव्या, अशी त्यानें तजवीज केली. अशा रीतीनें तिला बराच वेळपर्यंत विश्रांति वगैरे मिळाल्यानंतर ती साधारणपणें शुद्धीवर आली; व आपण कोठें आलों आहों, आणि आपण जेथें आलों आहों तेथील परिस्थिति कशी बदललेली आहे, वगैरेबद्दलची सर्व हकीगत तिला हळूहळू समजली; तेव्हां तिच्या मनामध्यें पहिला विचार जो आला, तो सरस्वतीबाईच्या निधनासंबंधींचा होय.

सरस्वतीबाई वारल्याबद्दल गंगाबाईला अतिशय वाईट वाटलें. सरस्वतीबाईनें गंगाबाईला पूर्वी जरी पुष्कळ छळलें होतें, आणि तिच्यावर जरी सरस्वतीबाईनें मत्सरग्रस्त बुद्धीनें भलतीं भलतीं नाहक बालंटें घेतलीं होतीं, तरी देखील गंगेच्या पाण्यांत ज्यामाणें मालीन्य नसतें, त्याप्रमाणें गंगाबाईच्या मनामध्यें सरस्वतीबाईविषयीं यत्किंचितही किल्मिष नव्हतें. त्यामुळें सरस्वतीबाईच्या निधनाची बातमी ऐकून गंगाबाईला अति वाईट वाटलें. ही सरस्वतीबाई मरण पावली नव्हे, तर आपली सख्खी बहीण मरण पावली आहे, इतकें तिला दुःख झालें. फूल कुसकरलें

तरी तें वास देतच असतें, त्याप्रमाणें सज्जन माणसाच्या स्वभावाची गोष्ट आहे. गंगाबाईच्या मनाला सरस्वतीबाईविषयीं द्वेष तर कधीं शिवला नाहींच, पण उलट त्यांच्या घरांत आपणाला आश्रय मिळाला याबद्दलच आपल्या डोक्यावर त्यांच्या उपकारांचें ओझें झालें आहे, असेंच गंगाबाईना वाटत असे व हें त्यांचें ऋण आपण कसें फेडूं याबद्दल गंगाबाईना काळजी वाटत असे. तरी पण गंगाबाईचा स्वभाव थोडा अभिमानी होता. म्हणून एक वेळ तिला असें वाटे कीं ज्या घरांतून सरस्वतीबाईनें आपल्याला घालवून लाविलें, त्या घरांत आपण फिरून येणें हें कांहीं बरोबर नव्हे. तरी पण गणपतीभय्याच्या त्या अनाथ आणि पोरक्या मुलाकडे तिची दृष्टि गेली, म्हणजे तिची स्वतःविषयींची अभिमानबुद्धि पार मावळून जात असे. तें मूल पूर्वीपासूनच गंगाबाईच्या फार प्रेमांतील होतें. त्याच्याकडे पाहून ती आपल्या मनाशीं असा विचार करूं लागली कीं, मी आपल्या स्वतःच्या क्षुद्र अभिमानासाठीं या अर्भकाचे हाल करणें हें कांहीं चांगलें नव्हे. माझेंही मूल असेंच कोठें तरी अनाथासारखें पडलें असेल! त्याला नको का कोणी संभाळावयाला? तेव्हां मी जर या अनाथ मुलाला संभाळलें, तर माझ्याही मुलाला कोणी तरी संभाळणारा निघेलच निघेलच! देव कांहीं निष्ठुर का आहे? अशा उदात्त आणि प्रेमळ विचारांनीं गंगाबाईचें मन वर्षाकालांतील गंगेच्या पात्राप्रमाणें नेहमीं दुथडी तुडुंब भरून चाललेलें असे. त्यामुळें ज्या घरांतून आपल्याला हांकून देण्यांत आलें, त्या घरांत आपण फिरून राहूं नये, असें जरी पहिल्या पहिल्यानें तिला वाटलें, तरी आपण येथून निघून गेल्यास या अर्भकाचे हाल होतील, म्हणून आपण येथून जाणें योग्य नाहीं, हा तिचा निश्चय कायम ठरला.

परंतु गंगाबाईला तेथें राहणें आणखीही एका कारणासाठीं इष्ट होतें. गंगाबाई नुकतीच बाळंतीण झालेली होती आणि ती मोठी प्रेमळ आई असल्याकारणानें तिच्या अंतःकरणांतील सगळें पुत्रप्रेम तिच्या अंगावरील दुधामध्यें परिणाम पावत असे, व तिचें मूल तिच्याजवळ होतें तोंपर्यंत त्याचा योग्य विनियोगहि होत असे. परंतु पुढें दुर्दैवानें तिचें मूलच नाहींसें झालें! पण तिचें मूल नाहींसें झालें म्हणून मातृवात्सल्यानें फुटणारा तिचा पान्हा नाहींसा झाला, असें मात्र झालें नाहीं. तिच्या मुलाची तिला आठवण झाली, म्हणजे तिला किती तरी पान्हा फुटत असे! पण तिच्या अंगावरील हें दूध पिण्याला तिचें मूल नसल्यामुळें त्या दुधापासून

तिला अतिशय क्लेश होत असत व तें दूध दुसऱ्या कोणा तरी मुलाला पाजणें तिला जरूर होतें. अशी सोय गणपतीभय्याच्या मुलाला आपल्या अंगावर पिण्याला घेतल्यानें होईल, हा एक गंगाबाईचा हेतु होता. आणि याशिवाय परोपकार घडून एका अनाथ मुलाचें आपल्या हातून संगोपन व्हावें, हा तिचा दुसराही हेतु होता. त्यामुळें गणपतीभय्याच्या विनंतीला मान देऊन तिनें तेथें राहण्याचें कबूल केलें. गंगाबाई बोलून चालून अर्धवेडी झालेली होती. ती जितके दिवस टिकेल तितके दिवस टिकेल, अशा समजुतीनें गणपतीभय्यानें तिला आपल्या घरीं ठेवून घेतली होती व तीही कधीं अर्धवट वेडांत तर कधीं अर्धवट शुद्धीवर अशा रीतीनें गणपतीभय्याच्या घरीं दिवस काढीत होती.

गंगाबाई मुलासाठीं जितकी वेडी झालेली होती, तितकीच किंबहुना त्याहूनहि जास्त ती आपल्या नवऱ्यासाठीं वेडी झालेली होती. आणि म्हणूनच ती जेव्हां अर्धवट शुद्धीवर असे, तेव्हां एखादे वेळीं तिनें पूर्वीं गणपतीभय्याच्या घरांत पाहिलेल्या त्या हिऱ्याच्या आंगठीचीहि तिला आठवण होत असे. त्या आंगठी-संबंधानें तिच्या मनामध्यें अनेक तरंग उत्पन्न होत असत; परंतु ते सर्व तिनें अजूनपर्यंत आपल्या मनांतल्या मनांतच ठेविले होते.

गंगाबाईच्या घरांत राहावयाला आल्यापासून गणपतीभय्याच्या अंगावरचें मुलाचें ओझें बरेंच हलकें झालें. कारण, त्या मुलाचें यथासांग संगोपन करण्याचें काम गंगाबाईनें आपल्याकडे घेतलें. त्यामुळें गणपतीभय्याला बरीच फुरसत मिळूं लागली. आणि ह्या वेळेचा उपयोग तो धर्माचीं कांहीं पोथ्या-पुस्तकें वाचण्याकडे करूं लागला. देवाधर्माकडे त्याची पहिल्यापासून फारशी प्रवृत्ति होती असें नाहीं. उलट पूर्ववयामध्यें त्यानें बऱ्याच व्यसनांमध्यें आपल्या आयुष्याचा नाश केलेला होता. तरी पण त्याच्या बायकोच्या मृत्यूमुळें त्याच्या चित्तवृत्तीला एकदम इतका मोठा धक्का बसला कीं, एखादा मनुष्य झोपेंतून जसा जागा व्हावा त्याप्रमाणें तो अज्ञानाच्या गाढ निद्रेतून खडबडून जागृत झाला, आणि त्याची मनोवृत्ति एकदम पालटली. सर्व कांहीं ठीक चाललें असतां आपली बायको एकाएकीं कां मरण पावावी ? असा प्रश्न तो आपल्या मनाशीं वारंवार विचारीत असे. आणि त्याच्या मनानें अखेरीस असें घेतलें कीं, आपल्या हातून पातकें घडत आलीं म्हणून त्यांचा असा हा परिणाम झाला असला पाहिजे ! आपण चोरून पातकें करीत होतों म्हणून देवाच्या घरचा हा अकल्पित घाला आपल्यावर आला आहे !

तेव्हां आतां यापुढें तरी आपण आपले डोळे उघडले पाहिजेत आणि सर्व पापाचरणापासून आपण परावृत्त झालें पाहिजे, असा त्याच्या मनाचा संल्कप ठरला व त्याप्रमाणे तो वागूं लागला.

परंतु गणपतीभय्याच्या मनाची साधुवृत्ति झाली, म्हणून त्याची वेश्या—कमळाबाई—ही कांहीं साध्वी झाली, असें नाहीं. ती पूर्वी जशी वेश्या होती तशीच अद्यापिही होती. गणपतीभय्याची बायको मेल्यामुळें गणपतीभय्याच्या विलासाविषयींच्या सर्व वासना करपून गेल्या; परंतु कमळाबाईच्या वासना मात्र नष्ट न होतां सरस्वतीबाईच्या निधनामुळें आतां त्यांना .आशेचे जास्तच अंकुर फुटूं लागले होते. कमळाबाईला वाटत होतें कीं, गणपतीभय्याची बायको मेल्यानंतर आतां त्यांना आपली जास्तच आवश्यकता भासूं लागेल; परंतु तसें कांहींच होईना. तेव्हां या गोष्टीचें कमळाबाईला मोठें आश्चर्य वाटूं लागलें. गणपतीभय्याची चित्तवृत्ति पार पालटून जाऊन असन्मार्गांतून ती सन्मार्गाकडे वळली आहे, ह्या उदात्त क्रांतीची त्या क्षुद्र वेश्येला कधीं कल्पना आली नाहीं. ती आपल्या मनाच्या क्षुद्रतेच्या अनुरोधानें या फेरफाराबद्दल कांहीं तरी क्षुद्र कारणें शोधूं लागली. मत्सर जवळ होताच. त्यानें तिला सांगितलें कीं, गणपतीभय्याच्या घरांत पूर्वी जी गंगाबाई राहात होती, तिच्यावर गणपतीभय्याचें मन निःसंशय बसलेलें होतें, आणि ती गेल्यापासून तिच्या विरहामुळें गणपतीभय्याला दुसरें तिसरें कांहीं सुचत नसलें पाहिजे. मत्सराची ही कानगोष्ट कमळाबाईला ताबडतोब पटली व त्यामुळें गणपतीभय्यावर तिचें जें प्रेम होतें त्याच्या जागीं तिच्या मनांत हळुहळू द्वेष वाढूं लागला. तिच्या मनांतील मत्सरानें उत्पन्न केलेला संशय पुष्कळ दिवसपर्यंत निराधार होता. पण गणपतीभय्याची बायको मेल्यानंतर अलीकडे फिरून गंगाबाई गणपतीभय्याच्या घरामध्यें रहावयाला आलेली आहे, ही गोष्ट जेव्हां कमळाबाईला कळली, तेव्हां तर तिच्या मनाचा पक्का निश्चय झाला कीं, ह्या दोघांच्या संबंधामध्यें खात्रीनें कांहीं तरी काळेंबेरें असलें पाहिजे. तेव्हांपासून गणपतीभय्याची पूर्वीची जी जीवश्च कंठश्च वेश्या ती आतां त्याची कट्टी दुष्मन बनली. आणि असल्या गंगाबाईसारख्या दुसऱ्या एका स्त्रीच्या नादीं लागून ज्यानें आपल्या प्रेमाचा आणि आशेचा उच्छेद केला, त्या गणपतीभय्याचा आणि त्याच्या त्या गंगाबाईचाही आपण पक्का सूड उगविला पाहिजे, असा तिनें दृढ निश्चय केला. त्यांच्यासंबंधानें लोकांमध्यें भलभलत्या

कंड्या उठवून त्यांची होईल तितकी बदनामी करण्याचा तिनें प्रयत्न चालविला. आणि शक्य झालें तर गंगाबाईला अजीबातच या जगांतून युक्तिप्रयुक्तीनें नाहींशी करून आपल्या आणि गणपतीभय्याच्या प्रेमाच्या मधील आणि द्रव्याच्या मधील आडकाठी कायमची दूर करावी, असाही तिच्या पोटांतील एक इरादा होता; व या दिशेने तिनें गुप्तपणानें आपलीं कारस्थानें चालविलीं होतीं.



## : : रांग एकोणिसावी

उत्तरमठाचे शंकराचार्य आपल्या संचारामध्यें ठिकठिकाणच्या तीर्थयात्रा करीत करीत चालले होते, हें मागें सांगितलेंच आहे. त्यांच्याजवळच्या अपार संपत्ती-वर डोळा ठेवून त्यांच्या छावणीवर छापा घालण्याची योग्य संधि केव्हां सांपडेल, याची टेहळणी करण्याकरितां करीमबक्षाचे टेहळे त्या शंकराचार्यांच्या लोकांच्या पाठीवर लपून छपून होते व ते करीमबक्षाकडे वरचेवर बातम्या पोंचवीत होते, हेंही पूर्वी सांगितलेंच आहे. शंकराचार्यांच्या छावणीवर छापा घालण्याची करीम-बक्षाची सर्व तयारी पुरी झालेली होती; परंतु त्याच्या प्रेमांतील एका रखेलीच्या लहान मुलाची तब्येत एकाएकीं फार बिघल्यामुळें शंकराचार्यांच्या छावणीवर छापा घालण्याचा त्याचा बेत थोडासा दिरंगाईवर पडला होता. ती त्याची राखलेली वेश्या आणि तिचा तो मुलगा हीं दोन्हींही या वेळीं करीमबक्षाच्या जंगलांतलि छावणीमध्यें होतीं. तेथें त्या आजारी मुलाला जंगलांतलि झाडपाल्याचे औषधोप-चार सुरू होते. ते सगळे करीमबक्ष स्वतः आपल्या हातानें करीत असे, इतकी त्याची त्या मुलावर प्रीति असे. त्या मुलाला करीमबक्ष अगदीं जीव कीं प्राण करीत असे. तो मुलगा म्हणजे एवढा कांहीं सुरेख किंवा एवढी विशेष प्रीति करण्यासारखा होता, असें कांहीं नाहीं. तरी पण करीमबक्षाची त्या मुलावर विशेष प्रीति बसलेली होती, हें खरें. प्रत्येक मनुष्याच्या मनामध्यें आकाशांतील ढगां-प्रमाणें प्रेमाचीं कांहीं तरी पटलें तरंगत असतात व तीं आपल्याकरितां कोठें तरी कांहीं तरी आधार हुडकीत असतात. आणि असा आधार हुडकतां हुडकतां दमून भागून गेलेलीं तीं प्रेमाचीं पटलें विश्रांतीकरितां कोठें तरी खालीं उतरून जेथें जागा मिळेल तेथें कायमचें ठाणें देतात. आणि अशा रीतीनें जशी जवळ-

पासच्या कोणत्या तरी झाडावर वेल चढते, त्याप्रमाणें मानवी प्रीति कोठें तरी चिकटून राहते. आणि त्यालाच जन्मांतरींचे लागेबांधे अशीं गुह्य आणि मोठमोठालीं नांवें देण्यांत येतात. ह्या मुलावर करीमबक्षाचें प्रेम बसण्याला आणखी एक कारण असें झालें होतें कीं, हा मुलगा पुढें कसा निघेल हें कोणी जाणता मनुष्य भेटला म्हणजे त्याला विचारण्याचा करीमबक्षाला फार नाद असे. वर्तमानकाळचे पाप-पुण्याचे सगळे कायदे दरवडे घालतांना आणि खून करितांना बिनदिक्कतपणानें मोडणाऱ्या करीमबक्षाचा भविष्यकाळच्या घडामोडींच्या नियमांवर कां विश्वास असावा, हें समजणें मोठें कठिण आहे. जो आजच्या नीतीच्या नियमांनीं बांधला जाण्याला तयार नाहीं, त्यानें भविष्यकाळच्या नियमांचे तरी फायदे आपल्याला खास मिळतील असें कां मानावें, हें समजणें कठिण आहे. तरी पण प्रत्येक मनुष्य अशाच विचारसरणीनें विचार करीत असतो, हें खास. ह्या मुलाच्या संबंधानें एका फकिरानें करीमबक्षाला असें सांगितलें होतें कीं, हा तुझा मुलगा पांच वर्षांच्या पुढें जगला, तर हा बापसे बेटा सवाई होईल. हा तुझें नांव पुढें चालवील. हा तुझ्यापेक्षां जास्त दरवडे घालील, आणि जास्त खून करील. हा तुझ्या वंशांतला कुलदीपक होईल! आणि ह्याच्यासारखा ठग आजपर्यंत जन्मास आला नाहीं, आणि पुढें कधीं येणार नाहीं, असा याचा साऱ्या दुनियेभर नांवलौकिक होईल! अशा प्रकारचें इतकें चांगलें भविष्य या मुलाच्या संबंधानें वर्तविण्यांत आलें असल्याकारणानें करीमबक्षाला त्याच्याबद्दल फार आशा होती; परंतु हें त्याच्या जीवावरचें दुखणें आलेलें असल्यामुळें फकिरानें जें सांगितलें होतें, तेंच हें पांच वर्षांच्या आंतील गंडांतर आहे कीं काय, याविषयीं करीमबक्षाला फार धास्ती वाटत होती, व त्यामुळें तो रात्रंदिवस मनामध्यें अतिशय झुरत होता. अंगारेधुपारे, जादूटोणे, मंत्रतंत्र, बकऱ्या-कोंबड्यांचे नवस आणि उतारे वगैरे अनेक उपायांनीं देवाच्या डोळ्यांत धूळ टाकण्याचे त्यानें जारीनें प्रयत्न चालविले होते. भुतें, मुंजे, पीर, खवीस वगैरे सर्वांना मदतीस बोलावून त्यांच्या मध्यस्थीनें सृष्टीच्या नियमांना धाब्यावर बसविण्याची त्यानें झपाट्यानें खटपट चालविली होती. आपल्या सगळ्या चोरांची आणि ठगांची आदिमाता जी अंबाभवानी विंध्यवासिनीदेवी, तिनें आपल्याला या मुलाच्या बाबतीमध्यें दगा देऊं नये, म्हणून आपल्या मुलाचा प्राण वांचविण्याकरितां तो त्या विंध्यवासिनीदेवीच्या नांवानें बळी द्यावयाच्या दोनचार बकऱ्यांचे तरी प्राण दररोज

घेत असे. व इतक्या बकऱ्यांचे जीव घेऊनही जर आपल्या मुलाला बरें वाटलें नाहीं, तर विंध्यवासिनीदेवीच्या समक्ष पायांवर घालण्याकरितां आपल्या मुलाला विंध्याचल येथील विंध्यवासिनीदेवीच्या जवळ आपण लवकरच घेऊन येऊं, असाही त्यानें एक नवस केला होता. आपण स्वतः जरी अनेक लोकांचे गळे कापतांना आजपर्यंत धर्माधर्माच्या भयानें कधीं मागेंपुढें पाहिलें नाहीं, तरी धर्मसंरक्षणार्थ अवतीर्ण झालेली ती भवानी विंध्यवासिनीदेवी आपल्या मुलाचे प्राण वांचविण्याकरितां अवश्य नवसाला पावेल, अशी त्याला खात्री वाटत होती! परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, करीमबक्ष जरी अशा प्रकारचे अनेक उपाय योजीत होता, तरी त्यांपैकीं एकाही उपायाला अजूनपर्यंत गुण आलेला नव्हता. आणि हीच काय ती त्याच्या मनाला हल्लीं मोठी काळजी लागून राहिली होती. बाकी भग्याखानाची जी दुसरी एक काळजी त्याच्या मनाला इतके दिवस खात असे, ती हल्लीं कित्येक दिवस समूळ नाहींशी झाली होती. भग्याखान जिवंत असेल कीं काय, आणि तो जिवंत असला तर तो आपल्यावर उलटेल कीं काय, ह्याविषयीं पूर्वीं त्याला जबरदस्त काळजी होती. ही काळजी त्याला दिवसां अन्न गोड लागूं देत नव्हती व रात्रीं स्वस्थ झोंप लागूं देत नव्हती; परंतु विंध्य पर्वताच्या एका डोंगराच्या गुहेमध्यें तो जिवंत जाळला गेला, ही मागील एका प्रकरणांत वर्णन केलेली हकीगत त्याला कळल्यापासून तो भग्याखानाच्या बाबतींत अगदीं निश्चिन्त होता. आणि आपल्या मुलाला जरा बरें वाटलें, म्हणजे उत्तरमठाच्या शंकराचार्यांची जेथें छावणी असेल तेथें जाऊन त्यांच्यावर घाला घालावयाचा, हा त्याचा बेत अगदीं नक्की ठरून राहिलेला होता.

या सुमारास एक गुप्त जासूद करीमबक्षाकडे एक गुप्त निरोप घेऊन आला. तो निरोप ऐकल्यापासून छावणीमध्यें जिकडे तिकडे फारच गडबड उडून गेली. करीमबक्ष आणि त्याच्या हाताखालील मुख्य जमादार गंगाप्रसाद यांना तर बिलकूल कांहीं सुचेनासें झालें व ते अगदीं वेड्यासारखे होऊन गेले. आणि हें आहे तरी काय, याची त्यांना कांहींच कल्पना येईना. तेव्हां ह्या बातमीचा शांतपणानें खुलासा करून घेण्याकरितां करीमबक्ष आणि गंगाप्रसाद हे त्या जंगलांतील एका एकांत अशा ठिकाणीं गेले व ज्यानें तो निरोप आणिला होता त्याला बोलावून घेऊन ते दोघे त्याच्यापाशीं फिरून विचारपूस करूं लागले.

"हं! काय म्हणतोस!" करीमबक्ष विचारूं लागला. "तूं काय निरोप आणिला आहेस? भग्याखान आपल्या बायकोचा शोध करीत करीत चांदबिबीच्या गांवीं आला आहे, आणि तिनें त्याला तेथें थांबवून ठेविलें आहे, असा तूं निरोप आणिला आहेस?"

"होय." जासूद म्हणाला.

"आणि म्हणून," गंगाप्रसादनें पुढें विचारिलें, "त्याला पकडण्याकरितां चांदबिबीनें आम्हांला ताबडतोब बोलाविलें आहे असें तुझें म्हणणें?"

"होय महाराज." जासूद म्हणाला.

"अरे, पण हें होईल कसें?" करीमबक्षानें रागानें विचारिलें. "मूर्खा, भग्याखान मेला आहे! जळून खाक झाला आहे! आणि त्याची चार चिमट्या राख होऊन गेलेली आहे! त्याचीं प्रत्यक्ष हाडें माझ्याजवळ आहेत! मग तो जिवंत होईल कसा आणि चांदबिबीच्या गांवीं जाईल कसा?"

"महाराज," जासुदानें उत्तर दिलें, "तें मला काय माहीत? मी निरोपाचा धनी; मला जसा निरोप सांगितला आहे, तसा तो मी तुम्हांला सांगत आहें. मीं भग्याखान कसा तो काळागोरा पाहिला नाहीं, आणि चांदबिबी कशी ती मी त्याहूनही पाहिली नाहीं. आमच्या गांवच्या पाटलानें तुमच्या जंगलांतला पत्ता देऊन मला पाठविलें. त्याप्रमाणें त्याचा निरोप घेऊन मी आलों आहे. त्या निरोपांत जर मी एक अवाक्षर कमीजास्त केलें असेल, तर मात्र मी गुन्हेगार आहे. बाकी तो भग्याखान मेला असून जिवंत कसा झाला, ह्याची जबाबदारी माझ्याकडे नाहीं."

भग्याखान जंगलांत जळून खाक झाला, ही करीमबक्ष आणि गंगाप्रसाद यांची ठाम खात्री झालेली होती. त्यामुळें हा जासूद आपल्याला फसविण्याकरितां आणि खड्ड्यांत घालण्याकरितां कांहीं तरी लबाडी करीत असला पाहिजे, अशी गंगाप्रसादनें करीमबक्षाजवळ शंका काढली. त्यावर करीमबक्ष बोलला, "नाहीं, तसेंही म्हणतां येत नाहीं! कारण, मी चांदबिबीपाशीं खुणेसाठीं जी आंगठी दिली होती, तीच आंगठी यानें आपल्या निरोपाबरोबर आणली आहे. त्यामुळें तसाही संशय घेतां येत नाहीं!" असें म्हणत असतांना एकीकडे आपल्या बोटांत घातलेली—त्या जासुदानें आणून दिलेली—ती खुणेची आंगठी करीमबक्षानें आपल्या बोटांतून

काढून गंगाप्रसादला दाखविली. त्यानेंही ती ओळखली. त्यामुळें तोही निरुत्तर होऊन गेला.

“ चांदबिबीनें तर कांहीं लबाडी केली नसेल ? ” गंगाप्रसादनें शंका काढिली.

“ छे ! छे ! ” करीमबक्ष म्हणाला, “ ही शंका तर तूं मनांतच आणूं नकोस. तिच्याबद्दल मला पक्की खात्री आहे ! ”

“ ह्या लबाड रांडांच्याबद्दल कसली खात्री असणार ? ” गंगाप्रसाद तिरस्कारानें म्हणाला, “ त्यांना दुसऱ्या कोणी पैसे दिले म्हणजे ह्या त्याच्या बाजूला वळणार ! ”

“ पण, गंगाप्रसाद, ” करीमबक्ष निश्चययुक्त मुद्रेनें बोलला. “ दुसऱ्या कोणी तिला साधारणपणें जितके पैसे देणें शक्य आहे, त्याच्यापेक्षां मी तिला किती तरी जास्त पैसे दिलेले आहेत ! आणि शिवाय भग्याखान माझ्या हातीं लागला तर तिला आणखीही पुष्कळ पैसे देण्याचें मी कबूल केलें आहे. ही तिला आशा आहे, म्हणून ती खोटा निरोप पाठवणार नाहीं, अशी मला खात्री आहे. ”

“ तर मग आतां आपण काय करावयाचें ? ” गंगाप्रसाद सचिंत दृष्टि करून म्हणाला.

इतक्यांत जासूद करीमबक्षाला उद्देशून म्हणाला, “ तुम्ही असे विचार करीत काय बसलां आहां ? तुम्हांला ताबडतोब बोलाविलें आहे. तुम्ही असा वेळ दवडीत बसलां, तर तिकडे तो कदाचित् निघून देखील जाईल. म्हणून तुम्ही घाई करणें फार जरूरीचें आहे.”

“ गंगाप्रसाद,” करीमबक्ष गंगाप्रसादकडे वळून म्हणाला, “ हा जासूद म्हणतो आहे तें अगदीं खरें आहे. मला ताबडतोब निघालेंच पाहिजे.”

“ नाईकसाहेब, ” गंगाप्रसादानें विनंती केली, “ तुम्ही जाऊं नका; मला या निरोपांत कांहीं तरी काळेंबेरें दिसत आहे. म्हणून मला वाटतें कीं, तुम्ही जाऊं नये.”

“ छे ! छे ! ” रागानें उसळून जाऊन करीमबक्ष म्हणाला, “ इतके वेळां मारून अजून देखील जर भग्याखान मेला नसेल, तर त्याला पुरा आणि पक्का मारण्याकरितां मलाच गेलें पाहिजे. तो माझा शत्रु आहे, आणि मी त्याला मारणार ! म्हणून मी म्हणतों कीं, मीच गेलें पाहिजे.”

“ नका नाईकसाहेब, तुम्ही आधीं स्वतः जाऊं नका ! ” आपला हात आडवा करून गंगाप्रसाद बोलूं लागला, “ मी आधीं पुढें जातों आणि कसा काय रंग आहे,

त्याचा शोध काढतों, आणि मग मी तुम्हांला हाच जासूद परत बोलवावयाला पाठवितों."

"गंगाप्रसाद," करीमबक्ष सद्गदित होऊन म्हणाला, "संकटामध्यें तूं पहिल्यानें उडी घालावीस आणि मी पाठीमागें राहावें, असा मी कांहीं भित्रा नाहीं! सबब तुझें म्हणणें मी कधींहीं ऐकणार नाहीं. आणि भय्याखानाचा जीव घेण्याकरितां मीच स्वतः जाणार! माझी तयारी करा."

असे दृढनिश्चयाचे आणि न ढळणारे शब्द करीमबक्षाच्या तोंडून निघाले असतील किंवा नसतील, इतक्यांत करीमबक्षाच्या रांडेचा जो लहान मुलगा त्या छावणीमध्यें आजारी होता त्याची प्रकृति जास्त बिघडल्यामुळें करीमबक्षाला तिकडे तावडतोब बोलाविलें असल्याची वर्दी आली. तेव्हां करीमबक्षाचें मन फिरून घोटाळ्यांत पडलें. त्या मुलाची प्रकृति जास्त बिघडली असतां त्याला टाकून करीमबक्षाच्यानें जाववेना. त्यामुळें त्याचें मन द्विधा झालें. आणि तो गंगाप्रसादला म्हणालाः—"गंगाप्रसाद, भय्याखानाचा समाचार घेण्याकरितां आपण स्वतःच जावें असें माझ्या मनांत फार होतें; पण ह्या मुलाची हल्ली प्रकृति जास्त बिघडली असतां त्याला अशा स्थितीमध्यें टाकून माझ्याच्यानें जाववत नाहीं. तेव्हां तूंच जा. शिवाय, मी स्वतः या वेळीं न जावें असें माझ्या मनाला आणखीही एका कारणासाठीं वाटूं लागलें आहे."

"तें काय कारण?" गंगाप्रसादानें आश्चर्ययुक्त चेहरा करून विचारलें.

"मी भित्रा नाहीं हें, गंगाप्रसाद, तुला मी सांगितलें पाहिजे असें नाहीं." करीमबक्ष करुणस्वरानें बोलूं लागला. "तरी पण अलीकडे मला ह्या मुलाच्या दुखण्यांत एक प्रकारची भीति वाटूं लागली आहे. मी कांहीं त्या भय्याखानाला भितों असें नाहीं; पण मला अलीकडे पापाची भीति वाटूं लागली आहे. आणि म्हणून ह्या माझ्या मुलाला बरें वाटेपर्यंत आपल्या हातून होतां होईल तोंपर्यंत कोणतेंही फारसें मोठें पाप होऊं नये, असें माझ्या मनाला वाटूं लागलें आहे. ही उगीच कांहीं तरी वेडगळ समजूत आहे. आणि माझा तिच्यावर नेहमींच भरंवसा बसलेला राहील असेंही मला वाटत नाहीं. व असल्या वेडगळ समजुतीवर भरंवसा बसून तो आपल्या धंद्याच्या आड यावा, असेंही मीं कधीं करणार नाहीं. तरी पण हा मुलगा माझा किती आवडता आहे, हें तुला माहितच आहे. तेव्हां माझ्या पातकांनीं त्याच्या जिवाला धक्का बसूं नये, अशी माझी फार फार इच्छा आहे.

तो बरा झाल्यावर मी एखाद्या देवाचा देखील खून करीन. पण तो आजारी आहे तोंपर्यंत देवानें त्याला बरें करावें म्हणून दोन दिवस देवाला फसविण्याकरितांच कां म्हणेनास, मी कोणतेंही मोठें पातक करावयाचें नाहीं, असें मनांत योजीत आहें. म्हणूनच उत्तरमठाच्या शंकराचार्यांच्या छावणीवर हल्ला करण्याचें कामही मी थोडें लांबणीवर टाकलें आहे. आणि म्हणून मला वाटतें कीं, तूं म्हणतोस त्याप्रमाणें तूंच पुढें जावेंस हें बरें. कारण, मी गेलों तर भय्याखानाचा खून माझ्या हातून झाल्यावांचून राहणार नाहीं. आणि शिवाय चांदबिबीची आणि माझी गांठ पडली, म्हणजे तीही मला पातकाचा धनी केल्यावांचून सोडणार नाहीं. तेव्हां ह्या दोन्ही पातकांपासून मी दूर राहण्याकरितां तूंच भय्याखानाचा समाचार घेण्याकरितां जावेंस, हेंच मला योग्य वाटतें."

ही करीमबक्षाची बदललेली मनोवृत्ति पाहून गंगाप्रसादाला मोठें आश्चर्य वाटलें. कारण, अशा बदललेल्या मनोवृत्तीचा हाच पहिला प्रसंग होता. ह्याच्या-पूर्वी कृतकर्माच्या प्रायश्चित्ताचे विंचू त्याच्या मनाला डंसत असल्याचें कधीं कोणाला माहीत नव्हतें! असो. गंगाप्रसादची जाण्याची तयारी होतीच. आणि म्हणून त्याच्या धन्याचा हुकूम होतांच त्या जासुदाला बरोबर येऊन तो तावड-तोब निघाला.

गंगाप्रसादची रवानगी करून दिल्यानंतर करीमबक्ष आपला मुलगा जेथें आजारी पडलेला होता तेथें आला. तेथें आल्यावर त्यानें पाहिलें तों मुलाची प्रकृति बरीच जास्त बिघडलेली त्याच्या दृष्टीस पडली. इतर माणसें जवळ बसून औषधोपचार करीतच होतीं. त्याची आई त्याचें डोकें आपल्या मांडीवर घेऊन त्याच्या उशागतीं एकीकडे रडत आणि एकीकडे त्याच्या तोंडावरून हात फिर-वीत बसलेली होती. त्या मुलाला ह्या वेळीं वाताचा झटका आल्यामुळें त्याची प्रकृति जास्त बिघडली होती. त्यामुळें जवळची मंडळी जास्त घाबरली होती. म्हणूनच करीमबक्ष आला तर तो कांहीं धीर देईल म्हणून त्याला इतक्या तावडतोबीनें बोलावणें पाठविण्यांत आलें होतें. त्या बोलावण्याप्रमाणें करीमबक्ष तेथें आला, पण या वेळीं त्याचें नेहमींचें धैर्य मात्र तेथें त्याच्याबरोबर आलें नाहीं. भय्याखान जिवंत आहे, ही बातमी फिरून उपस्थित होऊन त्याच्या कानावर आल्यामुळें त्याचें सारें धैर्य गळून गेलेलें होतें. चांदबिबीकडून जासुदाच्या बरोबर जी बातमी आली होती, त्या बातमीवर त्याचा अगदीं पूर्णपणें

विश्वास बसलेलाच होता, असें नाहीं; तरी पण चांदबिबीकडील बातमी अगदीं खोटी असेल, असेंही त्याच्या मनाला पटेना. म्हणून या संशयामध्यें तो अगदीं गोंधळून गेला होता. आणि त्यामुळें भय्याखान मेलेलाही असला पाहिजे, आणि तो फिरून जिवंतही झालेला असला पाहिजे, ह्या दोन्हीही गोष्टी त्याच्या मनावर सारखाच परिणाम उत्पन्न करीत होत्या. आणि त्यामुळें त्याला पुढें अशीही भीति वाटूं लागली कीं, 'असे मेलेले लोक फिरून फिरून जिवंत होऊन मला जर भेवडावूं लागले, तर माझें पुढें कसें होईल ! मी आजपर्यंत किती तरी लोकांना ठार मारलें आहे. इतके सगळे लोक जर फिरून जिवंत होऊन माझ्यावर सूड उगवूं लागले तर मग त्यांच्या सपाट्यांतून मी कसला जिवंत राहणार ! आणि मला मग काय आशा आहे !'

अशा विचारांनीं त्याचें मन अगदीं व्यग्र होऊन गेलें असतां, तो ज्या वेळीं आपल्या आजारी मुलाच्या अंथरुणाच्याजवळ येऊन बसला, आणि चोहोंकडे पाहूं लागला, त्या वेळीं त्या अंथरुणाच्या भोंवतीं जी मंडळी बसली होती, त्यांच्या पाठीमागें त्याच्या भ्रमून गेलेल्या आणि भयभीत झालेल्या डोळ्यांना दुसऱ्या किती तरी आकृति दिसूं लागल्या ! त्या आकृतींचीं स्वरूपें फार उग्र, भयंकर आणि खवळलेलीं अशीं दिसत होतीं. त्यांपैकीं प्रत्येकाचे डोळे क्रोधानें लाल झालेले होते, आणि प्रत्येकाचे हात सूड घेण्याच्या इच्छेनें उभारलेले होते. त्यांना पाहून करीमबक्ष अगदीं घाबरून गेला आणि म्हणाला, "अबबब ! हे कोण ! माझ्या मुलाच्या अंथरुणाच्या भोंवतीं बसलेल्या ह्या जिवंत मंडळीच्या सभोंवार हे इतके मेलेले लोक कोण आहेत ! आणि हे येथें कशाला आले आहेत ! आणि हे माझ्या ह्या मुलाकडे अशा आवेशानें कां पहात आहेत !—हे कोण आहेत ! —ह्यांतले कांहीं चेहरे माझ्या ओळखीचे दिसतात !—नव्हे, हे बहुतेक सगळे ओळखीचे दिसतात !—ज्यांना मी जंगलांत मारलें होतें !—ते हे लोक आहेत ! —हाय ! हाय ! इतके सगळे मीं मारलेले लोक त्या भय्याखानाप्रमाणेंच फिरून भुतांच्या रूपानें निर्माण होऊन माझ्या ह्या बिचाऱ्या मुलावर आपला सूड उगविण्याकरितां आलेले असले पाहिजेत, असें दिसतें !—इतके मेलेले लोक जर माझ्या मुलाला मारण्याकरितां ह्या ठिकाणीं एकत्र गोळा झालेले असतील, तर ह्यांच्या ह्या वासनांपुढें माझा मुलगा काय जगणार ! आणि इतके लोक त्याचा जीव त्याच्या शरीरांतून ओढून बाहेर काढण्याला तयार झाले असतां, हीं बिचारीं

झाडपाल्यांचीं औषधें त्याचा जीव त्याच्या शरीरामध्यें किती वेळ कोंडून ठेवूं शकणार आहेत! माझ्या ह्या मरणोन्मुख झालेल्या मुलाच्या अंथरुणाभोंवतीं जीं हीं अनेक भुतें गोळा झालीं आहेत, त्यांत कित्येक मोठीं माणसें आहेत, आणि कांहीं कांहीं अगदीं लहान लहान तीन तीन चार चार वर्षांचे असे कोवळे बच्चे दिसत आहेत! यांनाही मीं मारलें आहे! हीं लहान लहान बालकें आपल्या आयांच्या अंगावर स्तनपान करीत होतीं, आणि त्यांच्या मांडीवर खेळत होतीं!—तेथून तशींच ओढून काढून, मी त्यांना ठार मारलें! तीं हीं सगळीं मीं मारलेलीं मुलें माझ्या मुलाच्या प्राणोत्क्रमणाच्या वेळीं त्याच्याभोंवतीं जमा झालेलीं मला दिसत आहेत! व सूड घेण्याच्या किंकाळ्या तीं जोरानें फोडीत आहेत! त्या किंकाळ्या मला ऐकूं येत आहेत! माझ्या प्रियेनें--माझ्या ह्या निरपराधी प्रियेनें--पुत्रवात्सल्याच्या अतिरेकानें आपल्या ह्या मुलाला आपल्या मांडीवर कितीही घट्ट धरून ठेविलें असलें, तरी माझीं हीं पातकें इतकीं भयंकर आहेत कीं, तीं ह्या माझ्या मुलाला ओढून मृत्युमुखांत घातल्यावांचून कधींही राहणार नाहींत! मी लोकांचीं हीं इतकीं अनाथ बालकें त्यांच्या अंगावरच्या एखाद्या यःकश्चित् भिकारड्या दागिन्यासाठीं जर निष्ठुरपणानें मारिलीं आहेत, तर आतां हा माझा मुलगा जगूं दे, असें मी देवापाशीं कोणत्या तोंडानें म्हणूं! आणि मी म्हटलें, तरी देव माझें ऐकेल किंवा यांचें ऐकेल! माझी ही मंडळी या मुलाला कशाला विनाकारण औषध देत आहेत! मनुष्यप्राणी पुण्याईनें जगत असतो, औषधानें जगत नाहीं! त्या पुण्याईचें औषध याला देण्याकरितां जर माझ्यापाशीं एक रतिमात्र देखील पुण्य नाहीं, तर मग आतां याची आशा धरून काय उपयोग! मला वाटतें कीं, हा जाणार आणि ह्याच्यामागून मीही जाणार!"

अशा विचारांनीं करीमबक्षाचीही प्रकृति अगदीं बेताल होऊन गेली. आणि म्हणून जे लोक त्या मुलाची जोपासना करीत होते, त्यांना तें काम सोडून करीमबक्षाचीच काळजी घेणें प्राप्त झालें!

● ● ●

: :

# रांग विसावी

करीमबक्षाचा मुलगा आजारी होता, म्हणून त्याचें मन अगदीं व्यग्र झालेलें होतें, आणि त्यांतच भय्याखान जिवंत असल्याचें अशुभ वर्तमान चांदबिबीच्या निरोपावरून कळल्यामुळें तर त्यांचें मन जास्तच व्यग्र झालें होतें. गंगाप्रसादला जरी त्यानें चांदबिबीकडे पाठविलें होतें, तरी भय्याखान जिवंत असलाच, तर त्याचा पुरा समाचार घेण्याकरितां आपण स्वतः गेलों असतों, तर जास्त चांगलें झालें असतें, असें त्याला वाटत होतें. परंतु त्याच्या मुलाच्या आजारीपणामुळें निरुपाय होऊन त्याला जातां येईना. शिवाय इकडे उत्तरमठाच्या शंकराचार्यांच्या छावणीवर छापा घालण्याची त्याची अगदीं जारीनें तयारी चाललेली होती. त्यामुळें चांदबिबीनें बोलावल्याप्रमाणें फिरून जिवंत झालेल्या भय्याखानाला मारण्याकरितां तिकडे जावें, तर इकडे कदाचित् शंकराचार्यांची शिकार हातांतून जाईल, अशी त्याला भीति होती. म्हणून तो चांदबिबीकडे न जातां आपल्या मुलाच्या प्रकृतीची आणि शंकराचार्यांच्या संपत्तीची काळजी घेण्याकरितां तो आपल्या स्वतःच्या छावणीमध्येंच थांबून राहिला होता. आणि वरचेवर आपले गुप्त हेर पाठवून तो आचार्यांच्या मुक्कामांची बातमी नेहमीं आणवीत असे. त्यांचे मुक्काम अद्यापि बहुतेक जंगलांतूनच होत होते. त्यांना काशीविश्वेश्वराच्या दर्शनाला प्रथमतः जावयाचें होतें. परंतु त्यांचे मुक्काम फार सावकाशीनें बदलत असत. अरण्यांत जेथें एखादें ठिकाणीं एखादें रमणीय स्थान आढळेल, तेथेंच ते आठ आठ दिवस मुक्काम करून रहात. संन्याशांना काय ? अरण्य हेंच त्यांचें घर. संसारापासून निवृत्त झालेल्या आणि गृहस्थाश्रमाला कंटाळलेल्या संन्याशांना अरण्यांतच ज्यास्त सुख वाटे. कोठें एखादी सुंदर नदी पाहिली, एखादें उंच पर्वतशिखर पाहिलें, एखादी खोल गुहा पाहिली, किंवा एखादें वंदनीय देवस्थान पाहिले, म्हणजे तेथेंच त्यांची चित्तवृत्ति

तल्लीन होऊन जात असे. अशा रीतीनें सावकाश सावकाश प्रवास करीत जाणाऱ्या शंकराचार्यांच्या छावणींतील त्या मंडळींना काशीला जाऊन पोंहोचण्याला पुष्कळ दिवस लागणार, हें अगदीं उघड होतें. आणि स्वसंरक्षणाकरितां शिंदेसरकारपासून त्यांनीं जी फौज मागविली होती तीही अद्यापि येऊन पोंहोचलेली नव्हती. तिची वाट पहात पहात ही शंकराचार्यांच्या छावणींतील मंडळी हळूहळू त्या विंध्याचलाच्या अरण्यांतून प्रवास करीत चालली होती. त्यांच्यासंबंधानें करीमबक्षाची अशी योजना होती कीं, जोंपर्यंत शिंद्यांचें लष्कर यांच्या मदतीला येऊन पोंहोचलें नाहीं, आणि जोंपर्यंत त्यांच्या प्रवासाचा मुक्काम एखाद्या मोठ्या शहरापासून दूर अशा जंगलामध्येंच आहे, तोंपर्यंत आपण त्यांच्या छावणीवर हल्ला करून आपलें काम साधून घ्यावें. परंतु करीमबक्षाच्या मुलाच्या प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें आणि गंगाप्रसादच्या जाण्यामुळें त्याचे बेत कांहींसे लांबणीवर पडूं लागले.

शंकराचार्यांची स्वारी त्या प्रांतांतून संचार करीत फिरत असतांनाही आसपासच्या लोकांची निग्रहानुग्रहाचीं धार्मिक कामें त्यांच्याकडे पुष्कळ येत असत. तीं सर्व न्याय निवडण्याचीं, धार्मिक बाबतींतील शास्त्रार्थ देण्याचीं, जे प्रायश्चित्ती असतील त्यांना प्रायश्चित्तें सांगण्याचीं, वगैरे कामें आचार्य स्वतःच करीत होते. परंतु अलीकडे त्यांना एक योग्य आणि अधिकारी असा संन्यासी मिळाल्यामुळें धर्मशास्त्रांतील खटल्यांचे निर्णय करण्याचें न्यायाधीशाचें काम त्यांनीं त्यालाच कांहीं दिवस सांगितलें होतें. तें काम त्या संन्याशाकडून फार उत्कृष्ट रीतीनें बजाविलें जात असल्याकारणानें आचार्यांची त्याच्यावर फार मर्जी बसली होती. आचार्यांच्या छावणींतलि सर्व शास्त्री-पंडित लोकांमध्येंही त्याच्या विद्वत्तेमुळें व सौजन्यामुळें त्याच्याबद्दल अतिशय आदर उत्पन्न झाला होता. ज्याच्याकडे हें मठांतील न्यायाधीशाचें काम सोपविण्यांत आलेलें होतें तो संन्यासी जरी वयानें तरुण होता, तरी ज्ञानवृद्धत्वामध्यें त्याची योग्यता फार मोठी होती. त्याची कांति अतिशय तेजस्वी होती, व इंद्रियनिग्रहापासून उत्पन्न होणारी ओजस्विता त्याच्या मुखचर्येवर स्पष्ट दिसत होती. त्याचें शरीर भव्य, बांधेसूद, पीळदार आणि पाणीदार असें दिसत असे. सारांश, त्याच्या सर्वांगसुंदर कृतीनें आणि आकृतीनेंही त्याच्याबद्दल सर्वांच्या मनांत अतिशय उत्कृष्ट ग्रह झालेला होता. तो स्वरूपानें मोठा राजबिंडा पुरुष दिसत असे. कपाळ भव्य, छाती विशाल, वर्ण गौर, नेत्र

तेजस्वी, वय तारुण्याचें, अशा अवस्थेमध्यें त्याचा तो संन्यासाश्रम पाहिला, म्हणजे याच्या या चतुर्थाश्रमामध्यें कांहीं तरी चूक झालेली असली पाहिजे, असें कोणालाही वाटे! आणि गृहस्थाश्रमाच्या हद्दीचें या संन्यासाश्रमानें कसें आतिक्रमण केलें आहे, याच्याबद्दल कोणाच्याही मनामध्यें उलगडा होत नसे. त्याचा स्वभाव मोठा आनंदी होता, व मठांतल्या मंडळींमध्यें तो नेहमीं मिळूनमिसळून वागत असे. तरी पण मधून मधून बरेच वेळां तो अगदीं उद्विग्न झाल्यासारखा दिसत असे; व अशा वेळीं समाधि लावण्यासाठीं म्हणून तो कोठें तरी दूर एकांतांत जाऊन बसत असे. परंतु अशी जरी त्याच्या मनाची वृत्ति एखादे वेळीं निर्विण्णतेच्या पराकाष्ठेला जाऊन पोंहोचलेली दिसत असे, तरी इतर वेळीं आचार्यांनीं त्याच्याकडे जें धर्मशास्त्राच्या कज्ज्यांतील न्याय निवडण्याचें काम दिलें होतें, तें काम करण्यांत त्याच्याकडून कधींही हयगय झाली नाहीं. तें काम तो नेहमीं नियमितपणानें आणि निःपक्षपातबुद्धीनें करीत असे. त्यामुळें त्याच्या न्यायाधीशपणाच्या चांगुलपणाची थोडक्याच दिवसांत जिकडे तिकडे पुष्कळ ख्याति झाली होती. कोठेंही ज्ञातिसंबंधीं कांहीं भानगडीच्या पंचायती उपस्थित झाल्या तर त्या निर्णयाकरितां याच्याकडे येत असत, आणि यानें दिलेलें आज्ञापत्र आणि प्रायश्चित्त सर्व ठिकाणच्या शास्त्री-पंडितांना नेहमीं मान्य होत असे. याचें नांव अभयानंदस्वामी असें होतें.

मागच्या कथाभागांत सागर मुक्कामीं तेथील तलावाच्या कांठच्या एका मंदिरामध्यें किसनप्रसाद आणि जम्नामाई असें एक नवरा-बायकोचें जोडपें तेथील देवाची पूजाअर्चा करून साधुवृत्तीनें राहात असे, हें सांगितलेलेंच आहे. त्या दोघांपैकीं किसनप्रसाद हा आपल्या साधुवृत्तीच्या दरिद्रावस्थेला कंटाळून चोरांच्या टोळींत सामील होण्याकरितां आपल्या बायकोला एकटी टाकून निघून गेला होता, व त्याची बायको जम्नामाई ही आपल्या नवऱ्याला शोधीत रानोमाळ फिरत होती, वगैरे मागील हकीकत वाचकांना माहीतच आहे. त्यांपैकीं किसनप्रसाद हा आपल्या घरांतून नाहींसा झाल्यापासून करीमबक्षाच्या टोळीमध्येंच येऊन राहिला होता. त्याच्या वयाला पन्नाशी उलटून गेलेली असून तो साठीच्या जवळ जवळ आला होता. त्यामुळें त्याच्या हातून शक्तीचीं आणि साहसाचीं कामें इतक्या उतार वयांत होणें शक्य नव्हतें. म्हणून त्याच्याकडे हेराचें आणि टेहळणी करून बातमी काढण्याचें काम देण्यांत आलेलें होतें. हल्लीं या शंकराचार्यांच्या छावणी-

वर नजर ठेवण्याच्या कामावर करीमबक्षानें त्याची नेमणूक केली होती. आणि म्हणून तो किसनप्रसाद निरनिराळीं सोंगें घेऊन वरचेवर शंकराचार्यांच्या मठामध्यें कांहीं तरी निमित्तानें येत असे, आणि अशा रीतीनें काढलेल्या गुप्त बातम्या किसनप्रसादकडून करीमबक्षाला मिळत असत.

उत्तरपीठाच्या शंकराचार्यांच्या मठांत अशा प्रकारची स्थिति चाललेली असतां आणि तेथील सर्व मंडळींच्या हालचालींवर गुप्त हेरांच्या मार्फतीनें करीमबक्षाची पूर्ण नजर असतां, दुसरीकडे प्रयागच्या नगरामध्यें गणपतीभय्याच्या घरीं गंगाबाईच्याबद्दल काय हकीगत चाललेली होती, हें आपण थोडेंसें पाहूं. गंगाबाईचें मूल नाहींसें झाल्यामुळें वेड लागून ती फिरून प्रयागमध्यें आली, आणि गणपतीभय्याच्या घरीं राहून त्याच्या पोरक्या मुलाचें संगोपन करूं लागली, हें मागें सांगितलेंच आहे. पण तेथेंही तिला गणपतीभय्याची पूर्वीची जी एक वेश्या होती, ती चैन पडूं देईना. मत्सराग्नीनें प्रदीप्त होऊन ती गणपतीभय्याच्या घरांतून गंगाबाईचा कांटा काढून टाकण्याची वाट पहात बसलेली होती. पण गंगाबाई ही गंगेसारखी मनानें निर्मळ असल्यामुळें तिच्या वर्तनामध्यें कोणालाही नांव ठेवण्याला कोठें यत्किंचितही जागा मिळत तसे. शिवाय ती आपल्या पतिदुःखानें आणि पुत्रदुःखानें इतकी विह्वल झालेली होती कीं, तिचें मन दुसऱ्या कोणत्याही गोष्टीकडे दवडण्याला तिला फुरसतच नव्हती. आपल्या पतीची आणि आपली फिरून गांठ पडेल काय, आपलें मूल आपल्याला परत सांपडेल काय, आपल्या नवऱ्याची आणि आपली गांठ पडली नाहीं आणि त्याचा आपल्याला कांहीं शोध लागला नाहीं तर मग पुढें आपण आपल्या पूर्वसंकल्पाप्रमाणें कोंकणांत राजापुरास आपल्या माहेरीं जावें, किंवा आपलें काळें तोंड आपल्या आईबापांना दाखविण्याकरितां तिकडे न जातां येथेंच क्षेत्रांत कोठेंतरी कालक्षेप करावा, अशा प्रकारचे अनेक विचारतरंग गंगाबाईच्या मनामध्यें येत असत. ह्या अशा प्रकारच्या सगळ्या निराशेच्या वणव्यांत सांपडून ती इतकी होरपळून जात असे कीं, एखादे वेळीं कांहीं तरी करून किंवा खाऊन आपला जीव द्यावा, इतक्या थराला तिची मनोवृत्ति जात असे. पण अशा वेळीं फक्त दोनच गोष्टी तिला त्या मृत्यूच्या जबड्यापासून परत ओढून आणत असत.

त्यापैकीं पहिली गोष्ट गणपतीभय्याच्या त्या अनाथ अर्भकाची होय! तें मूल पाहून गंगाबाईला आपल्या मुलाची आठवण होत असे, व मी जर या

मुलाला टाकून गेलें आणि माझ्यामुळें हें मूल अनाथ झालें, तर माझें मूल जेथें कोठें असेल, तेथें देव त्याला असेंच अनाथ करील, अशी कल्पना गंगाबाईच्या मनामध्यें येऊन त्या भीतीनें तिनें आपला जीव देण्याचा अगदीं नक्की झालेला बेत किती तरी वेळां माघारा घेतला होता!

आणि तिनें जीव न देण्याचें दुसरें कारण असें होतें कीं, तिला कांहीं गोष्टींवरून थोडीशी आशा लागलेली होती. तिनें ह्या मुलाच्या पुत्रावणाच्या दिवशीं जी आंगठी मागे पाहिल्याचें सांगितलें आहे, त्या आंगठीवरून तिला कांहीं विलक्षण आशा उत्पन्न झालेली होती. ही आंगठी आपल्या ओळखीची असावी, असें तिला वाटे. निदान आपल्या आंगठीसारखी अगदीं हुबेहूब ही आंगठी असली पाहिजे, अशी तिला खात्री वाटत होती. परंतु ह्याच्यापेक्षां जास्त असा कांहीं एक तिचा तर्क चालेना. पण ती आंगठी आपलीच असली तर गणपतीभय्याच्या घरांत ती कशी यावी, याच्याबद्दल तिची कांहीं एक कल्पना चालेना. तेव्हां कधीं तरी त्या आंगठीबद्दल गणपतीभय्याला विचारावें, आणि त्यापासून त्या आंगठीवरून त्या आंगठीच्या मालकाचा कांहीं शोध निघाला तर पाहावा, तोंपर्यंत आपण आपल्या जिवाचें कांहीं बरें वाईट करूं नये, असें तिच्या मनाला वाटत होतें.

एकदां गणपतीभय्याच्या त्या लहान मुलाची प्रकृति थोडी नादुरुस्त झाली होती. त्या वेळीं गंगाबाई त्याचें आपल्या पोटाच्या मुलाप्रमाणें काळजीपूर्वक संगोपन करीत होती. तें पाहून गणपतीभय्याच्या पोटांतून अगदीं भडभडून आलें. आणि तो म्हणाला, "गंगाबाई, तुम्ही आहां म्हणून ह्या माझ्या मुलाला औषधपाणी तरी मिळत आहे, नाहीं तर याची जोपासना कोणीं केली असती? तुमचे माझ्यावर अनंत उपकार आहेत. ते माझ्या हातून कधींही फिटले जाणार नाहींत. तुम्ही आहां, म्हणूनच हें माझें मूल आहे. नाहीं तर माझ्या हातून याचें संगोपन कसलें होतें? तुम्ही याचा सांभाळ करण्याला मिळालां नसतां, तर मी हें मूल गंगेच्या वाळवंटावर नेऊन ठेविलें असतें, किंवा गंगेच्या पाण्यामध्यें, कुंतीनें कर्णाला सोडलें, त्याप्रमाणें मी याला सोडून दिलें असतें!"

"छे छे! नका हो!" गंगाबाई म्हणाली, "तुम्ही असें अभद्र बोलूं नका! कसें सोन्यासारखें मूल आहे! अहो, नवस करून देखील असें मूल नजरेस पडायाचें नाहीं! मीच पहा कशी हतभागी आहे ती! माझें असलेलें मूल माझ्या

दैवानें माझ्यापासून हिरावून नेलें! आणि तुम्हांला दैवानें असलें सुरेख मूल दिलें असून तुम्ही म्हणतां, मी त्याला गंगेच्या पाण्यांत सोडून दिलें असतें! छे, छे! असें अभद्र कधींसुद्धां बोलूं नका. मी त्याचें जतन करीन. मी त्याला बरें करीन.—पण तुम्ही त्याला वैद्याकडून कांहीं तरी मात्रेबिलेचें औषध मागवा."

"मी वैद्याकडे आपल्या नोकराला मघाशींच पाठविलें आहे. तो एव्हांना औषध घेऊन यावयालाही पाहिजे होता! मग अजून तो कां आला नाहीं, कोण जाणे." इतकें गणपतीभय्या बोलत आहे, तोंच त्याचा नोकर औषध घेऊन आला आणि कांहीं औषधाच्या पुड्या गणपतीभय्याजवळ देऊन त्यानें सांगितलें कीं, ह्यांतील मात्रेची एक पुडी मधांत घालून आणि त्यांत थोडेसें सोनें उगाळून, तें चाटण वरचेवर जिभेला चोळावें, म्हणजे बरें वाटेल, असें वैद्यबुवांनीं सांगितलें आहे.

हें ऐकून घेतल्यानंतर गंगाबाईनें तावडतोब मधाची शिशी काढली, व एका वाटींत ती मात्रा आणि मध त्यांनीं एकत्र कालविली. आतां त्यांत फक्त सोनेंच उगाळावयाचें राहिलें होतें. परंतु गंगाबाईपाशीं सोनें कोठून असणार? त्या बिचारीला सोन्याचा विटाळही नव्हता. तेव्हां गणपतीभय्यानें चटकन् उठून एक सोन्याची आंगठी त्या मात्रेंत दोन वळसे उगाळून घालण्याकरितां आणून दिली. गंगाबाईचें लक्ष मुलाच्या प्रकृतीकडे आणि त्याला लवकर औषध पोंचण्याकडे विशेष वेधून गेलेलें असल्यामुळें त्यांनीं ती आंगठी घेऊन घाईघाईनें सहाणेवर दोन वळसे उगाळले आणि तें चाटण करून त्या मुलाच्या जिभेला फासलें. त्यामुळें कांहीं वेळानें त्या मुलाच्या प्रकृतीला थोडासा उतार पडला. तें पाहून गणपतीभय्याला जरा हुषारी वाटली व गंगाबाईच्या जोपासनेमुळें आपल्या मुलाला औषधपाणी तरी मिळत आहे, असें पाहून त्याच्या मनांतील कृतज्ञताबुद्धीच्या उद्गारांनीं फिरून उचल खाल्ली. तो गंगाबाईच्या परोपकारी वर्तनाची फिरून स्तुति करूं लागला.

"गंगाबाई," तो म्हणाला, "तुमचे माझ्यावर अनंत उपकार आहेत! हा मुलगा माझा नसून तुमचा आहे. तुम्ही याला औषधपाणी करून जीवदान देत आहां. मी कांहीं केलें, तरी तुमचे उपकार माझ्या हातून फिटणार नाहींत!"

"मी ह्यांत असे काय मोठे उपकार करीत आहे?" गंगाबाई म्हणाल्या. गंगाबाई हे शब्द बोलत असतांना आणि गणपतीभय्याचे वरील उद्गार त्या ऐकत असतानांही त्यांचें सारें लक्ष दुसऱ्या एका व्यापारामध्यें गुंतून गेलेलें होतें. मात्रेंत

सोनें उगाळण्याकरितां जी आंगठो गणपतीभय्यानें आणून दिली होती, ती या वेळीं गंगाबाईच्या हातांत होती व तिच्याकडे गंगाबाई फिरून फिरून न्याहाळून पहात होत्या. त्या आंगठीकडे सारें लक्ष लावून फार बारकाईनें ती आंगठी तपासून पहात असतां एकीकडे गंगाबाई गणपतीभय्याला म्हणाल्या, " अहो, मी तुमच्या मुलाची जोपासना केली, तर देव माझ्या मुलाची अशीच कोणाकडून तरी जोपासना करवील, अशी मला आशा आहे. पण मी जें हें तुमच्या मुलाचें निरपेक्ष रीतीनें संगोपन करीत आहे, त्याबद्दल, जर तुम्हांला इतकें अवघड वाटत असेल,—"

" तर त्याकरितां मी काय करूं ? " गणपतीभय्यानें मध्येंच आतुरतेनें विचारलें, " गंगाबाई, तुमच्या उपकाराची फेड माझ्या हातून कशी होईल, या विवंचनेमध्यें मी आहे; म्हणून मी तुमच्याकरितां काय करूं, हें मला कांहीं तरी सांगा. "

" मला कशाचीही अपेक्षा राहिलेली नाहीं ! " गंगाबाई डोळ्यांत अश्रु आणून म्हणाल्या, आणि फिरून त्या आंगठीकडे न्याहाळून पाहूं लागल्या.

तें पाहून गणपतीभय्यानें गंगाबाईंना विचारलें, " तुम्ही त्या आंगठीकडे इतकें न्याहाळून कां पहात आहां ? तुम्हांला ती आवडली असली आणि तुम्हांला ती पाहिजे असली, तर तुम्ही ती खुशाल आपल्याजवळ ठेवा. मी असल्या हजार आंगठ्या तुम्हांला दिल्या, तरी तुमचे उपकार फिटावयाचे नाहींत. तरी पण मी तुमच्यासाठीं कांहीं तरी केलें, असें माझ्या मनाला वाटलें, तर माझ्या मनांतील कृतघ्नतेची टोंचणी कांहीं तरी कमी होईल; म्हणून मी म्हणतों कीं, गंगाबाई, ती आंगठी तुमच्याजवळ असूं द्या. "

" ही आंगठी दुसऱ्या कोणाची असली, तर मी ती कशी घेऊं ? दुसऱ्या कोणाच्या सुतळीच्या तोड्याचीही मला अपेक्षा नाहीं. " गंगाबाई म्हणाली, " पण तुमच्या मनांतून माझ्यावर जर कांहीं कृपा करावयाची असेल तर मला हें कळावयाला पाहिजे आहे कीं,— "

" गंगाबाई, तुम्हांला काय कळावयाला पाहिजे आहे ? तुम्ही कृपा असें कां म्हणतां ? तुमचा हक्क आहे. तुम्हांला काय कळावयाला पाहिजे आहे ? " गणपतीभय्यानें विचारलें.

" मी भलताच प्रश्न विचारीत आहें, असें तुम्हांला वाटत नसेल, तरच तुम्ही माझ्या प्रश्नाचें उत्तर द्या; नाहीं तर देऊं नका. " गंगाबाई म्हणाल्या.

" गंगाबाई, तुम्ही वाटेल तो प्रश्न विचारा. " गणपतीभय्यानें तिला आश्वासन देऊन सांगितलें.

" तर मग ही आंगठी कोठली ? " गंगाबाईनें अतिशय भीत भीत विचारलें. " ही तुम्ही स्वतः नवीन करविली काय ? "

" नाहीं ! मी ती आयती विकत घेतली ! " गणपतीभय्यानें मोकळ्या मनानें सांगितलें. आणि गंगाबाईसारख्या निरुपद्रवी व आपल्यावर इतका उपकार करणाऱ्या बायको-माणसाजवळ इतक्या उत्सुकतेनें विचारलेल्या प्रश्नाचें खरें उत्तर सांगण्याला कांहीं हरकत आहे असें कृतज्ञतेनें भरून गेलेल्या गणपतीभय्याच्या स्वप्नांतही आलें नाहीं.

पण हें गणपतीभय्याचें उत्तर ऐकून गंगाबाईच्या मुखचर्येमध्यें किती तरी फरक पडला. आणि तिनें पुढें विचारलें, " तम्ही ही आंगठी विकत घेतल्याला किती दिवस झाले असतील ? फार दिवस झालेले नसावेत ! "

" कुठले फार दिवस ? सात आठ महिने देखील अजून झाले नसतील. " गणपतीभय्यानें अंदाजानें महिने आठवीत आठवीत सांगितलें.

" तुम्हीं ही आंगठी कां विकत घेतली ? अगदीं स्वल्पांत का मिळाली ? " गंगाबाईनें आपला तर्क चालवीत चालवीत विचारलें.

" गंगाबाई, " गणपतीभय्या आश्चर्यानें चकित होऊन म्हणाला, " ही आंगठी मला थोडक्या किंमतींत मिळाली असली पाहिजे, हें तुम्ही कशावरून विचारलें ? "

" मला उगीच वाटलें, म्हणून मी म्हटलें. " गंगाबाईनें उडवाउडवीचें उत्तर दिलें. आणि मध्येंच मुलाला मात्रेच्या चाटणाचें एक बोट देऊन फिरून गंगाबाई म्हणाल्या, " आणि हा मुलगा झाला, त्या दिवशीं पुत्रावणाच्या वेळेला याच्या तोंडाला मध लावण्याकरितां तुम्हीं जी एक हिऱ्याची आंगठी काढलेली होती, ती देखील तर मग याच आंगठीच्याबरोबर आणि अशीच थोड्या किंमतीला तुम्ही विकत घेतलेली असली पाहिजे ! "

" या दोन्हीही आंगठ्या मी खरोखरच एकदम आणि थोड्या किंमतीला विकत घेतल्या. " गणपतीभय्यानें सांगितलें.

"मग ह्या आंगठ्याच्याबरोबर," गगाबाईनें मोठ्या उत्सुकतेनें विचारलें, "तुम्ही कदाचित् आणखीही दुसरे कांहीं तरी जिन्नस पान्नस विकत घेतले असतील ?"

"अगदीं थोडक्यांत मिळत होतो म्हणून मी आणखी एक शालजोडी विकत घेतली." गणपतीभय्यानें सांगितलें.

"ती पिवळ्या रंगाची होती ?"

"होय !" गगपतीभय्या दचकून म्हणाला. "पण, गंगाबाई, तुम्हांला त्या शालजोडीचा रंग पिवळाच होता, हें कसें माहीत ?

"आणि तिचा पदर जरीचा होता ?"

"गंगाबाई, तुम्ही ती शालजोडी पूर्वी कोठें तरी खात्रीनें पाहिलेली असला पाहिजे." गणपतीभय्या मोठ्या विस्मयानें म्हणाला, "एरवीं ती पिवळी होती, तिचा पदर जरीचा होता, इतकें तुम्हांला कसें माहीत ?"

"पण ती शालजोडी आतां कोठें आहे ! मी ती समक्ष पाहिल्याशिवाय काय सांगूं ?" गंगाबाई म्हणाल्या.

"मी ती आतां थोड्या वेळांत तुम्हांला आणून दाखवितों." असें म्हणून गणपतीभय्या चटकन् उठून ती शालजोडी आणण्याकरितां बाहेर निघून गेला. गंगाबाईच्या मनांत, ती शालजोडी घरांतच कोठें तरीं असेल, असें वाटलें होतें. परंतु ती बाहेरून आणण्याकरितां गणपतीभय्या बाहेर कोठें तरी जात आहे, असें तिनें पाहिलें, तेव्हां ती शालजोडी आत्तांच न आणिली तरी चालेल, असें गंगाबाई म्हणाली. पण तिचे ते शब्द न ऐकतांच गणपतीभय्या बाहेर निघून गेला. तेव्हां गंगाबाईनें त्या मुलाला आपल्या मांडीवर घेतलें आणि फिरून एकदां त्याच्या जिभेला मात्रेचें तें चाटण फांसलें. त्या दोन आंगठ्या आणि ती पिवळी जरतारीची शालजोडी ह्यांच्यावरून उघडकीस येऊं लागलेल्या प्रकाराबद्दल ती मोठ्या आशायुक्त अन्तःकरणानें आपल्या मनांत चिंतन करूं लागली. या चिंतनांत ती इतकी गर्क होऊन गेली होती कीं, गणपतीभय्या बाहेर जाण्याच्या आणि बाहेरून परत येण्याच्या दरम्यान किती वेळ लोटला, ह्याचें तिला कांहीं भान राहिलें नाहीं. इतकी ती त्या विचारांत निमग्न होऊन गेलेली होती. अखेरीस "हो पहा ती शालजोडी !" असें म्हणून गणपतीभय्यानें आणलेली शालजोडी तिच्यापुढें ठेविली, तेव्हां ती शुद्धीवर आल्यासारखी झाली, आणि तिची दृष्टि त्या

शालजोडीकडे वळली. तिनें त्या मुलाला आपल्या मांडीवरून क्षणभर खालीं ठेविलें; आणि ती शालजोडी आपल्या हातांत घेऊन तिनें ती उलगडून पाहण्याला सुरुवात केली. ती पाहत असतांना ही आपल्या ओळखीची शालजोडी आहे, अशा भावनेचीं स्पष्ट चिन्हें गंगाबाईच्या मुखचर्येवर दिसूं लागलीं. आणि " छे, नकोच संशय! अगदीं तीच ही शालजोडी!" असे उद्गार अखेरीस गंगाबाईच्या तोंडून निघाले.

हा सगळा प्रकार गणपतीभय्या लक्षपूर्वक परंतु मोठ्या आश्चर्यानें पहात होता. परंतु गंगाबाईच्या ह्या सगळ्या बोलण्याचा आणि वर्तणुकीचा अर्थ काय, हें मात्र त्याच्या लक्षांत आलें नाहीं. एवढें मात्र त्याच्या लक्षांत आलें कीं, गंगाबाईला या शालजोडीचें कांहीं तरी विशेष महत्त्व वाटत असलें पाहिजे. म्हणून तिच्या समाधानाकरितां गणपतीभय्यानें गंगाबाईला असें सांगितलें कीं, " गंगाबाई, तुमचे माझ्यावर अनंत उपकार झालेले आहेत. त्यांच्या मोबदल्यांत मी तुम्हांला कांहींही आणि कितीही दिलें तरी तें पुरें पडणार नाहीं, हें मी जाणतों. तरी पण ही शालजोडी ज्या अर्थी तुम्हांला इतकी महत्त्वाची वाटत आहे त्या अर्थी ती तुमच्याचजवळ असूं द्या. मी ती तुम्हांला देतों. पण इतकेंच नव्हे तर आणखीही तुम्हांला काय पाहिजे, तें मला सांगा; मी तेंही तुम्हांला देईन."

" तर मग या शालजोडीप्रमाणेंच त्या दोन्ही आंगठ्याही मला पाहिजे आहेत." गंगाबाईनें अतिशय कष्टानें आपली इच्छा प्रदर्शित केली.

परंतु गणपतीभय्याचें मन या वेळीं कृतज्ञतेनें अगदीं द्रवून गेलेलें होतें. गंगाबाईची इच्छा समजल्याबरोबर गणपतीभय्यानें ती हिऱ्याची आंगठी ताबडतोब आणिली; आणि दुसरी ती सोन्याची आंगठी तर तेथेंच होती. त्या दोन्हीही आंगठ्या घेऊन गणपतीभय्यानें गंगाबाईच्या पुढें ठेवल्या आणि त्यांचा स्वीकार करण्याविषयीं गणपतीभय्यानें गंगाबाईची विनंती केली. पण विनंतीची जरूरीच नव्हती. गंगाबाईला त्या दोन आंगठ्या आणि तिसरी ती शालजोडी अशा त्या तिन्हीही वस्तु पाहिजेच होत्या. गंगाबाईनें त्या तिन्हीही वस्तूंचा अतिशय नम्रतापूर्वक स्वीकार केला व त्या दोन्ही आंगठ्या आपल्या बोटांत घालून ती जरीकाठी शालजोडी त्यांनीं आपल्या अंगावर पांघरण्याला घेतली. पण हें करीत असतांना त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा चाललेल्या होत्या. अशा स्थितींतच

त्यांनीं गणपतीभय्याच्या मुलाला फिरून आपल्या मांडीवर उचलून घेतलें, आणि त्याच्या तोंडाला त्यांनीं फिरून एक मात्रेचें बोट लावलें.

“ गंगाबाई, ” गणपतीभय्यानें साशंक होऊन विचारिलें. “ तुम्ही रडत का आहां ? माझ्या हातून कांहीं चुकलें का आहे ? तुम्हांला कशामुळें इतकें दुःख होत आहे ? ”

पण गणपतीभय्याचे हे प्रश्न ऐकून गंगाबाईला जास्तच रडूं कोसळलें. तेव्हां आतां यापुढें आणखी प्रश्न विचारून गंगाबाईच्या मनाला अधिक दुःख द्यावें, हें बरोबर नाहीं, असें म्हणून फिरून केव्हां तरी या सगळ्या प्रकाराच्या कारणाचा आपण उलगडा करून घेऊं, अशा इराद्यानें गणपतीभय्यानें आपल्या बोलण्याचा ओघ दुसरीकडे वळवून, गंगाबाईच्या मनाला त्या वेळेपुरता तरी निदान विसर पाडण्याचा त्यानें प्रयत्न केला, व तो तेवढ्यापुरता थोडासा यशस्वीही झाला. पण ह्या आपल्या वस्तु पुनरपि दृष्टीस पडल्यामुळें गंगाबाईच्या मनामध्यें जें प्रचंड वादळ उद्भवलें होतें, तें कसें शांत होणार !

• • •

: :

# रांग एकविसावी

मध्यंतरींच्या अवधीमध्यें बऱ्याच गोष्टींचा उलगडा होऊन गेला. गंगाबाईला आपली सगळी हकीकत गणपतीभय्याला सांगणें जरूर पडलें. त्या आंगठ्या नेहमीं आपल्या नवऱ्याच्या बोटांत असत, आणि ती शालजोडी नेहमीं भय्यासाहेब आपल्या अंगावर घेत असत, आणि म्हणून त्या वस्तु आपल्याला इतक्या प्रिय झालेल्या आहेत, व त्यांवरून भय्यासाहेबांचा पुढें आपल्याला शोध लावण्याला कांहीं तरी साधन सांपडेल, असें आपल्याला वाटत असल्याचें गंगाबाईनें गणपतीभय्याला सांगितलें. गंगाबाईनें आपली सर्व हकीकत गणपतीभय्याला मोकळ्या मनानें सांगितली. पण हे जिन्नस तुमच्यापाशीं कसे आले, याविषयींचे प्रश्न गंगाबाई गणपतीभय्याला एकसारखे दोन तीन दिवस विचारीत होती. पण गणपतीभय्यानें अजूनपर्यंत त्यांचें सरळ असें एकही उत्तर दिलें नव्हतें. कांहीं तरी टाळाटाळ करून तो त्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें लांबणीवर टाकीत होता. असें करण्यांतील त्याचा उद्देश गंगाबाईच्या ध्यानांत पूर्णपणें येऊन चुकलेला होता. हा चोरीचा माल गणपतीभय्याच्या ताब्यांत होता, हें तर उघडच होतें. पण ही गोष्ट कबूल करण्याची गणपतीभय्याला लाज वाटत होती. व याबद्दल आतां कांहीं तरी खोटी आणि बनावट गोष्ट गंगाबाईला सांगावी किंवा आपली खरी हकीकत सांगून आपला अन्याय कबूल करावा, या घोटाळ्यांत तो दोन तीन दिवस पडलेला होता. ही त्याची मनःस्थिति गंगाबाई पूर्णपणें जाणत होती. परंतु ह्या सांपडलेल्या वस्तूंवरून आपल्या नवऱ्याचा लवकर कांहीं तरी सुगावा लागावा, यासाठीं गंगाबाई अतिशय उत्कंठित झाली होती. आणि म्हणून ती पुन्हां पुन्हां तेच तेच प्रश्न गणपतीभय्याला विचारीत होती. परंतु गणपतीभय्याच्या मनाचा अद्यापिही हिय्या होईना.

गणपतीभय्याचा मुलगा अजूनही आजारीच होता. त्याला फिरून मधून मधून वाताचे झटके येतच होते. आणि म्हणून गणपतीभय्यानें गंगाबाईला तें पूर्वीचेंच मात्रेचें चाटण तयार करण्याला सांगितलें. त्याप्रमाणें गंगाबाई चाटण तयार करीत होती, इतक्यांत गणपतीभय्यानें त्या मात्रेंत सोनें उगाळण्याकरितां दुसरी एक नवीन आंगठी आणून दिली. ती पाहून गंगाबाई म्हणाली, "ही कोठली दुसरी आंगठी? अशा तुमच्यापाशीं आंगठ्या आहेत तरी किती? आणि ह्या तुम्ही कोठून पैदा केल्या? ही आंगठी मी तुमच्या मुलाच्या मात्रेमध्यें कधीही उगाळणार नाहीं. मला वाटतें, ही सुद्धां चोरांचीच आंगठी असली पाहिजे! असली ही आंगठी उगाळून त्यांतील सोन्याचे कण ह्या मुलाच्या पोटांत माझ्या उघड्या डोळ्यांनी मी कसे जाऊं देऊं? त्या दिवशीं मी ही जी माझ्या बोटांतील अंगठी उगाळली, ती देखील चोरीचीच खरी; पण त्या वेळीं ही चोरीचीच आहे असें मला पक्के माहीत नव्हतें. म्हणूनच मी ती उगाळली. नाहीतर मीं ती कधींहि उगाळली नसती. पण आतां त्या तसल्या—पातकांनीं भरलेल्या—अंगठ्या पाहिजेत कशाला? आतां ही माझी सत्तेची आंगठी आहे. ही मी उगाळीन. उगीच भलत्या-सलत्या पाहिजेत कशाला? कारण, मला हें तुमचें मूल जगवयाला पाहिजे आहे. त्याच्या पोटांत मी हें चोरीच्या सोन्याचें प्रत्यक्ष हालाहल विष कसें घालूं? गणपती-भय्या, तुम्हांला कल्पना नाहीं; पण ही आंगठी चोरीची असली,—आणि ती चोरीचीच असली पाहिजे, याबद्दल आतां मला मुळींच शंका उरलेली नाहीं,—तर या लहानशा आंगठीच्या भोंवतीं देखील हिच्या मालकाच्या किती तरी अतृप्त वासना गुरफटून राहिल्या असतील! त्यांचा एक कण देखील जर या मुलाच्या पोटांत गेला, तर याचा वात भयंकर वाढेल. कदाचित् ज्याच्या बोटांत ही आंगठी असेल, त्याच्या बोटांतून ती चटकन् निघाली नसली, तर चोरांनीं आणि ठगांनीं कदाचित् त्याचें तें बोट कापूनही ही आंगठी काढून घेतली असेल! आणि त्या वेळचें रक्त जर या आंगठीला लागलेलें असेल, आणि जर तें ही आंगठी उगाळल्यानें तुमच्या मुलाच्या पोटांत जाईल, तर तें सूड घेण्यासाठीं भुकेलेलें रक्त तुमच्या मुलाच्या पोटांत गेल्यानंतर स्वस्थ बसेल, असें कां तुम्हांला वाटतें? गणपतीभय्या, असल्या दुसऱ्यांच्या वासनांनीं विटाळलेल्या आणि रक्तांनीं डागळलेल्या सोन्याच्या लगडीच्या लगडी तुम्ही आणल्या, म्हणून त्या काय मनुष्याचे प्राण वांचविणार आहेत! या जगांत वाइटापासून चांगलें कधींहि निष्पन्न व्हावयाचें नाहीं! गरीब बिचारे बैरागी! बापडे दारोदार भिक्षा

मागून आपलें पोट भरीत असतात! त्यांच्यापाशीं कुठलें सोनें आलें आहे! पण त्यांच्यापाशीं त्यांचें शुद्ध आचरण आणि त्यांची कडकडीत तपश्चर्या मात्र असते! त्याच्या जोरावर ते एका राखेच्या चिमटीनेंही मरणोन्मुख झालेल्या लोकांना बरें करतात! त्यांच्यापाशीं कुठलें आलें आहे सोनें! आणि कुठलें आलें आहे मोतीं! सत्य आणि शुद्ध आचरण हेंच त्यांचें सोनें आणि परोपकार हेंच त्यांचें मोतीं! या सोन्या-मोत्याच्या व्यापारावर ते जन्माचें कल्याण साधतात! अशा पवित्र आणि सदाचरणी लोकांच्या राखेच्या चिमटीलाही जी किंमत आहे, ती अन्यायानें मिळविलेल्या तुमच्या सोन्याच्या ढिगांनाही नाहीं! म्हणून म्हणतें, कीं ही आंगठी मी उगाळीत नाहीं. माझ्यापाशीं आतां माझ्या मालकीची ठरलेली ही आंगठी आहे ती मी उगाळतें. पण तो विषारी आंगठी नको—हें मूल किती पवित्र आहे! याच्या हातून अद्यापि या जगांत आल्यापासून एकही अपराध झालेला नाहीं! अशा ह्या पवित्र देहामध्यें तुमच्या चोरीच्या सोन्याच्या कणांना कोठें जागा मिळणार आहे? तुमचीं पातकें या पवित्र देहामध्यें कशाला शिराव-याला पाहिजे आहेत? बापांनीं स्वतः आपल्या पातकांनीं भ्रष्ट व्हावें आणि आपल्या अन्यायांनीं आपल्या अनाथ अर्भकालाही त्यांनीं भ्रष्ट करावें, हें काय पित्याचें पुत्रवात्सल्य झालें? कांहीं नको! तुमची आंगठी नको आणि कांहीं नको! त्या दीनदयाळ भगवंतापाशीं इतकी दया भरलेली आहे कीं, तो आपल्या नुसत्या कृपाकटाक्षानेंही या बाळाला आराम देईल!"

"पण गंगाबाई, त्या दीनदयाळ भगवंताचा कृपाकटाक्ष मला आराम देईल काय हो?" गणपतीभय्यानें अगदीं गहिंवरून येऊन विचारलें. गंगाबाई वरील शब्द उच्चारीत असतां त्यांचा गणपतीभय्याच्या मनावर विलक्षण परिणाम घडत चालला होता. त्याला अतिशय पश्चात्ताप वाटूं लागला होता; आणि त्याचें अंतःकरण सद्गदित होऊन त्याला रडूं कोसळूं लागलें होतें. त्याचीं मागचीं सगळीं कुकर्मे त्याला आठवूं लागलीं. व त्याचा आजारी मुलगा त्याला समोर दिसतच होता. अशा स्थितींत गंगाबाईंनीं स्वाभाविक रीतीनें उच्चारलेल्या शब्दांनीं त्याचे डोळे उघडले आणि त्याच्या हृदयांत एकदम लख्ख प्रकाश पडला. आणि अशा पश्चात्तापाच्या स्थितींत त्याच्या तोंडून वरील प्रश्न बाहेर पडला.

त्या वेळीं गंगाबाईनें त्याला धीर दिला आणि पश्चात्तापानें शुद्ध झालेल्या अंतःकरणाचा भक्तवत्सल भगवान् कधींही अव्हेर करीत नाहीं, असें तिनें त्याला

अनेक रीतीनें सांगितलें. नंतर गणपतीभय्यानें परमेश्वराची करुणा भाकली, आणि आपलीं सगळीं पातकें त्यानें गंगाबाईजवळ निवेदन केलीं.

त्याच्या पातकांचे मुख्यत्वेंकरून दोन वर्ग होते. एक तर तो पहिल्यानें चोऱ्या करीत असे, आणि पाठीमागून त्यानें चोरीचा माल विकत घेण्याचा धंदा सुरू केला होता. आणि श्रमावांचून पैसा मिळूं लागला म्हणजे त्याचा दुरुपयोग वेश्यागमनामध्यें व्हावयाचा, हें ठरलेलेंच असतें. त्याप्रमाणें वेश्यांचा नाद हें त्याचें दुसरें दुर्व्यसन होतें. ह्या दोन्ही व्यसनांच्या पायीं त्यानें पुष्कळ अनन्वित कृत्यें केलेलीं होतीं. पण त्या सगळ्यांच्याबद्दल त्याला हल्लीं अतिशय पश्चात्ताप होत होता. व त्यामुळें त्यानें आपली सगळी खरी हकीकत गंगाबाईपाशीं सांगितली. गंगाबाईच्या दोन आंगठ्या आणि तिसरी शालजोडी ह्या तिन्हीही जिनसा आपण एका चोरीचा माल विकणाऱ्या चोरापासून विकत घेतल्याचें गणपतीभय्यानें कबूल केलें. व तो चोर फिरून चोरीचा माल विकण्याकरितां घेऊन आला, म्हणजे त्याच्यापासून ह्या आंगठ्यांच्या आणि शालजोडीच्या दरवड्याची माहिती विचारूं, व त्याच्या माहितीनें भय्यासाहेबांचा जो कांहीं शोध लागेल, तो सर्व आपण अवश्य काढूं, असें गणपतीभय्यानें आश्वासन दिलें. त्यामुळें गंगाबाईच्या मनाला पुष्कळ बरें वाटलें. आपल्या नवऱ्याचा कांहीं तरी शोध काढण्याला आपण या मार्गानें समर्थ होऊं अशी तिला आशा वाटूं लागली. आणि तिच्या हातांत असलेल्या त्या दोन आंगठ्या आणि तिच्या अंगावर असलेली ती शालजोडी यांच्यामुळें आपल्या पतीचा शोध लागण्याचा हा संभव उत्पन्न झाला, म्हणून त्या तिन्ही वस्तूंना आपल्या मनामध्यें मोठा धन्यवाद देऊन गंगाबाई गणपतीभय्याच्या त्या मुलाला आपल्या मांडीवर घेऊन अतिशय प्रेमानें औषधोपचार करूं लागली.

इतक्यांत गणपतीभय्याची पूर्वीची—पण हल्लीं टाकून दिलेली—वेश्या कमलाबाई ही तेथें आली. मागच्या रांगेंतील संभाषणांत शालजोडीची गोष्ट निघाली तेव्हां गणपतीभय्या ताबडतोब बाहेर निघून गेला. आणि थोड्या वेळांत परत येऊन त्यानें ती शालजोडी गंगाबाईच्या पुढें ठेविली, असें सांगितलेलें आहे. ही चोरीची शालजोडी विकत घेतल्यानंतर त्यानें ती कोणाला वापरण्याकरितां दिलेली होती, हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. ती जरीकाठी शालजोडी कमलाबाईच्या घरीं होती. परंतु कृतज्ञतेमुळें गणपतीभय्याचें मन त्या वेळीं गंगाबाईच्या संबंधानें इतकें उचंबळून गेलेलें होतें कीं, तिला जर ती शालजोडी पाहिजे होती, तर तीही ताबड-

तोब आणून देण्याला त्या वेळीं गणपतीभय्याला हरकत वाटली नाहीं. गणपतीभय्या आपल्या घरांतून ताबडतोब उठला, कमलाबाईच्या घरीं गेला, आणि तिला कांहीं तरी सांगून तिच्यापासून त्यानें ती शालजोडी घेतली आणि गंगाबाईच्या पुढें आणून ठेविली. परंतु ह्या गोष्टीला दोन तीन दिवस झाले. कमलाबाईला वाटलें कीं, आज नाहीं उद्यां गणपतीभय्या आपली शालजोडी आपल्याला आपण होऊन परत आणून देईल. पण तसें कांहींच झालें नाहीं; म्हणून आपली शालजोडी परत मागण्याच्या निमित्तानें कमलाबाई गणपतीभय्याच्या घरीं आली. तों आपले-कडून आणलेली शालजोडी गंगाबाई पांघरून बसलेली तिच्या दृष्टीस पडली! तेव्हां कमलाबाईला अतिशय राग आला व तिनें तेवढ्यावरून नाहीं नाहीं तीं कुभांडें रचण्याला सुरवात केली. गणपतीभय्यावरही नाहीं नाहीं ते शब्दांचे भडिमार तिनें सुरू केले. रागानें बोलतां बोलतां गंगाबाईच्या बोटांत ज्या दोन आंगठ्या होत्या, तिकडेही कमलाबाईचें लक्ष गेलें. त्या आंगठ्या तिनें पूर्वीं कधीं कधीं गणपतीभय्याच्या हातांतहि पाहिलेल्या होत्या. त्यावरून ह्या आंगठ्या गणपतीभय्यानें कामवश होऊनच गंगाबाईला दिल्या असल्या पाहिजेत, अशी मत्सरानें अंध झालेल्या कमलाबाईला खात्री वाटूं लागली व त्यावरून तर तिनें फारच मोठा ग्रंथ रचला. मत्सराला अगदीं थोडेंही कारण पुरतें. मग इतकी सामग्री मिळाल्यावर त्याच्यावर तिला कोणती इमारत रचतां येणार नाहीं? कमलाबाईनें आपल्या बायकांच्या स्वभावाला अनुसरून पुष्कळ अद्वातद्वा बोलण्याची शिकस्त केली. व रागाच्या आवेशामध्यें गंगाबाईच्या अंगावरून ती आपली शालजोडी ओढून घेण्याचाही तिनें एकदां प्रयत्न केला. पण हल्लींच्या नव्या स्थितीमध्यें ती शालजोडी गंगाबाईला तिच्या प्राणापेक्षांही जास्त जरूरीची होती, म्हणून तिनें ती बिलकूल सोडली नाहीं. तेव्हां निरुपाय होऊन संतापानें हातपाय आपटीत, बोटें मोडीत, हातावर हात चोळीत आणि त्या दोघांनाहि शिव्याशाप देत ती निघून गेली. पण जातांना, "मी खरी नांवाची कमलाबाई असेन, तर या गोष्टीचा पक्का सूड उगवल्यावांचून मी कधींही राहणार नाहीं!" असे जे तिनें शब्द उच्चारले, ते ऐकून मात्र गंगाबाईच्या मनामध्यें अगदीं धस्स होऊन गेलें! कारण, दुष्ट माणसांच्या हातून काय होणार नाहीं!

• • •

## : : रांग बाविसावी

जे अभयानंदस्वामी मागील रांगेमध्यें वर्णिलेले आहेत, ते कोण असावेत, याच्याबद्दल वाचकांनीं आपले तर्क चालवून कांहीं तरी ठरविलेंच असेल. ते तरुण होते, सशक्त होते, अंगापिंडानें सुरेख आणि बांधेसूद होते; विद्वान होते, शास्त्री-पंडितांत मोडण्यासारखे होते वगैरे जीं वर्णनें ह्या अभयानंदस्वामींच्या संबंधानें मागील प्रकरणांत देण्यांत आलेलीं आहेत, त्यांच्या सादृश्याच्या खुणा मागील कथाभागांतील कोणत्या पात्राशीं विशेष जमतात, याच्याबद्दल वाचकांनीं आपल्या मनामध्यें आतांपर्यंत उहापोह केलाच असेल व त्यावरून स्वामी अभयानंद हे दुसरे कोणी नसून पूर्वींच्या कथाभागांतील भाऊसाहेब किंवा भय्यासाहेब हेच हे हल्लींचे अभयानंदस्वामी असले पाहिजेत, असें जर त्यांनीं अनुमान बांधलें असेल, तर तें त्यांचें अनुमान चुकलेलें नाहीं. त्यांची कल्पना अगदीं बरोबर आहे. पूर्वींचे भय्यासाहेब तेच हल्लींचे अभयानंद होत. पूर्वीं ज्या भय्याखानाला आपण आपल्या चोरांकडून रानांतील गुहेमध्यें जाळून भस्म केलें, असें करीमबक्ष समजत होता, तोच भय्याखान वास्तविकपणें जळला गेलेला नसून अद्यापि जिवंत होता, आणि तोच हल्लीं अभयानंदस्वामी या नांवानें उत्तरमठाच्या शंकराचार्यांच्या छावणीमध्यें वास्तव्य करीत होता. चोरांनीं गुहा पेटवून दिल्यानंतर भय्यासाहेब आणि जम्नामाई हीं दोघें जेव्हां तेथून निघालीं, तेव्हांच भय्यासाहेबांचा विचार संन्याशाचा वेष घेऊन शंकराचार्यांच्या छावणींत शिरावें असा होता. पुढें शंकराचार्यांच्या मुक्कामाचा शोध करीत जातां जातां रानांत अमुक ठिकाणीं एकदोन कोसांवर त्यांचा मुक्काम आहे, असें भय्यासाहेबांना एके दिवशीं संध्याकाळीं कळलें आणि त्याच्या दुसऱ्या दिवशींच्या प्रातःकाळानें भय्यासाहेब अभयानंदस्वामी झालेले एकदम पाहिले ! गृहस्थाश्रम जाऊन चतुर्थाश्रम उत्पन्न झाला ! आणि

पांढरे कपडे जाऊन त्यांच्या जागीं एकाएकीं कपड्यांना भगवा रंग आला! आणि अशा रीतीनें भय्यासाहेब वरून तर पुरे संन्यासी बनले! पण आंतून ते होते तसेच होते. त्यांच्या शरीरानें गृहस्थाश्रमाच्या वस्त्रांचा त्याग केला; परंतु त्यांच्या अन्तःकरणानें गृहस्थाश्रमांतील वासनांचा मुळींच त्याग केलेला नव्हता. त्यांनीं आपल्या शरीरावरील शिखासूत्र तोडून टाकलें; पण त्यांनीं आपल्या मनांतील वैषयिक बंधनें कोणतींही तोडलेलीं नव्हतीं. त्यांनीं आपल्या अंगावर काषाय वस्त्र पांघरून घेतलें, पण त्यांच्या हृदयांतील कामकल्पनांवर जें वैराग्याचें पांघरूण पडावयाला पाहिजे होतें, तें मुळींच पडलेलें नव्हतें. आपली प्रियपत्नी मरणच पावलेली असली पाहिजे, असें जरी सप्रमाण रीतीनें त्यांना सिद्ध करतां येत होतें, तरीही कदाचित् ती जिवंत असेल, अशी त्यांना उगीच एक आशा वाटत असे. आणि ती जिवंत असली, तर कोठें असेल, कदाचित् कोंकणांत राजापुरास ती आपल्या माहेरीं गेली असेल काय, किंवा एकटी दुकटी इतक्या लांब जाऊं शकणार नसल्यामुळें ती परत झांशीला गेली असेल काय, किंवा दुसरीकडे कोठें असली तरी आतां तिला किती महिने झाले असतील, ती बाळंत झाली असेल काय, आणि बाळंत झाली असली तर तिला मुलगा झाला असेल किंवा मुलगी झाली असेल, असे एक ना दोन, हजारों सांसारिक विचार त्या अभयानंदस्वामींच्या भगव्या वस्त्रांच्या खालीं त्यांच्या अन्तःकरणामध्यें खेळत असत. अशा रीतीनें त्यांचें मन जरी संन्यास घेण्याला तयार झालेलें नव्हतें, तरी त्यांच्या शरीरानें संन्यास घेण्याचें धाडस केलें. आणि एके दिवशीं सकाळीं भय्यासाहेबांचे अभयानंदस्वामी बनले. परंतु आपल्या ह्या अभयानंदस्वामींचा हा संन्यास मनानें जसा खरा नव्हता, तसाच तो धर्मशास्त्रानेंही खरा नव्हता. कारण त्या वेळीं भय्यासाहेबांनीं मंत्रपूर्वक आणि विधिपूर्वक प्रेष म्हणून कांहीं संन्यास घेतलेला नव्हता, आणि ते तसा खरा संन्यास घेणार तरी कसे? त्यांच्या किती तरी आशा अद्यापि अतृप्त राहिलेल्या होत्या; व त्या आपण परिपूर्ण करूं अशी त्यांना उमेद होती. म्हणून त्यांनीं खरा संन्यास घेतलेलाच नव्हता. फक्त प्रसंगापुरतें त्यांनीं हें वेषांतर केलेलें होतें आणि ह्या वेषांतराच्या साहाय्यानें आणि शंकराचार्यांच्या साहचर्यानें आपण ह्या चोरांचा आणि ठग लोकांचा शक्य झाल्यास बींमोड करून आपण आपल्या प्रिय पत्नीचा आणखी शोध करूं, आणि त्या प्रयत्नांत काय होतें तें पाहून नंतर आपल्या देशाच्या इतिहासांत आपलें चिरस्थायी होण्यासारखें आपल्याला कांहीं

करतां आलें, तर आपण करूं, अशी त्यांची इच्छा होती. आणि म्हणून त्यांचा संन्यास बोलून चालून वरवरचाच होता. आणि तसल्या त्या तात्पुरत्या संन्यासाचें पांघरूण घेऊन त्यांनीं शंकराचार्याच्या मठांत प्रवेश करण्याचा निश्चय केला. यापूर्वीं इतके दिवसपर्यंत भय्यासाहेब आणि जम्नामाई हीं दोघें जरी एकत्र राहत होतीं, तरी आतां जें सोंग आणावयाचें त्याची बतावणी योग्य होणें जरूर असल्यामुळें स्वामींच्या सहवासामध्यें कोणी स्त्री जवळ असणें अगदीं साहजिकपणेंच गैर होतें. म्हणून भय्यासाहेब अभयानंदस्वामी बनल्यानंतर जम्नामाईनें आपणच होऊन परवानगी मागितली, आणि ती आपल्या नवऱ्याचा शोध करण्याकरितां जंगलांत निघून गेली. आणि तिला निरोप दिल्यानंतर एकदोन कोसांच्या मुक्कामा-वर जवळच असलेल्या आचार्यांच्या मठामध्यें आपल्या अभयानंदस्वामींची स्वारी "नारायण!" "नारायण!" "नारायण!" असें नारायणनामाचें स्मरण करीत करीत प्राप्त झाली. ही अभयानंदस्वामींची पूर्वीची हकीकत होय. त्यानंतर आपल्या गुणांनीं ते त्या मठांत सर्वांना प्रिय झाले, व आचार्यांनीं त्यांची विद्वत्ता आणि योग्यता पाहून त्यांना धर्माधिकाऱ्याचें पद अर्पण केलें. आणि अशा स्थितींत अभयानंदस्वामी शंकराचार्यांच्या मठामध्यें आपली कालक्रमणा करीत होते.

पण ह्या अभयानंदस्वामींच्या भगव्या पोषाखाखालीं आपला आवडता मुलगा भय्यासाहेब एखाद्या शंकराचार्यांच्या मठामध्यें सुखरूप आहे, हें त्या बिचाऱ्या भय्यासाहेबांच्या आईला काय माहीत! ती बिचारी झांशीस आपल्या वाड्यांत आपल्या मुलाच्या काळजीनें झुरणीस लागलेली होती. तिला चैन कसें तें पडतच नव्हतें. आपल्या मुलासाठीं तिनें किती तरी नेमधर्म चालविले होते. पण कशानें कांहीं गुण येत नव्हता. आपल्या मनाची करमणूक करून घेण्यासाठीं भय्यासाहेबांची आई संध्याकाळच्या घटका दोन घटका पुराण ऐकत बसत असत. पण तें ऐकून कधीं कधीं त्यांना आपल्या मुलाचें विस्मरण पडण्याच्या ऐवजीं त्याचें स्मरणच त्यांना जास्त होऊं लागे. भागवतांतलि दशमस्कंधाचें पुराण सुरू करण्यांत आलेलें होतें. त्यांत बाल्यावस्थेंतील भगवान् श्रीगोपाळकृष्णावर कांहीं संकट आलें म्हणजे त्याची आई यशोदा कशी घाबरून जात असे, तें वर्णन तिला आपल्या मुलाची आठवण जास्तच तीव्रतेनें होत असे. एकदां पुराणांत कालियामर्दनाचें आख्यान चाललेलें होतें. त्यांत कृष्ण यमुनेच्या डोहांत बुडून फिरून वर आला, हें वर्णन सांगून पुराणिकबुवांनीं अध्याय संगावेला. पण भागवतांतलि

अध्याय जेथें संपला, तेथें भय्यासाहेबांच्या आईच्या मनांतील शोकाच्या अध्यायाला सुरवात झाली. त्या आपल्या मनाशीं म्हणाल्याः—" माझें असेंच होईल काय ? हे भगवंता गोपालकृष्णा, तूं कालियाडोहांतून वर येऊन आपल्या यशोदा मातेला संतोषित केलेंस, त्याप्रमाणें माझा मुलगा कोठें नाहींसा झाला आहे, तो फिरून भेटून यशोदा मातेप्रमाणें तो मला आनंदित करील काय? हे श्यामसुंदरा श्रीकृष्णा, तूं यमुना डोहांत बुडून नाहींसा झाला होतास, तसाच माझा मुलगा आज कित्येक दिवसपर्यंत कोठें नाहींसा झाला आहे; आणि त्या वेळीं, हे कमलाक्षा यशोदानंदना, तुझ्या आईची जशी दीनवाणी स्थिति झाली होती, तशीच हल्लीं माझीही झालेली आहे! त्या संकटांतून, हे करुणाघना, तूं आपल्या आईला मात्र सोडवावेंस आणि मला तसेंच दुःखांत ठेवावेंस, हा पक्षपात, हे भक्तवत्सला नारायणा, तुझ्या ब्रीदाला कसा शोभेल? तूं माझी आणि माझ्या मुलाची गांठ घालून दिलीच पाहिजेस. आणि अशा मायलेकरांच्या भेटी तूं थोड्या का करून दिल्या आहेस! सांदीपनीची संतति यमसदनांत गेली असतांही ती तूं आपल्या गुरूला परत आणून नाहीं का दिलीस? मग माझ्यावरच तूं इतका निष्ठुर कां होशील? तुझीच माता देवकी हिचे कंसानें मारलेले जे सात पुत्र त्यांचेंही पुनर्दर्शन तूं आपल्या आईला नाहीं का करवून दिलेंस? मग माझ्यावरच तूं इतका निष्ठुर कां होशील? पांडव वनवासांतून अज्ञातवासांत गेल्यानंतर फिरून कैक दिवसांनीं त्या पांडवांची आणि त्यांची आई जी कुंती यांची भेट कोणीं करवून दिली? तूंच ना तें केलेंस? मग माझ्याच ठिकाणीं तेवढा, हे दीनवत्सला, दीनानाथा, तूं निष्ठुर काय म्हणून होशील?" असे अनेक विचार मनांत आणून भय्यासाहेबांची आई ढळढळां रडत असे. कित्येक दिवसांनीं भागवतांतील कृष्णलीला संपल्यानंतर वाल्मीकि-रामायणांतील युद्धकांडाची कथा सुरू करण्यांत आलेली होती. तीही संपत आली. पण भय्यासाहेबांच्या आईचें दुर्दैव संपलें नाहीं. चौदा वर्षांनीं राम आपल्या आईला भेटला, तसा चौदा वर्षांनीं तरी आपला मुलगा आपल्याला भेटेल काय, असे विचार तिच्या मनांत येत असत. पण माझा भय्यासाहेब मला चौदा वर्षांनीं भेटणार असला, तरी इतके दिवस मी या दुःखांतून आतां कसली जगणार, असें वाटून त्यांची अतिशय निराशा होत असे. रामाचें आगमन निवेदित करण्याकरितां अंजनीसुत मारुति पुढें आला, तशी माझ्या मुलाची वार्ता सांगण्याकरितां कोणी मजकडे येत असेल काय, अशा वेड्या आशेनें त्या चारी दिशांकडे आपली

दृष्टि गरगर फिरवीत असत! पण अखेरीस निराश होऊन त्या खालीं मान घालून रडत बसत! आणि आपलेंच दुःख आपणच शमवून घेण्यासाठीं त्या आपल्या मनाची समजूत घालीत असत कीं, " कुठें ती माउली कौसल्या आणि कुठें महापातकी आणि महामंदभगिनी मी! त्या जगद्वंद्य माउलीची मला कोठून सर येणार! जिच्या पोटीं प्रत्यक्ष भगवान् श्रीरामचंद्र जन्माला आले, तिची केवढी योग्यता! आणि तिच्याशीं मी आपली बरोबरी काय वेड्यासारखी लावीत बसलें आहें! पण कौसल्येची आणि माझी योग्यता जरी सारखी नसली, तरी तिचें पुत्रवात्सल्य आणि माझें पुत्रवात्सल्य या दोघांच्या योग्यतेंत मात्र यत्किंचित् देखील फरक नाहीं. म्हणून मला वाटतें कीं, कौसल्येचें पुत्रवात्सल्य जसें सफळ झालें, तसें माझ्या पुत्राच्या भेटीनें माझेंही पुत्रवात्सल्य सफळ होईल!" असे अनेक विचार त्यांच्या मनांत वरचेवर घोळत असत.

एकदां आपल्या घरच्या ज्योतिषीबुवांना बोलावून त्यांच्यापुढें आपल्या मुलाची जन्मपत्रिका ठेवून मोठ्या चिंताक्रांत मुद्रेनें भय्यासाहेबांच्या मातोश्री त्यांना भय्यासाहेबांच्यासंबंधानें इष्ट प्रश्न विचारीत बसल्या होत्या. बरींचशीं पंचांगें, दौत-लेखणी, कागद वगैरे सामग्री घेऊन जोशीबुवाही गणित करण्यांत गुंतलेले होते. त्यांनीं बराच वेळ नक्षत्रांचीं आणि राशींचीं नांवें घेऊन आणि बोटें घालून मोजून पाहून अखेरीस भय्यासाहेबांच्या आईला सांगितलें कीं, " तुम्ही कांहीं काळजी करूं नका. भय्यासाहेबांच्या जीवाला बिलकूल धक्का लागलेला नाहीं; ते कोठें तरी सुरक्षित आहेत."

" पण कोठें तरी म्हणजे कोठें?" आईसाहेबांनीं विलंब सहन होत नाहीं अशा उत्सुकतेनें विचारलें.

" आईसाहेब, हें जर मनुष्याला समजतें, तर मनुष्य आणि देव यांच्यांत अंतर तें काय राहिलें असतें?" जोशीबुवांनीं आईसाहेबांचें शांतवन करीत करीत भाषण केलें. " पण मी तुम्हांला एवढें सांगतों कीं, ते अगदीं सुरक्षित आहेत. त्यांच्या शनीच्या दशेमुळें त्यांना हा त्रास झालेला आहे. पण आतां अलीकडे ग्रहांचे योग त्यांना मोठे शुभकारक येत आहेत; आणि त्यांची तुम्हांला लवकरच कांहीं तरी खबर कळली पाहिजे, असा योग हल्लींच्या वेळेवरून दिसत आहे."

“ जोशीबुवा, ” आईसाहेब निराशेचा उच्छ्वास टाकून म्हणाल्या, “ कसला योग आणि कसलें काय! तुम्ही आज थोड्या का वेळां मला आश्वासनें दिलेलीं आहेत? मी समजतें कीं, माझ्या मनांतील आशेचा तंतु तुटून जाऊं नये म्हणून तुम्ही मला हीं कांहीं तरी खोटीं आश्वासनें देत असलां पाहिजे. पण मी वेडी, माझें आईचें प्रेम वेडें; माझ्याच्यानें राहावत नाहीं, म्हणून मी तुम्हांला फिरून फिरून विचारतें. पण तुम्ही तरी काय कराल? माझ्या कपाळींच जर पुत्रसुख नसेल, तर तुम्ही तें या पत्रिकेच्या कागदांतून का काढून देणार आहां? मला वाईट स्वप्नें पडतात. माझ्या मुलाची आणि माझी गांठ पडावयाची असती, तर अशीं अशुभ आणि अमंगल स्वप्नें मला कधींही पडलीं नसतीं. मी त्या दिवशीं देवांची पूजा करीत होतें. गंधाक्षत वाहून झाल्यावर मी देवावर फुलें वाहिलीं. तेव्हां देव कसा दिसत होता! मला वाटलें देव माझ्यावर अगदीं प्रसन्न झाला आहे! म्हणून अशा प्रसन्न झालेल्या देवापासून वरप्रदान मागून घ्यावें, म्हणून घाईघाईनें धूप समर्पण करून मी निरांजन लाविलें. आणि मी तें देवाभोंवतीं ओवाळतां ओवाळतां मी देवाला म्हटलें, ‘ देवा, हा दीपक मी जसा तुला दाखवीत आहें, तसा तूं माझा कुलदीपक पुत्र मला—’ हे माझ्या तोंडचे शब्द माझ्या तोंडांतच होते, इतक्यांत देवापुढें ठेवलेलें नैवेद्याचें दूध मांजरानें सांडलें. त्याला मी डाव्या हातानें हाकलतें, तों इकडे माझ्या उजव्या हातांतील निरांजन माझ्या हातांतून खालीं पडलें! तेव्हां माझ्या मनांत धस्स झालें. आणि मला सगळा भविष्य काळ माझ्या डोळ्यांपुढें दिसूं लागला. देवाची पूजा अर्धवट टाकावयाची नाहीं, म्हणून मी फिरून दुसरें नीरांजन लावून आणिलें, दुसरा नैवेद्य भरून आणिला आणि कशीबशी मी देवाची पूजा पुरी केली. पण फिरून आपल्या मुलाबद्दल देवापाशीं प्रार्थना करण्याचें मला धैर्य झालें नाहीं. तेव्हांपासून तीन दिवस माझ्या घशाखालीं अन्नाचा रस उतरला नाहीं! आपलें दैव अनुकूल नाहीं, तर देवावर विनाकारण संकट घालून काय उपयोग? एक दिवस उत्तर रात्रीं माझा थोडासा डोळा लागला. आणि तेवढ्यांत मला असें स्वप्न पडलें कीं, मी अगदीं मरणोन्मुख झालेली आहे. आणि माझ्या मुलानें माझ्या मानेखालीं मांडी दिली आहे. पण इतक्यांत कोणी तरी येऊन त्यानें माझ्या मुलाला माझ्याजवळून ओढून नेलें! असें मी स्वप्नांत पाहिलें. तेव्हां त्यावरून माझ्या कपाळीं पुत्रसुख नाहीं, हें खास. तो बिचारा श्रावण दशरथाच्या बाणांनीं

मरण पावल्यानंतर त्याच्या आईनें नाहीं का ' पुत्र पुत्र ' म्हणून प्राण सोडला ! तीच माझी गत होणार ! मी पूर्वजन्मीं कोणा माय-लेकरांची किंवा गाय-वासरांची ताटातूट केली असेल म्हणून देव मला या जन्मीं हें शासन करीत असला पाहिजे ! अशा स्थितींत, जोशीबुवा, माझ्या मुलाचे ग्रह आतां बदलत चालले आहेत, म्हणून तुम्ही काय सांगतां ? "

" मी दुसरें काय सांगणार ? ह्या पत्रिकेंतील ग्रह जे मला सांगत आहेत, तें मी तुम्हांला सांगत आहें. " जोशीबुवांनीं मुकाट्यानें सांगितलें. " तुम्ही कांहीं दिवस थांबा, म्हणजे माझ्या बोलण्याचें प्रत्यंतर तुम्हांला येईल. "

इतकें त्यांचें बोलणें होत आहे न होत आहे, तोंच ग्वाल्हेराहून गोपाळभय्यांकडून जासुदाबरोबर आलेला एक लखोटा घेऊन कारभारीसाहेब आईसाहेबांच्या जवळ आले व त्यांनीं त्यांना त्या लखोट्यांतील मजकूर वाचून दाखविला.

त्या पत्रांत लछमनसिंगाचीच बहुतेक हकीगत होती. व ती सर्व हकीगत वाचकांना मागील एका प्रकरणामध्यें पूर्वीच माहीत झालेली आहे. तीच हकीगत लछमनसिंगाकडून गोपाळभय्यांकडे जशी लिहून आली होती, तशीच्या तशीच गोपाळभय्यांनीं ती भाऊसाहेबांच्या आईकडे पाठविली होती. त्या हकीगतीचें तें भयानक वर्णन वाचून आईसाहेब भीतीनें अगदीं थरथर कापूं लागल्या. शिवाय ती हकीगत ऐकून भय्यासाहेबांच्या आईनें निराळेच तर्क बांधण्याला सुरवात केली. त्या आपल्या मनाशीं म्हणाल्या, " लछमनसिंगाचा भाऊ रामसिंग हा आपल्या भय्यासाहेबांच्याबरोबर रखवालदार म्हणून गेलेला होता. त्याला जर चोरांनीं ठार मारून अशा निर्दय रीतीनें जमिनींत पुरून टाकलेलें असलें, तर रामसिंगाच्या धन्याची त्यांनीं काय दशा केली असली पाहिजे, हें उघड होत आहे. " असे त्यांचे विचार मधून मधून एकीकडे चाललेच होते, आणि एकीकडे कारभारी वाचीत असलेलें पत्र त्या ऐकतच होत्या. आपल्या मुलाच्या संबंधाचा अनिष्टसूचक विचार मनांत येऊन पहिल्यानें त्या अगदीं उदासीन झाल्या होत्या. पण फिरून पुढें पुढें त्यांचें लक्ष त्या पत्रांतील हकीकतीकडे लागलें. गोपाळभय्यांनीं त्या पत्रांत पुढें असें आणखी लिहिलें होतें कीं, " आमचा शिपाई लछमनसिंग हा मोठा धूर्त आणि दृढनिश्चयी आहे. त्यानें आपल्या भावाचा पत्ता काढला, तसा त्या भावाला मारणाऱ्या चोरांचाही पत्ता काढण्यांत त्याला यश मिळत चाललें आहे, असें त्यानें मला कळविलें आहे. त्या चोरांची चांदबिबी या

नांवाची एक रखेली लछमनसिंगाला अनुकूल झाली असून तिच्या साहाय्यानें लछमनसिंगानें गंगाप्रसाद या नांवाचा एक मोठा ठग मोठ्या युक्तीनें आणि शिताफीनें पकडला आहे. व तो आतां हातांत आल्यामुळें त्याच्यापासून सगळ्या चोऱ्यांचा लछमनसिंग सुगावा काढल्यावांचून कधींही राहणार नाहीं. आणि तसें झाले म्हणजे भय्यासाहेबांची हकीगत कळण्याला मुळींच अडचण पडणार नाहीं. ती हकीगत आतां समजण्याच्या बेतांत आली आहे. कदाचित् मी आपल्याला हें पत्र धाडीत आहें, या वेळेलाही लछमनसिंगाला तिकडे ती बातमी कळलेली असेल. त्याला कळल्याबरोबर तो ती मजकडे ताबडतोब पाठवील. पण मला मात्र आतां ताबडतोब निघालें पाहिजे. लछमनसिंगानें मला आतां विलंब न करण्याविषयीं लिहिलें आहे. त्यामुळें मी आपले खासे निवडक स्वार पुढल्या मुक्कामाला पाठवून दिले आहेत; व आज संध्याकाळीं मीही निघून त्यांना जाऊन मिळत आहें. मला थोड्याच दिवसांत लछमनसिंग जेथें आहे, तेथें जाऊन पोहोंचलें पाहिजे. कारण रानांत आरडाओरड करून रान उठविल्यानंतर आणि वाघाची जाळी कोठें असली पाहिजे, हें निश्चित होऊं लागल्यावर शिकार करणाऱ्या शिकारी मनुष्यानें वाघावर आपली बंदूक रोखण्यासाठीं आपल्या जागेवर हजर असलें पाहिजे. शिवाय लछमनसिंगानें त्या ठगांच्या टोळीपैकीं गंगाप्रसाद या नांवाच्या एका मोठ्या ठगाला पकडून त्या योगानें त्या ठगांचा मुख्य नायक जो करीमबक्ष त्याला दुखविलें आहे. त्यामुळें तो एखाद्या सापाप्रमाणें लछमनसिंगाच्या अंगावरही कदाचित् उलटून पडण्याचा संभव आहे. म्हणून लछमनसिंगाच्या आणि त्याच्या बरोबरच्या माझ्या इतर शिपायांच्या संरक्षणासाठीं मला तेथें जाग्यावर ताबडतोब गेलें पाहिजे. एका क्षणाचाही विलंब करून उपयोगाचा नाहीं. म्हणून मी आतां हें पत्र येथेंच पुरें करतों. तेथें गेल्यावर भाऊसाहेबांच्या संबंधानें मला आणखी जो कांहीं शोध काढतां येईल, तो काढून त्यांच्याबद्दलची सर्व हकीकत मी तुम्हांला जासुदाच्या हातीं ताबडतोब कळवीन." असा मजकूर गोपाळभय्यांच्या पत्रांत होता. तो ऐकून आईसाहेबांना फारशी आशाही वाटली नाहीं, आणि त्यामुळें त्यांची फारशी निराशाही झाली नाहीं. तरी पण जोशीबुवा ही सगळी हकीगत ऐकत जवळ बसलेले होते. ते ती हकीकत ऐकून घेतल्यानंतर आईसाहेबांचें शांतवन करण्याच्या हेतूनें आणि आपल्या भविष्यज्ञानाची प्रौढी मिळविण्याच्या

हेतूनें मोठ्या डौलानें जोशीबुवा असें म्हणाले कीं, " पाहिलेंत आईसाहेब ! मी कुंडली पाहून सांगत होतों त्याच्यावर तुमचा विश्वास बसत नव्हता; पण मी जसें सांगितलें तसा ठोकताळा जमला. आतां भय्यासाहेबांचे ग्रह पालटत चाललेले आहेत, असें मी सांगत आहें, तोंच त्यांच्याकडच्या बातमीचें पत्र तुमच्याकडे येऊन ठेपलें ! अशीच आणखीही बातमी लवकरच तुम्हांला खात्रीनें कळेल; पण तोंपर्यंत तुम्ही शनीचीं आणि मंगळाचीं कांहीं तरी दानें दररोज ब्राह्मणांना देत जा. म्हणजे तो सर्वग्रहाधिपति भगवान् महाविष्णु सर्व अरिष्टांचें प्रशमन करील." असें जोशीबुवा आपल्याकडून पुष्कळ बोलत होते, पण आईसाहेबांना त्यापैकीं फारच थोडा भाग पटत असावा, असें त्यांच्या अश्रूंनीं भिजून गेलेल्या त्यांच्या अंगावरील शालजोडीवरून दिसत होतें.

हें गोपाळभय्याचें पत्र येऊन कांहीं दिवस लोटले नाहींत तों आईसाहेबांकडे आणखी एक पत्र घेऊन कारभारीसाहेब आले. हें पत्र जासुदाच्या हातीं रामचंद्ररावांकडून धाडण्यांत आलेलें होतें. त्यांत त्यांनीं आपली सगळी हकीकत लिहिली होती; व भय्यासाहेबांचा आणि आपल्या मुलीचा झांशीस तरी कांहीं पत्ता लागला आहे काय, म्हणून त्यांनीं उलट माहिती विचारिली होती. आपले जांवई आणि आपली मुलगी कोंकणांत येणार म्हणून आपण किती तयारी केली होती, त्यांची किती वाट पाहिली, जासुदांच्याबरोबर किती ठिकाणीं पत्रें पाठविलीं, किती जणांजवळ चौकशी केली, आणि कांहीं पत्ता लागेना, तेव्हां अखेरीस आपण स्वतः कुटुंबासह काशीयात्रेच्या निमित्तानें भय्यासाहेबांचा शोध करीत फिरत फिरत प्रयागापर्यंत कसे आलों, वगैरेबद्दलची सर्व हृदयद्रावक हकीकत रामचंद्ररावांनीं आपल्या पत्रांत सविस्तर लिहिली होती. परंतु त्यांच्या पत्रांतील शेवटचा भाग अतिशयच हृदयद्रावक होता. रामचंद्ररावांनीं पुढें असें लिहिलें होतें कीं, " आम्ही जवळ जवळ काशीपर्यंत भय्यासाहेबांचा तपास करीत आलों. पण कोठेंही कांहींसुद्धां शोध लागत नाहीं. तुमचेकडे तरी कांहीं पत्ता लागला असल्यास कळविणें. आमची तर अगदीं निराशा होऊन गेली आहे. आतां कोठें शोधावयाचें उरलेलें नाहीं. आतां पुढें काय करावयाचें ? फिरून घरीं कोंकणांत जावें असें आम्हां उभयतांपैकीं कोणाच्याही मनांत येत नाहीं. येथेंच कोठें तरी तीर्थाच्या ठिकाणीं राहून आयुष्याचे राहिलेले दिवस घालवावे, असें वाटतें. काशीच्या आसपासच्या पंचक्रोशींतील आमच्या सगळ्या तीर्थयात्रा झाल्या. आतां

फक्त विंध्याचल येथील आमची कुलस्वामिनी जी विंध्यवासिनीदेवी तिचें दर्शन घ्यावयाचें राहिलेलें आहे. तेथें एकदां जाऊन यावें, असें कुटुंबाच्या मनांत फार आहे. तेथील देवींचें स्थान फार जागृत आहे, असें म्हणतात. तेथें मोठमोठे शाक्तपंथी मांत्रिक आहेत, आणि त्यांना मंत्रसामर्थ्यानें पुष्कळ गोष्टी समजतात, असें म्हणतात. तेथें जाऊन कुलस्वामिनींचें बोडण भरावें, आणि चार ब्राह्मण-सुवासिनी सांगून आपल्या उभेयकुलांवर कृपा करण्याविषयीं कुलस्वामिनीची प्रार्थना करावी, असा मनोदय आहे. आपलें नशीब अनुकूल असलें, तर देवीचा कांहीं तरी दृष्टान्त होतो, असें सगळे जण सांगतात. म्हणून तो एकदां अनुभव घेऊन पहावयाचा आहे. तिकडे आम्ही कांहीं दिवसांत जाणार आहों. तेथें कुल-स्वामिनी काय साक्षात्कार दाखवील, तो खरा! पण तूर्त आमच्यापैकीं कोणाच्याच मनाला चैन पडत नाहीं. आम्ही वेड्यासारखीं झालों आहों, आणि वेड्यासारखीं यात्रेंत कोठें तरी फिरत असतों. काळजीमुळें वेळ जात नाहीं म्हणून करमणुकी-साठीं वाटेंत प्रयागच्याजवळ आम्हांला एक ब्राह्मणाचें तान्हें मूल मिळालें तें आम्ही घेतलें आहे व त्याच्या संगोपनांत आम्ही आपला वेळ घालवितों. मुलगा मात्र अगदीं कंटाळलेल्या माणसाची करमणूक करण्यासारखा आहे. त्याच्या नादांत आम्ही असतों. तें मूल नेहमीं हसतमुख असतें आणि त्याच्या चेहऱ्यांत असा कांहीं एक गुण आहे कीं, तें मूल हंसूं लागलें म्हणजे त्याचा तोंडावळा अगदीं तुमच्या सुनेच्या तोंडावळ्यासारखा दिसतो. तेवढयावरच आम्ही कांहीं तरी मनोराज्यें करीत दिवस घालवितों. पण आमची फार इच्छा आहे कीं, तुम्ही देखील एकदां हें मूल पहावें. आम्हांला वाटतें तसा तोंडावळ्याचा सारखेपणा तुम्हांला देखील वाटतो किंवा नाहीं याची एकदां तुमच्या दृष्टीनेंही शहानिशा व्हावी, अशी आमची फार इच्छा आहे. आणि या बाबतींत तुमच्या आणि आमच्याशिवाय दुसऱ्या कोणाचा संबंध आहे? आणि दुसरें कोण लक्ष घालणार? असो. भय्यासाहेबांची तुमच्याकडे कांहीं हकीकत कळली असल्यास कळवावी. कळावें."

हें पत्र वाचून दाखवून दिवाणजी त्या पत्रासंबंधानें जासुदाबरोबर उलट जबाब पाठविण्याच्या तजविजीकरितां निघून गेल्यानंतर आईसाहेबांच्या मनांत कांहीं निराळेच विचार घोळूं लागले. आपले व्याही रामचंद्रराव यांच्याकडून आलेल्या पत्रांतील मजकुराचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. त्यांनीं लिहिलेल्या

तोंडावळ्याच्या सारखेपणासंबंधानें त्यांच्या मनामध्यें अनेक विचार घोळूं लागले. व त्यामुळें त्यांना कांहीं सुचेनासें झालें. त्या दिवशीं त्यांनीं आपल्या पदरच्या ज्योतिषीबुवांना बोलावणें पाठविलें. ते येईपर्यंत वेळ जाईना म्हणून आपल्या घरच्या पत्रिकांचा रुमाल पुढें घेऊन त्यांतील भय्यासाहेबांची पत्रिका काढून उगीच वाचीत बसल्या. त्यांना पत्रिकेंतील ग्रह आणि त्यांचीं फळें समजत होतीं, असें नाहीं. पण त्यांना त्या वेळच्या थोर घराण्यांतील स्त्रियांप्रमाणें चांगलें लिहितांवाचतां येत असल्यामुळें, व नेहमीं पोथ्या-पुराणें ऐकण्याच्या संवयीनें कांहीं कांहीं सामान्य संस्कृत शब्दांचे अर्थही त्यांना माहीत झालेले असल्यामुळें, आईसाहेब जोशीबुवा येईपर्यंत भय्यासाहेबांची पत्रिका वाचीत बसल्या होत्या. वाचतां वाचतां त्यांनीं हळू हळू बहुतेक पत्रिका वाचून टाकली. आणि अखेरीस त्या पत्रिकेंतील शेवटचा श्लोक त्या वाचूं लागल्या. तो श्लोक असा होताः—

**वंशो विस्तारतां यातु वृद्धिं यातु महद्यशः ।**
**आयुर्विपुलता यातु यस्यैषा जन्मपत्रिका ॥**

हा श्लोक वाचीत असतांना त्याचा ढोबळ अर्थ त्यांच्या लक्षांत येऊन त्यामुळें त्यांच्या डोळ्यांतून खळखळा अश्रु वाहूं लागले.

इतक्यांत जोशीबुवा तेथें आले व त्यांनीं तो प्रकार पाहिला. तेव्हां आईसाहेबांच्या दुःखानें तेही अतिशय दुःखित झाले. त्यांनीं पुष्कळ उपदेशाच्या गोष्टी सांगून आईसाहेबांच्या मनाचें शांतवन करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस रडत रडतच ती भय्यासाहेबांची पत्रिका जोशीबुवांच्या पुढें ठेवून आईसाहेबांनीं त्यांना विचारलें, " जोशीबुवा, ह्या पत्रिकेंत शेवटीं हा जो श्लोक लिहिलेला आहे, ह्याचा अर्थ काय बरें आहे ? "

त्यांच्या प्रश्न विचारण्यांतील धोरण लक्षांत आणून जोशीबुवांनीं त्या श्लोकाचा अर्थ सांगितला. " आईसाहेब, ह्या श्लोकांतील भावार्थ असा आहे कीं, ज्यांची ही जन्मपत्रिका आहे, त्यांचा वंश विस्तार पावो, त्यांचें यश वृद्धीप्रत जावो आणि ते दीर्घायुषी होवोत ! "

" हं, असाच ना याचा अर्थ आहे ? आईसाहेबांनीं सोत्कंठ मुद्रेनें फिरून विचारिलें.

" होय, आईसाहेब, अगदीं असाच अर्थ आहे. मी तुम्हांला अन्यथा सांगेन असें कां वाटतें ? "

" तर मग जोशीबुवा, या श्लोकांत सांगितलें आहे, तसें खरोखर होईल काय हो ? हा श्लोक सगळ्या पत्रिकेच्या शेवटीं त्यांतील अगदीं सार म्हणून लिहिलेला आहे, त्याप्रमाणें खरोखर सगळ्या गोष्टी घडून येतील काय हो ? "

" आईसाहेब, याबद्दल तुम्हांला शंका वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. यांत लिहिलें आहे, तसें झालेंच पाहिजे." जोशीबुवांनीं भीतभीत आश्वासन दिलें.

" तर मग, ही कोणाची पत्रिका आहे ? "

" कोणाची म्हणजे ? आपल्या भय्यासाहेबांची ! "

" तर मग, माझा भय्यासाहेब—नव्हे नव्हे, तुम्हां देवाब्राह्मणांचा हा प्रसाद दीर्घायुषी होईल का हो ? आणि आमच्या वंशाचा हा वेल विस्तार पावेल काय हो ? देवा, त्याचें यश वाढलें नाहीं, तरी हरकत नाहीं, पण त्याचें आयुष्य तूं कमी करूं नकोस. "

" आईसाहेब, तुमची देवावरील अढळ श्रद्धा तुमचे सर्व हेतु खात्रीनें परिपूर्ण करील. "

" जोशीबुवा, देव करो आणि तुमच्या तोंडांत साखर पडो ! तर मग आमच्या वंशाचा वेल येथेंच खुंटणार नाहीं ना ? त्याची नक्कल होणार नाहीं ना ? आणि भय्यासाहेबांचा वंशविस्तार पुढें चालेल ना ? "

" होय होय; आईसाहेब, चालेल ना म्हणून तुम्ही काय विचारतां ? भय्यासाहेबांच्या कुंडलींत संततिस्थानीं असे जोराचे ग्रह पडलेले आहेत कीं, त्यांना संतति झालीच पाहिजे. आणि इतकेंच नव्हें, पण त्यांना पहिला मुलगाच झाला पाहिजे. " जोशीबुवा संततिस्थानाचा विचार करीत करीत आणि एकीकडे राशींचीं नांवें घेऊन हाताचीं बोटें घालीत घालीत म्हणाले.

" काय ! पहिला मुलगाच झाला पाहिजे ! " आईसाहेब जोशीबुवांच्या ह्या शब्दानें चकित होऊन म्हणाल्या.

" होय होय ! पाहिला पुत्रयोग अगदीं स्पष्ट आहे. "

" पण मी मागें एकदां दुसऱ्या कोणालाशी हीच पत्रिका दाखविली होती, तेव्हां त्यांनीं पहिली मुलगी होईल, असें सांगितलें होतें." आईसाहेब आपल्या मनाची पक्की खात्री करून घेण्यासाठीं मुद्दाम उलटें बोलल्या.

परंतु जोशीबुवांनीं फिरून निश्चयानें सांगितलें कीं, " आईसाहेब, मी खात्रीनें तुम्हांला सांगतों कीं, पहिला मुलगाच झाला पाहिजे, इतका पुत्रयोग बलिष्ठ आहे. हें खोटें झालें, तर मी फिरून पत्रिका हातांत धरणर नाहीं ! "

जोशीबुवा जसजसे जास्त ईर्षेनें बोलूं लागले, तसतशी आईसाहेबांना जास्त जास्त खात्री वाटूं लागली. त्यांना रामचंद्ररावांच्या त्या पत्रांतील शब्दांची आठवण झाली. त्यांना सांपडलेला मुलगाच आहे, आणि ती कांहीं मुलगी नाहीं, ही गोष्ट ठळक रीतीनें त्यांच्या डोळ्यांपुढें उभी राहिली. आणि यानंतर त्या तोंडावळ्याच्या सारखेपणाची कल्पना जेव्हां त्यांच्या मनामध्यें उत्पन्न झाली, तेव्हां त्यांच्या मनांतील आशेला किती अंकुर फुटूं लागले, हें सांगणें कठिण आहे. उन्हाळ्याच्या दिवसांत वाळून पडलेल्या एखाद्या कांद्याला पाऊस पडल्याबरोबर जसे हजारों अंकुर फुटूं लागतात, तशी त्यांच्या मनाची त्या वेळीं स्थिति झाली; आणि

**वंशो विस्तारतां यातु वृद्धिं यातु महद्यशः ।**
**आयुर्विपुलतां यातु यस्यैषा जन्मपत्रिका ॥**

हा श्लोक तोंडानें वारंवार म्हणत त्यांनीं जोशीबुवांना जाण्याला रजा दिली व शनीचा आणि मंगळाचा जप करण्याविषयीं त्यांनीं त्यांना सांगितलें.

आईसाहेबांच्या आज्ञेप्रमाणें जोशीबुवा त्यांच्या वाड्यांतून गेले. पण रामचंद्ररावांच्या पत्रांतील विचार मात्र आईसाहेबांच्या मनांतून कांहीं केल्या जाईनात. त्या आपल्या मनाशीं म्हणाल्या, " तोंडावळ्यांत इतका सारखेपणा एरवीं येईल कसा ? सारखीं सारखीं माणसें नसतात, असें नाहीं. पण तो मुलगा हसूं लागला म्हणजे रामचंद्ररावांना आणि त्यांच्या कुटुंबाला आपल्या मुलीच्या चेहऱ्याची आठवण होते, इतका सारखेपणा त्या मुलाच्या चेहऱ्यांत एरवीं यावा कोठून ? आणि जोशीबुवांनींही आमच्या भय्याच्या कुंडलींतील ग्रह पाहून स्वतंत्र रीतीनें सांगितलें कीं, भय्यासाहेबांना पहिला मुलगाच झाला पाहिजे. तेव्हां ही गोष्ट दोन्हीही बाजूनें जमते—देवा, मला आशा उत्पन्न होत आहे, तसें हें खरोखरच असेल काय रे ? आणि आमचा हा वेल मांडवावर चढेल काय रे ?—पण त्या मुलाचें तोंड आपल्या आईसारखें असलें, तर एक मात्र जमत नाहीं. मातृमुखी आणि सदासुखी असें म्हणतत. पण याला सुख कसलें आहे ? कोठें बिचाऱ्याचे

आई-बाप काळ कंठत असतील, आणि त्यांची याची कशी ताटातूट झाली असेल, देव जाणे. त्याच्या आईबापांना शोधण्याकरितां रामचंद्रराव आणि त्यांचें कुटुंब या दोघांनींही केव्हांच आपलें घर सोडिलें आहे आणि इतके दिवस त्यांचा शोध करीत आहेत! आणि मी मात्र आपली अजून घरच्या घरींच आहें! भय्यासाहेब माझ्या पोटचा मुलगा! माझा एकुलता एक मुलगा! माझें पोट फाडून बाहेर आलेला माझा मुलगा! तो नाहींसा होऊन आज किती तरी महिने झाले! पण मी मात्र या जगांतून नाहींशी झालें नाहीं. भय्यासाहेबाच्या आणि त्याच्या वहिनीसाहेबांच्या शोकानें त्यांच्या बागेंतील वेली देखील करपून गेल्या पण माझें हृदय अजून आहे तसेंच आहे. माझें शरीर त्या वेलींप्रमाणें करपून गेलेलें नाहीं असें नाहीं, पण त्या वेलींवरील फुलांप्रमाणें माझें शरीर अद्यापि गळून पडलें नाहीं, म्हणून माझ्या मनाला मोठी खंती वाटत आहे!" असे पश्चात्तापाचे आणि दुःखावेगाचे उद्गार काढीत काढीत आईसाहेब शंकराच्या दर्शनाला निघून गेल्या.



: :

# रांग तेविसावी

विंध्याचलाच्या डोंगरांतील ठगांच्या टोळीचा मुख्य करीमबक्ष, याच्या रांडेचा आवडता लहान मुलगा अत्यवस्थ आजारी असल्यामुळें फिरून जिवंत झालेल्या भय्यासाहेबांना पकडण्याकरितां तो स्वतः न जातां त्यानें त्या कामगिरीवर गंगाप्रसादाला पाठविलें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. परंतु त्या कामगिरींत गंगाप्रसादला यश आलें नाहीं. गोपाळभय्याच्या हाताखालील लछमनसिंग याच्या युक्तीमुळें गंगाप्रसाद अचानक रीतीनें पकडला गेला. पण ही बातमी जेव्हां करीमबक्ष याला कळली, तेव्हां रागाच्या आवेशानें त्याचें देहभान जाग्यावर नाहींसें झालें. आपल्या मुलाची प्राणांतिक अवस्था झालेली आहे, हेंही तो विसरला. त्याच्याकरितां जें उपाय करावयाचे म्हणून मनांत आणिलें होतें, ते सगळे उपाय जागच्या जागीं राहिले. उत्तरमठाच्या शंकराचार्यांच्या छावणीवर छापा घालण्याचे त्याचे जे बेत होते, तेहि क्षणभर त्यानें बाजूला सारले. त्याच्या डोळ्यांपुढें दुसरें कांहीं दिसेना. आणि त्याच्या मनाला गंगाप्रसादाला सोडविण्याशिवाय दुसरा विचार सुचेना. भय्यासाहेब दोन वेळां मारला गेला असून फिरून तो जिवंतच आहे कीं काय, ही एक मोठी थोरली दहशत त्याच्या मनाला होतीच. ती दहशत कायमची दूर करून टाकण्याकरितां त्यानें गंगाप्रसादला त्या कामगिरीवर पाठविलें होतें; पण भय्यासाहेब जिवंत आहे किंवा नाहीं याची तर शहानिशा झाली नाहींच, पण उलट आपल्या हाताखालचा गंगाप्रसाद हा एक उत्कृष्ट ठग मात्र नाहींसा झाला, ह्याबद्दल करीमबक्षाच्या मनाला फार खाऊं लागलें, व हरप्रयत्न करून आपण गंगाप्रसादला सोडविलें पाहिजे असा त्यानें निश्चय केला. गंगाप्रसादला आपण लवकर सोडविलें नाहीं, तर शत्रूकडील लोक कदाचित् त्याचा निर्दयपणानें वध करण्याला चुकणार नाहींत, अशीही करीम-

बक्षाला भीति वाटत होती. म्हणून सगळीं कारणें आणि सगळे अडथळे बाजूला सारून गंगाप्रसादच्या सुटकेचें काम त्यानें आधीं हातीं घेतलें व थोड्याशा चोरांच्या मदतीसह तो त्या कामगिरीवर निघाला.

इकडे ज्या गांवीं पूर्वी भय्यासाहेबांना लुटण्यांत आलें होतें, त्याच गांवीं लछमनसिंग ह्याच्या पलटणीची अद्यापि छावणी होती. लछमनसिंगला रामसिंगाच्या खुनाचा ह्याच ठिकाणीं तपास लागला होता, व येथूनच त्यानें भय्यासाहेबांच्या संबंधीचा शोध चालविला होता. त्या शोधांत गंगाप्रसाद हा अचानक रीतीनें हातीं लागल्यामुळें भावी यशाच्या संबंधानें त्याला पुष्कळ आशा वाटूं लागली होती, व गंगाप्रसादाचे हाल हाल करून त्याच्यापासून आपण सर्व प्रकारची बातमी काढून घेऊं अशी त्याला उमेद होती. परंतु ह्यांत त्याची पूर्ण निराशा झाली. गंगाप्रसादला त्यानें उपाशीं ठेवून पाहिलें, त्याला खोडा देऊन पाहिला, राखेच्या तोबऱ्याचा आणि तापलेल्या तव्याचाहि प्रयोग करून पाहण्यांत आला! पण गंगाप्रसादनें बोलण्याचें बिलकुल नाकारलें. या मार्गानीं गंगाप्रसादच्या तोंडांतून कांहींहि बातमी बाहेर पडेना, तेव्हां लछमनसिंगानें दुसराहि एक उपाय करून पाहिला. त्याच्या अंगांतील बळाची आणि त्याच्या मनांतील धैर्याची आधीं पुष्कळ तारीफ करून नंतर पुढें लछमनसिंग एकदां त्याला म्हणाला कीं, " गंगाप्रसाद, तूं या चोरीच्या आणि ठगबाजीच्या धंद्यांत पडून आपल्या अंगच्या सगळ्या कर्तबगारीची माती करून टाकली आहेस. हे तुझ्या अंगचे गुण जर तू एखाद्या चांगल्या कामाला लाविले असतेस तर तूं रानांत दडून बसणारा असला दरवडेखोर न होतां एखादा शूर शिपाई झाला असतास, आणि तुझा किती तरी नांवलौकिक झाला असता! पण अजून काय झालें आहे! अजूनसुद्धां ही गोष्ट तुझ्या हातांतून गेली आहे असें नाहीं. अजून तुला आपली मागील चूक ह्याच्यापुढें सुधारतां येण्यासारखी आहे. आमच्या पलटणीवरील सेनापति गोपाळभय्या हे फार दयाळू गृहस्थ आहेत. त्यांनीं तुला पाहिलें, तर तुझ्याबद्दल त्यांच्या मनांत खात्रीनें करुणा उत्पन्न होईल, आणि तूं नोकरी करण्याला कबूल होशील तर आमच्या श्रीमंत सरकारांना सांगून गोपाळभय्या तुझे सगळे गुन्हे माफ करवितील; इतकेंच नव्हे तर तुला एखादी चांगली असामीहि लावून देतील." पण रानांत स्वतंत्रपणें फिरणाऱ्या वाघाला एखाद्या चांगल्या रंगीत अशाहि पिंजऱ्यामध्यें राहण्याचें आवडावयाचें नाहीं. त्याप्रमाणें गंगाप्रसादच्या मनाला लछमनसिंगाचे

हे विचार मुळींच पटले नाहींत. तरी पण त्याची रग जिरली म्हणजे कांहीं दिवसांनीं तो ताळ्यावर येईल व आपल्या ह्या नोकरीच्या मोहामध्यें सांपडून तो पुढेंमागें केव्हां तरी लवकरच आपली सर्व हकीगत सांगेल, असा लछमनसिंगाला अंदाज होता; आणि म्हणून त्यानें त्याला ठार न करतां जिवंत ठेविलें होतें. चोऱ्या, दरवडे, लुटालुटी, खून वगैरे गंगाप्रसादचे अनेक गुन्हे लक्षांत घेतले असतां त्याला देहांत प्रायश्चित्ताची शिक्षा हीच योग्य होती, पण केवळ त्याच्याकडून कांहीं तरी बातमी काढून घेण्याच्या हेतूनेंच त्याला जिवंत ठेवण्यांत आलेलें होतें.

गंगाप्रसाद अजून जरी फितूर होऊन कांहीं बातम्या सांगूं लागला नव्हता, तरी लछमनसिंग त्याच्या बातम्यांवरच थांबून राहिला होता, असें नाहीं. त्याच्या पलटणींतील शिपाई लोक दुसरीकडूनहि ठगांच्या टोळ्यांच्या बातम्या मिळवीतच होते; व अशा रीतीनें जी जी बातमी मिळेल, तिचा तिचा पाठपुरावा करून लछमनसिंग त्या प्रांतांतील ठगांचा उपद्रव कमी करण्याचा प्रयत्न करीत होता. व रहदारींचे रस्ते जास्त सुरक्षित होतील अशा तजविजीहि तो करीत होता. तरी पण करीमबक्षाच्या मुख्य टोळीचा नायनाट केल्यावांचून त्या मुलखांत खरी शांतता आणि सुरक्षितता वाटूं लागावयाची नाहीं, ही त्याला पक्की खात्री होती. आणि म्हणून करीमबक्षाच्या टोळीचा पुरा समाचार घेण्याविषयीं त्याची खटपट चालली होती. परंतु गोपाळभय्या हे ग्वाल्हेरहून नवीन कुमक घेऊन त्याला येऊन मिळेपर्यंत त्यानें एकट्यानें हें अवघड काम अंगावर घेण्यासारखें नव्हतें व तसा त्याला हुकूमहि नव्हता. म्हणून तूर्त त्यानें त्या मुलखांत लहान लहान बाबतींत सुरक्षितता उत्पन्न करण्याचीं कामें हातीं घेतलीं होतीं. कोणा वाटसरूंना जंगलांतून जातांना रखवालदारांची मदत पाहिजे असल्यास ती तो त्यांना आपल्या पलटणींतून देई. पण याशिवाय आणखीहि कोणाला कांहीं संरक्षणाच्या बाबतींत मदत लागली, तर त्यांनीं आपल्याला येऊन भेटावें, अशी त्यानें आसपासच्या भागांतून आणि रहदारीच्या रस्त्यांवरून दवंडी पिटविली होती.

अशी बंदोबस्ताची व्यवस्था करून लछमनसिंग त्या गांवीं आपला तळ देऊन राहिला असतां एके दिवशीं कोणी तीन चार असामी फिरस्ते अतिशय घाबरलेल्या स्थितीमध्यें लछमनसिंगाकडे भेटण्याकरितां आले. त्यांच्या चर्येवरून ते कांहीं तरी मोठ्या संकटांत असावेत असें दिसत होतें, व घाईघाईनें बऱ्याच लांबवरचा प्रवास

केल्यामुळें त्यांचे हातपाय अगदीं गळून गेल्यासारखे दिसत होते. लछमनसिंगाची आणि त्यांची गांठ पडल्यानंतर त्यांनीं आपली हकीगत त्याला सांगितली. त्यांतील तात्पर्य असें:—

आम्ही भोपाळचे व्यापारी आहोंत. आम्ही मोतीं, हिरे, वगैरेचा व्यापार करितों. दक्षिणेंतील निजामाच्या हैद्राबादेला आमची एक पेढी आहे. त्या पेढीवर कांहीं मालाची जरूर लागल्यामुळें आम्हीं तो माल घेऊन निघालों असतां चोरट्यांना आमचा सुगावा लागून ते आज सात आठ दिवस आमच्या पाठलागावर आहेत. त्यांच्या टोळींचा करीमबक्ष ह्या नांवाचा कोणी मुख्य नाईक आहे असें म्हणतात. त्याला त्यांनीं आमची हकीगत कळविली असून तो येण्याची ते वाट पहात आहेत. तो आज संध्याकाळीं येणार असून आजच्या रात्रीं तो आल्याबरोबर ते ठग लोक आमच्यावर हल्ला करणार आहेत, असें त्यांचें जें एक गुप्त खलबत एकदां आम्हांला चोरून ऐकावयाला सांपडलें, त्यावरून समजलें आहे. तेव्हां आतां ह्यांच्या तावडींतून आम्ही आणि आमचें जडजवाहीर कसें बचावणार ह्या विवंचनेमध्यें आम्ही सगळेजण असतांना वाटेंत तुम्हीं पिटविलेली दवंडी आमच्या कानावर आली, आणि त्यामुळें धीर येऊन आम्ही तुमच्याकडे आलों आहोंत. आमच्यापैकीं कांहीं माणसें मागच्या मुक्कामावर आहेत, त्यांत आमच्या दुकानचे खुद्द मालकहि आहेत. तुमची दवंडी ऐकल्यावर तुमच्या कानावर आपली हकीकत घालून तुमच्याकडून कांहीं तरी मदत पाठवावी म्हणून आमच्या धन्यानें आम्हांस तुमच्याकडे रवाना केलें आहे. शिवाय विशेष जोखमीची अशी जी कांहीं चीजवस्तु त्यांच्यापाशीं होती, तीहि त्यांनीं आमच्याबरोबर ह्या पेटींत घालून तूर्त तुमच्या लष्करी पहाऱ्यांत सुरक्षितपणें ठेवण्याकरितां पाठविली आहे. असें म्हणून त्यांनीं एक जड वजनाची पेटी लछमनसिंगापुढें ठेविली. ती पेटी पाहून आणि त्या व्यापारी वाटसरूंची सांगितलेली हकीगत ऐकून लछमनसिंगच्या मनामध्यें मोठी उमेद उत्पन्न झाली. पण त्याच्याहिपेक्षां त्या हकीकतीमध्यें करीमबक्षाचा उल्लेख आलेला ऐकून तर त्याला अतिशयच आनंद झाला. करीमबक्ष अनायासानें आपल्या आटोक्यांत येणार हा संभव पाहून त्याचे डोळे आनंदानें विस्तार पावले; आणि आज करीमबक्ष आपल्या हातांत सांपडला तर आपले सरदार गोपाळभय्या हे आपल्यावर किती खूष होतील, आणि श्रीमंत शिंदेसरकार आपल्याला किती मोठें इनाम देतील, ह्याच्याबद्दलच्या कल्पनांच्या भराऱ्यांनीं लछमनसिंगाचें डोकें

अगदीं भणाणून गेलें. आपण करीमबक्षाचा तपास काढीत असतां दैवानें आपलें सावज आपल्या घरांत आयतेंच आणून घातलें याबद्दल लछमनसिंगाला मोठी धन्यता वाटली व आपल्याला आजच्या शिकारीमध्यें मोठें यश मिळणार अशी त्याला खात्री वाटूं लागली. करीमबक्षाला पकडण्याकरितां आतां आपण काय काय तजविजी केल्या पाहिजेत ह्याच्याबद्दल तो आपल्या मनांत योजना करूं लागला. तुम्ही आतां कोणत्या गांवाहून आलां, तुमच्या धन्याचा मुक्काम कोणत्या ठिकाणीं आहे, तुमचा पाठलाग करणारे आणि तुमच्यावर टेहळणी ठेवणारे ठग लोक किती आहेत, त्यांचा मुक्काम तुमच्या मुक्कामाबरोबरच असतो किंवा ते पुढें मागें कोठें तळ देऊन उतरतात, आज संध्याकाळचा तुमचा मुक्काम कोठें असणार, तुमच्या पाळतीवर जे ठग लोक आहेत म्हणून तुम्हांला संशय आला आहे ते पायदळ चालतात किंवा त्यांच्यापाशीं घोडीं आहेत, तुमच्या व्यापारी वाटसरूंच्या तांड्यामध्यें किती लोक आहेत, तुमच्यापाशीं हत्यारें आहेत किंवा नाहींत, तसेंच ठगांच्या टोळींतील लोकांच्यापाशीं तरवारी, बंदुका वगैरे कांहीं हत्यारें उघड किंवा दडविलेलीं कोठें दिसतात किंवा कसें, वगैरे अनेक प्रश्नांबद्दलची माहिती लछमनसिंगानें त्या भोपाळच्या सौदागरांपासून विचारून घेतली, व तीवरून पुढें काय करावयाचें याच्याबद्दलचे बेत त्यानें आपल्या मनांत रचले. त्या भोपाळवाल्यांनीं लछमनसिंगाला जशी पाहिजे होती तशी खडान्‌खडा हकीगत सांगितली व ती लछमनसिंगाला अगदीं बरोबर वाटली. त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या जडजवाहिराची पेटीही आपण होऊन निःशंकपणानें आपल्या पहाऱ्यांत सुरक्षित ठेवण्याकरितां दिल्यावरून तर लछमनसिंगाचा त्यांच्यावर चांगलाच विश्वास बसला. पेटींतील ऐवजाची वगैरे साधारणपणें कल्पना येण्याकरितां लछमनसिंगानें ती पेटी उचलूनहि पाहिली, तेव्हां ती बरीच जड लागली. त्यावरून त्यांत बरेंच सोनें-नाणें व जडजवाहिर भरलेलें असलें पाहिजे, असें त्याला वाटलें, व म्हणून इतका हा मूल्यवान् खजिना सुरक्षितपणें रखवालींत ठेवण्याकरितां त्यानें पेटीच्या कुलपावर मोहोर करण्यालाहि सांगितलें. एका शिपायानें त्याप्रमाणें लछमनसिंगाच्या सहीची मोहोर आणून कुलपावर बहुतेक डकवून झालेली पाहिल्यानंतर त्या भोपाळवाल्या वाटसरूंपैकीं जो मुख्य दिसत होता त्यानें असें सुचविलें कीं, ही संदुक मोहोरबंद करण्याच्या पूर्वीं आपल्याला पाहिजे तर आंतील माल तपासून ठेवावा. हा त्या व्यापाऱ्याचा दिलदारपणा पाहून लछमनसिंग फारच खूष झाला व तो उलट असें म्हणाला कीं,

"छे! छे! तुमच्या पेटींतील तुमचा खाजगी माल मला तपासून पाहण्याची काय जरूरी आहे? त्यांत तुमचें कांहींका असेना! तुम्ही आपलें जडजवाहीर आमच्या ताब्यांत जें दिलें आहे तें सुरक्षितपणें संभाळलें जावें एवढ्याकरितांच मी त्याच्यावर आपली मोहोर करीत आहें." अशा रीतीनें ती पेटी मोहोरबंद करून पहाऱ्यांत देण्यांत आल्यावर लछमनसिंगानें त्या भोपाळवाल्या दुकानदारापैकीं एका इसमाला त्याच्या मालकाकडे परत जाण्याला सांगितलें. त्यानें आपल्या मालकाच्या मुक्कामावर परत जावें, लछमनसिंग आपल्या हाताखालील शिपाई घेऊन तुमच्या मदतीला येत आहे तेव्हां तुम्ही आतां भिण्याचें कारण नाहीं, असा त्यांना धीर द्यावा, आणि करीमबक्ष नक्की केव्हां येणार आणि कोठें छापा घालणार याबद्दल कांहीं जास्त माहिती मिळाली असल्यास ती घेऊन त्यानें परत यावें, म्हणजे या सगळ्या माहितीच्या योगानें करीमबक्षाला पकडण्याकरितां निघणाऱ्या लछमनसिंगाच्या पलटणीला वाट दाखविण्याचें वाटाड्याचें काम त्याला चांगल्या रीतीनें बजावतां येईल, असा ह्या योजनेंतील हेतु होता, व त्याप्रमाणें तो इसम ताबडतोब रवाना केला गेला. नंतर मग ह्या दख्खन हैदराबादच्या पेढीवाल्यांच्या गुमास्त्यांच्या जेवणाखाणाचा वगैरे बंदोबस्त करण्यांत आला. त्या वेळीं निरनिराळ्या प्रसंगानें त्या गुमास्त्यांना लछमनसिंगाच्या छावणींत ठिकठिकाणीं फिरण्याची, त्यांच्या बंदोबस्ताची व्यवस्था अजमावण्याची आणि निरनिराळ्या शिपाई लोकांपाशीं वगैरे बोलण्याचालण्याची पुष्कळ संधि मिळाली. खुद्द लछमनसिंग हाही ह्या सौदागरांपाशीं पुष्कळ मन मोकळें करून बोलत होता.

अशा प्रकारच्या अनेक व्यवहारांमध्यें त्या मंडळींचा त्या दिवसाचा बराच भाग लोटला. पण या सर्व अवकाशांत बातमी आणण्याकरितां गेलेला इसम काय बातमी आणतो ह्याची सर्वजण वाट पहात होते. अखेरीस तो इसम परत आला व त्यांच्यापैकीं जो मुख्य होता त्याच्यापाशीं त्यानें सगळी बातमी सांगितली. ती ऐकून घेऊन त्या भोपाळवाल्या वाटसरूंपैकीं जो मुख्य मुनीम होता, तो लछमनसिंगाजवळ येऊन ती बातमी त्याला सांगूं लागला. आज संध्याकाळानंतर दीड प्रहर रात्रीच्या सुमारास चंद्र मावळल्यावर करीमबक्ष येणार असून तो त्याच वेळीं या भोपाळवाल्या सावकारांच्या छावणीवर हल्ला करणार आहे, अशी बातमी त्या मुख्य मुनिमाच्या तोंडून ऐकल्याबरोबर आपल्या लष्करांतील शिंग वाजवून हुकूम झाल्याबरोबर सगळ्या शिपायांनीं कूच करण्याला तयार असावें असा लछमनसिंग-

कडून ताबडतोब इषारा देण्यांत आला. त्यानंतर लछमनसिंग त्या मुनिमाकडे फिरून वळून म्हणाला, "ठगांनीं, चोरांनीं आणि दरवडेखोरांनीं हा सगळा विंध्याद्रीचा डोंगर भयाण करून सोडला आहे आणि वाटसरूंच्या जाण्यायेण्याच्या वाटा यांच्या भीतीमुळें बहुतेक बंद पडण्याच्या बेतांत आल्या आहेत. एकटा दुकटा प्रवासी या जंगलांतून भर दिवसा देखील जाण्याला धजत नाहीं, असा ह्या चोरट्यांनीं उच्छाद आणला आहे. ह्यांनीं आपल्या शेतीभातीचा धंदा करून प्रामाणिकपणें आपली उपजीविका खरोखर म्हटलें तर चालवावयाची. पण तें सगळें सोडून देऊन हे चोऱ्यांचे आणि ठगीचे धंदे करूं लागले आहेत."

"ठगबाजीनें थोडक्या वेळांत जर पुष्कळ पैसे मिळतात," तो भोपाळवाला मुख्य मुनीम म्हणाला, "तर साऱ्या वर्षभर शेतकीच्या कामांत कुचमत कोण बसणार? शिवाय, लढाईच्या वेळीं निरनिराळ्या राजांनीं आपल्या लष्करची भरती करण्याकरितां शेतकऱ्यांमधून शिपाई नोकरीला ठेवावेत आणि लढाई संपली म्हणजे त्यांना फिरून हांकून द्यावें आणि मुलखावर मोकळें सोडावें. ह्याचा परिणाम असा होतो कीं, एकदां शेतीच्या कामावरून कांहीं तरी कारणानें त्यांचें लक्ष उडालें, म्हणजे ते शांततेचे कोणतेही धंदे करण्याला नालायक होतात, आणि मग लष्करांत असतांना कोणावर तरी धाड घालण्याला ते जसे शिकविले गेलेले असतात, त्याचप्रमाणें ते लष्करांतून निघाल्यानंतरहि कोणावर तरी धाड घालण्याचें काम करूं लागतात!"

"पण त्यामुळें," लछमनसिंग म्हणाला, "लोकांचे किती हाल होतात? आणि हा करीमबक्ष तर वाटसरूंचे हाल करतो, असें मी ऐकलें आहे."

"हा करीमबक्ष म्हणजे कसा काय मनुष्य आहे हो?" त्या मुनीमानें विचारलें. "तो काळा गोरा, उंच-ठेंगणा, आहे तरी कसा? लछमनसिंगजी, तुम्ही त्याला कधीं पाहिलें आहे काय?"

"मी आज रात्रीं त्याला पाहणार."

"पण ह्याच्यापूर्वी अजून तुम्ही कधीं त्याला प्रत्यक्ष पाहिलें नाहीं?"

"पूर्वी पाहिलें असतें, तर मी त्याला अजून जिवंतच ठेविलें नसतें!"

"मग आज रात्रीं तुमची त्याची गांठ पडल्यावर तुम्ही त्याला एकदम तेथल्या तेथें ठार करणार?"

"नाहीं! आज मी त्याला ठार करणार नाहीं!"

हें त्यांचें संभाषण चाललें असतां ते त्या छावणींतून इकडे तिकडे फिरत होते व त्या भोपाळवाल्या सौदागरापाशीं एकीकडे बोलतां बोलतां दुसरीकडे आपल्या छावणींतील व्यवस्थेची देखरेख करण्याचें कामहि एकीकडे लछमनसिंग करीत होता. छावणींतील घोड्यांची चाकरी बरोबर झाली आहे किंवा नाहीं, त्यांना दाणा-वैरण बरोबर मिळाली आहे किंवा नाहीं, घोडे बांधलेल्या जागीं स्वच्छता आहे किंवा नाहीं, घोड्यांचे लगाम, खोगीर वगैरे सामान बरोबर आहे किंवा नाहीं, घोडस्वारांचे आणि शिपायांचे पोषाख स्वच्छ आहेत किंवा नाहींत, त्यांच्या बंदुका, तरवारी पुसून साफ केलेल्या आहेत किंवा नाहींत वगैरेबद्दलची सर्व प्रकारची पाहणी लछमनसिंग मधून मधून फार बारकाईनें करीत होता, व कोठें कोणा शिपायाची चूक आढळून आल्यास या भोपाळवाल्यांपाशीं बोलतां बोलतां शिपायाची तो कानउघाडणी करीत असे. अशा रीतीनें बोलत चालत फिरतां फिरतां आणि सगळ्या छावणीची पाहणी करितां करितां गंगाप्रसाद याला जेथे अटकेंत कोंडून ठेविलें होतें, त्याच्याजवळ ती मंडळी आली.

भोपाळवाल्या मुख्य मुनीमानें आपल्या पूर्वीच्या प्रश्नाला लछमनसिंगानें 'मी करीमबक्षाला ठार मारणार नाहीं.' हें उत्तर दिलेलें ऐकून मोठें आश्चर्य व्यक्त केलें आणि तो मुनीम पुढें म्हणाला, "तुम्ही करीमबक्षाला ठार करणार नाहीं असें म्हणतां, हें ऐकून मला मोठें आश्चर्य वाटतें! सारे वाटसरू लोक त्या हराम-खोराचें नांव ऐकून थरथर कांपत असतात आणि त्यांची भीति निवारण करण्या-साठीं तुम्ही त्याला जरूर ठार मारिलें पाहिजे. पण असें असतां आज तो तुमच्या हातीं सांपडणार असूनही तुम्ही त्याला जिवंत सोडणार म्हणतां, हें कसें?"

"मी त्याला जिवंत सोडणार नाहीं, तर त्याला जिवंत धरणार आहें! त्याचा एक साथीदार गंगाप्रसाद ह्याला आम्ही मोठ्या युक्तीनें पकडलें आहे आणि त्याला जसें जिवंत पकडलें आहे, तसेंच त्या करीमबक्षालाहि आज जिवंत पकडून आणून ह्या समोरच्या कोठडींत जेथें गंगाप्रसादला कोंडून ठेविलें आहे तेथें त्यालाहि कोंडून ठेवण्याचा माझा विचार आहे."

"हा गंगाप्रसाद कोण?"

"हा एक मोठा अट्टल ठग असून हा करीमबक्षाइतकाच निर्दय, विश्वासघातकी आणि मानवी प्राण्यांचा शत्रु आहे, आणि म्हणूनच त्याला आम्ही ह्या मजबूत कोठडींत कोंडून ठेविलें आहे." हे शब्द उच्चारीत असतां लछमनसिंग त्या भोपाळ-

वाल्या मुनिमाबरोबर त्या कोठडीच्या दरवाजापाशीं आला व त्यानें त्याला दरवाजाच्या गजांतून ' हा गंगाप्रसाद ' म्हणून दाखविलें.

" हा गंगाप्रसाद काय ! " असे आश्चर्ययुक्त शब्द गजांच्या फटींतून पाहतां पाहतां त्या मुनिमाच्या तोंडांतून बाहेर पडले व कांहीं वेळपर्यंत तो मुनीम गंगाप्रसादाच्या तोंडाकडे निरखून पहात उभा राहिला. ह्या वेळीं लछमनसिंगाचें लक्ष त्या कोठडीच्या आसपासची व्यवस्था आणि स्वच्छता नीट ठेविली गेलेली आहे किंवा नाहीं हें पाहण्याकडेच विशेष गुंतलेलें होतें; त्यामुळें हा भोपाळवाला मुनीम गंगाप्रसादाकडे किती रेखून आणि कशा मुद्रेनें पाहत होता, इकडे लछमनसिंगाचें फारसें लक्ष नव्हतें. ही संधि पाहून कोठडीच्या आंतून गंगाप्रसाद हाही त्या मुनिमाकडे विशेष बारकाईनें पाहूं लागला. हा मुनीम कोण आहे हें गंगाप्रसादनें त्याला पाहिल्याबरोबर ओळखलें, व तो त्या ठिकाणीं कसा आला असावा ह्याच्याबद्दल त्याला मोठें आश्चर्य वाटलें. त्या दोघांनीं एकमेकांना पाहिलें, दोघांच्या खाणाखुणा पटल्या आणि दोघांचे कांहीं नेत्रसंकेतहि झाले. लछमनसिंगाचें लक्ष पूर्वी सांगितलेल्या व्यवसायावरून यानंतर जेव्हां कोठडीच्या आंतील गंगाप्रसादाकडे वळलें, त्या वेळीं त्याचा चेहरा थोडा हास्ययुक्त आणि त्याचे डोळे थोडे आशायुक्त झालेले असल्यासारखें त्याला वाटलें, पण त्यांत कांहीं विशेष अर्थ असेल असें त्या वेळीं त्याला वाटलें नाहीं.

" हाच का तो गंगाप्रसाद ! " असें बराच वेळ पाहून झाल्यावर तो भोपाळचा मुनीम फिरून आश्चर्यानें म्हणाला.

" हाच तो ! " लछमनसिंगानें त्याला सांगितलें.

" तर मग ह्याच्याचसंबंधानें आमच्या इसमानें ती बातमी आणलेली असली पाहिजे ! "

" कोणती ती बातमी ? "

" आमच्या मालकाकडे जाऊन आलेल्या इसमानें तेथें अशी एक कुणकुण ऐकली आहे कीं, आज रात्रींच करीमबक्ष ह्या गंगाप्रसादाला येथून पळवून घेऊन जाणार आहे ! "

" खरेंच ? "

" अशी बातमी तर त्यानें आणलेली आहे खरी ! "

" पण मी तुम्हांला सांगतों कीं, ही गोष्ट अशक्य आहे. आज रात्रीं करीमबक्ष येथें येणार, एवढा तुमच्या बातमीपैकीं भाग बरोबर आहे, ह्यांत शंका नाहीं. पण तो येथें ह्या कोठडीकडे गंगाप्रसादाला पळवून नेण्याकरितां येणार हें खोटें! तर ह्याच्या उलट तो गंगाप्रसादच्या सोबतीला याच कोठडींत कोंडला जाण्याकरितां येथें येणार आहे! आज रात्रीं त्याची माझी गांठ पडल्यावर त्याला पकडून आणून ह्याच कोठडीमध्यें कोंडून ठेवण्याचा मीं निश्चय केला आहे. "

" पण तो तुमच्या हातीं लागेल असें तुम्हांला वाटतें ? ह्या ठगांच्या नायकाच्या धूर्तपणाच्या ज्या गोष्टी ऐकण्यांत आलेल्या आहेत, त्यावरून तो तुमच्या हातीं सांपडण्याच्या ऐवजीं तुमच्या हातावर तुरी देऊन निघून न जावो म्हणजे झालें!" बोलण्याच्या ओघांत आपण हें जें बोललों, तें बरोबर नाहीं, असें वाटून तो मुनीम आपला आवाज थोडा बदलून पुढें असें म्हणाला कीं, आम्हां वाटसरू लोकांचे हाल संपावयाचे दिवस जवळ आले असतील, तर परमेश्वर करील आणि तुम्हांला यश येऊन तो तुमच्या हातांत सांपडेल! तुम्ही कसेंहि करून आज रात्रीं त्याला त्या जंगलांत पकडाच ! जिवंत सांपडला नाहीं, तर ठार करा! पण त्याला मोकळा म्हणून सोडूं नका! तो आज त्या ठिकाणीं तुमच्या हातांत खात्रीनें सांपडेल. बाकीचे सगळे चोर आणि ठग तुमच्या हातून निसटून गेले, तरी हरकत नाहीं. पण ह्या करीमबक्षाला तुम्ही तेथून जाऊं देऊं नका! आम्हां वाटसरू लोकांना जिवंत-खाणारा हा वाघ—हा चांडाळ—हा करीमबक्ष, आज अनायासानें आम्हांला मिळा-लेल्या बातमीवरून तुमच्या जाळ्यांत आयताच येऊन पडत आहे! त्याला कसेंहि करून तुम्ही तेथें पकडा आणि आम्हां वाटसरूंना जीवदान द्या! आमच्यासारखे हजारो लोक तुम्हांला दुवा देतील! तेव्हां कसेंही करून आज रात्रीं तुम्ही त्या हरामखोराला तेथें पकडाच! आमच्या मालकापाशीं मोठमोठ्या जाड आणि मजबूत अशा दोऱ्या पुष्कळ आहेत. त्या त्या गुलामाचे हातपाय बांधण्याकरितां तुम्हांला तेथें मिळण्याची मीं तजवीज करवितों! पण तुम्ही त्याला आज तेथें कसेंहि करून पकडलेंच पाहिजे!"

" त्याची तुम्हांला काळजी नको." लछमनसिंग म्हणाला, " त्या गुलामाच्या मुसक्या बांधून त्याला येथें आणतों.—पण आतां बरीच संध्याकाळ होत आली आहे. आतां आम्ही निघण्याची तयारी केलीच पाहिजे. वेळेवर तेथें जाऊन

कोणाला कोठें उभें करावयाचें आणि कोणीं कोठें दबा धरून बसावयाचें, वगैरे सर्व व्यवस्था वेळींच करून ठेविली पाहिजे."

असें म्हणून लछमनसिंग त्या भोपाळवाल्या मंडळींसह आपल्या मुक्कामाच्या जागेकडे वळला. तेथें गेल्यानंतर लछमनसिंगानें त्या भोपाळवाल्यांच्यापैकीं जो वाटाड्याचें काम करणार होता, त्याला आपल्याजवळ बसविलें व जेथें करीमबक्षाला पकडावयाचें त्याच्या आसपासच्या जागांचा आणि वाटांचा एक साधारण नकाशा तयार करण्याला त्यानें सुरुवात केली. भोपाळवाल्या सावकारांचा तळ कोठें आहे, त्याच्या पाठीमागें ठग लोकांचा मुक्काम किती दूर आहे, या दोन ठिकाणांच्या दरम्यान आणि भोपाळवाल्या सावकारांच्या छावणींच्या आसपास लहान मोठे नदी-नाले, ओढे, खड्डे वगैरे कोठें कसे आहेत, चोरट्यांना दडून बसण्याला सोईचीं अशीं लहानमोठीं टेकाडें किंवा घळी किंवा नदीच्या खोल दरडी किंवा दाट झाडी कोठें आहे, वगैरे सर्व बाबतींत विचारपूस करून लछमनसिंगानें एक नकाशा बनविला व आपल्या तुकडीनें कोणत्या वाटेनें जावें, कोणत्या ठिकाणीं लपून बसावें आणि शत्रूला कोठें अडवावें, वगैरे सर्व बेत त्यानें एखाद्या लढाईच्या शिस्तीनें ठरविले. असल्या प्रकारच्या लष्करी टापटिपीच्या कामामध्यें आणि डावपेंचांमध्यें लछमनसिंग हा फार निष्णात होता. पण या गोष्टी ठरवितांना असें दिसून आलें कीं, त्या भोपाळवाल्या सौदागरांपैकीं जो मुख्य मुनीम होता, त्यालाही या कामांतील बरीच माहिती असली पाहिजे! म्हणून त्यानें सुचविलेल्या कांहीं कांहीं मसलती लछमनसिंगाला चांगल्या पटल्या व त्याप्रमाणें वागण्याचें त्यानें कबूलही केलें. भोपाळवाल्या सावकारांच्या तळाची जी जागा होती, तिकडे मुळींच न जातां तो तळ दूर सोडून आणि त्याला दुरून वळसा घालून तो तळ आणि ठगांचा मुक्काम यांच्या दरम्यानच्या वाटेवर असलेल्या एका लहानशा टेकडीच्या आड खोऱ्यामध्यें लछमनसिंगाच्या लोकांनीं दबा धरून बसावें आणि लछमनसिंगाच्या टेहळ्यांनीं शत्रु येत आहे अशी बातमी आणल्याबरोबर सर्वांनीं तयार व्हावें व गनिमाला बरेंचसें पुढें येऊं देऊन नंतर मग त्याला चोहों बाजूंनीं वेढावें, असा व्यूह त्या मुनिमानें सुचविला व लछमनसिंगाला ती कल्पना पसंत पडली. त्या मुनिमाची लष्करी धोरणाची दृष्टि पाहून त्यानें आपल्याबरोबर छाप्याच्या जागीं चलावें, अशी लछमनसिंगानें फार जोराची इच्छा प्रगट केली. त्या वेळीं तो मुनीम म्हणाला, " मलाहि असल्या कामांची फार हौस आहे आणि म्हणून मी

मोठ्या आनंदानें तुमच्याबरोबर आलों असतों. पण माझ्या धन्याचा हुकूम मला मोडतां येत नाहीं. माझ्या धन्यानें मला ती जवाहिराची पेटी देऊन सांगितलें आहे कीं, कांहीं झालें तरी तूं त्या पेटीचें संरक्षण कर. त्यामुळें तुमच्या पहाऱ्यांत जी पेटी मी दिली आहे, ती टाकून मला येतां येणार नाहीं. माझ्या मालकांची आज्ञा मोडून मी आलों, तर माझा मालक मला काय म्हणेल ?"

ही त्याची स्वामिनिष्ठा पाहून लछमनसिंगाला मोठें समाधान वाटलें व त्याच्या इच्छेविरुद्ध त्याला आपल्याबरोबर येण्याचा आग्रह करण्याचें सोडून देऊन लछमनसिंग आपल्या हाताखालील मातादिन या नांवाच्या हवालदाराकडे छावणीच्या बंदोबस्ताची मागची सर्व व्यवस्था सोंपवून देऊन आपल्या तुकडींतील लोकांसह तिकडे जाण्याला निघाला. थोडक्याच वेळानें ते ठरलेल्या जागेवर आले. भोपाळवाल्यांचा तळ कोठें होता, हें त्यांना आढळलें नाहीं ! कारण ती जागा दूर सोडून त्याच्या बाजूनें दुरून वळसा घालून पुढें जावयाचें असेंच मुळीं ठरलेलें होतें ! त्याप्रमाणें ठरलेल्या वाटेनें कूच करून नकाशांतील टेकडीच्या एका दरडीच्या आड आसरा घेऊन लछमनसिंगानें आपले लोक त्या रस्त्याच्या बाजूनें थोड्या-थोड्या अंतरावर सगळीकडे पसरविले व आपल्या लोकांची अशी व्यवस्था लावून व टेहळणीकरितां कांहीं लोक पुढें पाठवून तो करीमबक्षाची येण्याची वाट पहात चाहूल घेत त्या टेकडीच्या वरच्या एका टोंकावर उभा राहिला. तेथून तो आपल्या-सभोंवार सगळीकडे दृष्टि फेकीत होता व कोठें कांहीं जवळपास मनुष्याच्या पावलांचा आवाज ऐकूं येत आहे काय, किंवा दूरून कोठें घोड्यांच्या टापा वाजत आहेत काय, हें तो पूर्ण लक्ष देऊन ऐकत होता. त्या रात्रीच्या वेळीं कोठें एखादा कुत्रा भुंकला, तरी तो कां भुंकला असावा, याचा तो बारीक दृष्टीनें विचार करी आणि तो उभा राहिला होता तेथपासून क्षितिजापर्यंत पसरलेल्या त्या रात्रीच्या अंधुक प्रकाशामध्यें हुक्का पिण्याकरितां कोणी चकमक झाडीत आहे काय आणि त्याचा कोठें उजेड दिसतो आहे कीं काय, हें सुद्धां तो बारकाईनें पहात होता. पण यांपैकीं मनुष्याच्या चाहुलीची कोणतीही खूण त्याला कोठेंसुद्धां आढळेना. त्यामुळें वाट पाहून पाहून तो अगदीं कंटाळून गेला. चंद्र मावळण्याच्या आधीं करीमबक्ष येणार नाहीं, ही लछमनसिंगाची खात्रीच होती. पण चंद्र मावळल्यावरदेखील बराच वेळ लोटला, तरीसुद्धां कोणाचीही चाहूल लागेना. रात्रींच्या वेळीं नक्षत्रांवरून वेळ किती झाली आहे, हें जाणण्याची पद्धत लछमनसिंगाला माहीत होती.

चंद्र मावळावयाला गेला, त्या वेळीं पूर्वेच्या क्षितिजाजवळ जें नक्षत्र होतें तें बरेंच वर येऊन त्याच्या पाठीमागून दुसरींही दोन तीन नक्षत्रें एकामागून एक उगवून वर आलीं. तरीही करीमबक्षाच्या येण्याचा कानोसा कोठें ऐकूं येईना. त्यामुळें लछमनसिंगाला अगदीं वेड्यासारखें झालें. तो आणि त्याचे लोक जवळ जवळ मध्यान्ह रात्र उलटेपर्यंत आकाशांतील नक्षत्रें मोजीत स्वस्थ बसले; तरी पण करीमबक्ष येईना. तेव्हां यांत कांहीं तरी दगा असावा आणि आपल्याला कोणी तरी या रानांत आणि डोंगरांत आणून कांहीं तरी हेतूनें फसविलें असलें पाहिजे, असा किंचित्सा संशय लछमनसिंगाच्या मनामध्यें प्रकाश पाडूं लागला व त्यामुळें तो कांहींसा खजीलही होऊन गेला.

पण इतक्यांत त्याला कांहीं चाहूल ऐकूं आली व पावलांचे आवाज जवळ जवळ येत चालले आहेत असें त्याला स्पष्ट वाटूं लागलें; त्यामुळें आपल्याला आतां कांहीं तरी शिकार खात्रीनें मिळणार असें वाटून त्याला थोडी ईर्षा उत्पन्न झाली. त्यानें आपल्या हाताखालच्या शिपायांना इषारा दिला. ते आपली आसऱ्याची जागा सोडून गुपचुप रीतीनें पुढें आले. त्यांनाही असेंच वाटलें कीं, करीमबक्षाला आतां आपण पकडणार. ज्याची ही चाहूल एवढा वेळपर्यंत दुरून ऐकूं येत होती, तो आतां यावेळेपर्यंत बराच जवळ आला. तो पुढें आल्याबरोबर लछमनसिंगाच्या सर्व शिपायांनीं त्याला वेढलें आणि नंतर त्यांच्यापैकीं कित्येकांनीं त्याच्या तोंडांत, त्यानें ओरडूं नये म्हणून, बोळे घातले आणि कित्येकांनीं त्याचे हातपाय दोऱ्यांनीं आवळून बांधले. हा सर्व वेळपर्यंत आपल्या हातीं बहुतकरून करीमबक्षच सांपडला आणि करीमबक्षालाच आपण चतुर्भुज करीत आहोंत, अशा समजुतीनें ते मोठ्या धांदलीनें आणि गडबडीनें हीं वर सांगितलेलीं कामें करीत होते. पण त्याचे हातपाय बांधून झाल्यावर आणि त्याउप्परही त्याला पळून जातां येऊं नये म्हणून त्याला जवळच्या एका झाडाला बांधून झाल्यावर मग त्या पकडल्या गेलेल्या करीमबक्षाची निर्भर्त्सना करण्याला त्यांनीं सुरवात केली.

" अरे गुलामा ! आज तूं बरा आमच्या हातीं सांपडलास. इतके दिवस तूं लोकांना पकडीत असस, पण आज तुझ्यावरच पकडला जाण्याचा प्रसंग आला आहे. तूं आजपर्यंत वाटसरूंचे हाल करीत असस, त्या सगळ्याचा वचपा आज तुझ्यावर आम्ही काढणार ! तूं आज आपल्या गंगाप्रसादाला आमच्या अटकेंतून

सोडविणार होतास नाहीं ? पण त्याला सोडविण्याच्या ऐवजीं तूंच आतां आमच्या अटकेंत सांपडला आहेस. आतां कोठें पळून जातोस तें पाहूं."

असे अनेकांनीं त्याच्यावर अनेक शब्दप्रहार सुरू केले, व प्रत्येक शब्दाबरोबर आणि शिवीबरोबर त्याच्यावर त्या शिपायांकडून बुक्यांचा आणि लाथांचाहि भडिमार चाललेला होता. शिवाय तुच्छतेनें कोणी त्याच्या अंगावर थुंकत होते आणि त्वेषानें कोणी त्याच्या अंगावर काठ्यांचे वळ उठवीत होते. तें दुःख सहन न होऊन तो बिचारा तडफडत होता; पण तोंडांत बोळे कोंबलेले असल्यामुळें त्याला कांहीं बोलतां किंवा ओरडतां येईना. आणि म्हणून मुकाट्यानें त्याला हा सगळा चोप सहन करावा लागत होता. पण हा सगळा प्रकार रात्रींच्या काळोखांतच चाललेला होता. तेव्हां करीमबक्षाची ही सारी विटंबना चालली असतां त्या क्रूर करीमबक्षाच्या डोळ्यांतून पाणी कसें वाहत आहे आणि त्या निष्ठुर करीमबक्षाचा चेहरा ह्या पाणउताऱ्यानें कसा उतरून गेलेला आहे, हें उजेडांत पाहण्याकरितां त्या शिपायांनीं आपल्यांतील एकाला एक मशाल पेटविण्याला सांगितली. लछमनसिंगालाहि मशाल पेटवावयाला पाहिजे होती. त्याच्या शिपायांनीं ही जी गर्दी केली होती आणि बडबड चालविली होती, ती त्याला फारशी पसंत पडत नव्हती. त्या रात्रीच्या एकंदर सर्व प्रकारामध्यें त्याला थोडा थोडा संशय आधींपासूनच वाटूं लागला होता. व ह्यांत कदाचित् कांहीं तरी लबाडी असली पाहिजे अशी त्याला भीति वाटत होती. त्यामुळें आपण करीमबक्षाला पकडलें असें जरी त्याचे बार्कांचे शिपाई ओरडत होते व त्याबद्दल जरी ते हर्ष मानीत होते, तरी तो करीमबक्षच असेल अशी लछमनसिंगाला खात्री वाटेना; म्हणून त्याची शहानिशा करण्याकरितां लछमनसिंगालाहि मशालीचा उजेड पाहिजेच होता.

अखेरीस मशाल पेटवून आणल्यावर एवढा वेळपर्यंत झालेले त्याचे हाल पुरेसे झाले नाहींत असें वाटून कोणी शिपाई त्या मशालीनें त्याच्या हातापायांना चटके देऊं लागले. हें कृत्य चाललें असतां त्या मशालीचा उजेड त्याच्या तोंडावर पडतच होता. त्या उजेडांत लछमनसिंगानें आणि दुसऱ्याहि कित्येक शिपायांनीं जेव्हां त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलें, तेव्हां ते एकदम दचकले! हा चेहरा आपल्या ओळखीचा आहे असें त्यांना भासलें. आणि त्या दिवटीच्या उजेडानें त्यांनीं जवळ येऊन नीट न्याहाळून पाहिलें, तेव्हां हा आपल्याच पलटणींतील हवालदार मातादिन आहे, असें त्यांनीं ओळखलें! तेव्हां ते सर्वजण फार शरमिंदे झाले व

आपल्याच माणसाचे आपण विनाकारण हाल केल्याबद्दल आणि ह्या सगळ्या कामांत आपली पूर्ण फजिती झाल्याबद्दल त्यांना अतिशय वाईट वाटलें. त्यांनीं ताबडतोब आपल्या हवालदाराच्या तोंडांतून तोंडांत घातलेले फडक्याचे बोळे काढले, आणि त्याच्या हातापायाला बांधलेल्या दोऱ्या सोडल्या. नंतर आपल्या हातून झालेल्या ह्या चुकीच्या वेडगळपणाबद्दल सर्वांनीं मातादिनची माफी मागितली. नंतर हा प्रकार कसा झाला, तूं येथें कसा आलास, आपल्या छावणीवरील हकीकत काय आहे, वगैरे अनेक प्रश्न लछमनसिंगाच्या शिपायांनीं मातादिनला विचारण्यास सुरुवात केली. लछमनसिंगच्या ध्यानांत ह्या सगळ्या प्रकाराचा उलगडा या वेळेपर्यंत बहुतेक येऊन चुकलेलाच होता. सकाळीं आपल्या छावणींत भोपाळचे सौदागार म्हणून जे इसम आले ते कोण असावेत व त्यांच्या भुलथापांना फसून आपल्या हातून आतांपर्यंत कसकशा चुका होत गेल्या, ह्याचें संपूर्ण चित्र लछमनसिंगाच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. लछमनसिंगनें अशा रीतीनें जो तर्क आपल्या मनामध्यें बांधला होता तोच मातादिननें सांगितलेल्या हकीकतीवरून अखेरीस खरा ठरला. भोपाळचा जो मुख्य मुनीम म्हणून आपल्याला म्हणवीत होता, तो करीमबक्षच होय, असें मातादिननें सांगितलें !

" बरें पण तूं येथें कां व कसा आलास ? " एकानें विचारलें.

" माझ्या कमनशिबानें मला येथें आणिलें ! " मातादिन सांगूं लागला. " करीमबक्षानें आपल्या छावणींतून माझे हात माझ्या पाठीकडे बांधून साऱ्या वाटभर धक्केबुक्के देत मला येथपर्यंत आणिलें ! आणि येथें आल्यावर माझे हातपाय बांधून तुम्ही मला लाथाबुक्क्या देऊं लागला ! मिळून दोहोंकडून माझी कणीक चांगली तिंबली गेली ! हें माझें कमनशीबच नव्हे तर काय ! "

" तुला करीमबक्षानें येथें आणलें म्हणून तूं म्हणतोस ? " लछमनसिंगानें विचारलें. " तर मग तो कोठें आहे ? तो हरामखोर तर मग येथेंच कोठें तरी जवळपास असला पाहिजे !—चला, शिपायांनों, बघतां काय ? तुम्ही आत्तांच्या आत्तां आसपास फिरून त्या करीमबक्षाला हुडकून काढा ! "

" बस करा ! कशाला उगीच श्रम घेतां ? " मातादिन त्यांना थांबवून म्हणाला. " तो तुम्हांला येथें कोठेंहि सांपडणार नाहीं. तो एव्हांना तुमच्या आटोक्याच्या पार पलीकडे निघून गेलेला आहे व त्याचे सगळे साथीदारहि त्याच्याबरोबर निघून गेलेले आहेत. करीमबक्ष त्या दूरच्या पलीकडच्या डोंगरावर मला घेऊन गेला

आणि तेथून त्यानें मला ही टेकडी दाखविली. ह्या टेकडीकडे बोट दाखवीत तो मला म्हणाला कीं, " ती जी दूर एक लहानशी टेकडी दिसत आहे, त्या टेकडीच्या एका दरडीमागें तुझा लछमनसिंग माझी वाट पहात बसलेला आहे. बिचारा या रात्रीच्या थंडींत आणि उघड्या हवेंत कुडकुडत बसला असेल आणि माझी वाट पाहून अगदीं कंटाळून गेला असेल ! त्याला जाऊन सांग कीं, करीमबक्षाला आज जें काम करावयाचें होतें, ते काम फत्ते करून तो आज जात आहे ! त्याला आज तुझ्या भेटीला येण्यास सवड नाहीं ! पण फिरून केव्हां तरी लौकरच तो तुझी आणि तुझ्या लष्कराची गांठ घेण्याकरितां येणार आहे ! " असा उर्मटपणाचा आणि अपमानकारकपणाचा निरोप माझ्यापाशीं सांगून करीमबक्ष आपल्या साथीदारांसह जंगलांत निघून गेला आणि मग मी तुमचा पत्ता काढीत इकडे आलों. तेथून येथें येईपर्यंत या रात्रीच्या काळोखांतून वाट काढतां काढतां आणि चालतां चालतां मला दोन घटका तरी लागल्या असाव्यात. एवढ्या वेळांत करीमबक्ष आणि त्याचे साथीदार किती तरी लांबवर पळून गेले असतील. ते येथें आसपास कोठेंही नाहींत. तेव्हां ते आतां यावेळीं तुमच्या हातीं कसे लागणार ? "

ही हकीकत ऐकून लछमनसिंग आणि त्याचे शिपाई ह्यांची फिरून निराशा झाली, व ह्या झालेल्या एकंदर फजितीमुळें ते सगळेजण इतके खजील होऊन गेले, कीं त्यांतला एकजणहि वर तोंड काढून बोलेना. लछमनसिंगानें सगळ्यांना कूच करून आपल्या छावणीकडे माघारें चलण्याचा हुकूम केला व सकाळच्या सुमाराला ते सर्वजण आपल्या छावणींत हात हलवीत परत येऊन दाखल झाले.

छावणींत आल्यावर काय प्रकार आपल्या दृष्टोत्पत्तीस येणार हें लछमनसिंगाला आधींच समजलेलें होतें. तरी पण आपल्या फजितीचें आणि फसवणुकीचें प्रत्यक्ष स्वरूप पाहण्याकरितां गंगाप्रसादाला ज्या कोठडीमध्यें त्यानें कोंडून ठेविलें होतें, त्या कोठडीकडे तो व त्याचे शिपाई गेले. कोठडीच्या पाठीमागच्या भिंतीला एक मोठें थोरलें भगदाड पडलेलें सर्वांच्या दृष्टीस पडलें ! ही भिंत फोडून करीमबक्षानें पहारेकरी झोपेंत असतांना गंगाप्रसादाला संधि साधून पळवून नेलें असलें पाहिजे, ही गोष्ट सर्वांना उघडपणें कळून चुकली, व ह्या नामुष्कीच्या प्रकाराबद्दल सर्वांना अत्यंत खेद वाटला. त्या वेळीं कोणी पहारेकऱ्यांना नांवें ठेवूं लागले, असल्या झोंप घेणाऱ्या रखवालदारांना आणि मातादिनसारख्या हवालदारांना नोकरीवरून काढून टाकलें पाहिजे असें कित्येक म्हणाले, कोणी करीम-

बक्षाच्या धारिष्टाची तारीफ करूं लागले आणि कोणी ह्या झालेल्या नुकसानीबद्दल हळहळ व्यक्त करूं लागले.

अशीं निरनिराळ्या लोकांची निरनिराळीं बोलणीं चाललीं असतां त्यांच्यांतील एक जण म्हणाला, " झाली ही गोष्ट तर वाईटच झाली, व ही नामुष्कीची झालेली नुकसानी कशानेंही भरून निघणार नाहीं हेंही खरें; तरी पण ह्या कामांत आपण सगळेंच घालवून बसलों आहोंत असें नाहीं. आपण ह्या कामांत कांहीं मिळविलेंहि आहे ! आपण पकडलेला कैदी गंगाप्रसाद आपल्या हातून सुटून गेला म्हणून गोपाळभय्या आपल्यावर रागावतील खरे; पण त्या चोरांनीं आपल्या पहाऱ्यांत ठेविलेली ती जडजवाहिराची पेटी गोपाळभय्यांनीं पाहिली, म्हणजे ते आपल्या किफायतीची तारीफ केल्यावांचून खात्रीनें राहणार नाहींत ! केवढी ती पेटी आहे ! आणि किती तरी जड आहे ! काल सकाळीं ती पहाऱ्यांत नेऊन ठेवण्याचे वेळीं मी उचलून पहात होतों, ती मला किती तरी जड वाटली ! इतकें त्या चोरांनीं हजारो लोकांना लुटून एकत्र जमविलेलें माणिक-मोतीं गोपाळभय्यांनीं साऱ्या जन्मांत कधीं पाहिलें नसेल ! इतकें जडजवाहीर पाहून गोपाळभय्या खात्रीनें खूष होतील ! "

ह्या खालच्या अडाणी शिपायांइतका लछमनसिंग मुळींच मूर्ख नव्हता. त्याला आपली सगळी चूक समजून चुकली होती. त्यामुळें त्या जडजवाहिराची त्याला मुळींच आशा नव्हती. करीमबक्षाच्या इतक्या लबाड्या उघडकीस आल्यानंतर आतां या पेटींमध्यें काय निघणार हें लछमनसिंगाला दिसतच होतें ! तरी पण आपल्या मूर्खपणाचा शेवटचा पुरावा सगळ्यांच्यापुढें ठेवण्याकरितां त्यानें ती पेटी पहाऱ्यांतून आणावयास सांगितली. पेटीवरील मोहोर अगदीं जशीच्या तशी कायम होती. तेव्हां पेटी उघडून आंतलें जडजवाहिर करीमबक्षानें नेलें नसून तें आंत कायम असलें पाहिजे असें कित्येकांना वाटलें. पण पेटी फोडून पाहण्यांत आली, तों आंत काय ? आंत सारे दगड खचून भरलेले होते !

:  :  रंग चोविसावी

भय्यासाहेब अभयानंद हें नांव धारण करून एका संन्याशाच्या वेषामध्यें उत्तरपीठाच्या शंकराचार्याच्या मठामध्यें येऊन राहिले होते, हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्यांच्यासह शंकराचार्यांची स्वारी आस्ते आस्ते प्रवास करीत चाललेली होती. पण त्यांना लवकरच कोठें तरी कायमच्या मुक्कामावर जाऊन राहणें जरूर होतें. कारण, त्यावेळीं उन्हाळ्याचे दिवस संपून पर्जन्यकाळ अगदीं जवळ येऊन ठेपलेला होता. आकाशांत ढगांनीं आपली तयारी चालविली होती व दिवसेंदिवस त्यांचें बळ वाढत जाऊन त्यांनीं सूर्याचा चोहोंकडून बहुतेक अगदीं कोंडमारा करून टाकिला होता. अशा स्थितींत पर्जन्य केव्हां सुरू होईल याचा कांहीं एक नेम नव्हता. आणि एकदां पाऊस सुरू झाला, म्हणजे त्या पावसांतून प्रवास करण्याचें काम शंकराचार्यांच्या मंडळीला फार त्रासाचें झालें असतें. शिवाय यतिधर्माच्या नियमाप्रमाणें चातुर्मास सुरू होण्याच्या पूर्वी त्यांना कोठें तरी कायमचा मुक्काम करून राहणें भागच होतें. आणि करीमबक्षाच्या टोळीचा हल्ला आपल्या छावणीवर आज येईल कीं काय, आणि आजचा दिवस टळला तर उद्यां येईल कीं काय, अशा विवंचनेमध्यें आपल्या प्रवासांतील दिवस काढून काढून आचार्यांच्या मठांतील मंडळी अगदीं कंटाळून गेली होती; व हा जंगलांतील प्रवास संपवून कोठें तरी एखाद्या मोठ्या शहरीं चातुर्मास्याच्या मुक्कामावर जाण्याला ते सर्व लोक अतिशय उत्सुक झालेले होते. अशा सर्व कारणांमुळें त्यांनीं पुढें पुढें आपला प्रवास जलदीनें चालविला होता व चातुर्मासाचा मुक्काम करण्याला सोईचें ठिकाण कोणतें पडेल, याविषयीं त्यांनीं तपास चालविला होता. त्यांत आपण प्रवास करतां करतां भगवती श्रीविंध्यवासिनीदेवीच्या ठिकाणाच्या अगदीं जवळ आलों आहों, असें चौकशीअंतीं त्यांना कळलें. शंकराचार्यांच्या मठामध्यें

श्रीचिदंबरेश्वराची जशी उपासना चालू असे, तशीच श्रीभगवतीशारदादेवीचीही उपासना नित्य चालविण्यांत येत असे. त्यामुळें आपल्या उपास्यदेवतेचें स्थान इतक्या जवळ आलें असतां आपण त्या ठिकाणीं न जाणें हें योग्य नाहीं, असें आचार्यांचें मत पडलें. त्यांच्या मनांतून तें प्रसिद्ध आणि पवित्र स्थान पहावयाचें असून तेथें कांहीं अनुष्ठान करविण्याचीही त्यांची फार इच्छा होती. म्हणून सर्व मंडळींच्या सल्लयानें चातुर्मास्यांत श्रीविंध्यवासिनीदेवीच्या चरणपंकजाच्या सान्निध्यामध्यें मुक्काम करण्याचें अखेरीस निश्चित करण्यांत आलें. व त्याप्रमाणें चातुर्मास सुरू होण्याच्या पूर्वी दोन चार दिवस मठाचा मुक्काम तेथें येऊन पडला.

ज्या ठिकाणीं आचार्यांची स्वारी चातुर्मास्याकरितां आली, तें विंध्यवासिनीदेवीचें ठिकाण त्यांच्यासारख्यांना राहण्याला योग्य असेंच होतें. या विंध्यवासिनीदेवीचें स्थान विंध्याचल पर्वताच्या अनेक रांगांपैकीं एका टेकडीवर आहे. येथील शोभा फारच प्रेक्षणीय आहे. ही टेकडी फार उंचही नाहीं व फार ठेंगणीही नाहीं. या टेकडीच्या पायथ्याशीं विंध्याचल नांवाचें एक लहानसें गांव आहे आणि त्या गांवांतून थोडें पुढें गेलें म्हणजे विंध्यवासिनीच्या टेकडीची चढण लागते. या चढणीच्या पायथ्याशीं एक मोठें थोरलें तळें आहे आणि त्याच्या एका बाजूनें वर वाट गेलेली आहे. या वाटेनें या टेकडीच्या सुमारें अर्ध्याअधिक भागावर चढून गेल्यानंतर वाटेंत मोठमोठाले दगड लागतात. त्यांच्यापुढें डोंगरांत कांहीं गुहा आहेत. बौद्धांच्या वेळचीं जशीं कित्येक ठिकाणीं डोंगरांतून लेणीं खोदलेलीं असतात तशाच स्वरूपाचें हें गुहेचें स्थान आहे. या गुहा एकंदर दोन तीन आहेत. यांची उंची फारशी मोठी नाहीं व या गुहा फारशा खोलही नाहींत. त्यामुळें यांत उजेड आणि मोकळी हवा यांचा सदोदित मुबलक पुरवठा होत असतो. यांपैकीं एका मध्यवर्ती गुहेमध्यें विंध्यवासिनीदेवीचें मुख्य स्थान आहे. या गुहेंत देवीच्या एकंदर तीन मूर्ति आहेत. त्यांपैकीं मधली जी मुख्य देवी तिला महामाया असें म्हणतात व तिच्या दोन बाजूंना ज्या दुसऱ्या दोन देवी आहेत, त्यांना महाकाली आणि महासरस्वती अशीं नांवें आहेत. यांपैकीं मध्यवर्तिनी जी महामाया, तिलाच श्रीमद्भागवतामध्यें योगमाया असें म्हटलेलें आहे. या योगमायेला भगवंतांनीं गोकुळांत नंदाच्या घरीं रोहिणीच्या पोटीं जन्म घेण्याला सांगितलें. गोकुळांतून हिलाच पुढें वसुदेवानें मथुरेला आणल्यानंतर

कंस तिला मारण्याकरितां वध्य शिलेवर आपटण्याला उद्युक्त झाला असतां त्याच्या हातून निसटून ही देवी विजेसारखी कडाडत वर निघून गेली व नंतर तेथून ती विंध्याचल पर्वतावर येऊन राहिली; आणि म्हणून तिला विंध्यवासिनी असें नांव पडलें नंदगोपगृहे जाता यशोदागर्भसंभवा। ततस्तौ नाशयिष्यामि विंध्याचलनिवासिनी ॥ या श्लोकामध्यें वरील गोष्टीचा जो उल्लेख आला आहे, त्यावरून विंध्यवासिनीदेवीचें किती महत्त्व आहे, हें लक्षांत येण्यासारखें आहे. ही विंध्यवासिनीदेवी ज्या टेकडीवर आहे, त्या टेकडीच्या जवळच आणखी दुसऱ्या दोन टेकड्या आहेत; व या एकंदर तिन्ही टेकड्या मिळून तेथें एक निसर्गसिद्ध त्रिकोण यंत्र साधलें गेलेलें आहे, अशी पूर्वापार मंत्रशास्त्रांतील तज्ज्ञ लोकांची समजूत आहे. या निसर्गकृत विशिष्ट रचनेमुळें या स्थानाला एक प्रकारचें मंत्रतंत्राच्या दृष्टीनें महत्त्व आहे असें म्हणतात. विंध्यवासिनीदेवीच्या गुहेचा डोंगर चढून वर गेल्यावर तेथें एक फार मोठा पठार लागतो. तेथें आणि त्याच्या पुढील जंगलांत कोणी सिद्ध पुरुष राहतात, अशी समजूत आहे. या पठारावर येऊन आसमंतांत भागीं दृष्टि फेंकली असतां वर चढण्यांत झालेल्या सर्व श्रमांचा एका क्षणामध्यें परिहार होऊन जातो. या पठारावरून पश्चिमेकडे आपल्यासमोर पहावें, तों तेथील सृष्टिसौंदर्य फारच विलक्षण दिसूं लागतें. आपल्याखालचा डोंगराच्या उतरणीचा सर्व भाग झाडांनीं आच्छादिलेला असल्यामुळें तो हिरव्यागार पानांनीं रचलेला उतरता जिना मनामध्यें फारच आश्चर्य उत्पन्न करतो. त्याच्यापुढील सपाट जमिनीच्या पृष्ठभागावर जिकडे तिकडे पसरलेल्या हिरव्यागार शेतांनीं देवी विंध्यवासिनीच्या सेवेसाठीं आणि विलासासाठीं जिकडे तिकडे हे गालिचेच पसरले आहेत कीं काय, असा भास होतो. आणि त्या गालिचांच्या पलीकडे पांढऱ्या शुभ्र वालुकामय तीरप्रदेशांनीं मंडित झालेली अशी ती परमपावन गंगा नदी जेव्हां डोळ्यांना दिसूं लागते, तेव्हां मनाला जो आनंद होतो, त्याचें तर वर्णन करणें शक्यच नाहीं. आणि त्या वेळीं मग असें वाटूं लागतें कीं, त्या डोंगराच्या गुहेमध्यें जी देवी वसलेली आहे ती खरी विंध्यवासिनी नसून बाहेर विंध्याचलापासून गंगातीरापर्यंत जी ही चोहोंकडे पसरली आहे तीच खरी विंध्यवासिनी होय! आणि भगवती विंध्यवासिनीदेवीच्या दर्शनानें जर स्वर्गप्राप्ति व्हावयाची असेल, तर त्या स्वर्गवासाचें सौख्य या बाहेरच्या सृष्टिसौंदर्याच्या निरीक्षणानें मनुष्याच्या मनाला इहलोकींही प्राप्त होतें, यांत बिलकुल संशय नाहीं.

विंध्याचलासारखें सुंदर स्थान आणि गंगा नदीसारखी पवित्र नदी यांचा या ठिकाणीं झालेला समागम पाहून त्या सृष्टिसौंदर्यानें मोहित होऊनच बहुतकरून विंध्यवासिनी-देवीनें आपल्या निवासाकरितां हें स्थान पसंत केलें असलें पाहिजे !

डोंगरांतील गुहेमध्यें असलेल्या ज्या स्थानाचें वर वर्णन केलें आहे, तें विंध्य-वासिनीदेवीचें पहिलें आणि मुख्य स्थान होय. पण तें जंगलांत एकीकडे आणि उंच चढणीवर आहे; म्हणून यात्रेकरूंच्या सोईसाठीं विंध्याचल या सपाटीवरील गांवांमध्यें गंगा नदीचे कांठीं विंध्यवासिनीदेवीचें एक देऊळ बांधण्यांत आलेलें आहे व यात्रेकरूंच्या दर्शनाची, सप्तशतीच्या पाठांची, होमहवनाची, बलिसमर्पणाची वगैरे मुख्य जागा हीच आहे. हें देऊळ आकारानें फारसें मोठें आहे असें नाहीं. तरी पण भाविक लोकांच्या भावनेनें त्याला फार महत्त्व आलेलें आहे. देवीच्या दर्शनाकरितां आंत जाण्याचे दरवाजे लहान आहेत व आंतील गाभाऱ्याची जागाही फारशी मोठी आहे असें नाहीं; आणि देवीच्या दर्शनाला पौर्णिमा, अमा-वास्या, मंगळवार, शुक्रवार वगैरे विशिष्ट दिवसांनिमित्त यात्रेकरूंची जी अतिशय गर्दी लोटते, त्या गर्दीच्या मानानें पाहिलें, तर ते दरवाजे आणि ती गाभाऱ्यांतील जागा फारच लहान पडते व त्यामुळें देवीचें नुसतें दर्शन होण्यालाही अतिशय पंचाईत पडते. अशा वेळीं तेथें इतकी गर्दी होते कीं, बायका, लहान मुलें, वृद्ध माणसें, यांची तर गोष्ट राहोच, पण चांगल्या धट्ट्याकट्ट्या मनुष्यालाही इतक्या गर्दीतून जाऊन दर्शन घेणें नकोसें वाटूं लागतें. या देवीच्या देवळांतच कांहीं थोड्याशा अंतरावर समोरच एक चौक आहे. ज्यांना कोणाला देवीच्या निमित्तानें कांहीं पशूंचा वगैरे बलि द्यावयाचा असेल, त्यांच्याकरितां त्या पशूंचा वध करण्याची ही जागा आहे. अशा प्रकारची या देवळाची रचना आणि व्यवस्था आहे. हें देऊळ थोडयाशा उंचीवर असून तेथून गंगेच्या किनाऱ्यावर जाण्याकरितां उतरत्या पायऱ्या बांधलेल्या आहेत. येथें गंगेला मोठा घाट असून आसपास इतर देवळेंही बरींच आहेत. या ठिकाणच्या घाटावरून गंगेकडे पाहिलें असतां गंगा नदीचा व आसमंतात् भागाचा देखावा फारच चित्ताकर्षक दिसतो. नवरात्राच्या उत्सवांत येथें यात्रेकरूंची अतिशय भीड होते व विंध्यवासिनीला केलेले आपापले नवस फेडण्याकरितां व देवीचें दर्शन घेऊन तिच्यापासून आशीर्वाद मागण्याकरितां भाविक लोकांची अतोनात गर्दी जमते.

अशा प्रकारचें विंध्यवासिनीदेवीचें हें अत्यंत पवित्र आणि अत्यंत मनोहर असें निवासस्थान आहे. येथील डोंगराच्या गुहेंतील एक आणि दुसरें गंगातीरावरचें अशीं जीं दोन देवीचीं स्थानें आहेत, त्यांपैकीं डोंगराच्या गुहेंतील देवस्थानाच्या जवळ पायथ्याला एक मोठें महादेवाचें देऊळ होतें. तें देऊळ निवांत आणि आपल्या सोईचें आहे असें पाहून उत्तरपीठाच्या शंकराचार्यांनीं त्या देवळांत चातुर्मास्य संपेपर्यंत आपला मुक्काम करण्याचें ठरविलें व त्यांच्याबरोबरच्या बाकीच्या मंडळींनीं त्यांच्या आसपास आपापले तंबू, डेरे लावून आपल्या राहण्याची व्यवस्था केली. महादेवाचें देऊळ विस्तीर्ण असल्यामुळें त्याच्या सभोंवतीं पुष्कळ ओऱ्या असल्यामुळें त्यांतूनही आचार्यांच्या आश्रित मंडळीपैकीं पुष्कळ लोक राहिले होते. आसपासच्या गांवांतील लोकांना शंकराचार्यांची स्वारी येथे येऊन राहिली आहे, असें कळल्यानंतर पुष्कळ लोक त्यांच्या दर्शनाकरितां येऊं लागले व त्यांपैकीं जे मोठमोठे धनाढ्य, शेठसावकार, जमेदार वगैरे होते, त्यांनीं श्रींच्या चातुर्मास्याच्या शिधासामग्रीची वगैरे सर्व समाधानकारक व्यवस्था करून दिली. ही सर्व व्यवस्था सुरळितपणें सुरू झाल्यानंतर श्रींच्या मठांतील नित्य आणि नैमित्तिक अशीं सर्व धर्मकृत्यें मोठ्या थाटामाटानें होऊं लागलीं. आचार्यांच्या मठांतील बहुतेक सर्व भाविक मंडळी गंगेचें प्रातःस्नान कधींही चुकवीत नसत. त्यानंतर देवदेवतार्चन विधि यथासांग करण्यांत येत असे व त्यानंतर ब्रह्मसूत्रें किंवा उपनिषदें यांचें निरूपण जमलेल्या श्रोतृवृंदापुढें सकाळीं नित्यनियमानें चाललेलें असे. शिवाय ब्राह्मणांचें वेदपठणही याच वेळीं होत असे. तसेंच ज्या महादेवाच्या देवळांत ही मंडळी उतरली होती त्या महादेवावर नित्य रुद्राभिषेक सुरू करण्यांत आला होता. भोजनोत्तर तिसरे प्रहरीं मठांतच पुराणश्रवणाला मंडळी जमली, म्हणजे भारत, भागवत यांतील कांहीं पुराण चालत असे. शिवाय मठांत कोणी वैदिक, शास्त्री, पुराणिक अगर हरिदास आले, तर श्रींच्यापुढें त्यांचीही प्रसंगविशेषीं हजेरी लागून योग्य संभावना करण्यांत येत असे. संध्याकाळीं धूपारतीचा समारंभ फार मोठा होत असे व त्या वेळीं चारी वेदांची सेवा, मंत्रपुष्प वगैरे झाल्यानंतर थोडेंसें कीर्तन किंवा गायनही होत असे. अशा रीतीनें आचार्यांची स्वारी तेथें आल्यापासून नित्य मंगल, नित्य आनंद तेथें सुरू झालेला होता. देवळाच्या समोरच्या माडीवर चारी प्रहरांचा चौघडा झडत असे आणि देवळांत दिव्यांच्या रोषणाईनें रात्रीच्या प्रहरीं अपूर्व शोभा उत्पन्न होत असे. भालदार,

चोपदार, शिपाई, प्यादे, हत्ती, घोडे, डंका, नौबत, निशाण वगैरे इतमामामुळें तें ठिकाण म्हणजे एक राजवाडाच होऊन गेलेला होता. त्यामुळें यात्रेकरूंपैकीं आणि आसपासच्या गांवांतील बायका, मुलें, तरुण, वृद्ध वगैरे अनेक लोकांच्या झुंडीच्या झुंडी तेथें देवदर्शनाला, श्रींच्या दर्शनाला आणि वेद-शास्त्र-पुराणांच्या श्रवणाला मोठ्या श्रद्धेनें जमत असत. शंकराचार्यांची स्वारी तेथें आलेली असल्यामुळें आसपासच्या गांवांतील ग्रामण्यें आणि धर्मशास्त्राचे प्रश्न यांचे निकाल लावून घेण्याचीं प्रकरणेंही श्रींच्या दरबारीं पुष्कळ येऊन पडत होतीं. त्या बाबतींतील साक्षीपुरावा पाहून निर्णय देण्याचें काम श्रींनीं स्वामी अभयानंद यांच्याकडे दिलेलें होतें. अभयानंदस्वामी सकाळीं उपनिषदांवरील भाष्याचें निरूपण करीत आणि संध्याकाळीं कधीं कधीं पुराणही सांगत असत; व याच्या दरम्यान दोन प्रहरीं जो वेळ सांपडत असे, त्यांत त्यांनीं हे धर्मशास्त्राचे निवाडे करण्याचा संप्रदाय ठेविला होता. अशा रीतीनें मठांतील कामकाजाची सर्व व्यवस्था नीटनेटकेपणानें चाललेली होती. अशी व्यवस्था चालली असतां पुढें श्रावण महिना आला. त्यावेळीं शेजारच्या एका राजानें श्रींच्या चरणीं अशी विनंति केली कीं, 'आपल्या आगमनाचा या प्रांतांतील लोकांना हा अपूर्व लाभ प्राप्त झाला आहे. त्यांतच हल्लीं आतां श्रावण महिना येत आहे. तरी तन्निमित्त या पुण्यक्षेत्रीं आपलेकडून कोटिलिंगार्चनाचा समारंभ व्हावा. आम्हीं येथील लोकांनीं हा अपूर्व समारंभ पूर्वी कधीं पाहिलेला नाहीं. तेव्हां ही आमची विनंति आपण अवश्य मान्य करावी व कोटिलिंगार्चनाच्या दर्शनानें आपण आम्हांला पुनीत करावें. या धर्मकृत्याला व तत्प्रीत्यर्थ ब्राह्मणसंतर्पणाला जो खर्च येईल, तो मी आपल्या सेवेला या ठिकाणीं सादर करीत आहें.' असें म्हणून सोन्याच्या नाण्यांनीं भरलेली एक पिशवी त्यानें श्रींच्या पुढें तबकांत ठेविली. श्रींना परम संतोष झाला. त्यांनाही ती गोष्ट व्हावयाला पाहिजेच होती. त्यांनीं आपली संमति दिली व गुरुपौर्णिमेच्या दिवशींच्या झालेल्या व्यासपूजेच्या समारंभानंतरचा त्याच्यापेक्षां जास्त थाटाचा असा हा कोटिलिंगार्चनाचा समारंभ मोठ्या आनंदानें साजरा करण्यांत आला. महिनाभर चाललेला हा महोत्सव पाहून सर्वांना मोठी धन्यता वाटली.

अशा रीतीनें मठांत नित्य मंगल महोत्सव चाललेले असतां आपले कथानायक स्वामी अभयानंद यांची काय स्थिति होती, तें पाहण्याकडे आतां आपण थोडेसे वळूं. ते नित्य मोठ्या पहाटेसच जागे होत असत आणि अशा रीतीनें ब्राह्म मुहूर्तावर उठून

प्रातर्विधि झाल्यानंतर ते बराच वेळ एकाग्रतेनें भगवच्चिंतन करीत बसत असत. पंचपंच उषःकालीं गंगातीरावर जाऊन गंगेचें प्रातःस्नान करण्याचा नियम त्यांनीं अबाधितपणें कायम ठेविला होता. गंगास्नान करून आल्यानंतर ते एकांतामध्यें थोडा समाधीचा अभ्यास करीत बसत. त्यानंतर उपनिषद्भाष्याचें निरूपण, दुपारीं धर्मशास्त्राचे निर्णय आणि तिसरे प्रहरीं पुराण, हा त्यांचा नेहमींचा व्यवसाय ठरलेला असे. यानंतर मठाधिपतींनीं नेमून दिलेलें असें कांहीं विशेष काम त्यांच्याकडे नसल्यामुळें ते येथून पुढें बहुतेक रिकामेच असत. पण संकटांत आणि विरहावस्थेंत असलेल्या लोकांना हा रिकामपणचा वेळच अतिशय त्रासदायक होतो. त्यांच्या नेमलेल्या कामांतील त्यांची वेळ केव्हां जाई, हें त्यांना समजतही नसे. पण त्यांचें ठराविक काम संपून ते रिकामे झाले, म्हणजे त्यांना सगळें त्रिभुवन आठवे. ते पूर्वी अरण्यांत असतांना त्यांनीं एका वाघाला मारून ज्या एका सद्यःप्रसूत हरिणबालकाचा जीव वांचविला होता म्हणून मागें सांगितलेलें आहे, तें हरिणबालक त्यांच्याबरोबर त्यांनीं मठामध्येंच ठेविलें होतें. चतुर्थाश्रमाचा वेष घेण्याच्या पूर्वी त्यांनीं बाकीच्या जशा कांहीं गोष्टींचा त्याग केला होता, तसा त्यांनीं या हरिणबालकाचा त्याग केला नाहीं. चतुर्थाश्रमामध्येंही हरिणांना जवळ बाळगण्याला कांहीं हरकत नसते, हें तर एक कारण होतेंच; पण पुत्रनिरतिशय-प्रेमानें ते त्या हरिणबालकाकडे नेहमीं पहात असल्यामुळें तें त्यांना आपल्यापासून दूर करवेना. माझें बालक माझ्यापाशीं नाहीं, तर निदान हें हरिणबालक तरी आपल्यापाशीं असूं द्यावें, अशा भावनेनें त्यांनीं तें आपल्याजवळ बाळगिलें होतें. माझी प्रिया असती आणि तिला पुत्र झालेला असता, तर तोही एव्हांना असाच झाला असता, असे विचार त्यांच्या मनांत त्या हरिणशावकाला पाहून येत असत आणि आपल्या मुलाला जसें खाऊं पिऊं घालावें, तसें ते त्याला दूध पाजीत असत! आणि आपल्या मृगाजिनावर त्याला निजवून आपली छाटी त्याला पांघरावयाला घालीत असत! संध्याकाळच्या प्रहरीं ते त्या विंध्यवासिनीच्या टेकडी-वर कोठें फिरावयाला गेले तर तें हरिणशावक त्यांच्या पाठोपाठ जात असे. ते सृष्टिशोभा पहाण्याकरितां कोठें एखाद्या शिलातलावर बसले, तर तें हरिण त्यांच्या जवळपास कोठेंतरी गवतांत चरत असे. त्याच्याकडे पाहून स्वामींच्या डोळ्यांतून अश्रु येत. हरणाची जात अतिशय भित्री. जरा कोठें कांहीं वाजलें किंवा दुसरें कांहीं कारण घडलें कीं, तें हरिण एकदम दचकून स्वामी जेथें बसलेले असत तेथें

घेई आणि त्यांच्या मुलाप्रमाणें त्यांच्या मांडीवर जाऊन बसे. अशा वेळीं ते त्याला कुरवाळून आपल्या छातीजवळ उचलून धरीत, तेव्हां त्यांच्या डोळ्यांतील प्रेमाश्रु त्याच्या अंगावर टपटप गळत असत. अशा वेळीं ते त्याला म्हणत:—" बाळा, तुझी आई जिवंत असती, तर तुला एखादें भय वाटल्यावर तूं तिच्यापाशीं गेला असतास. पण तुला आई नाहीं! तुला बाप नाहीं! तरी पण तूं कांहीं काळजी करूं नकोस! मी तुझी आई आहें आणि बापही आहें! मी तुझें संगोपन करीन! मी असतांना तुला काय कमी आहे? तुझ्यापेक्षां जास्त हतभाग्य अशीं किती तरी पोरकीं मुलें आपल्या आईबापांवांचून उघडीं पडलेलीं असतील. त्यांना भीति वाटली, तर तीं कोणाच्या पोटांत शिरतील? आणि त्यांना कोण आपल्याजवळ घेणार आहे? तुझी आई नसली, तर तुला भूक लागली म्हणजे मी तुला दूध पाजतों आणि तुला तहान लागली म्हणजे मी तुला पाणी पाजतों! पण ज्यांचे आईबाप नाहींत, अशीं कोणी पोरकीं लहान लहान मुलें या अरण्यांत कोठें पडलीं असलीं, तर त्यांची तहानभूक कोण जाणणार आहे? आणि त्या पोरक्या मुलांना त्यांच्या आईबापांच्या इतक्या प्रेमळपणानें खायला आणि प्यायला दुसरें कोण देणार आहे? माझी प्रिया जिवंत असून प्रसूत झाली असेल, तर त्या मजवांचून अनाथ झालेल्या अबलेच्या अनाथ आणि पोरक्या मुलाची त्याच्या बापाच्या अभावीं या अरण्यांत कोण काळजी घेत असेल! पण आधीं तो इतक्या संकटांतून अजून जिवंत तरी राहिला असेल काय? बा हरिणबालका, तुझा एक तुझ्याचसारखा अनाथ झालेला भाऊ आहे! तो तुला माहीत आहे का! तो जिवंत असेल का! तो कोठें असेल हें तुला माहीत आहे का?—पण मी वेड्यासारखे याला हे प्रश्न काय विचारीत बसलों आहे! माझी प्रिय पत्नीच जर मारली गेलेली असली पाहिजे, तर तिला मुलगा तरी कोठून होणार आणि त्याची बातमी मी या हरिणबालकाला काय विचारतों!' असें म्हणून स्वामी आपल्या अंगावरील छाटीचा पदर आपल्या डोळ्याला लावून त्याच्याआड घटका घटका एकसारखे रडत बसत असत.

स्वामी अभयानंद यांचा विरहविनोदनाचा आणखी एक मार्ग म्हटला म्हणजे त्यांनीं आपल्याबरोबर आपल्या पत्नीचे जे कांहीं दागिने आणिले होते, त्यांच्याकडे पाहून पूर्वीच्या आठवणी काढून शोक करीत बसणें हा होता. या दागिन्यांना ते आपल्या जीवापलीकडे बाळगीत असत. संन्यासवेष धारण करण्याच्या वेळीं

त्यांनीं बाकीच्या सर्व गोष्टींचा त्याग केला; पण या दागिन्यांचा ते त्याग कसा करणार? विंध्यवासिनीदेवीच्या डोंगराच्या पठारावर चोहोंकडे जें अतिशय दाट जंगल पसरलेलें होतें, त्या जंगलांत कोणाच्याही दृष्टीस न पडतील, अशा ठिकाणीं स्वामींनीं ते दागिने एका बाजूला नेऊन ठेविले होतें. ते मठामध्यें ठेवणें त्यांना शक्यच नव्हतें. तेथें ते त्यांनीं ठेविले असते आणि ते जर तेथें कोणाच्या नजरेस पडले असते, तर स्वामींचें सगळेंच ढोंग उघडकीस येण्याला अवकाश लागला नसता. म्हणून कोणाच्याही सहसा नजरेस न पडतील, अशा जंगलांतील एका आपल्या खुणेच्या जागीं त्यांनीं ते दागिने नेऊन ठेविले होते. तेथें ते वरच्यावर जात असत. तेथें गेल्यापासून त्यांना कांहीं सौख्य किंवा आनंद होत असे, असें नाहीं. पण तेथें गेल्यावांचून त्यांना चैन मात्र बिलकुल पडत नसे. तेथे गेल्यावर त्या निरनिराळ्या दागिन्यांकडे पाहून त्यांनीं डोळ्यांतून अश्रु गाळावे, याच्याशिवाय तेथें दुसरें कांहीं एक होतच नसे. तरी पण विरहीजनांचा शोक हाच त्यांचा आनंद! आपल्या प्रियजनांच्या स्मरणानें विव्हल आणि शोकाकुल होणें यांतच त्यांना सौख्य वाटतें. आपल्या प्रियकरणीच्या प्रत्यक्ष समागमाच्या खालोखाल विरहीजनांना जर कशांत सौख्य जास्त वाटत असेल, तर तें आपल्या प्रियेची कल्पनामय मूर्ति निर्माण करून तिच्याशीं रममाण होण्यामध्येंच होत असते. निष्ठुर दुर्दैवाचे प्रयत्न विफल करण्याचें जर कांहीं साधन विरहीजनांच्या हातांत असेल, तर तें हेंच होय. विरहानें आपल्या प्रियेला दूर ओढून न्यावें आणि आपल्या कल्पनेनें तिला परत आपल्याजवळ ओढून आणावें, अशा प्रकारचा संग्राम दुष्ट विरह आणि कृपाळु कल्पना यांच्यामध्यें विरहीजनांच्या संबंधांत नित्य चाललेला असतो. आणि त्यांत सदोदित कल्पनेचाच विजय होत असतो.

ज्या प्रेमपाशबद्ध मनुष्यापाशीं त्याची कल्पनाशक्ति शाबूत आहे, त्याच्यापासून त्याची प्रिय ललना कोणीही हरण करून नेऊं शकत नाहीं. रामाची सीता आपण लंकेंत चोरून आणून ठेवली आहे, असें रावण आपल्या मनामध्यें समजत होता. पण श्रीसीतादेवी ही रामचंद्राच्या अंतःकरणासून किंवा डोळ्यांपुढून एक क्षणभरही कधीं दूर गेलेली नव्हती. सुवर्णहरिणाला बाण मारून परत आल्यावर दंडकारण्यांत राम सीतेला कोठें पहात नव्हता? जेथें पहावें तेथें रामाला सीता

दिसतच होती ! एखाद्या झाडावर एखादी कोमल लता समाश्रित झालेली दिसली, तर तेथें ती सीताच उभी आहे असें रामाला वाटे ! एखाद्या वृक्षावर एखादें सुंदर फूल थोडेसें उंच फुललेलें दिसलें, तर तें आपल्याला वास घेण्याकरितां आणून देण्यासाठीं आपल्या पायाच्या बोटांच्या टोंकांवर उभी राहून त्या फुलाला आपला हात पोहोंचण्याकरितां त्या झाडाच्या एकापुढलि एक खांद्या हळूहळू वांकवीत असलेली सीता रामाच्या नेहमीं नजरेस पडत असे ! एखादें हरिणबालक रामानें पाहिलें, तर त्याला जवळ घेऊन हिरव्या आणि कोंवळ्या गवताचे घास त्याला पुत्रवात्सल्यानें भरवीत बसलेली सीता रामाला पंचवटींतलि वनप्रदेशामध्यें दिसल्यावांचून कधीं राहिली नाहीं ! सीताहरण झाल्यानंतरही गोदावरीच्या तीरावर राम जेव्हां जेव्हां जाई, तेव्हां तेव्हां गोदावरीच्या वालुकामय तीराजवळील फार खोल नाहीं अशा पाण्यांत स्नान करून, उजवा हात आपल्या डाव्या खांद्याकडे वळवून आणि डाव्या हातानें आपल्या पायावरील आर्द्रवस्त्राचें ओंचे वर धरून, सलज्ज मुद्रेनें आपणाकडे किंचित् मंदस्मितधवलित अशा कटाक्ष दृष्टीनें पहात हळुहळू पाण्यांतून बाहेर येत असतांना किती तरी वेळां रामानें सीतेला पाहिलेली आहे ! रावणानें सीतेला नेल्यानंतर रामाला सीता कोठें दिसत नव्हती ? सीता पर्णकुटीच्या आंत दिसत होती, पर्णकुटीच्या बाहेर दिसत होती, गोदावरीच्या कांठावर दिसत होती, गोदावरीच्या पाण्यांत दिसत होती, पंचवटींत दिसत होती, आणि पंचवटीजवळच्या ठेंगण्या ठेंगण्या पर्वतांवरून दिसत होती ! जिकडे पहावें तिकडे रामाला सीता दिसत होती ! वर, खालीं, पुढें मागें, उजव्या बाजूला, डाव्या बाजूला, जमिनीवर आणि आकाशांत, सर्व दशदिशांनीं रामाला सीता दिसत होती ! आणि तीच अवस्था स्वामी अभयानंद यांची झालेली होती ! ते त्या विंध्याचलाच्या डोंगरांत जिकडे जिकडे फिरत, तिकडे तिकडे आपल्या पाठीमागून आपली प्रियपत्नी—गंगाबाई येत आहे, असें त्यांना वाटे. पण तिच्यासाठीं थांबून ते जेव्हां मागें वळून पहात, तेव्हां मागें कोणी नाहीं असें आढळून आल्यावर मात्र त्यांची निराशा होई आणि ते निराशेचे दीर्घ निश्वास टाकूं लागत असत ! गंगाबाईना आपल्या पतीबरोबर निर्जन अरण्यांतील उघड्या एकांतामध्यें स्वैरविहार करण्याची फार हौस असे, व सृष्टिसौंदर्याच्या सौख्याबरोबर पतिसमागमाच्या सौख्याचा आनंददायी अनुभव घेण्याची त्यांची नेहमीं फार इच्छा असे. या आपल्या प्रियेच्या इच्छेची आठवण होऊन स्वामी अभयानंद एकदां त्या विंध्याचलावरलि निसर्ग-

रमणीय एकांताकडे पाहून सुस्कारे टाकीत म्हणाले, " प्रिये ! तूं कोठें आहेस ? तुला ज्यांची हौस असे, अशीं हीं निर्जन एकांतस्थानें या अरण्यांत किती तरी आहेत ! आपण जेथें बसूं आणि विहार करूं असें म्हणूं, तेथें एकांतस्थानें तयार आहेत ! पण प्रिये, तूं कोठें आहेस ? येथील प्रत्येक वृक्षाच्या तळाशीं आपल्याला दोघांनाही बसण्याला पुरतील असे किती तरी शिलाखंड पसरलेले मला दिसत आहेत ! पण प्रिये, तूं कोठें आहेस ?—येथील वृक्षांवर आणि लतांवर इतकीं सुंदर आणि सुवासिक फुलें फुललेलीं दिसत आहेत कीं, त्यांच्या माळा करून तूं माझ्या गळ्यांत घातल्या असत्यास, आणि त्यांचे गजरे करून मी तुझ्या केशपाशांत घातले असते ! पण, प्रिये, तूं कोठें आहेस ?–तुझ्यावांचून हीं पहा येथील सर्व फुलें सकाळीं प्रफुल्ल होऊन संध्याकाळीं फुकट कोमेजून जात आहेत ! येथील ह्या लतांनीं आणि वेलींनीं तुझ्यासारख्या लज्जावती स्त्रियांच्या रहस्यक्रीडेसाठीं आपले हे नैसर्गिक कुंज इतके निबिड बनविलेले आहेत कीं, तुझ्या निर्भय प्रेमविलासामध्यें व्यत्यय न येण्यासाठीं त्यांनीं सूर्याच्या किरणांनाही आंत येण्याला कोठें वाट ठेवली नाहीं ! पण, प्रिये, तूं कोठें आहेस ? "

असे त्यांचे विलाप त्या अरण्यामधील तीं तीं निरनिराळीं स्थानें पाहून नित्य चालत असत. पण मध्येंच त्यांना एखादे वेळीं असें वाटे कीं, " आपली प्रिया आपल्याला परत सांपडावी, अशी मी नित्य इच्छा करीत आहे खरी, पण माझ्या सुदैवानें आणि कर्मधर्मसंयोगानें तिची आणि माझी गांठ पडण्याचा खरोखरच एखादे दिवशीं सुयोग आला, तर कसें होईल ? हा माझा संन्याशाचा वेष माझ्या मार्गांत आडवा पडेल, याची काय वाट ? माझी पत्नी जिवंत असली आणि ती मला भेटली, तरी या संन्याशाला पाहून तिला काय वाटेल ? आणि तिच्या इतक्या दिवसांच्या सगळ्या आशेमध्यें माती कालवणारा हा माझा वेष पाहून ती काय म्हणेल ? असला हा तिची निराशा करणारा वेष मी कशाला घेतला ! मी हा संन्याशाचा खोटा वेष घेतला असला, तरी तिला तें कसें समजणार ? मला दुरून ओळखून--पण मी संन्यासी झालेला पाहून, निराशेच्या आवेगामध्यें तिनें आपल्या जिवाचें कांहीं बरें वाईट केलें, तर मी काय करूं ? असला हा आत्मघातकी वेष मी कशाला घेतला ! मी संन्यासी कशाला झालों ? ही सगळी माझ्या सभोंवतालची सृष्टि संसारचक्राच्या परिवर्तनामध्यें निमग्न झालेली असतांना मीच हा संन्यास कशाला घेतला ? माझी आई घरीं माझ्या पत्राची वाट पहात बसलेली असेल;

आणि आम्ही झांशीवरून राजापुरास जाण्याकरितां निघून इतके दिवस झाले असतां माझ्या प्रिय पत्नीचे आई-बाप आमची दोघांची काय वाट झाली म्हणून काळजी करीत बसलेले असतील! त्या सगळ्यांची निराशा करून मी येथें संन्यासी होऊन काय म्हणून बसलों आहे! आणि आतां या भगव्या वस्त्रांमधून माझी सुटका कशी होणार?" अशा प्रकारच्या या विवंचनेनें त्यांच्या मनामध्यें फारच खिन्नता उत्पन्न होत असे. पण ते ज्या परिस्थितीमध्यें सध्यां येऊन पडले होते, त्यांतून त्यांची सुटका होण्याला कांहीं एक मार्ग दिसत नव्हता. आणि म्हणून प्राप्त झालेल्या स्थितीमध्येंच दुःखही मानीत आणि समाधानही मानीत, ते कसे तरी दिवस काढीत होते.

स्वामी अभयानंद हे अशा स्थितींत शंकराचार्यांच्या मठांत कसे दिवस काढीत होते हें आपण पाहिलें. आतां आपण प्रयागास काय प्रकार चालला होता तिकडे थोडेसे वळूं. प्रयागच्या गणपतीभय्याची वेश्या कमलाबाई ही गणपतीभय्यावर अनेक कारणांमुळें कशी रागावलेली होती हें आपण पूर्वी पाहिलेलेंच आहे. पापी मनाला सर्व ठिकाणीं पाप दिसत असतें, या निसर्गसिद्ध नियमाप्रमाणें कमलाबाईच्या मनानें असें घेतलें होतें कीं, गणपतीभय्यानें आपल्यासंबंधीचे पूर्वीचे सर्व प्रेमपाश तोडून टाकले असून तो हल्लीं गंगाबाईच्या प्रेमपाशांनीं पूर्णपणें बद्ध झालेला असला पाहिजे. या मत्सरमूलक संशयामुळें आपण बिचाऱ्या पवित्र गंगाबाईवर किती आग पाखडीत आहोंत याची कल्पना तिच्या मनाला कधींही शिवली नाहीं. गणपतीभय्या आणि गंगाबाई यांच्या हालचालीवर तिनें पक्की टेहळणी ठेवली होती. आणि त्यांनीं अत्यंत सरळपणानें आणि अतिशय पवित्र हेतूनें केलेल्याही प्रत्येक गोष्टीमध्यें कांहीं तरी काळेंबेरें असलें पाहिजे, आणि तें प्रत्येक कृत्य कांहीं तरी पापवासनामूलकच असलें पाहिजे असें कमलाबाई धरून चालत असे. अशा तिच्या मनःस्थितीमध्यें कांहीं दिवस लोटल्यानंतर तिला एकदां असें आढळून आलें कीं, गणपतीभय्याच्या घराच्या सर्व खिडक्या वगैरे बंद असून बाहेरच्या दाराला कुलुप लागलेलें आहे! घरांतील मंडळी कोठें आसपासच्या गांवीं गेलीं असतील व ती लवकरच परत येतील, असें तिला पहिल्यानें वाटलें. पण बरेच दिवस झाले, तरी गणपतीभय्याच्या घराला जें टाळें लागलें तें कायमच! तेव्हां कमलाबाईच्या मनांत निरनिराळे तर्क उत्पन्न होऊं लागले. आपण यांचें रहस्य बाहेर फोडूं, अशी गणपतीभय्या आणि गंगाबाई यांना रात्रंदिवस भीति वाटत

असल्यामुळें येथें त्यांना निर्धास्तपणें सुखोपभोग घेतां येत नाहींत, म्हणून बहुत-करून हें ठिकाण सोडून देऊन हें जोडपें दुसरीकडे कोठें तरी एखाद्या अनोळखी ठिकाणीं मजा मारण्याकरितां जाऊन राहिलें असलें पाहिजे, अशी कल्पना कमलाबाईच्या मनांत आली; व त्यांचा सुगावा काढण्यासाठीं आसपासच्या गांवां-तून तिनें त्यांचा पुष्कळ शोध केला; पण तिला त्यांचा कांहींच तपास लागला नाहीं. आणि तिला तो तपास लागणार तरी कसा? तिच्या पापी मनांत ज्या शुद्ध प्रेमाची कधीं कल्पनाही येणें शक्य नव्हतें, त्या पतिप्रेमानें प्रेरित होऊन गंगा-बाई गणपतीभय्याला आपल्या संरक्षणासाठीं आणि पतीची माहिती मिळविण्यासाठीं बरोबर घेऊन अगदीं भिन्न दिशेनें प्रवास करीत चाललेली होती. गणपतीभय्यानें चोरीचा माल विकणारे त्याचे पूर्वींचे कोणी तरी साथीदार येतील म्हणून पुष्कळ दिवसपर्यंत वाट पाहिली; पग त्यांच्यापैकीं कोणी अलीकडे प्रयागला आलेलें आढळलेंच नाहीं. तेव्हां आणखी कांहीं दिवस वाट पाहिली पाहिजे, असें गणपती-भय्याचें म्हणणें होतें. पण प्रिय पतीचा कांहीं तरी शोध लावण्याच्या बाबतींत गंगाबाई इतक्या अधीर होऊन गेलेल्या होत्या कीं, कांहीं प्रत्यक्ष प्रयत्न केल्यावांचून प्रयागामध्यें अनिश्चितपणानें नुसती वाट पहात बसणें हें त्यांना मुळींच पसंन पडेनासें झालें. आपल्या आंगठ्या, आपली शालजोडी, इतक्या जिन-सांच्या खुणाखाणा आपल्या हातीं मिळाल्या असतां याच्यापुढील शोध आपल्याला लावतां येऊं नये, या प्रयत्नदौर्बल्याबद्दल त्यांना खंती वाटूं लागली; व चोरीचा माल विकणारे चोर प्रयागांत येत नसले, तर आपण प्रयागांतून उठून ते चोर जेथें असतील तेथें जाणें जरूर आहे, असा गंगाबाईनें आपल्या मनाचा निश्चय केला. तो तिनें गणपतीभय्याला सांगून आपल्याबरोबर येण्याविषयीं त्याला विनंती केली. गणपतीभय्याला हा विचार बिलकूल मान्य झाला नाहीं. बायकामाणसांनीं विंध्याचलाच्या जंगलांत चोरांच्या टोळ्यांचा शोध करीत जाणें हें किती धोक्याचें आहे, याची गणपतीभय्याला पूर्ण कल्पना होती. आणि म्हणून गंगाबाई एकदां चोरांच्या आणि ठगांच्या हातून कशीबशी जी सुटली, तिला फिरून मृत्युमुखांत घालण्याचें साहस करण्याला गणपतीभय्या केव्हांही कबूल नव्हता.—परंतु "माझ्या पतीचा शोध लावून देण्यासाठीं आणि माझें वाटेंत संरक्षण करण्यासाठीं तुम्ही माझ्याबरोबर येण्याला खुषी नसाल, तर तुम्ही खुशाल येऊं नका. पण मी मात्र जाणारच. माझ्या पतीच्या शोधासाठीं मी एकटी जाण्यालाही मला बिलकूल

भय वाटत नाहीं. डोंगरांतून आणि रानावनांतून माझें पतिप्रेम आणि माझा परमेश्वर माझें खात्रीनें रक्षण करील. तो अनाथनाथ दीनवत्सल परमेश्वर या अबलेची कधींही उपेक्षा करणार नाहीं. माझ्या हातून आजपर्यंत जर कधीं पातक झालेलें नसेल आणि मी जर नेहमीं सत्यानें आणि धर्मानें वागलेली असेन, तर तें सत्य आणि तो धर्म माझें रक्षण करील, अशी माझी पक्की श्रद्धा आहे! तुमच्या मुलाला मी इतके दिवस संभाळलें! आतां यापुढें परमेश्वर त्याला संभाळील! त्याची आई नाहीं म्हणून तुम्ही काळजी करूं नका! त्याला आई नाहीं, पण निदान तुम्ही त्याचे बाप तरी आहां! पण माझ्या मुलाची काय दशा झाली असेल! त्या बिचाऱ्याला आई नाहीं आणि बापही नाहीं! मी दुःखानें संतापून 'या कारट्याला कोणाला तरी देऊन टाक!' असें म्हणून मी आपल्या एका समदुःखी मैत्रिणीजवळ त्याला दिलें आणि माझे हे रागानें उच्चारलेले शब्द मी खरोखरच अन्तःकरणापासून उच्चारलेले आहेत असें समजून,—तिला मूल झालेलें नसल्यामुळें आईच्या ममतेची कल्पना तिला न येऊन—तिनें माझें मूल खरोखरच दुसऱ्या कोणाला तरी देऊन टाकलें! अशी मी हतभाग्य आहें! माझा पति जिवंत आहे किंवा नाहीं याची मला कांहींच माहिती मिळत नाहीं. तसेंच माझ्या बाळाचेंही पुढें काय झालें आहे, हेंही मला कांहीं कळत नाहीं. अशा स्थितींत मी स्वस्थ कशी बसूं? मी जाणार! मी रानावनांतून आपल्या पतीच्या शोधासाठीं एकटी देखील हिंडणार! माझ्यापूर्वी दुसऱ्या कोणावर असे प्रसंग आलेले नाहींत, असें नाहीं. एवढी राजाची राणी दमयंती, पण ती देखील केवळ अर्धवस्त्र परिधान करून आपल्या नळराजाचा शोध करण्याकरितां रानावनांतून आणि कांट्याकुट्यांतून काय थोडी हिंडत होती? मग माझीच काय कथा! मी जाणार!" असें गंगाबाई निक्षून बोलली. तेव्हां तें तिचें भाषण ऐकून गणपतीभय्याच्या डोळ्यांतून खळखळा पाणी वाहूं लागलें. त्यानें एक अक्षरही पुढें तोंडांतून काढलें नाहीं आणि त्याच्याच दुसऱ्या दिवशीं गणपतीभय्याच्या घराला वर सांगितल्याप्रमाणें कुलूप लागलेलें होतें. प्रयागांत असतांना कमलाबाईच्या मनांत जसा संशय आला होता, तसा प्रयागच्या बाहेरही गणपतीभय्या आणि गंगाबाई यांच्यासंबंधानें संशय उत्पन्न होणें जरी कदाचित् स्वाभाविक होतें, तरी चोरांपासून बातमी काढण्याला व आपलें संरक्षण करण्याला गणपतीभय्याची आवश्यकता होती, व तोही आतां येण्याला कबूल झाला होता, म्हणून गंगाबाईनें

त्याला आपल्याबरोबर घेण्याची कल्पना मान्य केली. आणि शिवाय गणपतीभय्या याच्या अन्तःकरणांतील सर्व कुविचार गंगाबाईच्या उदात्त उद्गारांनीं आणि आचरणानें पार धुऊन गेलेले असल्यामुळें तोही त्यांच्याशीं भावाप्रमाणें एकनिष्ठ भक्तीनें वागत असे.

या उभयतांना ठगांपासून आणि चोरांपासून बातमी काढावयाची असल्यामुळें जिकडे चोर आणि ठग लोक फिरत असतील अशाच ठिकाणीं जाणें भाग होतें. आणि म्हणून मोठमोठ्या शहरांचे रस्ते सोडून गंगाबाई आणि गणपतीभय्या यांनीं बहुतेक जंगलांतून जाण्याचा रोख ठेवला होता. इतर प्रवासी प्रवासाला निघाले, तर ते चोरांना टाळीत असत; पण हे प्रवासी मुद्दाम चोरांना शोधीत चालले होते ! इतर प्रवासी आपण चोरांच्या हातून सुटावें अशी इच्छा करीत असले, तर हे प्रवासी आपण कोणत्या तरी चोरांच्या हातांत कसे सांपडूं याच्याबद्दल काळजी करीत होते ! एका ठगांच्या टोळीपासून दुसऱ्या ठगांच्या टोळीचा शोध लागेल आणि दुसऱ्यांपासून तिसऱ्यांचा लागेल आणि अशा रीतीनें केव्हां तरी आणि कोठें तरी ज्या ठगांच्या टोळीनें आपल्याला लुटलें त्या टोळीचा आपणाला सुगावा लागेल आणि मग त्यांच्यापासून भय्यासाहेबांची आपण कांहीं तरी नक्की बातमी मिळवूं शकूं, अशी गंगाबाईची कल्पना होती, व हा शोधाचा मार्ग गणपतीभय्यालाही नापसंत होता असें नाहीं. म्हणून ते जंगलाजंगलांतून जेथें ठगांच्या टोळ्यांचे मुक्काम असतील अशा ठिकाणांमधून प्रवास करीत चालले होते. परंतु दुर्दैवी मनुष्याला कांहीं फायद्यासाठीं आपल्यावर एखादें संकट यावें असें जरी वाटत असलें, तरी तें संकटसुद्धां त्याचें दुर्दैव त्याला मिळूं देत नाहीं ! आणि अशीच गंगाबाईची या बाबतींत स्थिति झाली होती. त्या वेळीं विंध्याचलाच्या जंगलांत आणि रस्त्यावरून शेकडों वाटसरू ठग लोकांकडून लुटले आणि मारले जात असतां बिचाऱ्या गंगाबाईला आणि गणपतीभय्याला मात्र एक सुद्धां कोणी ठग भेटेना ! आपल्याजवळ कांहीं माया नाहीं, त्यामुळें आपल्या गरिबांकडे ठग लोक सुद्धां ढुंकून पहात नाहींत, याबद्दल आपल्या गरिबीसाठीं त्यांना वाईट वाटलें. आणि ही गोष्ट लक्षांत येऊन नंतर आपल्याकडे चोरांचें चित्त आकर्षण करून घेण्याकरितां गणपतीभय्यानें एक थोडीशी धोक्याची पण अचूक परिणाम उत्पन्न करण्यासारखी युक्ति योजून पाहिली. जे ठग लोकांच्या टोळ्यांचे टेहळे असावेत असें गणपतीभय्याला वाटे त्यांच्याजवळ गणपतीभय्या युक्तीयुक्तीनें बोलण्याचा ओघ

वळवून एखाद्या बावळट माणसाचें सोंग आणून असेंही सांगत असे कीं, "ही जी माझ्याबरोबर बाई आहे, ही जरी बाहेरून अशी भिकाऱ्यासारखी दिसत आहे, तरी हिच्यापाशीं पैका फार पुष्कळ आहे. म्हणून आम्हांला ठग लोकांच्या टोळ्यांचें फार भय वाटत आहे! आणि म्हणून त्यांच्या तावडींत न सांपडतां आमचा प्रवास या जंगलांतून कसा सुरक्षितपणें पुरा होईल, याची आम्हांला मोठी धास्ती वाटत आहे!" पण असा जरी त्यानें संपत्तीचा आव आणला, तरी एक देखील ठग त्यांच्या पाळतीवर राहिला नाहीं. आणि गणपतीभय्यानें ही इतकी खोटी बतावणी आणि खोटी उठावणी केली, तरी कोणीही ठगानें किंवा चोरानें एकही रात्रीं कधीं त्याची झोपमोड केली नाहीं. गणपतीभय्या ज्यांना टेहळे म्हणून समजत होता ते कदाचित् चोरांचे टेहळेच नसतील; किंवा टेहळे असले, तर गणपतीभय्याच्या या सगळ्या बाता आहेत असें ओळखण्याइतके ते धूर्त तरी असले पाहिजेत; कारण गूळ असला तरच त्याच्यामागें लागावें हें डोंगळ्यांना देखील समजतें; मग कफल्लकांच्या मागें लागून धूर्त ठग आपला अमूल्य वेळ विनाकारण काय म्हणून खर्च करतील? सारांश, गंगाबाईचें दुर्दैव असें कीं, त्यांना त्या एवढ्या मोठ्या चोरांनीं आणि ठगांनीं गजबजलेल्या सुप्रसिद्ध विंध्याचलाच्या जंगलांत एकसुद्धां कोणी चोर आढळेना. रोज जंगलांतून प्रवास करावा, आणि आज कोणी ठग भेटेल का, उद्यां कोणी ठग भेटेल का, अशा आशेनें त्यांनीं साऱ्या दिवसभर वाट पहावी आणि साऱ्या रात्रभर जागत बसावें! पण कोणी ठग त्यांच्या सावलीला येईल तर शपथ! अशा निराशेनें त्यांनीं जंगलांतून प्रवास करण्यांत कित्येक दिवस घालविले. त्या प्रवासांत त्यांना नवीन तर कोणी भेटला नाहींच; पण गणपतीभय्याचा जो लहान मुलगा गंगाबाईनें आपल्या पोटच्या मुलाप्रमाणें इतके दिवस संभाळून वाढविला होता, तो मात्र त्या रानांतील प्रवासाच्या हालांत त्यांना सोडून गेला!

● ● ●

: :

# रांग पंचविसावी

पूर्वीच्या भागांत सांगितल्याप्रमाणें गंगाबाई आणि गणपतीभय्या हीं जंगलांतून प्रवास करीत असतां ते पावसाचे दिवस असल्यामुळें त्यांचा बरेच ठिकाणीं खोळंबा होत असे. पावसाची एखादी जोराची सर येऊन गेली कीं, त्यांच्या वाटेंतील एखादा भिकार नाला देखील अल्पाधिकाराच्या गर्वानें फुगलेल्या एखाद्या हलकट शिपायाप्रमाणें त्यांचा मार्ग रोखून धरीत असे; व त्यांच्या पुढें जाण्याला अटक करीत असे. आणि एखाद्या मदांध मनुष्याच्या डोळ्यावरील धुराप्रमाणें कांहीं वेळानें त्या नाल्याचें पाणी उतरून गेलें, म्हणजे मग ते प्रवासी आपली वाट पुढें चालूं लागत असत. पाऊस आला कीं, एखाद्या झाडाखालीं किंवा एखाद्या घराच्या वळचणीला किंवा गांवच्या एखाद्या देवळांत थोडा वेळ थांबावें, आणि पाऊस थांबला म्हणजे फिरून वाट चालूं लागावें आणि आपले भिजलेले कपडे चालतां चालतां वाटेच्या वाऱ्यानें वाळवावे, असा त्यांचा क्रम चालला होता. अशा रीतीनें प्रवास करतां करतां श्रावणाचा बहुतेक महिना अगदीं संपत संपत आला. पावसाचा जोरही थोडा कमी होत चालला होता; आणि वनश्रीच्या शोभेचा रंगही बराच पालटत चालला होता. पावसाच्या पहिल्या पहिल्या वर्षावांनीं रानांतील जीं झाडें नुसतींच एकजात हिरव्या रंगाचीं बनलेलीं होतीं, त्यांच्या रंगामध्यें थोडथोडा फरक पडून त्याच झाडांवर निरनिराळ्या रंगांचीं फुलें जिकडे तिकडे फुलूं लागलेलीं दिसत होतीं. पावसाची झड सुरू असतांना माणसांप्रमाणेंच जे पक्षी आपल्या घरट्यांत इतके दिवस बसून होते तेही आतां पावसाचा जोर थोडा थोडा कमी होऊं लागल्यामुळें बाहेर पडूं लागले होते, व तेही आपल्या पंखांमध्यें नवीन सतेजपणा झळकणाऱ्या चित्रविचित्र रंगांनीं त्या वनप्रदेशांतील

मोहकपणामध्यें भर घालण्याला मदत करूं लागले होते. झाडांच्या ढोलींतील आपल्या घरट्यांतून निघून झाडांच्या अग्रभागींच्या खांद्यांवरून यावेळीं जे पक्षी येऊन बसूं लागले होते, त्यांपैकीं हिरव्या किंवा काळसर रंगाचे जे पक्षी होते, त्यांचा आणि झाडांच्या पानांचा रंग एकसारखाच असल्यामुळें झाडाचीं पानें कोणतीं आणि पक्षी कोणते हें दुरून कांहीं एक समजण्यासारखें नव्हतें. पण कोठें कांहीं आवाज होऊन दचकून ते पक्षी तेथून उडून गेले, म्हणजे येथें पक्षी बसलेले होते, असें पाहणारांच्या पाठीमागून लक्षांत येत असे; पण अनेक चित्रविचित्र रंगांच्या पंखांचे पक्षी जेव्हां झाडांच्या शेंड्यांवर जाऊन बसत आणि एका झाडावरून दुसऱ्या झाडाकडे उडून जात, त्यावेळीं हीं देखील अनेक चित्रविचित्र रंगांचीं नवीन कांहीं विलक्षण फुलेंच या झाडांवर फुललीं आहेत कीं काय, आणि तीं वाऱ्यानें उडून इकडे तिकडे जात आहेत कीं काय, असा भास होई. अशा रीतीनें खऱ्या आणि आभासमय अशा दोन्ही प्रकारच्या फुलांनीं फुलून गेलेल्या त्या विंध्याचलांतील अरण्याची शोभा फारच मनोवेधक दिसत होती. अरण्यांतून एकदां एक जातीचीं झाडें लागलीं म्हणजे त्यांच्या आसपास बहुतेक तींच झाडें उगवलेलीं असतात. तशा रीतीनें एखाद्या ठिकाणीं पारिजातकाचीं झाडें तर जिकडे तिकडे पारिजातकाचींच झाडें लागलेलीं दिसत. या पारिजातकाचीं फुलें किती मोहक आणि त्यांचा वास किती मधुर असतो, हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. या पारिजातकाच्या असंख्य फुलांनीं झांकलेले भूपृष्ठभाग आणि त्या फुलांच्या परिमळानें भरलेले दिक्प्रांत यांनीं तेथील वनश्रीचें सौंदर्य आणि माधुर्य यांचा अतिरेक करून टाकला होता. हें पारिजातकाचें फूल खरोखरच भगवान् श्रीकृष्णांनीं स्वर्गलोकांतून पृथ्वीतलावर आणलेलें असो वा नसो, पण या फुलाचा मोहकपणा इतक्या पराकाष्ठेचा आहे कीं, इतकें दिव्य फूल या मर्त्यलोकीं असणें शक्य नसून तें स्वर्गांतूनच पृथ्वीतलावर आलेलें असलें पाहिजे, अशी त्याबद्दलची कल्पना प्रथमतः कोणाच्या मनांत आली असली, तर ती बिलकूल अस्थानीं नाहीं. इतकेंच नव्हे, पण इंद्राच्या नंदनवनांत कोणकोणतीं फुलझाडें आहेत, हें आपल्याला येथें नक्की माहीत नाहीं हें खरें; पण जर हें पारिजातकाचें पुष्प मूळचें तेथें नसेल, तर हें येथून नेऊनही तेथील सर्व फुलांमध्यें याला मूर्धाभिषिक्त करण्याइतकें माधुर्य याच्या अंगामध्यें आहे, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. अशा प्रकारच्या अनेक फुलांनीं तें अरण्य त्या वेळीं अत्यंत शोभिवंत दिसत होतें.

अशा त्या अरण्यांतून प्रवास करीत असतां गंगाबाईच्या मनांत एक कल्पना आली. गंगाबाईवर कोसळलेल्या अनेक संकटांमुळें तिची मुद्रा जरी निस्तेज दिसत होती तरी तिचें वय फार नव्हतें; फार काय, तिचें लग्न होऊन अजून पांच वर्षें देखील पुरीं झालीं नव्हतीं व तिच्या पांच वर्षांच्या मंगळागौरीही अजून पुऱ्या व्हावयाच्या होत्या. श्रावणाचा महिना बहुतेक संपत आला होता; तेव्हां या वर्षाच्या बाकीच्या मंगळागौरी अंतरल्या असल्या, तरी या अरण्यांत जीं मिळतील तीं पूजाद्रव्यें घेऊन आपण शेवटची एक तरी मंगळागौर पुजावी, असा विचार तिच्या मनांत आला. गंगाबाई स्वभावानें फार धर्मनिष्ठ व कर्मनिष्ठ होती. ती संकटांत असतांही स्त्रियांचे कोणतेही नेमधर्म चुकवीत नसे. जेष्ठांत वटसावित्रीच्या व्रताचे दिवस आले, तेव्हां तिनें तीन दिवस कडकडीत उपोषण करून वटसावित्रीचें व्रत केलें. त्यावेळीं सावित्रीची गोष्ट आणि आपली स्थिति यांच्यामधील साम्य क्षणोक्षणीं तिच्या डोळ्यांपुढें दिसूं लागे आणि तिच्या तोंडून पुढीलप्रमाणें उद्गार निघतः—" सावित्रीवर जसा प्रसंग पूर्वी आला होता, तसाच हल्लीं माझ्यावर आला आहे ! पण देवा, सावित्रीचा पति तूं तिला परत दिलास, आणि या अनाथ अबलेवरच तूं इतका रुष्ट कां झाला आहेस ? सावित्रीच्या आंगचे बाकीचे गुण माझ्या अंगांत असोत किंवा नसोत, पण पातिव्रत्य आणि पतिप्रेम यांच्या बाबतींत मी तिच्याइतकीच पवित्र आहे, हें, देवा, तूं अंतर्साक्ष आहेस, तुला माहीत आहे. मग तूं असा पक्षपात कां करतोस ? हें पुण्यशील सावित्री ! ज्या स्त्रिया हें वटसावित्रीचें व्रत करतील, त्यांना त्यांचा गेलेला पति परत मिळेल, असा तुझा आशीर्वाद आहे ना ? मग माझेंच भाग्य कां उघडत नाहीं ? आई जगदंबे, तुला आपल्या या मुलीची दया कशी येत नाहीं ? हे महाकाली, महालक्ष्मी विंध्यवासिनी अंबे, मी तुला सोन्याचा पुरुष करून वाहीन, पण माझा पति मला परत मिळूं दे ! " अशी तिनें त्यावेळीं अनेक देवतांची करुणा भाकली होती. आपण देवतांचें पूजन-अर्चन मनोभावानें केलें असतां त्या देवता आपणांवर केव्हां तरी सुप्रसन्न होतील, आणि आपलें कल्याण करतील, अशी तिची दृढ श्रद्धा होती. या श्रद्धेनें प्रेरित होऊन तिनें या वेळीं त्या अरण्यांत निदान शेवटची एक तरी मंगळागौर पुजण्याचा निश्चय केला. व त्याप्रमाणें श्रावणाच्या शेवटच्या मंगळवारीं तिनें मंगळागौरीची पूजा केली.

मंगळवारच्या आदल्या दिवशींच गंगाबाई व गणपतीभय्या यांनीं आपला प्रवास दोन दिवस थांबविण्याचें ठरवून त्या अरण्यांतील एका रमणीय ठिकाणीं त्यांनीं मुक्काम केला. गणपतीभय्या गंगाबाईपाशीं भावाच्या नात्यानें वागत असे. त्यानें आपल्या बहिणीची इच्छा मंगळागौर पुजण्याची आहे, असें जाणून तिची रानांत जितकी शक्य होती तितकी सर्व तयारी करून दिली. डोंगरांतील एका स्वच्छ ओढ्याच्या कांठीं एका मोठया वृक्षाच्या छायेखालीं त्यांनीं आपलें बिऱ्हाड लाविलें होतें. मंगळवारीं सकाळीं त्या ओढ्याच्या कांठीं गंगाबाई थंड पाण्यानेंच आपल्या केंसांवरून नहाली; व नंतर आपल्या मंगळागौरकिरितां रानांतील आसपासच्या झाडांवर फुललेलीं फुलें गोळा करण्याकरितां आणि जी कांहीं पत्री मिळेल ती आणण्याकरितां गंगाबाई फिरूं लागली. यावेळीं आपली मंगळागौर अशा रीतीनें पुजण्याची आपल्यावर वेळ आली आहे हें पाहून गंगाबाईला अतिशय वाईट वाटलें. गंगाबाई झांशीस आपल्या वाड्यांत असतांना त्यांची मंगळागौर फारच मोठया थाटानें होत असे. नहाण्याच्या वेळीं किती तरी उटणीं, अत्तरें आणि वासाचीं तेलें असावयाचीं! व त्यांना न्हाऊं घालावयाच्या वेळीं किती तरी कुळंबिणी त्यांच्या तैनातींत हजर असावयाच्या! पण या वेळीं येथें काय होतें? त्यांच्या केंसांना किती तरी महिन्यांत तेलाचा स्पर्श नव्हता! आणि गंगाबाईनें त्या नदीच्या गार पाण्यांत बुचकळी मारल्यावर तिचे केस कोरडे करावयाला सुद्धां तिच्यापाशीं वस्त्र नव्हतें. घरीं असतांना निरनिराळ्या प्रकारच्या चोळ्या, शालू, पैठण्या, पातळें हीं गंगाबाईच्या हौसेसाठीं किती घेतलेलीं होतीं याची गणतीच नव्हती. पण येथें ठिगळें लावलेल्या एकदोन वस्त्रांशिवाय गंगाबाईपाशीं कांहीं एक नव्हतें. झांशीच्या वाड्यांत गंगाबाईची मंगळागौर असली म्हणजे भय्यासाहेबांच्या निरनिराळ्या बागांतून त्यांचे माळी पत्री आणि फुलें यांच्या टोपल्याच्या टोपल्या भरून पूजेसाठीं आणून ठेवीत असत. पण येथें काय? येथें रानांत गंगाबाई कांट्याकुट्यांतून आणि दगडा-धोंडयांतून स्वतः फिरून फुलें गोळा करीत होती व एकीकडे मंगळागौरीच्या आरतीचें गाणें ती तोंडानें म्हणत होती. त्या गाण्यांतील

**आणा रे माळ्यांनो जाई-जुईच्या कळ्या।**
**सोळा त्रिकुटी सोळा दुरवा॥ सोळा परीची पत्री॥**
**जाईजुई आवई शेवंती नागचांफा॥**

हा भाग गंगाबाई एकीकडे गुणगुणत होती आणि एकीकडे स्वतः फुलें वेंचीत होती. त्या वेळीं ' आणा रे माळ्यांनो जाई-जुईच्या कळ्या ' हे शब्द गंगाबाईनें उच्चारावे, पण ती गंगाबाईची आज्ञा मान्य करण्याला कोणीही माळ्यानें जवळ नसावें, आणि तिचीं तिलाच फुलें गोळा करावीं लागावीं हें लक्षांत आणून गंगाबाईच्या मनाला काय वाटत असलें पाहिजे याची कल्पना करणेंही कठीण आहे ! झांशीच्या वाड्यांत मंगळागौरीच्या दिवशीं गंगाबाईच्या शेंकडो मैत्रिणी गंगाबाई-भोंवतीं जमा व्हावयाच्या आणि गंगाबाई मंगळागौरीच्या पूजेला बसली असतां सोन्या-चांदीचीं भांडीं आणि पूजेचीं उपकरणीं यांची गर्दी उडून जावयाची आणि मंगळागौरीच्या आरतींत

**सोनियाच्या ताटीं ॥ रत्नाचे दिवे ॥**
**माणिकांच्या वाती ॥ ओवाळूं मोतीं ज्योती ॥**

या चरणांत म्हटल्याप्रमाणें खरोखर सोन्याच्या तबकांत ठेवलेल्या रत्नांच्या दिव्यांनीं आणि मोतीं-माणकें लावलेल्या नीरांजनांनीं गंगाबाई आपल्या मंगळा-गौरीला आरती ओवाळीत असे. पण तें सगळें वैभव जाऊन गंगाबाईवर आज हा वनवासाचा प्रसंग आला होता ! पण त्या वनवासांतही ती एक प्रकारच्या दुःखाच्या आनंदांतच होती ! ती तोंडानें मंगळागौरीची आरती गात रानांत फिरत होती आणि तिच्या डोळ्यांतून टिपें गळत असतां ती जमिनीवरचीं फुलें आपल्या पदरांत वेंचून घेत होती. कोठें कांहीं खाण्यासारखीं जीं फळें दिसलीं, तींही गंगाबाईनें मंगळागौरीच्या नैवेद्याकरितां तोडून घेतलीं. अशी सामग्री जमवून गंगाबाई आपल्या नदीकांठच्या झाडाजवळ परत आली. गणपतीभय्यानेंही तेवढ्या वेळांत कांहीं फुलें गोळा करून आणलीं होतीं. मग गंगाबाईनें जवळच एक सपाट दगड पाहून त्याची चौरंगाच्या जागीं योजना केली. त्याच्या भोंवतालचें गवत उपटून काढून तिनें ती जागा स्वच्छ केली, आणि वनगाईचें शेण आणून तेथें सडा-संमार्जन केलें. नंतर त्या ओढ्याच्या कांठची थोडीशी पांढरी शुभ्र वाळू आणून त्या दगडी चौरंगाच्या भोंवती तिनें त्या पांढऱ्या वाळूची रांगोळी काढली. मग त्या नदीच्या प्रवाहांतील पांच स्वच्छ खडे आणून तिनें त्या दगडी चौरंगावर देवीच्या पंचायतनाची अत्यंत मनोभावानें स्थापना केली. आपल्या पूर्व वैभवाच्या आणि हल्लींच्या विपत्तीच्या स्मरणामुळें डोळ्यांतून टपटप वाहणाऱ्या अश्रूंच्या धारांनीं

तिनें आपल्या त्या मंगळागौरीला अर्घ्य दिले आणि स्नानही घातलें. नंतर झाडांच्या सालीचीं वल्कलें आणि पानें हीं तिनें वस्त्रासाठीं समर्पण केलीं. रानांतल्याच एका झाडाची ओली खांदी उगाळून तिनें गंध तयार करून ठेवलें होतें, तें तिनें समर्पण केलें; आणि त्या तेथील डोंगरांतलिच कांहीं गैरिक धातूंचें चूर्ण करून 'आई मंगळागौरी, हेंच हळदी-कुंकू म्हणून मानून घे!' असें म्हणून तिनें तें चूर्ण देवीच्या अंगाला लावलें. नंतर फुलें आणि पत्री समर्पण करण्यांत आली. देवीचें एक एक नांव घ्यावें आणि मनांत एक एक वासना तृप्त करण्याची प्रार्थना करून फुलें वहावीं, असा क्रम किती तरी वेळ चालला होता. रानांतील वाळलेल्या काटक्या तिनें ज्या जमविल्या होत्या, त्याच्या काडवाती तिनें लावल्या व वन्यफळांचा नैवेद्य दाखविण्यांत आला. गंगाबाईनें नंतर प्रदक्षिणा घातली आणि आपली कुलस्वामिनी देवी विंध्यवासिनी हिचें स्मरण करून नाक घांसून तिनें नमस्कार केला; व अखेरीस जिच्या हातांत आरतीच्या वेळीं सोन्याच्या ताटांत रत्नखचित दिवे असावयाचे, तिनें त्या रानांतल्या काडवाती हातांत घेऊन आपल्या देवीची आरती म्हटली! ती अशीः—

**ओवाळूं आरती ॥ आरती मंगळागौरी ॥ वससि काशिया पुरीं ॥ तुझी माय भक्ती करी ॥ ओवाळूं० ॥ ध्रु० ॥ न्हाऊनी माखुनी ॥ मौनी बसली ॥ नाना परीचे अलंकार ल्याइली ॥ पाटावाच्या चोळ्या ॥ खिरदुक नेसली ॥ आरती मंगळागौरी ॥ १ ॥**

**अमडुम डुमडुम वाजंत्री वाजती ॥ कवळाई कांकण गवराई शोभती ॥ कानीं कापाचे गाभे ॥ अंबा ल्याईली साजे ॥ देऊळ सोनियाचें ॥ आंत मूर्त बरवी ॥ आरती मंगळागौरी ॥ २ ॥**

**आणा रे माळ्यांनों ॥ जाईजुईच्या कळ्या ॥ सोळा त्रिकुटी सोळा दुरवा ॥ सोळा परीची पत्री ॥ जाईजुई आबई शेवंती नागचाफा ॥ पुजेजवळी आणती ॥ आरती मंगळागौरी ॥ ३ ॥**

**चांदीच्या ताटांत ॥ गवराईला नैवेद्य ॥ खाजीये करंजी ॥ घृत लाडू मोदक ॥ साखरेचा पाक ॥ विस्तारिलीं ताटें ॥ आरती मंगळागौरी ॥ ४ ॥**

**सोनियाचे तार्टी रतनाचे दिवे ॥ माणिकांच्या वाती ॥ ओंवाळूं मोती ज्योतीं ॥ भावें करूं आरती ॥ आरती मंगळागौरी ॥ ५ ॥**

**साळीचे तांदुळ ॥ मुगाच्या डाळी ॥ आळण खिचडी ॥ रांधिती नारी ॥ आपुल्या पतीकारणें ॥ सेवा करिते भारी ॥ आरती मंगळा-गौरी ॥ ६ ॥**

गंगाबाई ही आरती इतक्या प्रेमळपणानें आणि इतक्या करुणस्वरानें म्हणत होती कीं, तिच्या दुःखाने दुःखित झालेल्या त्या शेजारच्या नदीच्या पाण्याची खळखळ क्षणभर स्तब्ध झाली! नदीच्या कांठीं पाणी पिण्याकरितां आलेलीं तृषाक्रांत हरिणें क्षणभर पाणी पिण्याचें सोडून जिकडून हा करुणरसाचा आलाप येत होता तिकडे पहात कान टवकारून तटस्थ उभीं राहिलीं! आसपासच्या झाडांवर बसून एकसारखीं चिंवचिंव करणारीं आणि इकडून तिकडे उडणारीं चंचल पांखरें हे गंगाबाईचे करुणविलाप ऐकण्याकरितां क्षणभर शांत झालीं आणि इकडून तिकडे उडण्याचेंही तीं किती तरी वेळ विसरून गेलीं. तेथील लतांवरून आपल्या डेखांपासून शिथिल झालेलीं फुलें जीं टपटप खालीं पडत होतीं, ते गंगा-बाईच्या दुःखानें विव्हल झालेल्या त्या लतांच्या डोळ्यांतून अश्रुच गळत आहेत कीं काय, असा भास होई! आणि त्या अरण्यांतील मंदवायूच्या निस्वनाच्या स्वरूपानें तेथील वनदेवता गंगाबाईच्या संकटासाठीं दुःखाचे सुस्कारेच टाकीत आहेत कीं काय असें वाटूं लागे!

गंगाबाईच्या आरतीचा त्या अरण्यांत त्या वेळीं इतका विलक्षण परिणाम झाला! तें सर्व वातावरण गंगाबाईनें आपल्या करुणरसानें कोंदाटून टाकलें. तीव्र स्वरूपा-च्या मानवी मनोभावनांचा त्यांच्या सभोंवतालच्या स्थिर जंगमांवर आणि जड-चेतनांवर असा परिणाम होतो, यांत संशय नाहीं. कारण मानवी अन्तःकरणामध्यें जें चैतन्य उचंबळून येतें, तेंच सर्वत्र जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं, आब्रह्मस्तंब-पर्यंत पसरलेलें असल्यामुळें परिणामाचें ऐक्य हें अगदीं अपरिहार्यच आहे. शिवाय वरील आरतींतिल प्रेमळपणाही फार अद्भुत आहे. करुणरस आणि भक्तिरस यांच्या संमेलनानें त्यांतील वात्सल्याचा इतका कांहीं पराकाष्ठेचा परिपाक झालेला आहे कीं, त्यांतील शब्द कानांत शिरले कीं, डोळ्यांतून प्रेमाचे अश्रु बाहेर पडलेच पाहिजेत! वास्तविक विचिकित्सक बुद्धीनें पाहिलें, तर त्या गाण्यांतील शब्दांत

काय विशेष आहे! पण खरें काव्य हें कोणत्याही शब्दांमध्यें राहात नसून त्याच्या उत्पत्तीची खरी जागा मनुष्याचें अन्तःकरण ही आहे. हें गाणें कोणी तरी एखाद्या साध्याभोळ्या बाईनें रचलेलें असेल. तिला कवीच्या लक्षणाप्रमाणें कांहीं कवि असें म्हणतां येणार नाहीं. त्यांत किती तरी अशुद्ध शब्द असतील आणि व्याकरणाचें किती तरी नियम मोडले गेलेले असतील; तरी पण रसात्मक काव्याचें तें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. पतीच्या भक्तीनें आणि पवित्र अन्तःकरणानें आजपर्यंतच्या असंख्य पतिव्रतांनीं मंगळागौरीच्या समक्ष हें गाणें म्हणून आपल्यांतील सत्त्व-गुणांच्या समुच्चयानें या गाण्यामध्यें इतका पुण्यसंचय एकत्र सांठवून ठेवलेला आहे कीं, त्यांतील प्रत्येक शब्द ऐकला म्हणजे अंगावर रोमांच उभे राहतात आणि डोळ्यांतून अश्रु वाहूं लागतात!

अशा प्रकारची ही आरती म्हणून गंगाबाईनें मंगळागौरीची पूजा आटोपली आणि तिच्यापुढें नाक घांसून 'माझा पति मला लवकर भेटूं दे' अशी प्रार्थना केली. देवीपुढें नाक घांसून प्रार्थना करण्याकरितां बराच वेळ खालीं घातलेली मान तिनें वर उचलून पाहिलें, तों कोणी एक उजवा हात मोडलेला मनुष्य आपला डावा हात आपल्या कपाळाला लावून आणि आपली मान वांकवून आपल्या देवीला दुरून नमस्कार करून कांहीं तरी प्रार्थना करीत आहे, असें तिला दिसलें. इतक्यांतच गणपतीभय्यानेंही त्या इसमाला पाहिलें. व त्याच्याजवळ जाऊन तो कोण आहे, याबद्दल तो चौकशी करूं लागला. तेव्हां गणपतीभय्याच्या प्रश्नांना उत्तरें देत देत तो इसम गणपतीभय्याच्याबरोबर गंगाबाई जेथें पूजा करीत बसली होती, त्या जागेच्या जवळ आला. गंगाबाई आणि गणपतीभय्या यांनीं या इसमाला आतां नुकतेंच पाहिलें होतें. पण तो तेथें बराच वेळ एका झाडाच्या आड येऊन उभा राहिला होता. आणि गंगाबाईची पूजा पाहून त्याच्या मनावर फार विलक्षण परिणाम झाला होता. त्या पूजास्थानाच्या जवळ जाऊन आपण देवीचें दर्शन घ्यावें, अशी त्याच्या मनामध्यें फार उत्कृष्ट इच्छा उत्पन्न झालेली होती. म्हणून गणपतीभय्या आपल्याजवळ येऊन आपली चौकशी करीत आहे, या अनायासानें प्राप्त झालेल्या संधीचा फायदा घेऊन तो पूजास्थानाजवळ आला, व त्यानें आधीं एका हातावर आपला तोल सांवरून देवीपुढें अनेक वेळां नाक घांसलें. तो असें करीत असतांना 'हा कोण आहे?' म्हणून गंगाबाईनें गणपतीभय्याला विचारलें. इतक्यांत आपले कान धरून नाक घांसण्याचें झाल्यावर मान वर उचलून त्यानें

गंगाबाईच्या पुढेंही तसेंच नाक घासून तिला भक्तिभावानें नमस्कार केला, व मग डोकें वर उचलून तो गंगाबाईला उद्देशून म्हणालाः—" माझ्या आईसाहेब, मी कोण आहे, हें मीच आपल्याला सांगतों. पण आपण कोण आहां हें मला कोण सांगेल? मी आपल्या मंगल गायनाचा ध्वनि दुरून ऐकला, आणि हा इतका गोड आणि प्रेमळ आवाज कोठून येत आहे तें पहावें अशी मला इच्छा झाली आणि मी इकडे आलों. या वनांत वनदेवता आहेत आणि त्या कोठल्या तरी निर्जन ठिकाणीं एखादे वेळीं अतिशय गोड असें गायन करीत बसतात, असें मा पुष्कळ वेळां ऐकलें होतें; पण तें प्रत्यक्ष पाहण्याचा योग हा आजच मला आला आहे. माझ्या आईसाहेब, मी येथें येऊन दुरून त्या झाडाच्या आडून पाहिलें, तों तुम्ही या देवतेची पूजा करून तिच्यासमोर प्रेमळ सुरानें गाणीं म्हणत बसलां आहां असें मला दिसलें. तो आपला भक्तिभाव पाहून माझ्या मनाला अतिशय पश्चात्ताप झाला. तुम्ही या ठिकाणीं आपल्या भक्तिरसानें उत्पन्न केलेल्या या पवित्र वातावरणामध्यें मी आल्याबरोबर, काय असेल तें असो, माझ्या चित्तवृत्तींत एकदम किती तरी पालट पडला! तुम्ही किती पुण्यवान, आणि मी किती पापी! तुमची ही पूजा पहात असतांना माझ्या मनांत असें आलें कीं, आपणही अशीच देवाची पूजा करावी! तुमची पूजा पहात असतांना आणि तुम्ही भक्तिरसानें या देवतेला आळवीत असतांना माझ्या मनांत किती कालवाकालव चालली होती? आणि माझ्या डोळ्यांतून किती अश्रु वाहिले, हें मी काय सांगूं! तुमच्यासारखी आपणही या देवतेची पूजा करावी, असें माझ्या मनांत या थोडक्याशा अवकाशांत शंभर वेळां येऊन गेलें! पण आईसाहेब, मला देवाची भीति वाटते! मी देवापुढें कोणत्या तोंडानें उभा राहूं? आणि मी देवापुढें उभा राहिलों, तर देव मला काय म्हणेल? मला वाटतें, देवानें मला पाहिल्याबरोबर आधीं पहिल्यानें तो माझी मुंडी मुरगळून टाकील!"

"अरे बाबा, छे छे छे!" गंगाबाई म्हणाल्या, "त्या परमकारुणिक भगवान् परमेश्वराच्या संबंधानें तूं हें काय बोलत आहेस? तो सगळ्यांवर सारखी कृपा करतो. अनन्यभावानें जो त्याच्यापुढें नाक घाशील, त्याच्यावर परमेश्वर कृपा केल्यावांचून कधींही राहणार नाहीं. जो या सर्व विश्वाला जीवन देणारा परम कृपाळु

भगवान् तो तुला पाहिल्याबरोबर तुझी मुंडी मुरगळून टाकील, असें भलतेंच तुला वाटतें तरी कसें ?"

"आईसाहेब," तो इसम म्हणाला, "तुम्हांला माहीत नाहीं. तुमच्यासारख्यांच्या पवित्र अंतःकरणानें आमच्यासारख्या अधम लोकांच्या पापी कृत्यांची कल्पना येणें शक्य नाहीं. तुमच्यासारख्या पुण्यवान माणसांना देव कनवाळू दिसतो, हें बरोबर आहे. पण मला देव कसा दिसत असतो, आणि मला त्याची भीति कां वाटत असते, हें तुम्हांला कसें कळणार ? मी निजलों असलों, तर यमाचे दूत माझ्या छातीवर बसून आपल्या लाल इंगळासारख्या तापलेल्या सांडसांनीं माझें काळीज बाहेर काढीत आहेत, अशीं मला दररोज स्वप्नें पडतात. आणि दिवसाढवळ्या देखील डोळ्यांतून लाल आगीच्या ज्वाळा फेकणारे असे कोणी तरी लोक माझ्या पाठीमागून येऊन माझी गर्दन छाटण्याकरितां टपलेले आहेत, असा मला नेहमीं भास होतो ! अशा रीतीनें माझ्या दुष्कृत्यांबद्दल माझ्यावर रागावलेला देव माझ्यावर कृपा कोठून करणार ? आईसाहेब, मी किती पातकी आहें, याची तुम्हांला कल्पना नाहीं ! मी चोर आहें, दरवडेखोर आहें,—"

मी चोर आहें, मी दरवडेखोर आहें, इतके त्याच्या तोंडचे शब्द ऐकल्याबरोबर त्याला पुढें बोलूं न देतां मध्येंच थांबवून गणपतीभय्या त्याला मोठ्या आश्चर्यानें व आनंदानें म्हणाला, "काय ? तूं चोर आहेस ? आणि दरवडेखोर आहेस ?"

पश्चात्तापाच्या भरांत आपण चोर असल्याबद्दलची एकदम कबुली देण्यांत केलेल्या चुकीबद्दल त्या चोराला पश्चात्ताप आणि भीति वाटूं लागली असतां त्याला धीर देऊन गंगाबाई म्हणाली, "काय तूं चोर आणि दरवडेखोर आहेस ? पण तूं चोर आणि दरवडेखोर असलास, म्हणून त्यांत काय मोठेंसें आहे ? तुझीं पातकें क्षालन करून तुला पावन करणें हें सर्वशक्तिमान् आणि परमकारुणिक अशा त्या परमेश्वराला मोठें अवघड जाईल, असें का तुला वाटतें ? अरे वेड्या, देवाच्या करुणसागराला हा तुझा कलंक धुऊन टाकण्यांत कसला भार आहे ? ज्यानें आपल्या अन्यायाच्या खड्यांनीं सात रांजण भरून ठेविले होते, त्या वाल्या कोळ्यालादेखील ज्या भगवंतानें उद्धरिलें, त्या भगवंताच्यापुढें तुझ्या पातकांचा काय मोठासा पाड आहे ?"

हा चोर आहे, असें ऐकल्यापासून गणपतीभय्याच्या मनामध्यें निराळ्याच विचारांना सुरुवात झाली होती. व याच्यापासून आपल्याला जरूर ती माहिती मिळाली तर पहावी, म्हणून त्यानें बोलण्याचा निराळाच ओघ सुरू केला. तो म्हणाला, " अरे, असें पश्चात्तापाचें ढोंग करून, आमच्यासारख्या प्रवाशांच्या पाठीस लागून आणि पाळत राखून त्यांचे गळे दाबणारे ठग मला पुष्कळ ठाऊक आहेत. त्यांतलाच तूं एक असला पाहिजेस."

" मी त्यांतलाच एक ठग आहे, हें खरें. " त्या चोरानें मोकळ्या मनानें कबूल केलें. " किंवा इतके दिवस मी त्यांपैकीं एक ठग होतों! पण याच्यापुढें मात्र मला तसें राहण्याची बिलकूल इच्छा नाहीं. महाराज, आईसाहेब, मी तुमच्या पाळतीवर कशाला राहूं? तुमच्या अंगावरचीं हीं फाटकीं वस्त्रें आणि तुमचा हा वनवास या गोष्टी तुमचें दारिद्र्य उघडें करून दाखवीत आहेत. अशा तुमच्यासारख्या भिकाऱ्यांच्या पाळतीवर कोणता शहाणा चोर राहणार आहे! पण माझ्या आईसाहेब, मी या तुमच्या देवतेची आणि तुमच्या स्वतःच्या पायांची शपथ वाहून सांगतों कीं, तुमच्यापाशीं या फाटक्या चिंध्यांमध्यें बांधलेले लाखो रुपये असले, तरीही त्यांतल्या एका कवडीलासुद्धां याच्यापुढें मी शिवणार नाहीं! तुमची ही पूजा आणि तुमचें तें देवाला आळवणें पाहून माझ्या मनांत इतका बदल झाला आहे कीं, ह्यापुढें प्राण गेला तरी मी कधीं हें ठगबाजीचें काम करणार नाहीं. ज्या दोन हातांनीं इतके दिवस हें ठकबाजीचें पातक मीं केलें, त्यांपैकीं प्रत्येक पातकाच्या वेळीं पुढें सरसावणारा हा माझा उजवा हात मोडून त्याच्या कर्माचें त्याला योग्य प्रायश्चित्त मिळालें असतां अजून माझे डोळे उघडूं नयेत, असें तुम्हांला वाटतें? माझा एकच हात मोडला, याबद्दल मला वाईट वाटत आहे! आणि माझे दोन्हीही हात त्यानें मोडले असते, तरी माझ्या आजपर्यंतच्या अपराधाच्या मानानें मला ती शिक्षा थोडीच झाली असती!"

" अयाई!" मोठ्या कळवळ्यानें गंगाबाईनें विचारलें, " बाबा, कुणीं चांडाळानें तुझा हात मोडला?"

" आईसाहेब," आपल्या डाव्या हातानें निषेधाच्या खुणा करीत करीत त्या ठगानें उत्तर दिलें, " नका, नका, आईसाहेब, त्या बिचाऱ्याला चांडाळ म्हणूं नका! चांडाळ मी आहें! ज्यानें आजपर्यंत शेंकडो लोकांच्या गळ्यांभोंवतीं त्यांच्या माना मुरगळण्याकरितां या हातांनीं एखाद्या गळफासाप्रमाणें आपला रुमाल टाकून

त्यांना ठार मारलें आणि त्यांची संपत्ति लुटली, तो मी चांडाळ आहे! अशा या माझ्यासारख्या चांडाळाचे दोन्हीही हात वास्तविक त्यानें मोडून टाकावयाला पाहिजे होते. त्यानें माझा एक हात कायम ठेवला, तो खरोखर सत्पुरुष असला पाहिजे! त्यानें कृपा करून कायम ठेवलेल्या या एका हातानेंच कां होईना मी देवाला सदोदित नमस्कार करून त्याच्यापुढें हा एकच उरलेला हात पसरून त्याच्यापाशीं करुणेची मी नेहमीं भीक मागत राहीन. हा हात मी यापुढें कोणत्याही चोरीच्या, दरवड्याच्या, ठगबाजीच्या किंवा खुनाच्या पापानें केव्हांही विटाळणार नाहीं!" हे उद्गार त्याच्या तोंडून निघत असतां पश्चात्तापानें विरघळून गेलेल्या अन्तःकरणापासून वर उचंबळून निघणाऱ्या अश्रूंनीं डबडबलेले त्याचे डोळे त्याच्या डाव्या हाताकडे गेले. त्या वेळीं त्या हाताकडे पहात पहात त्यानें पुढील-प्रमाणें अंगावर शहारे उत्पन्न करणारे उद्गार काढले! "अबब! आईसाहेब, किती हा माझा हात पातकी आहे! या माझ्या हातावर किती तरी लोकांच्या दाबलेल्या आणि कापलेल्या मानांतून उडालेल्या रक्ताच्या चिळकांडयांचे डाग पडलेले माझ्या डोळ्यांना या वेळीं दिसूं लागले आहेत! प्रत्येक वेळीं कोणताही खून केल्यानंतर मी आपला हात स्वच्छ धुऊन टाकीत असें! आणि तेव्हां मला प्रत्येक वेळीं असें वाटत असे कीं, झालें! आतां या खुनाचा कांहीं सुद्धां मागमूस राहिलेला नाही! पण आतां मी पाहतों, तों हें सगळे डाग माझ्या हातावर जसेच्या तसे कायम आहेत! कोण हा माझा हात घाणेरडा आणि भयंकर दिसत आहे! जसा जसा मी या हाताकडे पहात आहें तसें तसें मला वाटतें कीं, आजपर्यंत शेंकडों लोकांना मीं लुटलें आणि मारलें, त्यांचीं सगळीं नांवें सुद्धां कोणी तरी माझ्या हातावर लिहून ठेविलीं आहेत. हीं नांवें माझ्या हातावर कोणीं लिहिलीं आणि केव्हां लिहिलीं! मला वाटत होतें कीं, या रानामधून कोणाला लुटलें आणि मारलें, तरी येथें मला कोणी पहात नाहीं! पण माझ्या त्या गुप्त गुन्ह्यांचा हा सगळा लेखी पुरावा जर कोणीं माझ्या न कळत खुद्द माझ्याच हातावर लिहून ठेवला असला, तर आतां या अनंत अपराधांपासून माझी सुटका कसली होणार! आईसाहेब, देव कृपाळू झाला, म्हणून तो किती अपराधांची क्षमा करील? आईसाहेब, मला वाटतें, त्या सत्पुरुषानें माझा उजवा हात उखडून टाकला, त्यापेक्षां त्यानें माझी ही मानच उपटून टाकली असती, तर फार बरें झालें असतें! कारण मीच मेल्यावर हे विचार कोणाच्या मनांत आले असते!"

त्याच्या मनाची ही बेफाम स्थिति झालेली पाहून त्याचें शांतवन करण्याच्या हेतूनें गंगाबाई त्याला म्हणाल्या, " तूं असा घाबरून जाऊं नको. तुझीं कितीही पातकें असलीं, तरी तूं देवाला शरण जा, म्हणजे तो तुला तुझ्या सर्व पातकांपासून मुक्त करील ! तूं नेहमीं देवाचें नांव घेत जा आणि त्याचें नेहमीं स्मरण करीत जा, म्हणजे तुझ्या मनाची ही सगळी तळमळ हळूहळू नाहींशी होईल ! तुझ्या या पातकांची कथा काय ! अजामीळ किती तरी पातकी होता ! पण त्याच्या तोंडून चुकून एकदां देवाचें नांव आलें, तर त्याला भगवंतानें आपले दूत पाठवून वैकुंठामध्यें नेऊन बसविलें. त्या परमेश्वरानें अशा किती तरी दुष्ट लोकांना दुःखमुक्त केलें आहे ! तोच परमेश्वर तुलाही दुःखमुक्त करील ! मात्र तूं नेहमीं त्याचें स्मरण करीत जा ! "

" आईसाहेब, " तो ठग हात जोडून म्हणाला, " ज्या त्या सत्पुरुषानें माझा उजवा हात उखडून माझ्या भावी दुष्कृत्यांचें जणुं काय मूळच उपटून टाकलें, तो देखील त्या वेळीं मला म्हणाला कीं, अशा चोऱ्या करण्यापेक्षां तूं देवाचें नांव घेतलें असतेस, तर तें तुझ्या किती तरी उपयोगी पडलें असतें. त्या वेळीं तें त्याचें म्हणणें मी ऐकलें नाहीं; पण तोच उपदेश तुम्ही फिरून केल्यामुळें तो आतां माझ्या मनावर चांगला ठसला आहे ! " असें म्हणून पांडुरंगाचा एक परमभक्त हात तोडले असतांही आपल्या थोट्या हातांनींच टाळ्या वाजवून ज्याप्रमाणें पांडुरंगाचें भजन करीत होता, त्याप्रमाणें हा ठग आपल्या एका हातानेंच टाळी वाजवीत देवाचें नांव घेऊं लागला !

त्या ठगाचें हें वरील बोलणें ऐकून गंगाबाई आपल्या मनांत विचार करूं लागली कीं, तूं देवाचें नांव घेतलेंस तर तें तुझ्या उपयोगी पडेल, हा उपदेश याला कोणीं बरें केला असावा ? देवाच्या नामस्मरणानें देव आपल्यावरील सर्व संकटांचा परिहार करतो, हें आपल्या पतीचें एक दृढ तत्त्व होतें, याची तिला आठवण झाली ! आणि त्यांनींच तर याला त्या तत्त्वाचा उपदेश केला नसेल ना, असा एक कल्पनेचा किरण तिच्या अन्तःकरणाच्या क्षितिजावर एकदां ओझरता चमकून गेला ! पण लगेच तिनेंच कल्पनेचें निराकरण केलें. भगवंताचें नांव घेतलें असतां तो संकटविनाशन करणारा भगवान् सर्वांना दुःखसमुद्रांतून काढून पैलतीराला नेऊन पोंचवितो, हें तत्त्व इतकें विश्वव्यापक आणि इतकें सर्वतोमुखी आहे कीं, त्याचें प्रतिपादन कोणीही करूं शकेल; आणि त्यावरून तें अमुकच कोणी

एकानें केलें असेल, असें अनुमान काढलें, तर तें निश्चयात्मक होणार नाहीं, ही गोष्ट गंगाबाईच्या लक्षांत आली. तरी पण हा मनुष्य कोण, त्यानें या ठगाचा हात काय म्हणून उखडला आणि इतका हात उखडण्याचा निष्ठुरपणा करीत असतांही त्यानें याला हा भगवद्भक्तीचा उपकारक उपदेश कसा केला, असे अनेक प्रश्न गंगाबाईच्या मनांत उचंबळत होते. म्हणून तिनें व गणपतीभय्यानेंही विनंति केल्यावरून त्या ठगानें आपली थोडीशी हकीगत त्यांना सांगितली.

तो म्हणालाः—"आईसाहेब, येथून कांहीं अंतरावर या विंध्याचलाच्या डोंगरांत विंध्यवासिनीदेवीचें एक मोठें जागृत स्थान आहे. तेथें हल्लीं उत्तरपीठाच्या शंकराचार्यांची एक मोठी छावणी येऊन पडली आहे. त्या छावणींत कोणी एक तरुण संन्यासी आहे. त्याला कसेंही करून ठार मारण्याच्या कामावर माझी नेमणूक झाली!—आईसाहेब, तुम्ही मला ही हकीकत कशाला विचारतां? मला माझ्या या मागच्या पापाचा इतका तिटकारा आला आहे कीं, त्याच्याबद्दल एक अवाक्षरही तोंडांतून काढूं नये, असें मला वाटतें!" असें म्हणून तो आपले तोंड बंद करून आणि मान खालीं घालून मुकाट्यानें बसला.

पण त्या योगानें गंगाबाई आणि गणपतीभय्याची उत्सुकता जास्तच वाढून त्यांनीं त्याला आपली गोष्ट पुढें सांगण्याला फिरून आग्रह केला. एखाद्या गरीब बिचाऱ्या संन्याशाला या ठगांनीं उगीचच्या उगीच काय म्हणून मारण्याला उद्युक्त व्हावें, हेंही गंगाबाईला समजेना. म्हणून तिनें त्याबद्दलही प्रश्न केला. तेव्हां त्या बिचाऱ्याचा निरुपाय होऊन तो पुढें सांगूं लागला,

"आईसाहेब, आमच्या टोळीनें मागें एकदां या विंध्याचलाच्या डोंगरांत एका श्रीमंत इसमाला गांठून, त्याला लुटून आणि कैद करून आमच्या टोळीच्या मुक्कामावर नेऊन ठेविलें होतें. पण तेथून पुढें कांहीं दिवसांनीं तो पळून गेला. आमचा मुख्य ठावठिकाणा कोठें आहे, आम्ही चोरीचा माल कोठें ठेवतों, वगैरे आमच्यांतील सगळ्या गुप्त गोष्टी तो आमच्या छावणींत कांहीं दिवस राहत असल्यामुळें त्याला माहीत झालेल्या होत्या. असा मनुष्य पळून गेला आणि आमच्या सगळ्या गुप्त गोष्टी बाहेर फुटूं लागल्या, तर आमचा सर्वस्वी नाश होईल, म्हणून त्याला ठार मारण्यासाठीं आमच्या टोळीच्या नाइकानें प्रयत्न केला. व त्या प्रयत्नानें तो ठार झाला असला पाहिजे अशी आमच्या टोळीच्या नाईकाची खात्री झालीही होती. पण पुढें त्याला एकदां अशी बातमी लागली कीं, या उत्तरपीठाच्या

शंकराचार्यांच्या छावणीमध्यें कोणी एक तरुण संन्यासी आहे, तो त्या पळून गेलेल्या इसमाच्यासारखा अगदीं हुबेहुब दिसतो. तेव्हां एखादा संन्यासी फुकट मारला गेला तरी हरकत नाहीं, पण जर खरोखरच तो पळून गेलेला इसम असेल तर कांहींही उपाय योजून त्याला ठार मारलेंच पाहिजे, अशी खात्री वाटून आमच्या नायकानें त्या कामावर माझी नेमणूक केली. त्याप्रमाणें मी शंकराचार्यांच्या छावणींत गेलों व शंकराचार्यांच्या दर्शनाच्या निमित्तानें एक विंध्यवासिनीदेवीचा यात्रेकरू म्हणून रोज तेथें जाऊन त्या संन्याशावर मी रात्रंदिवस दुरून आणि लपून छपून टेहळणी ठेवूं लागलों. जो आमच्यांतून पळून गेलेला इसम, तोच हा संन्यासी असावा, अशी माझीही त्याच्या मला सांगितलेल्या खुणाखाणांवरून खात्री पटूं लागली. आणि म्हणून हा कोठें जातो, कोठें बसतो, कोणाशीं बोलतो, काय करतो, वगैरे त्याच्या सर्व हालचालींवर मी मोठ्या काळजीपूर्वक रीतीनें नजर ठेवूं लागलों. या टेहळणींत मला असेंही आढळून आलें कीं, या संन्याशापाशीं कांहीं तरी डबोलें आहे व तें तो कोठें दडवून ठेवतो हेंही कांहीं दिवसांच्या पाळतीनें मला आढळून आलें. तेव्हां या संन्याशाला मारून त्याचें डबोलें उपटून आपण येथून पळून जावें असा मीं दुहेरी निश्चय केला, व त्याप्रमाणें एके दिवशीं पहाटेस काळोखांतून तो संन्यासी गंगास्नानासाठीं गंगेच्या तीरावर गेला असतां त्याच्या गळ्याभोंवतीं आपला रुमाल टाकून त्याचा गळा दाबण्याचा मी बेत ठरविला. पण माझा तो बेत सपशेल फसला. तो माझ्यापेक्षां फार मजबूत असल्यामुळें मी त्याच्या गळ्याभोंवतीं रुमाल आवळणार इतक्यांत त्यानें माझ्या उजव्या हाताला धरून इतक्या जोरानें हिसडा मारला कीं, त्याबरोबर माझा तो हात उखडून पडला. "सकाळच्या रामपाऱ्यांत देवाचें नांव घेतलें असतेंस, तर तें तुझ्या कांहींतरी उपयोगी पडलें असतें; पण अशा पवित्र वेळीं तूं लोकांचे गळे दाबतोस, अशा तुला, अधमा, देहान्त प्रायश्चित्तच देवविलें पाहिजे." असें म्हणून तो फिरून माझ्या अंगावर धांवला. तेव्हां जीव बचावण्यासाठीं मी गंगेच्या घाटावरून देवीच्या देवळाकडे पळत सुटलों; व 'चोर, चोर' म्हणून तो संन्यासीही माझ्या मागें धांवूं लागला. पण मी मात्र आमच्या चोरांच्या नेहमीच्या युक्तीप्रमाणें फारसा धांवलोंच नाहीं. थोडा वेळ धांवून गंगेच्या दरडीच्या बाजूला एक खिंडार होतें, तेथील काळोखांत मी हळूच दडून बसलों व तेथून तो संन्यासी व बाकीचे पहाटेस गंगेवर स्नानाकरितां येणारे लोक हे सगळे 'चोर चोर' म्हणून ओरडत पुढें वेड्यां-

सारखे धांवत चाललेले मीं पाहिले. सगळ्या लोकांची गर्दी गंगेच्या तीरावरून देवीच्या देवळाकडे आणि गांवाकडे चोराला धरण्याकरितां गेलेली पाहून मी जरी त्या हाताच्या व्याधीनें व्याकुळ झालों होतों, तरी हळूहळू त्या खिंडारांतून उठून गंगेच्या कांठीं आलों, आणि गंगेचें पाणी न हालवितां हळूच गंगेंत उडी मारली व गंगेच्या वाहत्या प्रवाहावर विश्वास ठेवून मला लांब दूरवर वाहून नेण्याविषयीं मी गंगेला प्रार्थना केली. गंगा खरोखरच साधुलक्षणांनीं युक्त ! तिला चोर काय आणि साव काय, दोघेही सारखेच ! मी जरी चोर होतों, तरी तिनें माझ्या आई-सारखें माझें संगोपन केलें. माझें पाहिलें सगळें रक्त तिनें धुऊन काढलें आणि शरीरांतून नवीन नवीन वाहत येणारें रक्त तिनें एकसारखें धुऊन धुऊन बंद केलें. गंगेचा प्रवाह माझ्या शरीरनौकेला आपोआप खालीं वाहून नेतच होता. फक्त जरूर त्या प्रसंगीं माझ्या शरीरनौकेची गति बदलण्याकरितां मी आपल्या एका हाताचा वल्ह्यासारखा उपयोग मधून मधून करीत होतों. त्या योगानें कांहीं वेळानें मी किनाऱ्याला सुरक्षितपणें येऊन लागलों. गांवांत चोर शोधण्याकरितां सगळ्या लोकांची आरडाओरड चाललेली होती, अशा वेळीं मी आपला मुकाट्यानें एका बाजूनें जंगलांत शिरून एका झुडपांत साऱ्या दिवसभर स्वस्थ पडून राहिलों होतों. रात्र झाली तेव्हां तो संन्यासी आपलें डबोलें कोठें ठेवतो तें मला जें माहीत झालेलें होतें, त्या जागीं मी नेमका गेलों, आणि निदान एवढा तरी लाभ या मोहिमेंत झाला असें म्हणून तें डबोलें पाठीवर टाकून मी तेथून तडक आपल्या नायकाच्या छावणीकडे येण्याकरितां निघालों ! तिकडे ज्या चोराचा शोध चाललेला आहे, तो मात्र त्यांना अजून सांपडला किंवा नाहीं कोण जाणें ! पण मी तर तेव्हां इतका घाबरून गेलों होतों कीं, त्या डबोल्यामध्यें काय आहे हें सुद्धां अजून उघडून न पाहतां किंवा आपल्या पाठीकडे दृष्टी न फेकतां एकसारखा पुढें चालून तेथपर्यंत आलों. पण वाटेनें येतांना माझा हात उखडला गेल्यामुळें माझ्या शरीराला अतिशय क्लेश होत होते, व माझ्या मनालाही अतिशय पश्चात्ताप वाटण्याला सुरुवात झाली होती. तो पश्चात्ताप तुमच्या दर्शनानें, आईसाहेब, आज पक्का झाला आहे. आईसाहेब, मी तुमच्या पायाची आतांच शपथ वाहिली आहे, ती मी खरी करणार ! मी यापुढें चोरीच्या पैशाला केव्हांही शिवणार नाहीं ! म्हणून मी जें हें त्या संन्याशाचें डबोलें चोरून आणलें आहे, तें यापुढें माझ्या-जवळ नको ! म्हणून हें मी तुम्हांला देत आहें. तुम्ही या रानावनांतून प्रवास

करीत आहां, तुमच्याजवळ हें असूं द्या. तुम्हांला कधीं काळीं हें उपयोगाला येईल." असें म्हणून त्यानें तें गाठोडें गंगाबाईच्या पुढें ठेवलें.

पण गंगाबाईला ही गोष्ट मुळींच आवडली नाहीं. ती म्हणाली, "छे छे! बाबा, हें विष आम्हांला कशाला हवें! चोरीच्या मालाला मी कधींही शिवणार नाहीं. हें तूं आपलें गाठोडें माघारें घे!" असें म्हणून त्याला न शिवतां तिनें त्याला तें परत घेण्याविषयीं आपल्या हातानें खूण केली.

त्या वेळीं तो ठग म्हणाला, "आईसाहेब, तुम्ही म्हणतां कीं, तूं आपलें हें गाठोडें परत घे. पण माझें हें गाठोडें होतें कधीं? तें माझें मुळींच नाहीं."

"तसेंच तें माझेंहि पण मुळींच नाहीं!" गंगाबाई घाईघाईनें म्हणाली.

"तुमचें तें नसेल." त्या ठगानें उत्तर दिलें. "तरीहि पण तें तुमच्याजवळ असूं द्या. एखाद्या आड-अडचणीच्या वेळीं तें तुमच्या कामाला येईल. शिवाय तुम्ही असें पहा कीं, मी हें गाठोडें घेऊन कोठें जाऊं? मी आपल्या टोळीच्या नायकाकडे आतां परत जाणार नाहीं, हें अगदीं खास! मी हा ठगबाजीचा धंदा आजपासून सोडून दिला! तेव्हां आतां मी त्या चोरांच्या टोळींत फिरून जाऊं कशाला? आणि मी काम फत्ते केल्याशिवाय उलट आपला हात उखडून घेऊन आलेला पाहून ते सगळेजण माझी छी थू केल्यावांचून कधींहि राहणार नाहींत. म्हणून या कारणासाठींही मी आतां तिकडे जाणार नाहीं. म्हणून म्हणतों कीं, हें गाठोडें तुमच्याजवळ असूं द्या." असें म्हणून त्या ठगानें तें गाठोडें उचलून गणपतीभय्या याच्या हातांत बळेंच दिलें.

पण हा सगळा इतका लांबलचक प्रकार झाला, तरी त्यांत गंगाबाई आणि गणपतीभय्या यांना जी माहिती पाहिजे होती, ती त्यांना मुळींच मिळाली नाहीं. त्यांनीं त्या ठगाला निरनिराळ्या रीतीनें खोदखोदून प्रश्न विचारले व गंगाबाईच्या-बद्दलची हकीगतहि गणपतीभय्यानें त्या ठगाला सांगितली. पण गंगाबाईला जी माहिती पाहिजे होती, त्याबद्दलची ती नक्की बातमी कांहीं त्या ठगाला सांगतां येईना. त्यांच्या टोळीच्या हातून शेकडो प्रवासी लुटले आणि मारले गेलेले होते. त्यांत तो बिचारा कोणाकोणाची म्हणून आठवण ठेवणार? त्यामुळें गंगाबाईची पुष्कळ निराशा झाली. एवढा हा ठग अनायासानें आपल्या तावडींत सांपडला आहे तेव्हां याच्यापासून गंगाबाईचा नवरा अद्यापि जिवंत आहे कीं नाहीं, आणि

तो कोठें आहे, याबद्दलची आपण कांहीं तरी बातमी काढूं, अशी गणपतीभय्या-लाही पुष्कळ उमेद होती. पण एवढा मोठा ठग आपल्या हातीं लागून त्याच्या-पासून आपल्याला कांहीं फायदा झाला नाहीं, म्हणून गणपतीभय्याला अतिशय वाईट वाटलें; पण बिचारा गणपतीभय्या त्याला काय उपाय करणार? अखेरीस थोडी विश्रांति घेऊन कांहीं वेळानें तो ठग गंगाबाईचा निरोप घेऊन जावयास निघाला, तेव्हां आम्हांला जी माहिती पाहिजे आहे ती तुला कोठें मिळाली, तर ती तूं आम्हांला जरूर कळव, असें गणपतीभय्यानें त्याला किती तरी वेळां सांगितलें; आणि त्या ठगानेंहि ती गोष्ट कबूल केली. आणि इतकें झाल्यावर तो ठग आपली वाट चालत आपल्या घराकडे निघून गेला.



: :

# रांग सव्विसावी

मंगळागौरीच्या दिवशीं मंगळागौर होती म्हणून आणि पुढें एक दोन दिवस विश्रांति घ्यावी म्हणून गंगाबाई आणि गणपतीभय्या यांनीं पुढें कांहीं दिवस तेथेंच मुक्काम केला. ज्या मंगळागौरीची आपण इतक्या मनोभावानें पूजा अर्चा केली, ती मंगळागौर आपल्या धांवण्याला धांवून येईल आणि आपल्या पतीचा कांहीं तरी शोध लावून देईल, अशी गंगाबाईला फार आशा वाटत होती. पण ती आशा सफळ झाली नाहीं. तेव्हां रात्रीं तरी निदान स्वप्नांत देवी आपल्याला कांहीं तरी दृष्टान्त देईल, म्हणून गंगाबाई देवीच्या समोरच झोपीं गेली. पण रात्र संपली आणि रानांतील पांखरें पहाटेस किलबिल किलबिल असा शब्द करूं लागलीं, तेव्हां गंगाबाई जागी झाली; पण तिला त्या रात्रीं इतकी गाढ झोप लागली कीं, त्या झोंपेंत तिला कसलें देखील स्वप्न पडलें नाहीं किंवा कोणताही दृष्टान्त झाला नाहीं. तेव्हां त्यामुळें तिची फार निराशा झाली. तरी पण देवीवर तिची श्रद्धा होती व आपली मंगळागौर, आपलें मांगल्य, सौभाग्य आणि अहेव-पण कायम राखील, असा तिला भरंवसा वाटत होता. गंगाबाईनें स्नान करून गौरीची उत्तर पूजा केली आणि नंतर गौर कवळासून त्या ओढ्यामध्यें तिनें त्या देवीचें विसर्जन केलें.

त्या ठगानें दिलेलें गाठोडें गणपतीभय्यापाशीं होतें. ज्यांत चोरीचा माल बांधलेला आहे, असल्या त्या गाठोड्याला आपण हात सुद्धां लावूं नये, असेंच गंगाबाईचें मत होतें; तरी पण चोरीचा माल विकत घेण्याचा गणपतीभय्याचा पूर्वीचा एक धंदा असल्यामुळें तें गाठोडें त्यानें आपल्या ताब्यांत घेतल्यापासून मी तें केव्हां उघडून पाहीन, असें गणपतीभय्याला झालेलें होतें. व गंगाबाई जवळ नसेल अशी संधि पाहून तिच्या न कळत आपण एकदां हें गाठोडें सोडून

पाहूं, असा गणपतीभय्यानें बेत केला होता. तेव्हां मंगळागौरीचें विसर्जन करण्याकरितां गंगाबाई नदीवर गेली त्यावेळीं ही संधि आतां बरी आहे, असें गणपतीभय्याला वाटलें. गंगाबाई नदीवर गेली, व नदीच्या सुमारें ढोपरभर पाण्यांत मध्येंच एक मोठा खडक कोरडा होता त्याच्यावर जाऊन तेथून तिनें गौरीचें विसर्जन केलें, व हातपाय धुऊन आणि नेत्रस्पर्श करून ती त्या खडकावर त्या नदीच्या लहानशा पात्राकडे उद्विग्न दृष्टीनें थोडा वेळ पहात बसली. गौरीवर वाहिलेलीं फुलें नदींत गौरीचें विसर्जन केल्यावर पाण्यावर तरंगत तरंगत हळुहळू खालीं वाहत चाललीं होतीं. त्या फुलांच्या गतीकडे गंगाबाई लक्ष लावून पहात होती. वाहत जातां जातां एक फूल दिसेनासें झालें म्हणजे ती दुसऱ्या फुलाकडे पाहूं लागे. अशीं तिनें सारीं फुलें वाहत जाऊन दिसेनाशीं झालेलीं पाहिलीं; आणि तिच्या मनांत आलें कीं, या संसाररूपी नदीमध्यें आपणही या फुलांसारखीं एकामागून एक वाहत जातां जातां अखेरीस एक दिवस अशींच दिसेनाशीं होणार ! या कल्पनेनें आधींच निराश झालेलें तिचें मन जास्त उदास झालें व त्या उदासीनतेच्या तंद्रीमध्यें ती त्या खडकावर बराच वेळ बसून राहिली. पण कोणीहीं हताश आणि उदासीन झालें, तरी त्या निष्क्रिय स्थितीमध्यें मनुष्य किती वेळ बसणार? प्राणी जिवंत आहे, तोंपर्यंत त्यानें कांहीं तरी हातपाय हलविलेच पाहिजेत. या नैसर्गिक प्रवृत्तीनें अखेरीस गंगाबाईला तिच्या तंद्रीमधून जागें केलें आणि तिला त्या नदीवरून परत आणिलें. गंगाबाई परत येऊन पहाते, तों गणपतीभय्या तें गाठोडें उघडून त्याच्याकडे टक लावून पहात बसलेला आहे, असें तिला दिसलें. ती म्हणाली, "गणपतीभय्या, तुम्ही तें गाठोडें कशाला सोडलें ?" गंगाबाई आपल्यावर रागावतील म्हणून गणपतीभय्या थोडासा भीतच होता; पण त्या गाठोड्यांतील दागिने पाहून ते गंगाबाईला दाखविल्यावांचून त्याच्यानें राहावेना. म्हणून त्यानें तें गाठोडें त्यांच्याजवळ नेलें, आणि एकदां यांतील सुंदर दागिने पहा तर खरे, असें म्हणण्याचें त्यानें धाडस केलें. पण आपल्याला ते दुसऱ्या कोणाचे चोरीचे दागिने पाहून करावयाचें आहे काय असें म्हणून तिनें त्या दागिन्यांकडे आपली तिरस्कारानें भरलेली दृष्टि फेंकली. त्यामुळें गणपतीभय्या भिऊन जाऊन ते दागिने माघारे नेऊं लागला; इतक्यांत गंगाबाईच्या तिरस्कारयुक्त दृष्टीला त्या गाठोड्यांमध्यें कांहीं तरी आपल्या ओळखीचे जिन्नस असावेत, असा भास झाला; आणि तिनें गणपतीभय्याच्या हातांतून तें गाठोडें

आपल्या हातांत घेतलें, व अतिशय आश्चर्ययुक्त मुद्रेनें ती त्यांतील एक एक दागिना फिरून फिरून न्याहाळून पाहूं लागली. ज्या दागिन्यांबद्दल गंगाबाईनें इतका तिरस्कार व्यक्त केला, त्या दागिन्यांकडे ती आतां इतक्या आश्चर्ययुक्त मुद्रेनें फिरून फिरून कां बघत बसली आहे, हें गणपतीभय्याला कांहीं कळेना. पण इतक्यांत गंगाबाईनें आकाशाकडे पाहून एक दीर्घ सुस्कारा सोडला. आणि मग गणपतीभय्याकडे दृष्टि वळवून ती म्हणाली, " गणपतीभय्या, तुम्हांला काय वाटतें? हे दागिने कोणाचे असावेत? लोकांचे दागिने आपल्याला कशाला पाहिजेत, असें मी तुम्हांला म्हटलें! पण, गणपतीभय्या, हे दागिने माझे आहेत! होय, मी ते पक्के ओळखले! माझ्या अंगावर रोज असणारे हे दागिने मी कसे ओळखणार नाहीं? निःसंशय हे माझेच दागिने आहेत!" असें म्हणून ती आपल्या पदरानें आपल्या डोळ्यांतून येणारें पाणी पुसूं लागली. गंगाबाई बोलत असतांना तिचें तें बोलणें ऐकून गणपतीभय्या आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन गेला. व हा काय प्रकार आहे, हें त्याला कांहींच समजेना. पण त्याला एवढें मात्र खास समजलें कीं, हे दागिने जर गंगाबाईचेच असतील, तर त्याच्या पुढील आपला मार्ग आतां स्पष्ट आहे. पण हे विचार त्याच्या मनांत येत आहेत, इतक्यांत गंगाबाईनें फिरून पुढें बोलण्याला सुरुवात केली. ती म्हणाली, " पण दागिन्यांसारखे दागिने नसतील आणि हे दागिने जर माझेच असतील, तर ते त्या उत्तरपीठाच्या शंकराचार्याच्या मठांतील एका संन्याशापाशीं कसे गेले? किंवा हा संन्यासी देखील कोणी त्या ठगांपैकींच आणि दरवडेखोरांपैकींच एखादा आहे? संन्यासी देखील ठगबाजीचीं आणि चोरीचीं कामें करूं लागले कीं काय?"

" गंगाबाई," गणपतीभय्या म्हणाला, " तें कांहींही असो. पण आपण आतां येथून त्या संन्याशाचा शोध काढण्याकरितां विंध्यवासिनीदेवीच्या क्षेत्रालाच गेलें पाहिजे. त्याच्याशिवाय या भानगडीचा उलगडा लागणें मला शक्य दिसत नाहीं."

" माझ्याही मनांत तसेंच येत आहे. तेव्हां आतां आपण विंध्यवासिनीचाच रस्ता धरूं. आपल्या शोधांत आपल्याला पुढला रस्ता कांहींच दिसत नव्हता. पण मी आपल्या मंगळागौरीची मनोभावानें पूजा करून तिच्यापाशीं वरप्रसाद मागितला होता. पण तिनें तो मला कांहींच दिला नाहीं, अशा समजुतीनें मी आतांपर्यंत अगदीं निराश आणि उदासीन झालें होतें. पण देवीनें मला वरप्रसाद दिला आहे. माझ्या अज्ञानामुळें मला तो समजला नाहीं. देवीनें माझे सौभाग्याचे

अलंकार मला परत आणून दिले याच्यापेक्षां आणखी काय पाहिजे? शिवाय माझ्या पतीच्या शोधांत विंध्यवासिनीच्या तीर्थक्षेत्राचा पुढील धागा दाखवून देऊन माझ्या मंगळागौरीनें या आपल्या मुलीला त्या श्रीजगदंबा कुलस्वामिनी विंध्यवासिनीच्या ओटींतच जणुं काय घातलें आहे, असें मला वाटतें! आई जगदंबे, विंध्यवासिनी, तूं आमची कुलस्वामिनी आहेस. मी तुझ्याकडे यावें, अशी सूचना यांत मला मिळत आहे; आणि तुझें दर्शन व्हावें अशी माझीही किती तरी दिवसांची इच्छा आहे; माझे आई, तुझ्या दर्शनानें माझें आहेवपण मला मिळूं दे आणि माझा नाहींसा झालेला नवरा आणि माझें नाहींसें झालेलें तान्हें मूल हीं मला परत मिळूं देत, एवढेंच माझें तुझ्या पायांपाशीं मागणें आहे!" असें म्हणून गंगाबाईनें विंध्यवासिनीच्या दर्शनाला जाण्याचा निश्चय केला आणि त्याप्रमाणें दुसरे दिवशीं गंगाबाई आणि गणपतीभय्या विंध्यवासिनीच्या मार्गानें हळुहळू प्रवास करूं लागलीं.

इकडे विंध्यवासिनीदेवीच्या पायथ्याशीं उत्तरपीठाच्या शंकराचार्यांच्या मठांत आपलें पूर्वीचें भय्यासाहेब हें नांव झांकून नवीन अभयानंद हें नांव घेतलेले स्वामी कसे तरी आपले दिवस काढीत होते. चतुर्थाश्रमाचा पोशाख आपल्या अंगावर घेतल्यापासून आतां आपण करीमबक्षाच्या भीतीपासून बहुतेक मुक्त झालो आहोंत, असा त्यांच्या मनामध्यें दिवसेंदिवस विश्वास उत्पन्न होत चालला होता, व त्यामुळें त्यांच्या मनाला थोडी थोडी स्वस्थताही वाटूं लागली होती. अशा मनाच्या स्वस्थतेच्या अवस्थेमध्यें आतां आपण आपल्या पत्नीचा कांहीं तरी शोध करूं, आणि कांहीं तरी निमित्तानें शंकराचार्यांची अनुज्ञा घेऊन एकदां आपण झांशीस परत जाऊं, असे विचार त्यांच्या मनामध्यें येऊं लागले होते. व आपल्या पत्नीचा शोध लावण्याकरितां त्यांनीं कांहीं गुप्त प्रयत्नही सुरू केले होते. पण मागील भागांत सांगितलेला प्रकार झाल्यामुळें फिरून त्यांच्या मनाची स्थिति बदलली. पहाटेस ठगांच्या काळोखांत आपल्या गळ्याभोंवतीं रुमाल टाकण्यांत आला, व आपण आपल्या पत्नीचे दडवून ठेविलेले दागिनेही नाहींसे झाले, या गोष्टीवरून त्यांची पूर्वींची सगळी भीति पुनरुज्जीवित झाली. ज्यानें मला मारण्याकरितां माझ्या गळ्याभोंवतीं हा रुमाल टाकला, तो कोणी तरी करीमबक्षाच्या टोळींतीलच ठग असला पाहिजे, आणि मी भय्यासाहेब अजून जिवंत असून या संन्याशाच्या वेषामध्यें दडून राहिलों आहे, या गोष्टीचा करीमबक्षाला सुगावा लागला असावा

निदान त्याला असा संशय तरी आला असावा, आणि म्हणून त्यानेंच हा ठग मला मारण्याकरितां पाठविला असावा, असें भय्यासाहेब यांच्या मनानें पक्कें घेतलें. हें त्यांचें अनुमान अगदीं बरोबर होतें. तेव्हां याच्यावर त्यांनीं एक दोन उपाय योजण्याची व्यवस्था केली. मुख्य उपाय म्हणजे ती जागा बदलण्याचा. पण बाह्यात्कारीं तरी निदान चातुर्मास्य संपल्याशिवाय यतिधर्मांच्या नियमांप्रमाणें स्वामी अभयानंद यांना तें विंध्यवासिनीचें ठिकाण सोडून दुसरीकडे कोठें जाणें शक्य नव्हतें. म्हणून तेथपर्यंत त्यांनीं दुसरे एक दोन प्रयोग सुरू केले. इतके दिवसपर्यंत आपण कोण व कोठील असा अभयानंदस्वामींना कोणी प्रश्न केला असतां संन्याशांनीं आपल्या पूर्वाश्रमींच्या वृत्तांताचें स्मरणही आपल्या मनाला होऊं देऊं नये, या नियमाच्या आधाराखालीं ते आपला पूर्ववृत्तांत कोणालाही कधीं सांगत नसत. परंतु आतां त्यांनीं तें धोरण बदललें. आतां त्यांच्या पूर्व-वृत्तांतासंबंधानें त्यांना कोणी जरा थोडासा प्रश्न केला कीं, ते आपला वृत्तांत म्हणून पुढील हकीगत सांगत असत. ती अशीः—

"मी मूळचा काशीचा राहणारा. मला शास्त्राध्ययनासाठीं माझ्या आई-बापांनीं गुरूच्या घरीं ठेविलें होतें. आपल्या ब्रह्मचर्याच्या काळामध्यें गुरुगृहीं शास्त्राभ्यास करून समावर्तनानंतर घरीं जाऊन लग्न वगैरे करावें, असा माझा विचार होता. परंतु इतक्यांत माझे आईबाप वारले. तेव्हां माझे दुसरे कोणी नातेवाईक नसल्यामुळें व माझ्या आईबापांच्यापाशीं कांहीं द्रव्यसंचयही नसल्या-मुळें मी एकदंम आश्रम घेण्याचेंच ठरविलें. पुढें संन्यासग्रहणानंतर तीर्थयात्रा करितां करितां मी या विंध्यारण्यामध्यें आलों. तेथें वाटेंत एकदां एका आजारी झालेल्या बैराग्याची आणि माझी गांठ पडली. तो बैरागी आणि मी संन्यासी अशा दोघांची आमची सहजच मैत्री जमली. मी संन्यासी कां झालों म्हणून त्यानें मला विचारलें, तेव्हां मी आपली हकीकत त्याला सांगितली. आणि तूं बैरागी कां झालास असें मी त्याला विचारलें, तेव्हां त्यानेंही मला आपली हकीकत सांगितली ती फारच कष्टप्रद होती. तो म्हणाला, 'मी मूळचा कांहीं बैरागी नव्हे. देवाच्या दयेनें मी एक मोठा जहागिरदार होतों. झांशीस माझें घर मी आपल्या बायकोला आणि चाकर माणसांना बरोबर घेऊन कोंकणांत सजापुरास जाण्यास निघालों. वाटेनें या विंध्याचलाच्या डोंगरांतून जातांना येथील करीम-बक्षाच्या हाताखालील ठगांच्या टोळीनें आम्हांस लुटलें. त्या गर्दींत माझी बायको

आणि चाकरमाणसें ह्यांच्यापैकीं कोण मारलीं गेलीं किंवा कोण कोण कोठें जिवंत आहेत याचा मला अजूनपर्यंत कांहीं एक पत्ता नाहीं. मला त्या ठगांनीं आपल्या छावणींत कैद करून नेलें. पण तेथून मी निसटलों. तरी पण त्यांनीं माझा तपास लावून मला मारण्याचा प्रयत्न केला. पण त्यांतूनही युक्तीनें सुटून मी हल्लीं या बैराग्याच्या वेषामध्यें फिरत आहे. पण या हालअपेष्टांची संवय नसल्यामुळें हल्लीं मला ताप येऊं लागला आहे.' बिचारा ही हकीकत सांगत असतांना त्याचें अंग तापानें फणफणलेलें होतें व डोळे लाल झालेले होते. त्याची माझी गांठ पडल्यापासून पहिले पांच सहा दिवस तो शुद्धीवर होता. मी रानांतील झाड-पाल्याचीं औषधें देऊन त्याची पुष्कळ शुश्रुषा केली; पण त्याचा ताप कांहीं हटेना. आणि अखेरीस शेवटचे दोनतीन दिवस तो बेशुद्धच होता. मला वाटतें तो त्याचा ताप नवज्वराचाच होता. त्याचा अंत झाल्यावर रानांतलि वाळलेल्या काष्ठांनीं एका नदीच्या कांठीं चिता रचून मी त्याला नारायण म्हणून अग्नि दिला; आणि नंतर मी तेथून नारायणनामस्मरण करीत निघालों. माझ्या मदतीपासून त्या बिचाऱ्या झांशीच्या जहागिरदाराला कांहीं उपयोग झाला नाहीं, याबद्दल मला वाईट वाटतें. त्या प्रसंगीं यतिधर्माच्या विरुद्ध अशाही कित्येक गोष्टी मला कराव्या लागल्या. पण तेथें काय करावयाचें ? त्या सगळ्या गोष्टी आपद्धर्म म्हणून नारायणाचें नांव घेऊन मी मुकाट्यानें केल्या !"

ही सगळी इत्थंभूत हकीकत स्वामी अभयानंद हे दररोज कोणा तरी चार पांच निरनिराळ्या लोकांजवळ सांगूं लागले. यांत स्वामींचा हेतु उघडच होता. पण तेथें स्वामींवर सर्व लोकांची मोठी दृढ श्रद्धा बसलेली असल्यामुळें स्वामींनीं ब्रह्मचर्याश्रमामधून घेतलेला चतुर्थाश्रम, स्वामींची परोपकारबुद्धि, स्वामींनीं त्या झांशीच्या जहागिरदाराची केलेली निरपेक्ष शुश्रुषा आणि त्या जहागिरदार बैराग्याचा नवज्वरानें झालेला अंत, या सगळ्या गोष्टी हळुहळु फैलावतां फैलावतां विंध्यवासिनीच्या, शंकराचार्यांच्या आणि त्यांच्या मठांतील या अभयानंद-स्वामींच्या दर्शनाला येणाऱ्या सर्व भल्याबुऱ्यां यात्रेकरूंच्या तोंडीं त्या झाल्या. स्वामींनीं मठांतील कित्येक शिष्य आणि विद्यार्थीही आपल्या सभोंवतीं गोळा केले होते; व जे ठग, चोर, दरवडेखोर वगैरे असण्याचा संभव आहे, असे जे कोणी जंगली यात्रेकरू देवीच्या दर्शनाला येत असत, त्यांच्यांत विशेषतः मिळून मिसळून जाऊन या शिष्यांनीं आणि विद्यार्थ्यांनीं त्यांना स्वामींची ही वरील

हकीकत आणि त्या झांशीच्या जहागिरदाराच्या मरणाची हकीकत सांगावी, अशी योजना स्वामींकडून करण्यांत आलेली होती. व या उपायानें आपला बराच कार्यभाग होईल, असा स्वामी अभयानंद यांचा अंदाज होता.

स्वसंरक्षणासाठीं ही एक युक्ति योजून झाल्यानंतर स्वामींनीं दुसऱ्याही कित्येक उपायांचा अवलंब करण्याला सुरुवात केली होती. भय्यासाहेब—झांशीचे सरदार भय्यासाहेब—यांना जरी सर्व प्रकारचीं हत्यारें वापरून कवाईत करण्याचा पूर्ण सराव होता, तरी अभयानंदस्वामींच्या पोषाखामध्यें असतांना त्यांनीं आजपर्यंत या संन्यासी पेशाच्या विरुद्ध कोणतेंही वर्तन केलें नव्हतें. पण याच्यापुढें त्यांनीं तें धोरण बदललें. आपल्यावर ठगांच्या टोळीचा कदाचित् हल्ला येईल, ही भीति शंकराचार्यां-च्याही मनांत होतीच. तेव्हां आपण त्याच्याकरितां तयारींत असलें पाहिजे, ही कल्पना स्वामी अभयानंद यांनीं शंकराचार्यांच्या डोक्यांत भरविली. आचार्य प्रथमतः या कल्पनेला फारसे कबूल नव्हते. संन्याशांनीं शस्त्रधारण करावें आणि प्रसंगविशेषीं लढाईलाही उद्युक्त व्हावें हें क्षत्रियाचें कर्म संन्याशांना उचित नाहीं, असें त्यांचें मत होतें. ग्वाल्हेरच्या शिंदे सरकारांनीं पाठविलेल्या पलटणीनें ठगांच्या टोळीचा कदा-चित् आतांपर्यंत बंदोबस्त केलाही असेल, असा त्यांचा एक अदमास होता. पण स्वामी अभयानंद यांनीं आपल्या स्वतःच्या बंदोबस्ताच्या तयारीकडे आचार्यांचें मन मोठ्या जोरानें वळविलें. ते म्हणाले, “ संन्याशांनीं हातांत शस्त्र धरूं नये हें खरें, आणि शिंद्यांच्या लष्करांतील शिपायांनीं आपलें रक्षण केलें, तर तेंही आपल्याला नको आहे असें नाहीं. पण तें सैन्य वेळेवर आलें नाहीं आणि त्याच्या आधींच कदाचित् चोरांनीं आपल्यावर हल्ला केला, तर आपण काय संन्यासी म्हणून हात न हालविता उगीच मरून जावयाचें ? अजून चोरांनीं हल्ला केला नाहीं आणि अजून आपण निभावलों आहों, म्हणून याच्यापुढेंही आपण गाफील राहावें, हें बरोबर नाहीं. आणि चोरांनीं आपल्याला लुटावें आणि आपण संन्यासी म्हणून हात जोडून त्यांच्या तोंडाकडे पहात बसावें, असें पूर्वींच्या तरी संन्याशांनीं कोणीं कधीं केलेलें आहे ? श्रींच्या पूज्य चरणांना हा पूर्व इतिहास विदितच असला पाहिजे कीं, आपल्या काशीचे राजे चेतसिंग यांना जेव्हां टोपिवाल्यांनीं काशीमध्यें पकडण्याचा घाट घातला, तेव्हां आपला राजा कैद केला जात आहे असें समजल्याबरोबर काशींतील सगळे संन्यासी खडबडून उठले आणि त्यांनीं काशींत बंडाचा झेंडा उभारला !

दाक्षिणेंत रामदासस्वामींनीं स्वधर्मसंरक्षणाकरितां सर्वांनीं लढण्याला तयार व्हावें, अशीच सर्व लोकांना शिकवण दिलेली आहे. श्रीब्रह्मेंद्रस्वामी हे आश्रमानें संन्यासीच होते; पण त्यांनीं थोरल्या बाजीरावसाहेबांना राजकारणांतील सल्ला देऊन त्यांच्याकडून किती तरी पराक्रम करविलेले आहेत. शीख लोकांचे गुरु, गुरु गोविंद वगैरे, हे सगळे मूळचे धर्माचे प्रवर्तक असूनही प्रसंगविशेषीं त्यांनी शस्त्र धरून किती तरी मोठमोठाले विजय संपादन केलेले आहेत. भगवान् श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेमध्यें संन्यासधर्माच्या बरोबरच अर्जुनाला क्षात्रधर्माचाही उपदेश केलेला नाहीं काय ? आणि द्रोणाचार्य, कृपाचार्य, वगैरे ब्रह्मवादी मंडळींनींही प्रसंगोपात्त शस्त्र धारण केलेलें नाहीं काय ? हा सगळा मागील इतिहास पाहून प्रस्तुत प्रसंगीं आपण आम्हां मंडळींना अनुज्ञा द्यावी अशी भगवत्पूज्यपादांच्या जवळ माझी नम्र विनंति आहे. आपण वयानें वृद्ध आहां, म्हणून आपल्याला ही गोष्ट अंगावर बेववत नसेल; पण मी तरुण आहे. माझ्यांत हिंमत आहे. आणि आपल्या कृपेनें प्रसंग आला, तर मी शत्रूवर अशी तलवार चालवीन कीं, आपल्या मठाच्या विजयध्वजाला अपमानाचा कधींही कलंक लावूं न देतां मी त्याला विजयश्रीच्या पुष्पमालांनीं अधिकच मंडित करीन ! म्हणून आपली अनुज्ञा असावी ! " स्वामी अभयानंद यांचें हें धीरोदात्त भाषण ऐकून श्रींच्या मनावर स्वामी अभयानंद यांच्या तेजस्वी स्वभावाबद्दल इतका चांगला परिणाम झाला कीं, हे खरोखर कोणी संन्यासी आहेत का सरदार आहेत, असाही क्षणभर त्यांच्या मनामध्यें संशय उत्पन्न झाला; परंतु अखेरीस त्यांनीं त्यांना आशीर्वादपूर्वक आपली संमति दिली. आणि तेव्हांपासून स्वामी अभयानंद यांनीं आपल्यापाशीं तर खंजीर, कट्यार, गुप्ती, पट्टा वगैरे हत्यारें गुप्तरीतीनें बाळगण्याला सुरुवात केलीच; पण त्यांनीं रात्रीच्या वेळीं आणि पहाटेच्या वेळीं मठांतील बहुतेक सर्व लोकांना कवाईत शिकवून त्यांची एक पलटणही तयार केली. तसेंच त्यांनीं आपल्याकरितां, ते झांशीस असतांना जसा सरदारी बाण्याचा पोषाख करीत असत, तसा एक नवीन सरदारी पोषाखही तयार करविला; व बाकीच्या शिपायांकरितांही त्यांनीं सगळ्यांचे सारखे पोषाख तयार करविले होते.

आश्विन शुक्ल पक्षांतील नवरात्राच्या उत्सवाला विंध्यवासिनीच्या संस्थानांत सुरुवात होण्याचे दिवस अगदीं जवळ येऊन ठेपले होते. ठिकठिकाणचे हजारों यात्रेकरू लोक विंध्यवासिनीदेवींची आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत सेवा

करण्याकरितां व सोहाळा पाहण्याकरितां विंध्यवासिनीच्या आसपास येऊन राहिले होते. विंध्याचलाच्या डोंगरांतील विंध्यवासिनीच्या देवळापासून तों थेट गंगेच्या किनाऱ्यावरील वाळवंटापर्यंत लाखों यात्रेकरूंचे फड जिकडे तिकडे लागून राहिले होते. विंध्यवासिनीच्या डोंगरावरील देवळाच्या दगडी पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंनीं व त्याच्याखालीं पायथ्याशीं मैदानांत किती तरी दुकानदारांचीं पालें लागून राहिलीं होतीं. त्याचप्रमाणें अनेक यात्रेकरूंनींही आपल्याला राहण्याकरितां जागोजागीं पालें ठोकलीं होतीं. शिवाय मोठमोठ्या झाडांखालून तर प्रवाशांचे आणि यात्रेकरूंचे किती तरी मोठाले तळ पडले होते. आसपासच्या धर्मशाळा, देवळांच्या आजूबाजूच्या ओऱ्या आणि गांवांतील मोकळीं घरें, यांतूनही पुष्कळ यात्रेकरू आश्रय घेऊन राहिले होते. गंगेच्या कांठावरील वाळवंटांत गोसावी, बैरागी, उदासी, कानफाटे, वगैरे अनेक पंथांच्या मेळ्यांनीं आपापलीं निशाणें उभारून त्यांच्याभोंवतीं आपले तळ दिले होते; व ढोल आणि झांजा यांच्या आवाजामध्यें आपापलीं भजनें सुरू केलीं होतीं. स्त्रिया आणि पुरुष, वृद्ध माणसें आणि लहान मुलें, भाविक लोक आणि भामटे, शाक्त आणि मांत्रिक, वैदिक आणि व्यवहारी, विद्वान आणि अडाणी, ब्राह्मण आणि शूद्र, चोर आणि साव, कुलस्त्रिया आणि वेश्या, सभ्य आणि हलकट, दुकानदार आणि गिऱ्हाईक, पंड्ये आणि यात्रेकरू, अमीर आणि फकीर, डोंबारी आणि कोल्हाटी, तमासगीर आणि जादूवाले, शेतकरी आणि जंगली, धट्टेकट्टे व लंगडेपांगळे, भीक मागणारे आणि दानधर्म करणारे, यात्रेकरूंना फसविणारे ठग आणि ठगाकडून फसविले जाणारे यात्रेकरू, गाड्याघोड्यांवरून येणारे धनिक आणि त्यांच्या गर्दींत चेंगरणारे भिकारी, शिपाई प्यादे आणि रानटी रयत, अशा अनेक प्रकारच्या लाखों लोकांची त्या विंध्यवासिनीदेवीच्या आसमंतात् प्रदेशांत जणूं काय खिचडीच होऊन गेलेली होती. त्यांतच जिनें गंगाबाईचा तान्हा मुलगा प्रयागचे जवळ रामचंद्रराव यांना देऊन टाकला होता, ती भिकारीणही भीक मागत मागत विंध्यवासिनीला आली होती व यात्रेमध्यें एकतारी वाजवीत भीक मागून ती आपला उदरनिर्वाह करीत होती. या सगळ्या गर्दींत नवरात्राच्या सुरुवातीला गंगाबाई, गणपतीभय्या वगैरे मंडळी कशीबशी एकदां विंध्यवासिनीला येऊन पोहोंचली. जंगलांतून प्रवास करतां करतां गंगाबाई आधींच थकलेली होती. त्यांतून ही एवढी मोठी प्रचंड यात्रा पाहून तर ती अगदीं घाबरून गेली. त्यांना एवढ्या मोठ्या गर्दींत चांगली जागा कोठून मिळणार? विंध्यवासिनीच्या मंदिरा-

पासून फार दूर अशा एका ठिकाणीं ती राहिली व गणपतीभय्यानें बिऱ्हाडाची शक्य ती तात्पुरती तजवीज केली. गणपतीभय्याची पूर्वीची वेश्या, कमळाबाई, हिचा दरसाल नवरात्रामध्यें विंध्यवासिनीच्या वारीला येण्याचा नेहमींचाच क्रम होता. त्याप्रमाणें ती या वेळीहि विंध्यवासिनीला आलेली होती. पण त्या एवढ्या मोठ्या गर्दीत कमळाबाई कोठें उतरली आहे आणि गणपतीभय्या कोठें उतरला आहे, याबद्दल कोणाची कोणाला मुळींच माहिती नव्हती. असल्या मोठ्या यात्रांतून खरे भाविक लोक फार थोडेच येत असतात; आणि वेश्यांचे वाईट व्यवहार, मद्यपान, चोऱ्या, ठगबाजी, भामटेगिरी, असल्या दुर्व्यसनांनाच या यात्रांमधून पुष्कळ अवसर मिळत असतो. या नेहमींच्या पद्धतीला अनुसरून इतर अनेक वाईट चालीच्या स्त्रियांप्रमाणें कमळाबाईही तेथें आलेली होती; व गंगास्नान, देवदेवतार्चन वगैरे देवधर्माची घरचीं सगळीं ढोंगें उरकून झाल्यानंतर हातांत चांदीचा पेला घेऊन रोज विंध्यवासिनीदेवीच्या, तेथें जवळच उतरलेल्या श्रीशंकराचार्यांच्या आणि इतर झाडून सगळ्या बारिकसारीक साधुसंतांच्या दर्शनाला लोकांच्या गर्दीमधून गर्दीगर्दीनें जाण्याचा तिनें आपला क्रम सुरू केला होता. त्याचप्रमाणें आचार्यांच्या मठांत अभयानंदस्वामींचें संध्याकाळचें पुराण चालत असे, त्या वेळीं तेथेंही ती प्रतिष्ठितपणानें प्रतिष्ठित बायकांमध्यें जाऊन बसत असे. पण या गोष्टीची गणपतीभय्याला किंवा गंगाबाईला मुळींच खबर नव्हती. गणपतीभय्या आणि गंगाबाई यांनीं विंध्यवासिनीला आल्यानंतर गंगामातेचें स्नान केलें आणि आपला चौका तयार करून कांहीं खाण्यापिण्याची तजवीज लावली. पण गंगाबाईचें लक्ष त्या खाण्यापिण्याकडे बिलकूल नव्हतें. तिचें लक्ष दुसरीकडे लागलेलें होतें. आपण माग काढीत काढीत येथपर्यंत आलों; पण आतां याच्यापुढें काय करावयाचें आणि या गर्दीत आपला हेतु कसा साध्य होणार, याबद्दल तिला विवंचना लागली होती. तरी पण ज्या परमेश्वरानें मला अनाथ अबलेला वाट दाखवीत दाखवीत येथपर्यंत आणलें, तोच अनाथनाथ परमेश्वर या गर्दीतूनही मला वाट दाखवील, असा तिच्या अन्तःकरणामध्यें एक प्रकारचा विश्वास वास्तव्य करीत होता. ती आपल्या मनांत म्हणाली:—" ही एवढी मोठी गर्दी असली, तरी ती मला गर्दी वाटत आहे; देवाला यांत कसली गर्दी आहे ? जो रोज सव्वा लाख प्राण्यांना जन्माला घालतो आणि जो इतक्या सगळ्या अनंत कोटि ब्रह्मांडांच्या गर्दीमध्येंही प्रत्येकाचे सुव्यवस्थित रीतीनें आणि

यत्किंचितही घोंटाळ्याशिवाय योगक्षेम चालवितो, त्याला ही गर्दी कसली! हजारों जनावरांच्या कळपांत चुकलेल्या लहान वासराला आपल्या आईची अचुक गांठ घालून देणारी जी निसर्गसिद्ध ईश्वरी आकर्षणशक्ति, ती काय माझ्याच बाबतींत आपलें सामर्थ्य विसरून जाईल? परमेश्वराच्या दयेच्या साम्राज्यामध्यें असा निष्ठुरपणा कधींही होणार नाहीं! कदाचित माझी ही विचारशक्ति जागृत होऊन तिच्या लाटा या मनुष्यांच्या गर्दीच्या समुद्राच्याही वरून चोहोंकडे पसरत असतां माझ्या व माझ्या पतीच्या भेटीचे धागे एकत्र जुळवून आणण्याच्या कार्यामध्यें ती कृपाळू दैवी शक्ति या वेळींही व्यग्र झालेली असेल!" असे विचार मनांत आणीत गंगाबाई पुष्कळ वेळ सचिंत बसली होती. पण फिरून तिला वाटलें कीं असें स्वस्थ बसून कसें होईल? देवाचा दयाळूपणा जरी सर्वशक्तिमान् असला, तरी मनुष्याच्या प्रयत्नानें त्याला थोडा तरी हातभार लाविलाच पाहिजे. आणि असें म्हणून त्या चोरानें दिलेल्या गाठोड्यांतील दागिन्यांपैकीं आपल्या गळ्यांत घालावयाची मोत्याची आणि जडावाची एक माळ खुणेसाठीं म्हणून गणपतीभय्यापाशीं देऊन शंकराचार्यांच्या मठांतील त्या स्वामीच्या शोधाकरितां तिनें गणपतीभय्याला पाठविलें; व कांहीं सुगावा लागतो असें वाटलें तर पुढें बोलण्याचें धोरण कसें काय ठेवावयाचें हेंही तिनें गणपतीभय्याला समजावून सांगितलें.

गणपतीभय्या या कामगिरीसाठीं बाहेर गेल्यावर पाठीमागें एकटी राहिलेली गंगाबाई गंगेच्या तीराजवळील देवीच्या दर्शनाला गेली. त्या वेळीं तेथील यात्रेकरूंचा तो अपूर्व मेळा पाहून तिला पहिल्यानें थोडी करमणूक वाटली. पण तो त्या पहिल्या देखाव्याचा आणि अनुभवाचा आनंद थोड्या वेळानें संपून गेल्यानंतर नेहमींच्याप्रमाणें फिरून तिचें मन आत्मस्थितीच्या निरीक्षणामध्यें गुंग होऊन गेलें. देवीच्या दर्शनाला किती तरी नवरे आणि बायका अशीं दोघें दोघें मिळून जात होतीं. त्यांना पाहून गंगाबाईच्या पोटांत कालवाकालव होऊं लागली. ती आपल्या मनाशीं म्हणाली, " आई जगदंबे, या सगळ्या बायका आपापल्या पतींना बरोबर घेऊन तुझ्या मंगलदायक दर्शनाला येत आहेत. आम्ही देखील दोघांनीं मिळून तुझ्या दर्शनाला यावें, तुझ्या पायांवर डोकें ठेवावें आणि त्यांना आयुष्य आणि मला सौभाग्य असें तुझ्यापासून मागून घ्यावें, अशी माझ्या मनांत किती तरी दिवसांपासूनची इच्छा होती. पण माझें दुर्दैव असें कीं आज मी येथें

एकटीच आहे!—आणि माझा पति कोठें आहे? त्यांच्यावांचून मी तुझ्या दर्शनाला कशी येऊं! आणि तरीपण तुझ्या देवळाच्या पायरीजवळ येऊन तुझें दर्शन घेतल्यावांचून मी येथून जाऊं तरी कशी? ज्यांच्याबरोबर तुझ्या मंदिरांत तुझ्या दर्शनाला यावें, अशी माझी फार उत्कट इच्छा, त्यांच्यावांचून माझ्या एकटीच्यानें तुझ्या दर्शनाला येववतही नाहीं आणि तुझें दर्शन घेतल्यावांचून माझ्याच्यानें येथून जाववतही नाहीं! अशी माझी स्थिति झाली आहे. अशा स्थितींत, आई जगदंबे, मी काय करूं? तसेंच तुझ्या मंदिरांतून ज्या बायका बाहेर पडत आहेत, त्यांच्या कपाळाला तुझ्या प्रसादाचें म्हणून केवढें तरी कुंकवाचें मळवट भरलेलें असतें! आणि त्यांच्या गळ्यांत तुझ्या प्रसादाच्या म्हणून तुझ्या पुजाऱ्यांकडून फुलांच्या माळा घालण्यांत आलेल्या मी पहातें! पण तुझ्या दर्शनाला आलें म्हणजे मी काय करूं? बाकीच्या बायकांसारखें मी आपलें मळवट भरून घेऊं किंवा नको घेऊं? आणि मी आपल्या गळांत तुझ्या प्रसादाची माळ घालून घेऊं किंवा नको घेऊं? माझ्या नशिबांत आहे तरी काय? आणि तें मला कोण सांगणार? या तुझ्या दर्शनाकरितां जमलेल्या लाखों लोकांच्या यात्रेमध्यें माझें करणें जरी स्त्री-स्वभावाच्या विरुद्ध आहे हें मी जाणतें, तरी मी प्रत्येक पुरुषाच्या तोंडाकडे न्याहाळून पाहतें. पण त्यांत माझा पति मला कोठें आढळत नाहीं! तेव्हा आतां मी काय करूं? मी आपल्याच हातानें भरलेलें कुंकवाचें मळवट आणि माझ्याचसारख्या कोणी तरी एकाद्या मानवी पुजाऱ्यानें माझ्या गळ्यांत घातलेली तुझ्या प्रसादाची माळ यांत मला कांहीं अर्थ वाटत नाहीं. आई जगदंबे, माझी अशी इच्छा आहे कीं, तूं आपल्या हातानें मला मळवट भर आणि तूं आपल्या हातानें माझ्या गळ्यांत प्रसादाची माळ घाल!' म्हणजे माझ्या अहेवपणाबद्दल मला खात्री वाटेल!—पण मी हें काय म्हणत आहे! आणि देवीला मी या काय अशक्य गोष्टी करावयाला सांगत आहे! जनाबाईच्या घरीं पांडुरंगानें दळणकांडण केलें आणि मिराबाईला देवानें प्रत्यक्ष दर्शन दिलें, या गोष्टी खऱ्या आहेत. पण जनाबाई, मिराबाई, सखूबाई, कान्हु पात्रा वगैरे स्त्रियांची योग्यता मला पापिणीला कोठून येणार? पण आई जगदंबे, तुझ्या प्रत्यक्ष दर्शनाला अशा कारणासाठीं जर मी पात्र नसलें तर अप्रत्यक्षपणानें तरी तूं मला कांहीं दृष्टान्त दे. दृष्टांत, शकुन, ठोकताळे, यांचे दरवाजे तर कांहीं कलियुगांत बंद झालेले नाहींत ना?" असें म्हणून आपल्याला केव्हां तरी कांहीं तरी शुभशकुन होईल, अशा आशेनें ती

स्वस्थ बसली. त्या यात्रेकरूंच्या गर्दींत किती तरी बायकांच्या कडेवर त्यांचीं लहान लहान मुलें होतीं; त्यांतील कोणीं रडत होतीं, कोणी हसत होतीं, कोणीं खेळत होतीं आणि कोणी यात्रेची मजा पाहत होतीं. त्यांच्या आया कोणाला देवीच्या पायावर घालीत होत्या, कोणाला अंगारा लावीत होत्या, कोणाला वाजंत्री वाजत असलेलीं ऐकवीत होत्या, कोणाला खाऊ खावयास देत होत्या, कोणाला फुलांचा वास देत होत्या, आणि कोणाच्या गळ्यांत देवीच्या प्रसादाच्या माळा घालीत होत्या. अशा प्रकारच्या त्या गर्दींत आपलें मूल कांहीं केल्यानें राहीना, म्हणून एका आईनें एका बाजूला बसून त्याला आपल्या अंगावर प्यावयाला घेतलें व त्याच्या अंगावरून आपला पदर टाकून एका हातानें त्याला कुरवाळीत त्याच्या तोंडाकडे पाहून किंचित् हास्य करीत बसली होती. गंगाबाईनें तें पाहिलें, तेव्हां एकदम जागृत झालेल्या पुत्रवात्सल्यामुळें फुटलेल्या पान्ह्यानें तिचें वस्त्र आर्द्र झालें आणि तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. आणि तिच्या मनांत असे विचार आले कीं, 'माझें मूल असतें, तर तें एव्हांना असेंच मोठें झालें असतें, आणि मी त्याला असेंच प्यावयाला दिलें असतें, आणि कडेवर घेऊन मी त्याला असेंच खेळविलें असतें! आम्हीं दोघें जण आपल्या मुलाला घेऊन देवीच्या दर्शनाला आलों असतों आणि त्या मुलाला देवीच्या ओटींत घालून त्याला शतायुष्य मागून घेतलें असतें! पण हें मनोराज्य काय उपयोगाचें? माझ्या त्या भिकारीण मैत्रिणीनें माझें मूल नेऊन कोणाला दिलें त्याचा पत्ता नाहीं आणि तिचाहि पत्ता नाहीं! अशा स्थितींत दुसऱ्या आयाबायांचीं मुलें पाहून मी कितीही कंठशोष केला म्हणून माझें मूल मला आतां कोठून परत मिळणार आहे! आई जगदंबे, तूंच काय करशील तें खरें!' असे अनेक विचार तिच्या मनांत येत होते आणि अशा स्थितींत ती तेथें पुष्कळ वेळ बसून राहिली होती व अखेरीस कंटाळून कंटाळून ती आपल्या मुक्कामावर परत गेली.

गंगाबाई वर सांगितल्याप्रमाणें गंगाकांठच्या देवीच्या देवळामध्यें जाऊन बसली होती, त्या वेळीं विंध्याचलाच्या डोंगरांतील गुहेमध्यें असलेलें विंध्यवासिनी-देवीचें जें आद्य स्थान तिकडे गणपतीभय्या गेला होता. कारण, शंकराचार्यांचा मुक्काम त्या डोंगराच्या पायथ्याशींच होता. आणि त्या शंकराचार्यांच्या मठांतच गणपतीभय्याचें मुख्य काम होतें. मठांत जाऊन त्यानें बराच शोध केला. मठांत पुष्कळ संन्यासी इकडून तिकडे वावरत होते, कोणी पुस्तक पाठ करीत होते,

कोणी ध्यानस्थ बसले होते, आणि कोणी खुद्द आचार्याच्याबरोबर कांहीं चर्चा करण्यांत गुंतले होते. यांपैकीं आपल्याला जो पाहिजे तो संन्यासी कोणता, याबद्दलची बातमी काढण्याला गणपतीभय्याला बराच त्रास पडला. स्वामी अभयानंद हे मागील ठगाचा वृत्तांत झाल्यापासून मोठ्या काळजीनें वागत असत. त्यांनीं आपल्याजवळ एक दोन शिष्य बाळगिले होते, व त्या शिष्यांना बाहेर ठेवून ते स्वतः एखाद्या आंतल्या ओरीमध्यें अगर खोलीमध्यें बसत असत. कोणी परका मनुष्य आला, तर ते एकदम सहसा त्याची गांठ घेत नसत. तो कोण आहे, कशाकरितां आलेला आहे, वगैरे सगळी चौकशी पहिल्यानें आपल्या शिष्यांकडून करवून घेऊन नंतर मग जरूरीप्रमाणें ते त्याच्याशीं बोलत असत. स्वामी अभयानंद यांनीं आपल्या सभोंवतीं अशा प्रकारचे कडक चौकी पहारे निर्माण करून ठेविले असल्यामुळें ते सगळे चौकी पहारे ओलांडून एकदम स्वामीकडे जाणें गणपतीभय्याला अशक्य झालें. त्याला स्वामींचा शोध लागला. पण स्वामींची प्रत्यक्ष गांठ पडेना, स्वामींच्या मधल्या शिष्यांनींच त्याला रोखून धरलें व तुमचें स्वामींपाशीं काय कामकाज आहे, वगैरेबद्दल चौकशी केली. त्यांत झांशीचे कोणी एक जहागीरदार, भय्यासाहेब, यांच्या ठावठिकाणाबद्दल आपल्याला कांहीं माहिती पाहिजे आहे, असें गणपतीभय्यानें सांगितलें. तें ऐकून शिष्यांपैकीं एकानें त्याला सांगितलें कीं, " या वेळीं स्वामींची गांठ पडणें शक्य नाहीं. पण तुला जर त्या झांशीच्या जहागीरदारासंबंधानेंच माहिती पाहिजे असेल, तर ती स्वामींच्या तोंडून आम्हीही ऐकलेली आहे. आणि ती येथें पुष्कळ लोकांना माहित झालेली आहे. ती पाहिजे तर आम्हीही तुला सांगतों. "

" तुम्ही का माझ्यावर मेहेरबानी करा ना ! " गणपतीभय्यानें मोठ्या आशेनें उत्तर दिलें. " मला काय ? कोणीकडून तरी माहिती मिळाली म्हणजे झालें. स्वामींची जर गांठ पडण्यासारखी नसेल आणि तुम्ही जर मला ती माहिती सांगत असाल, तर तुमच्यापासूनही मी ती ऐकून घेण्याला उत्सुक आहें. तें जहागीरदार सुखरूप आहेत ना ? आणि हल्लीं ते कोठें आहेत ! "

" सुखरूप ? आणि हल्लीं ते कोठें आहेत ? " तो शिष्य अतिशय दीर्घ सुस्कारा टाकून आणि तोंड अतिशय वाईट करून म्हणाला. " बाबा, आतां ते कसले सुखरूप ? ते स्वर्गस्थ होऊन किती तरी दिवस झाले ! "

" काय? ते मरण पावले?" गणपतीभय्यानें अत्यंत दुःखानें आणि अत्यंत निराशेनें विचारलें.

" होय बाबा!" त्या शिष्यानें उत्तर दिलें. आणि अभयानंदस्वामींनी आपल्या स्वतःच्या पूर्वाश्रमींच्या मरणाबद्दलची बनावट हकीगत करीमबक्षाच्या टोळींतील ठगांना ठकविण्याकरितां बनविली होती, ती सगळी इत्थंभूत हकीगत त्या शिष्यानें गणपतीभय्याला सांगितली. ती ऐकून गणपतीभय्याला अतिशय वाईट वाटलें व तो अत्यंत निराश होऊन तेथून माघारा फिरला.

कोणीही मनुष्य भेटला तरी त्याला आधीं ही हकीगत सांगून सोडावयाची, ही आपल्या संरक्षणासाठीं अभयानंदस्वामींनीं जी पद्धत आपल्या शिष्यांना घालून दिलेली होती, त्या पद्धतीप्रमाणें त्यांच्या शिष्यांनीं आपलें पहिलें काम बजावलें. पण, पुढें त्यांच्या असें लक्षांत आलें कीं, जो झांशीच्या जहागीरदाराची माहिती विचारण्याकरितां आला होता, त्याला तूं कोण म्हणून आपण प्रश्न विचारणें जरूर होतें; आणि म्हणून ते त्याला परत हांक मारूं लागले. पण गणपतीभय्या निराशेने इतका ग्रस्त होऊन गेला होता कीं, त्यांच्याकडे लक्ष न देतां तो तसाच चालता झाला. आणि तो परत येण्याची टाळाटाळी करीत आहे, त्या अर्थी तो कोणी तरी ठगांपैकींच एखादा असावा, अशी त्यांची कल्पना झाली. व त्याला ही खोटी बातमी सांगून एका ठगालाही आपण ठकविलें, याजबद्दल ते आपल्या मनाशीं आनंद मानून घेऊं लागले.



: : ## रंग सत्ताविसावा

विंध्यवासिनीदेवीच्या नवरात्राच्या यात्रेकरितां जवळच्या आणि दूरच्या अशा सर्व ठिकाणचे असंख्य यात्रेकरू विंध्यवासिनीच्या क्षेत्रांत जमलेले होते, व नवीन नवीन यात्रेकरू दररोज आणखी येतच होते; त्यामुळें विंध्यवासिनीच्या देवळांतील पंड्ये लोकांची फारच धांदल उडून गेलेली होती. यात्रेकरूंच्या गाड्या दहा दहा कोस दूर आहेत, तोंच त्यांना तेथून गांठून आणावयाचे, त्यांचीं नांवें विचारावयाचीं, त्यांचे पूर्वज कोणी आले होते किंवा काय याबद्दल माहिती काढावयाची, आपल्या वह्यांत त्यांचा ठावठिकाणा सांपडतो किंवा नाहीं हें शोधून पहावयाचें, यात्रेकरूंना आपल्या घरीं नेऊन त्यांची जागेची व जेवणाची व्यवस्था करावयाची, त्यांचेकडून गंगास्नान, तीर्थविधि, देवीचें दर्शन, वगैरे त्यांचीं सर्व धर्मकृत्यें यथासांग करून द्यावयाचीं, वगैरे अनेक कामें करण्यांत विंध्यवासिनीच्या देवळांतील पंड्ये आणि त्यांचे गुमास्ते अगदीं गर्क होऊन गेलेले होते. अशा पंड्यांच्यापैकीं एका श्रीमंत पंड्याच्या घरीं नुकतेच कांहीं नवीन यात्रेकरू येऊन उतरले होते. त्यांत कांहीं वृद्ध आणि प्रतिष्ठित अशा स्त्रिया होत्या व कांहीं पुरुष मंडळी होती. त्यांच्याजवळच घरचा मालक, पंडया कालीकिशोर, हा एकामागून एक अशा आपल्या यजमानांच्या नांवांच्या वह्यांचीं पानें उलटीत आणि मधून मधून त्यांतील नांवें वाचून दाखवीत बसला होता. त्याचे गुमास्ते नवीन नवीन वह्या त्याच्यापुढें आणून ठेवीत होते आणि एका वहींत नांव सांपडलें नाहीं म्हणजे दुसरी वही घेऊन चाळावी, असा त्याचा क्रम चालला होता. तो नांवें वाचीत होता आणि जवळ ज्या एक वृद्ध श्रीमंत विधवा बाई बसल्या होत्या त्या भलतींच नांवें ऐकून "छे! हें नव्हे!" असें म्हणून त्या हातानें आणि मानेनेंही त्या नांवाबद्दल नकार प्रदर्शित करीत होत्या. असा प्रकार बराच वेळ चालला असतां मध्येंच त्या वृद्ध बाई म्हणाल्या, "हं, थांबा, हें नांव वाचा पाहूं फिरून!"

तें ऐकून पंड्या कालीकिशोर आपल्या चोपडींतील तें नांव आणि त्याच्या-संबंधींचा बाकीचा मजकूर वाचूं लागला: " श्रीमंत बाबासाहेब—पिते गोविंदराव—आजे गोपाळभट—वस्ती जालवण—मूळ वस्ती प्रांत कोंकण—जिल्हे विजय-दुर्ग—बंधु दोन, रावसाहेब व बाळासाहेब—पुत्र भय्यासाहेब—आम्ही श्रीविंध्य-वासिनीदेवीच्या दर्शनाला सालमजकुरीं आलों असतां पूर्वीचा आमच्या कुळांतील आमच्या पूर्वजांचा तुमच्या दप्तरींचा दाखला पाहून आम्हीही आपलें उपाध्येपण तुम्हांस दिलें आहे. व आमच्या पुत्रपौत्रादि वंशजांपैकीं जे कोणी श्रीजगदंबेच्या दर्शनाला येतील, तेही तुम्हांलाच आपलें उपाध्येपण देतील."

" पंड्याजीमहाराज, ठेवा या सगळ्या तुमच्या चोपड्या मिटवून! आम्ही दिलें तुम्हांला उपाध्येपण!" आपल्या डोळ्याला पदर लावून त्या वृद्ध बाईनीं त्या पंड्याला सांगितलें; आणि तेथून उठून त्यांची बाडबिछायत होती, तेथें एका कोपऱ्यांत जाऊन त्या रडत बसल्या. इतक्यांत दुसऱ्या एक सवाष्ण बाई त्यांच्याजवळ येऊन त्यांना विचारूं लागल्या; " काय झालें? तुम्ही अशा कां बसलां आहां? नाहीं कां नांव सांपडत? नाहीं सांपडलें तर नाहीं! हें काय? त्याकरितां कां तुम्हांला इतकें वाईट वाटत आहे? अहो, आणखी जरा शोधलें म्हणजे सांपडेल नांव!"

" अहो, नांव सांपडावयाचें अजून राहिलें नाहीं." त्या वृद्ध विधवा बाई म्हाणल्या, " नांव सांपडलें!—अगदीं बरोबर नांव सांपडलें!—अगदीं सगळ्या खाणाखुणा जमल्या! मागची पुढचीं भाऊबंदाचीं सगळी नांवें बरोबर जमलीं!—आणि तें सगळें ऐकून माझ्या मनांत जो दुःखाचा हुंदका आला तो माझ्यानें आवरेना."

" आतां नांव सांपडलें, मग रडायला काय झालें?" दुसऱ्या सवाष्ण बाई म्हणाल्या.

" अहो, तुम्हांला काय सांगूं?" ती विधवा बाई रडत रडत बोलूं लागलीं. " त्या चोपडींत तिकडच्या हातचा जो मजकूर लिहिलेला आहे, तो ऐकून माझ्या पोटांत खळबळूं लागलें. मागच्या पिढ्यांचीं आणि भाऊबंदांचीं नांवें लिहून झाल्यावर पुढें पुत्र म्हणून माझ्या भय्यासाहेबाचें लिहिलेलें नांव आहे! तें ऐकून माझ्या भय्यासाहेबांची मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें साद्यंत उभी राहिली!—तेंही मी सहन केलें!—पण त्याच्यापुढें लिहिलेलीं अक्षरें माझ्या कानावर पडलीं, तेव्हां माझ्या

डोळ्यांतील अश्रु कांहीं केल्यानें आंतल्या आंत थांबेनात!—अहो, पुढें काय लिहिलेलें आहे, हें तुम्हांला ठाऊक आहे का?—त्यांत असें म्हटलें आहे कीं, ‘ आमच्या पुत्रपौत्रादि वंशजांपैकीं जे कोणी श्रीजगदंबेच्या दर्शनाला येतील तेही तुम्हांलाच—!’ याच्यापुढील शब्द दुःखातिरेकानें त्यांच्यानें उच्चारवेनात! त्यांचें समाधान करीत त्यांच्याजवळ बसलेल्या त्या सवाष्ण बाईच्या गळ्याभोंवतीं हात टाकून त्या मोठ्यामोठ्यानें रडूं लागल्या; आणि रडतां रडतां कांहीं वेळानें फिरून म्हणाल्या, “ काय माणसांचे विचार असतात! आणि काय त्यांच्या आशा असतात! या क्षणभंगुर जगांत जेथें उद्यांचा देखील भरंवसा नाहीं, तेथें वेडीं माणसें आपल्या पुढील पिढ्यान् पिढ्यांच्या गोष्टी लिहून ठेवीत असतात! आमच्या पुत्रपौत्रादि वंशजांपैकीं जे कोणी श्रीजगदंबेच्या दर्शनाला येतील, असें तिकडून लिहून ठेवावयाचें झालेलें आहे!—पण काय? आमच्यापैकीं देवीच्या दर्शनाला कोण येणार?—देवीचा आमच्यावर रोष झालेला आहे! देवी आमच्या कुळावर कोपली आहे! तिच्या कोपामुळें आमच्या वंशाचा वेल करपून गेला! आमच्या वंशाची नक्कल झाली!—अहो, तुम्ही लिहून ठेविलेंत पुत्रपौत्रादि म्हणून! पण जेथें पुत्रालाच ठिकाण नाहीं तेथें पौत्र कोठून येणार!—पुत्र नाहीं, पौत्र नाहीं, वंश नाहीं, कांहीं नाहीं! आपलें नांवही आणखी दहा वर्षांनीं कोणाला माहित असणार नाहीं! तिकडे आई जगदंबेच्या दर्शनाला—विंध्यवासिनी-ला यावयाचें होतें, त्या वेळेला, मला आठवतें, मला बरोबर न्या म्हणून मी पाठीस लागलें होतें! पण मला सांगावयाचें झालें कीं, तुझा हा चिमुकला भय्या अजून लहान आहे, त्याला आणि तुला जंगलांतील प्रवास सोसणार नाहीं, आणि शिवाय वाटेंत लढाईचाही मामला आहे, म्हणून तूं येऊं नकोस! आणि तिकडून परत आल्यावर मला सांगावयाचें होतें कीं, आपल्या विंध्यवासिनीच्या उपाध्याच्या वहींतील वंशावळीमध्यें आपल्या चिमुकल्या भय्याचें मी नांव लिहून ठेविलें आहे! तेव्हां आमचा भय्या खरोखरच किती तरी लहान होता. पण इतक्या लहानपणीं त्याचें नांव लिहितांना तिकडे वाटलें असेल काय, कीं मोठेपणीं आपल्या भय्यावर हा प्रसंग येईल!—कोठें आहे? तो आपला भय्या कोठें आहे!—अहो, तुम्ही लिहून ठेविलें आहे ना, कीं आपले पुत्रपौत्रादि वंशज श्रीजगदंबेच्या दर्शनाला येतील आणि ते अमुक अमुक करतील!—मग ते कोठें आहेत? सारा भ्रम! सारे पाण्याचे बुडबुडे!— ”

" बाईसाहेब ! बाईसाहेब ! " आपल्या सगळ्या वह्या बांधून नीट ठेवून झाल्यावर हातांत पळी-पंचपात्री घेऊन कालीकिशोर पंडया लगबगीनें हांका मारीत मारीत म्हणाला, " बाईसाहेब, चला, चला, गंगाजीच्या स्नानाला चला; नाहीं तर मग देवीच्या दर्शनाला आपल्याला उशीर होईल. "

पंडया कालीकिशोर हा आपल्याला गंगास्नानाला जाण्यासाठीं हांका मारीत आपल्याकडे येत आहे असें पाहून आपला शोक त्याच्या दृष्टीस पडूं देणें योग्य नाहीं असें लक्षांत आणून, त्या बाईनीं आपलें रडें आंवरून धरून सर्वांनीं गंगेवर जाण्याची तयारी केली, आणि आपल्या पंडयाच्या पाठीमागून ती सर्व मंडळी गंगेच्या घाटावर स्नानाकरितां गेली.

भय्यासाहेबांचे श्वशुर रामचंद्रराव आणि त्यांच्या पत्नी यांचा विंध्यवासिनीला येण्याचा पुष्कळ दिवसांचा मनोदय होता. व त्याप्रमाणें त्यांनीं झांशीस भय्यासाहेबांच्या आईलाही कळविलें होतें; व त्यांचाही त्याप्रमाणें येण्याचा मानस होता. पण निघतां निघतां हे दिवस आले. अखेरीस भय्यासाहेबांची आई, त्यांच्या पदरचे एक शास्त्रीबुवा, एक कारकून, कांहीं नोकर चाकर, तसेंच भय्यासाहेबांचे श्वशुर आणि सासुबाई, वगैरे मंडळी या नवरात्राच्या सुमाराला पूर्वीं सांगितल्याप्रमाणें कालीकिशोर पंडयाच्या घरीं येऊन उतरली होती. वर सांगितलेल्या प्रसंगोपात्त कारणामुळें भय्यासाहेबांच्या आईच्या मनामध्यें उत्पन्न झालेला दुःखातिरेक त्यांनीं बाह्यात्कारीं थोडासा आवरून धरला व ती सर्व मंडळी गंगेवर स्नानाला गेली.

भय्यासाहेबांच्या आईनें गंगेवर जाण्यासाठीं बाहेर निघण्याच्या वेळीं बाह्यात्कारीं जरी आपल्या मनावर विवेकाचें थोडेसें पांघरूण घातलें होतें, तरी तिच्या पोटांत पुत्रवात्सल्यानें पेटलेली आग खरोखर पाहिलें तर मुळींच शांत झालेली नव्हती. डोळे रडून रडून लाल झाले होते, अंगाचा कंप गेला नव्हता, डोळ्यांतून अश्रु गळतच होते, आणि रामचंद्ररावांच्या पत्नीनें—त्यांच्या विहिणीनें—त्यांचा हात धरिला होता म्हणूनच केवळ त्या रस्त्यानें अडखळल्यावांचून चालूं शकत होत्या. पण अशा रीतीनें चालतां चालतां थोडयाच वेळांत गंगेचें पात्र दिसूं लागलें ! तें पाहून सर्वांना आनंद झाला. भय्यासाहेबांच्या आईला अनिवार दुःख झालेलें होतें; पण त्यांनींही जेव्हां डोळे उघडून गंगेकडे पाहिलें, तेव्हां

त्यांनाही त्यांच्या दुःखाचा विसर पडला आणि त्यांचें मन आल्हादित झालें. असें कोणतें दुःख आहे कीं, जें गंगेच्या दर्शनानें नाहींसें होणार नाहीं ?

तरी आज गंगेचें रोजच्यासारखें शांत स्वरूप नव्हतें. गंगेचें पाणी गेल्या रात्रीपासून बरेंच वाढलें होतें आणि गंगा दुथडी भरून चालली होती. वाळवंटांत साधु, महंत, बैरागी, गोसावी, वगैरे यात्रेकरूंचे जे अनेक फड लागलेले होते, ते गंगेचें पाणी वाढत आहे, असें दिसूं लागल्याबरोबर हलवण्यांत येऊन सर्व यात्रेकरू उंचवट्याच्या ठिकाणावर आपले तळ देऊन राहिले होते. गंगेच्या पाण्याचा रंग अगदीं लाल होऊन गेला होता. आणि तिची नेहमींची शांत वृत्ति नाहींशी होऊन एखाद्या रागाच्या मनोविकाराप्रमाणें तिच्या पोटांतून मोठमोठ्या लाटा उसळत होत्या. असा तो देखावा फार भयंकर दिसत होता.

* * *

याच वेळीं दुसऱ्या कोठें तरी आणि फार दूर अंतरावर पण त्याच गंगानदीच्या कांठावर अगदीं एकीकडे गंगाबाई एकटीच उभी होती. यात्रेकरूंच्या गर्दीचा जेथें संपर्कसुद्धां येऊन पोहोंचणार नाहीं अशा एका दूर ठिकाणीं ती मुद्दामच गेलेली होती. ती जेथें उभी होती, तेथून गंगेची दरड एकदम तुटून त्यामुळें तेथील पात्र किती तरी खोल दिसत होतें. जवळपास कोणीही मनुष्य नव्हतें. गंगाबाईला जरी माहीत नव्हतें, तरी वास्तविक ती जागा स्मशानाची होती. त्यामुळें तेथें फारसें कोणी मनुष्य त्या वेळीं नसणें हें साहजिकच होतें. ती जेथें उभी होती, त्याच्या आसपास जमिनीवर किती तरी लहान मोठे दगड-धोंडे व हाडकें पसरलेलीं होतीं. ती एकदां त्या धोंड्यांकडे पाही आणि एकदां त्या गंगेच्या खवळलेल्या पात्राकडे पाही ! पुरामुळें गंगेचें पाणी अगदीं लालभडक रक्तासारखें होऊन गेलें होतें. आणि तुफानी समुद्राच्यासारख्या गंगेच्या लाटा किनाऱ्यावर येऊन आदळत होत्या. पाण्याच्या खळखळाटाचा आवाज इतक्या मोठ्यानें चालला होता कीं, तो दोन चार कोसांवर देखील ऐकूं जात असला पाहिजे. गंगाबाई ज्या किनाऱ्यावर उभी होती, त्या किनाऱ्याची दरड जरी उंच होती, तरी समोरच्या बाजूचा किनारा बराच सखल असल्यामुळें गंगेच्या पुराचें पाणी तिकडच्या बाजूला किती तरी लांबवर पसरलें असून त्यांत शेतें, शेतांचीं कुंपणें, लहानमोठीं झाडें आणि गरीब लोकांचीं घरें बुडून जाऊन जिकडे तिकडे जलमय

झालें होतें. नदीच्या पात्रांतून वरून किती तरी मोठमोठालीं झाडेंमाडें वाहून येत होतीं. आणि मधून मधून माणसाच्या डोक्यासारखें कांहीं वाहत चाललें असावें असाही पुष्कळ वेळां भास होई! हा देखावा पाहून गंगाबाई आपल्या मनाशीं म्हणाली, "अहाहा! किती ही चांगली संधि आहे! अशी सामग्री कोणी मुद्दाम मिळवूं म्हणेल तरीही कधीं मिळणार नाहीं! ती माझ्या दैवयोगानें अगदीं मला पाहिजे त्या वेळीं कांहीं एक प्रयत्न न करितां अनायासानें मला लाभली आहे! केवढी ही माझ्यावर गंगेची कृपा! ज्या गंगेनें आजवर माझें लालनपालन केलें, तीच आज माझ्या मरणाचीही अशा रीतीनें तयारी करून देत आहे, हें योग्यच आहे! मी दुसऱ्या कोठें असतें, तर गोष्ट वेगळी. पण या गंगेसारख्या मोक्ष-दात्रीच्या जवळ असतांना मी विष खाऊन किंवा गळफांस लावून कशाला मरूं! म्हणून, आई गंगे, तूं आतां मला आपल्या पोटांत घे! मी आतां जगून काय करणार? नवज्वरानें अरण्यांत तिकडचा अंत झाला, ही गणपतीभय्यानें स्वामींच्या मठांतून बातमी आणल्यानंतर आतां मला या जगांत जगून काय करावयाचें आहे? फक्त गणपतीभय्यानें आणलेल्या बातमीमध्येंही अजून मला कांहीं शंका राहिल्या आहेत, म्हणून मी त्याला परत तिकडेच पाठविलें आहे. त्यांत मला अजून आशा वाटत आहे. आणि माझा चांगल्या शकुनाचा डावा डोळा एकसारखा लवत आहे. आणि त्याच्या निमित्तानें माझी आई जगदंबा मला प्रत्येक क्षणीं आश्वासन देत आहे कीं, गंगाबाई, तूं धीर सोडूं नकोस. म्हणून त्या आशेवर माझा जीव गुंतून राहिला आहे. आणि शिवाय असें कीं, जर ते नवज्वरानें अरण्यामध्यें वारले, तर माझ्या गळ्यांतली ती मोत्याची आणि जडावाची मोहनमाळ या संन्याशाजवळ कोठून आली? याचा उलगडा झाल्यावांचून माझ्या मनाला कांहींच खात्री पटत नाहीं. म्हणून ती माळ आणि त्याशिवाय आणखीही कांहीं दुसऱ्या खुणेच्या जिनसा देऊन मी गणपतीभय्याला फिरून पाठविलें आहे. त्याचा निकाल झाला आणि माझें नशीब फुटलेलें आहे असेंच जर त्या निकालांत ठरलें, तर, हे माझे आई गंगे, रात्रीं मी फिरून या ठिकाणीं येईन! त्या वेळीं तूं मला आपल्या पोटांत घे! पाप न लागतां आत्महत्या करण्याला, गंगाबाई, तुझ्यासारखें पवित्र स्थान दुसरें कोठें मिळणार आहे? आणि किती ही सामग्रीची सिद्धता झालेली आहे! तुला हा किती तरी मोठा पूर आलेला आहे! तुझें पाणी किती लालभडक झालें आहे! आणि किती दूरवर पसरलेलें आहे! तुझ्या या किती मोठ्या लाटा! आणि त्यांचा

हा किती मोठा खळखळाट! या तुझ्या आजच्या एकाएकीं आलेल्या महापुरामध्यें शेंकडों माणसें वाहून गेलीं असतील! त्यांत माझी एकटीची काय कथा? या तुझ्या किनाऱ्यावरील कोणताही एखादा दगड मी आपल्याबरोबर सोबतीला घेतला, म्हणजे तो मला नेमका तुझ्या पोटांत नेऊन सोडील! आणि तुझ्या पोटांत लीन होण्याची माझी इच्छा तो तृप्त करील! या सर्व कांहीं भयानक गोष्टी माझा भयानक विचार शेवटास नेण्याला आतांही सिद्ध आहेत; पण भयानक रसाची मुख्य जन्मदात्री जी मेघपटलांनीं काळीकुट्ट झालेली मध्यरात्र, ती या वेळीं नाहीं! म्हणून मी तोंपर्यंत मुद्दाम तिची वाट पहात थांबणार आहें! आतां मी ही सगळी जागा पाहून ठेविली आहे. आणि माझ्या निराशेनें आजच्या मध्यरात्रीं मला येथें आणलें, तर तोंपर्यंत, हें जाह्नवी, हें तुझें सगळें उग्र आणि भयानक स्वरूप तूं कायम ठेव! मी येथून—या किनाऱ्यावरून—तुझ्या पाण्यांत उडी टाकीन! त्या वेळीं, आजपर्यंत तुझ्या प्रवाहांत जीव देऊनहि गतीला गेल्यावांचून राहिलेल्या पापी माणसांचीं भुतें पाण्याच्या पृष्ठभागावर आपलीं अकाळविकाळ डोकीं काढून माझें स्वागत करण्याकरितां आपले थंडीनें सडून सडून चाललेले हात पुढें काढतील आणि मोठ्यानें किंचाळ्या फोडून मला आपल्यामध्यें येण्यासाठीं बोलावतील, त्या वेळीं, ही आत्महत्या करणारी पापीण नसून पुण्यवान पतिव्रता स्त्री आहे असें सांगून तूं त्यांच्यापासून माझें संरक्षण कर, आणि स्वर्गलोकांत माझी आणि माझ्या पतीची फिरून गांठ घालून दे! हेंच माझें तुझ्यापाशीं मागणें आहे!”

असें म्हणून गंगाबाई तेथून परत फिरली. परत येतांना तिची चित्तवृत्ति अगदीं चमत्कारिक आणि एखाद्या भ्रमिष्ट माणसासारखी झालेली होती. तिचें डोकें ठिकाणावर नव्हतें आणि तिच्या पावलाखालची जमीन तिच्या डोळ्यांना दिसत नव्हती. आपला पति मरण पावला असून मी आतां विधवा झालें आहे, या विचारानें तिचें डोकें भणाणून गेलें होतें व ती अगदीं वेड्यासारखें करूं लागली होती. त्या स्थितींत तिला नारायणराव पेशव्यांच्या गंगाबाईची आठवण झाली. आणि लहानपणीं मैत्रिणींच्याबरोबर झोंपाळ्यावर बसून ज्या ओव्या ती परदुःखाच्या सहानुभूतीनें म्हणत होती त्या नारायणरावाच्या आणि गंगाबाईच्या संबंधींच्या ओव्या ती या वेळीं आपल्या स्वतःला अनुलक्षून रस्त्यानें जातांना हळूहळू वेड्यासारखी आपल्याशींच म्हणूं लागली. त्या वेळीं त्या ओव्या ऐकण्याला तेथें जर कोणी

असतें, तर खरोखरच त्यांतील करुणरसानें त्याला तत्काळ मूर्च्छाच आणली असती ! गंगाबाई ओव्यांतील जे कांहीं कांहीं मधले मधले शब्द वाटेनें बडबडत चाललेली होती, ते शब्द एकत्र जुळविले असतां त्यापासून होणाऱ्या ओव्या पुढील-प्रमाणें होत्याः—

**" नारायणरावाला मारिला । मागल्या वेशीशीं**
**गंगाबाई माहेराशीं । गेली होती ॥**
**नारायणरावाला मारिला । मुर्दा ठेविला झांकुनी ।**
**आली माहेर टाकुनी । गंगाबाई ॥**
**नारायणरावाला मारिला । गंगाबाई गरभार ।**
**नवा भरिला दरबार । रघुनाथरावांनीं ॥**
**नारायणरावाला मारिला । गंगाबाई रडे ।**
**आनंदीबाईनीं पेढे । वांटीयेले ॥ "**

* * *

गणपतीभय्या ज्या दिवशीं पहिल्यानें स्वामींच्याकडे चौकशी करण्याकरितां आला आणि शिष्यांनीं सांगितलेली माहिती ऐकून परत गेला, त्याच्या आदल्या दिवशींच्या रात्रीची गोष्ट. स्वामी अभयानंद तिनसांजांच्या वेळीं कांहीं कामा-करितां बाहेर चालले होते. त्या वेळीं मठांतील एक शागीर्द दिवा लावून कांहीं शोधीत होता असें त्यांना आढळलें. पण ते बाहेर जाण्याच्या घाईत असल्यामुळें त्यांनीं त्याला विचारलें नाहीं. पुढें चांगल्या एक घटकाभर अवकाशानें स्वामी बाहेरून परत आले, तरी हा आपला दिवा घेऊन शोधीतच होता; तेव्हां स्वामींना आश्चर्य वाटून त्यांनीं त्याला विचारलें, " काय रे, तूं एवढा वेळ दिवा लावून काय शोधीत आहेस ? " त्यावर त्यानें सांगितलें कीं, " स्वामीमहाराज, मघाशीं माझी येथें कोठें तरी एक अंगठी पडली, ती मी शोधीत आहें. "

हीं प्रश्नोत्तरें अगदीं सहजगत्या होऊन गेलीं. त्यांतील प्रश्न विचारतांना किंवा त्याचें उत्तर ऐकतांना स्वामींना कांहींच वाटलें नाहीं. पण पुढें मात्र या स्वाभाविक प्रश्नोत्तरांचा स्वामींच्या मनावर फार परिणाम झाला. स्वामी एकांतांत जाऊन बसल्यावर त्यांच्या मनांत नेहमींच्याप्रमाणें अनेक विचार घोळूं लागले आणि

त्यांत त्यांना आपल्या उद्योगहीनतेबद्दल अतिशय वाईट वाटूं लागलें! ते म्हणाले:- " माझ्यानें स्वस्थ बसवतें तरी कसें!—या इसमाची एक यःकश्चित् अंगठी हरवली आहे, तर ती हा एकसारखा घटकाभर शोधीत आहे! आणि माझी एवढी बायको हरवली असून तिचा पत्ता लावण्याकरितां मी कांहीं एक न करितां येथें स्वस्थ बसलों आहें, याचा अर्थ काय? त्याची अंगठी इतकी का महत्त्वाची आहे! तिच्यापेक्षां माझी प्रिय पत्नी लाख पटीनें मला अधिक आहे! तरी पण मी स्वस्थ बसलों आहें! पण हें कांहीं ठीक नव्हे. मी सुद्धां कांहीं तरी प्रयत्न केला पाहिजे."

इतक्यांत जो शागीर्द आपली अंगठी शोधीत होता, त्याला ती सांपडली; व स्वामी आपल्याला विचारीत होते म्हणून त्यांना ही बातमी सांगावी अशा हेतूनें त्यानें स्वामींच्या जवळ येऊन अंगठी सांपडली, असें सांगितलें. हें सांगून तो गेल्यावर स्वामी फिरून आपल्या मनाशीं म्हणाले, " त्याची अंगठी जशी सांपडली, त्याप्रमाणें कदाचित् माझी पत्नीही सांपडेल. नाहीं कशावरून? पण मी त्याकरितां कांहीं तरी प्रयत्न केले पाहिजेत, हें खास."

त्यांच्या चित्तवृत्तीमध्यें हा फरक झाल्यानंतर त्यांच्या मनांत आणखी अशीही एक कल्पना आली कीं, या नवरात्राकरितां येथें निरनिराळ्या ठिकाणांहून एवढी मोठी लाखों लोकांची यात्रा आली आहे, त्यांत कदाचित् कोणी आपल्या झांशीचे यात्रेकरू आले नसतील कशावरून? तेव्हां कोणी तसाच यात्रेकरू भेटला, तर त्याच्याशीं झांशीच्या यात्रेकरूंबद्दल चौकशी करून कांहीं शोध लागल्यास तो काढण्याचा त्यांनीं निश्चय केला.

त्यानंतर दुसरे दिवशीं सकाळीं—कोणी एक इसम येऊन आपल्यापाशीं झांशीचे जहागीरदार भय्यासाहेब यांच्याबद्दल चौकशी करीत होता व ते जंगलांत नवज्वरानें वारल्याबद्दलची आपली ठराविक हकीगत आपण त्याला सांगितली,—ही झालेली गोष्ट स्वामींच्या शिष्यांनीं स्वामींना सांगितली. व तो इसम बहुतकरून ठगांपैकींच कोणी तरी असून त्याच्या हातावर आपण चांगल्या तुरी दिल्या हा आपला ग्रहही शिष्यांनीं स्वामींना सांगितला. तें ऐकून स्वामींची चित्तवृत्ति द्विधा झाली. आपली चौकशी करण्याकरितां फिरून हा कोणी तरी दुसरा ठग आला असेल कीं काय या विचारानें त्यांना थोडीशी भीति वाटली; आणि आपल्या नातेवाईकांपैकीं कोणी आपला शोध करण्याकरितां पाठविलेला हा कोणी तरी इसम

चांगल्या हेतूनें आपल्याकडे आलेला असेल कीं काय, अशा कल्पनेनें त्यांच्या मनाला आशा वाटूं लागली; व आपल्या खऱ्या माहितीच्या ऐवजीं आपण उठविलेली खोटी बातमी ऐकूनच तो परत गेला, याबद्दल त्यांना वाईट वाटूं लागलें. अशा भिन्नभिन्न प्रकारच्या कल्पनांच्या कात्रींत सांपडलेल्या त्यांच्या मनाला बिलकूल चैन पडेनासें झालें. तो मनुष्य फिरून येऊं नये असें एकदां त्यांना वाटे, तर तो फिरून आपल्याकडे येईल काय, अशा उत्कंठेनें त्यांचें मन चंचल होई. आणि तो आलाच तर त्याला आपण भेटावें किंवा न भेटावें, याबद्दलही त्यांच्या मनाचा निश्चय होईना. तो आला तर एकदम त्याला घालवून द्या असें एकदां त्यांनीं शिष्यांना सांगितलें, तर फिरून त्याला एकदम मजकडे घेऊन या, अशी दुसरी आज्ञा त्यांनीं दिली. त्यामुळें आपण काय करावें हें शिष्यांना मुळींच समजेना. अशा अनिश्चित अवस्थेंत त्यांचा पुष्कळ वेळ गेला. त्यांच्या नित्यकर्मांत त्यांचें लक्ष लागेना. त्यांचें डोकें दुखूं लागलें. आचार्यांकडून मध्यंतरीं कांहीं कामाकरितां त्यांना बोलावणें आलें होतें, पण तिकडेही ते जाऊं शकले नाहींत. त्यांच्या मनाची अस्वस्थता फार वाढली होती. आणि म्हणून ते पडून राहिले होते. बऱ्याच वेळानें त्यांचा एक शिष्य त्यांना उठविण्याकरितां आला. " स्वामीमहाराज, स्वामीमहाराज, सकाळीं जो मनुष्य आला होता, तोच फिरून आला आहे! हा मोठा निर्लज्ज आणि धीट चोर दिसतो! एकदां घालवून लाविला, तरी फिरून येण्याला याला भीति कशी वाटत नाहीं?—आपलें नांव गणपतीभय्या आहे, असें तो सांगतो. चोरांना नांवें बदलून येतां येत नाहीं, असें नाहीं.—आपण सांगितलें, तर त्याला आपल्याकडे घेऊन येतों. नाहीं तर त्याला आम्ही हांकलून लावितों."

" थांब, हांकलून लावूं नको." स्वामी उठून बसले व हळुहळू म्हणाले, " पण मला आधीं हें सांग पाहूं! तो दिसतो आहे कसा?"

" तो दिसतो तर आहे अगदीं एखाद्या सावासारखा." शिष्यानें उत्तर दिलें. " पण चोरांना सावासारखें दिसतां येत नाहीं कीं काय?"

" पण तो प्रत्यक्ष चोर आणि ठगांच्या टोळींतील ठग असला, तरी मी त्याची गांठ घेणारच. एक कांहीं तरी निश्चय केला पाहिजे." अनिश्चित मनानें स्वामी म्हणाले, " माझी कट्यार, गुप्ती वगैरे हत्यारें कोठें आहेत, तीं माझ्याजवळ

येथें आणून ठेव. तुम्हीही बाहेर गाफील असूं नका. आणि तुमचा सगळा बंदोबस्त बाहेर पुरा झाला म्हणजे त्याला आंत घेऊन ये."

स्वामींच्या आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यावर गणपतीभय्याला स्वामींच्या समोर नेण्यांत आलें. गणपतीभय्यानें आपल्या बगलेंतील गाठोडें बाजूला ठेवून स्वामींना साष्टांग प्रणिपात घातला. स्वामींनीं 'नारायण' म्हणून आशीर्वाद दिला. मी प्रयागचा राहणारा, माझें नांव गणपतीभय्या असून यात्रेकरितां मी येथें आलों आहें, अशी कांहीं वरवरची सामान्य आणि प्रास्ताविक माहिती आपल्यासंबंधानें गणपतीभय्यानें सांगितली.

त्यानंतर स्वामींनीं त्याला विचारलें, "आज सकाळीं तुम्ही येथें आलां होतां?"

"होय." गणपतीभय्यानें सांगितलें. "झांशीचे जहागीरदार, भय्यासाहेब, यांच्यासंबंधानें कांहीं चौकशी करण्याकरितां मी येथें आलों होतों. पण ते जंगलांत नवज्वरानें आपल्या समक्ष वारल्याची हकीगत आपल्या शिष्यांकडून कळली, म्हणून मी माघारा गेलों."

"मग आतां फिरून परत येण्याचें कारण काय?" स्वामींच्या चेहऱ्यावर भीति, आश्चर्य, उत्सुकता, इत्यादि अनेक मनोविकार या वेळीं उमटत होते. पण ते सगळे दाबून ठेवण्याचा प्रयत्न करीत करीत स्वामींनीं विचारिलें.

"परत येण्याचें कारण असें कीं," आपल्या बंडीच्या आंतल्या कप्प्यामधून मोत्यांची आणि जडावाची एक माळ बाहेर काढीत काढीत गणपतीभय्या म्हणाला, "झांशीचे जहागीरदार, भय्यासाहेब, हे जर मरण पावले, तर ही त्यांची मोत्यांची आणि जडावाची माळ आपल्याजवळ कशी आली?"

ती माळ पाहिल्याबरोबर स्वामींची पांचावर धारण बसली. आपल्या लटलट कांपत असलेल्या हातांमध्यें गणपतीभय्याजवळची माळ घेऊन तिच्याकडे पहात असतां स्वामी आपल्या मनाशीं म्हणाले, "ही माळ! ही माळ माझ्या प्रियेची! ही तर माझ्याजवळ होती! आणि माझ्या गळ्याभोंवतीं ज्या ठगानें आपला रुमाल टाकिला होता, त्यानेंच बहुतकरून माझ्याजवळचें दागिन्यांचें जें गाठोडें चोरून नेलें त्यांत ही मोत्यांची माळ होती. मग त्यानें चोरलेली माळ ह्याच्यापाशीं कशी आली? अर्थात् हा देखील त्या ठगांच्या टोळीपैकीं कोणी तरी एक ठग असला पाहिजे, हें उघड आहे, आणि मी खरा संन्यासी नसून माझें खरें स्वरूप काय आहे हेंही ह्याला समजलेलें असलें पाहिजे. तेव्हां आतां याची उपेक्षा करून

उपयोगी नाहीं." असा विचार मनांत आणून स्वामींनीं त्याला फिरून विचारलें, "काय म्हणतां? ही मोत्यांची माळ माझ्याजवळ कशी आली? पण माझाच तुला उलट असा प्रश्न आहे कीं, ही मोत्यांची माळ तुझ्याजवळ कशी आली? अरे चोरा, काय खरें आहे तें सांग; नाहीं तर तुझी आतां धडगत नाहीं." असें म्हणून स्वामींनीं आपल्याजवळ ठेवलेली आपली कट्यार म्यानांतून बाहेर काढली आणि ते त्याच्या अंगावर धांवून गेले. असा प्रसंग ओढवेल अशी गणपतीभय्याला कांहींच कल्पना नव्हती. त्यामुळें तो अगदीं घाबरून गेला व तेथून निसटून जाण्याचा प्रयत्न करूं लागला. गणपतीभय्या पुढें पळूं लागला आणि स्वामी हातांत कट्यार घेऊन त्याला पकडण्याकरितां त्याच्या पाठीमागें धांवूं लागले. त्या गडबडीचा इषारा मिळाल्यामुळें स्वामींच्या शिष्यांनींहि आपलीं हत्यारें बाहेर काढलीं. पण आपला जीव बचावण्यासाठीं गणपतीभय्यानें इतकी कांहीं चलाखी केली, कीं तो त्या सगळ्यांच्या हातून निसटून यात्रेच्या गर्दींत जाऊन मिसळला. त्याचा पाठलाग करण्याकरितां स्वामींनीं आपला एक शिष्य पाठविला. पण त्या गर्दींत त्याचा कांहीं तपास लागला नाहीं. तेव्हां थोडेसे निराश होऊन स्वामी अभयानंद परत आपल्या खोलीमध्यें आले. खोलींत येऊन पहातात तों पळून जाण्याच्या धांदलींत गणपतीभय्याचें राहिलेलें एक गाठोडें त्यांना दिसलें! तेव्हां त्यांत काय आहे हें उघडून पाहण्याची त्यांना साहाजिकपणें उत्सुकता झाली. या गाठोड्यांत ज्या जिनसा असतील त्यांवरून हा इसम कोण असावा याच्याबद्दल आपल्याला कांहीं तरी अनुमान बांधतां येईल, अशा हेतूनें त्यांनीं तें गाठोडें सोडण्याला सुरुवात केली. गंगाबाईनें गणपतीभय्याला जेव्हां स्वामींकडे पाठविलें, तेव्हां त्याला नीट पढवून पाठविलें होतें आणि कांहीं सुगावा लागत चालला, तर आणखी कांहीं जास्त खुणा पटण्यासाठीं म्हणून गंगाबाईनें आपली शालजोडी त्या गाठोड्यांत बांधून गणपतीभय्याच्याबरोबर जसा प्रसंग येईल त्याप्रमाणें उपयोग करण्याच्या उद्देशानें दिलेली होती. तें गाठोडें सोडल्यानंतर त्यांत दिसणारी ती शालजोडी पाहून स्वामी आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन गेले आणि त्यांना हा प्रकार काय आहे हें कांहींच समजेना. ते म्हणाले, "ही शालजोडी आमची! ही नेहमीं माझ्या प्रियेच्या अंगावर असे! ज्या दिवशीं आम्हांला जंगलांत चोरांनीं लुटलें, त्या दिवशीं आम्ही निजलों तेव्हां पांघरण्याकरितां मी आपल्या हातानें ही शालजोडी आपल्या प्रियेच्या अंगावर घातलेली होती! तीच

ही शालजोडी!—ही शालजोडी तीच!—पण ही जिच्या अंगावर मी पांघरूण म्हणून घातलेली होती, ती माझी प्रिया कोठें आहे?—तिची काय अवस्था झाली असेल?—तिची आणि तुझी केव्हांपासून ताटातूट झाली? तिला तूं कोठें सोडलीस? जिच्या अंगावर असल्यामुळें तुला जास्त शोभा येत होती, ती माझी प्रिया जिवंत आहे ना? ती कोठें आहे? तिनें का तुला माझ्याकडे पाठविलें आहे? पण ह्या निर्जीव शालजोडीला मी कितीहि विचारलें, तरी ती का बोलणार आहे! पण ही येथें आली कशी? हा काय योगायोग आहे? आणि ज्यानें ही शालजोडी येथे आणली, तो कोण मनुष्य? माझ्याजवळ जी मोत्यांची मोहनमाळ होती, ती त्या ठगानें चोरली आणि तीच माळ फिरून या इसमाजवळ दिसली, म्हणून मी ह्याला त्या ठगांच्या टोळीपैकींच एक असें समजून आपलें शस्त्र उपसून मारावयाला धांवलों आणि त्याला येथून घालवून लाविलें; पण त्याच्याच गाठोड्यांतून ही माझ्या प्रियेची शालजोडी निघाली! तो गेला नसता, तर हा काय प्रकार आहे हें त्याला विचारतां तरी आलें असतें. ही माळ, ही शालजोडी, ह्या खुणेच्या जिनसा माझी ओळख पटवून घेण्याकरितां कोणी तरी माझ्याकडे मुद्दाम पाठवीत असलें पाहिजे हें खास! करीमबक्षाचे ठग एक तर माझ्या पाळतीवर असले पाहिजेत, किंवा या लाखो लोकांच्या यात्रेच्या गर्दीत माझी प्रिया तरी मला हुडकून काढण्याचा प्रयत्न करीत असली पाहिजे! याच्याशिवाय तिसरी कल्पना शक्य नाहीं. आतां या दोहोंतून माझें दैव मला सकटांत नेऊन लोटणार किंवा सुखसमुद्रांत निमग्न करणार हें ठरावयाचें राहिलें आहे. असो; माझ्या प्रियेचा मला जेव्हां समागम होईल तेव्हां होवो, पण तिच्या शरीराच्या चिरसमागमाचें सौख्य जिला लाभलेलें आहे त्या ह्या शालजोडीचा आज माझ्या अंगाला स्पर्श होत आहे, यानेंच मला किती तरी आनंद होत आहे!" असें म्हणून तिचें चुंबन घेऊन स्वामींनीं ती शालजोडी आपल्या अंगावर पांघरून घेतली.

* * *

इतर यात्रांपेक्षां देवीच्या यात्रांमधून एक विशेष असतो तो हा कीं, या यात्रांत वाममार्गाचे प्रकार धर्माच्या संमतीच्या नांवाखालीं राजरोसपणें चाललेले असतात. देवी म्हणजे आदिशक्ति ही मूळची कल्पना किती तरी उदात्तपणाची आहे. पण त्या शक्तीची म्हणून जी उपासना पुढें चालू झाली आहे, तिच्यांत त्या उदात्तपणाचा

लेशही शिल्लक उरलेला नाहीं. शक्तीचे उपासक आपल्याला शाक्त म्हणवितात. ते मूळचे शाक्त शब्दानें आणि अर्थानें अशा दोन्हीही दृष्टींनीं हल्लीं छाकटे झालेले आहेत. आणि त्या शाक्तांचे धर्ममार्ग कसे आहेत हें सर्वांना माहीतच आहे. मद्य, मांस, वेश्या वगैरे सर्व दुर्व्यसनें या शाक्तपंथांत धर्माच्या नांवाखालीं शिरलीं आहेत. व त्यांचा पूर्ण प्रादुर्भाव या विंध्यवासिनीदेवीच्या नवरात्राच्या यात्रेमध्येंही स्पष्टपणें दृष्टोत्पत्तीस येत होता. देवीच्या संतिणी म्हणून त्या यात्रेमध्यें किती तरी वेश्या आणि इतर वाईट चालीच्या स्त्रिया जमा झालेल्या होत्या. व मांसाशन आणि मद्यप्राशन यांच्या मदानें धुंद होऊन नाच, गाणीं आणि तमाशे, यांच्यामध्यें रात्रंदिवस निमग्न होऊन रहावयाचें व बाह्यात्कारीं धर्माचा दांभिक देखावा दाखवावयाचा, हा त्यांचा व्यवसाय असे. आणि आपल्या कथानकांत पूर्वीं सांगितलेली जी कमळाबाई विंध्यवासिनीच्या यात्रेला आलेली होती, तिचाही बहुतेक मुख्य धंदा हाच होता; व अशी चैन करण्यासाठींच ती येथें यात्रेला आलेली होती. गणपतीभय्या स्वामी अभयानंद यांच्या तडाक्यां-तून आपला जीव बचावून गर्दींतून पळत गेल्याचें पूर्वीं सांगितलें आहे. तो अशा रीतीनें गर्दींतील लोकांना बाजूला सारून घाईघाईनें आणि घाबऱ्या घाबऱ्या रीतीनें चाललेला असतांना सहजगत्या तो दुरून कमळाबाईच्या दृष्टीस पडला. कमळाबाईनें त्याला ओळखिलें व ती मोठी आश्चर्यचकित झाली. प्रयागमधून गणपतीभय्या आणि गंगाबाई हीं दोघें नाहींशीं झाल्या दिवसापासून हीं कोठें गेलीं असतील, याची कमळाबाईला कांहीं एक कल्पना आलेली नव्हती. परंतु त्यांचा शोध काढून गणपतीभय्यानें केलेल्या प्रणयभंगाबद्दल त्या दोघांवर सूड उगवावा अशी तिच्या मत्सरबुद्धीला फार उत्कट इच्छा होती. त्यामुळें गणपतीभय्याला पाहिल्यानें तिच्या मत्सराला एक प्रकारचा आनंद झाला. आणि येथें जर गणपती-भय्या आहे, तर त्याच्याबरोबर ती गंगाबाईही असलीच पाहिजे, हें तिनें अनु-मानानें ठरविलें. गंगाबाईची परिस्थिति या वेळीं किती करुणास्पद झालेली होती, तिचे विचार किती पवित्र होते आणि तिचें पातिव्रत्य किती कडकडीत होतें, याबद्दलची कल्पना वेश्येचा धंदा करणाऱ्या त्या कमळाबाईला कोठून असणार ? तिला वाटलें कीं, आपल्याप्रमाणेंच गणपतीभय्या हा गंगाबाईला घेऊन स्वैरवर्तन करण्या-करितां आणि दोन दिवस मजा मारण्याकरितां येथें आला असला पाहिजे. या विचारानें तर तिचा मत्सराग्नि फारच भडकला आणि गणपतीभय्या व गंगा-

बाई यांच्या सुखांत कोणीकडून तरी माती कालवावी असा तिनें निश्चय केला. गणपतीभय्याला तिनें दुरून पाहिलें आणि हा कोठें जातो, हा कोठें उतरला आहे, यानें त्या गंगाबाईला कोठें ठेविली आहे, वगैरे गोष्टी जाणण्याच्या उद्देशानें ती त्याच्या पाठीमागून हळूहळू जाऊं लागली. गणपतीभय्याच्या आणि आपल्यामध्यें पहिल्यानें जें शेंदीडशें पावलांचें अंतर होतें, तें तिनें कायम ठेविलें होतें. आणि तितक्या अंतरावरून दुरून त्याच्यावर नजर ठेवून ती त्याच्या मागून चालली होती. तो पुढें थांबला, तर ही पाठीमागें थांबत असे. त्यानें कांहीं कारणासाठीं पाठीमागें तोंड वळविलें, तर ही कोणातरी यात्रेकरूंच्या गर्दीच्या आड दडत असे. तो ज्या कोपऱ्यावरून वळेल त्याच कोपऱ्यावरून ही वळत असे. आणि अशा रीतीनें त्याच्यामागून जाऊन गणपतीभय्या आणि गंगाबाई यांच्या मुक्कामाचा तिनें तपास काढला.



: : रंग अठ्ठाविसावी

दिवसास देवधर्म आणि रात्रीं रागरंग असा कमळाबाईचा कार्यक्रम असे. त्याच्या अनुरोधानें ती तिसरे प्रहरीं देवीच्या दर्शनाला व पुराणश्रवणाला जात असे. शंकरचार्याच्या मठांतील स्वामी अभयानंद यांचे मठांत नित्य तिसरे प्रहरीं पुराण चालत असे. त्यांची मुद्रा मोहक आणि वाणी चित्ताकर्षक असल्यामुळें त्यांच्या पुराणाला स्त्रीपुरुषांची पुष्कळच गर्दी होत असे. व त्यांत हातांत चांदीचा पेला घेऊन आणि थाटामाटाचा रोज नवा श्रृंगार करून कमळाबाई ही पुराणश्रवणाला येऊन बसत असे. मागील भागांत गणपतीभय्याच्या पाठीमागून त्याच्या न कळत जाऊन त्याचा आणि गंगाबाईचा पत्ता लावण्याचा प्रकार कमळाबाईनें ज्या दिवशीं केला, त्याच्या दुसऱ्या दिवशीं कमळाबाई नेहमींच्याप्रमाणें स्वामींच्या मठांत पुराणश्रवणाला येऊन बसली. ती जरी पुराण ऐकण्याकरितां येऊन बसत असे, तरी तिचें पुराण ऐकण्याकडे फारच थोडें लक्ष असे. कोण पुरुष कसा आहे, तो कोणाशीं बोलतो, तो कोणाकडे पहातो, त्याचें आपल्याकडे लक्ष वेधलेलें आहे काय, वगैरे गोष्टींमध्येंच तिचें मन नेहमीं निमग्न झालेलें असे, व अशा पापी वासनेनें ती खुद्द स्वामी अभयानंद यांच्याशींही कधीं कधीं थोडाबहुत लघळपणा करीत असे. स्वामींची निर्विकार चित्तवृत्ति तिला पुरून उरण्यासारखी जरी होती, तरी तिचा स्वभावदुरतिक्रम होता. परंतु त्यांतही आज आणखी एका दुष्ट मनोविकाराची भर पडली होती. आपला पूर्वीचा मित्र, गणपतीभय्या, याचें आपल्यावरील लक्ष उडून तो हल्लीं त्या गंगाबाईच्या नादीं लागला आहे, हा तिच्या मनाचा ग्रह मत्सरबुद्धीमुळें अगदीं पक्का होऊन गेलेला होता. आणि तिच्यासारख्या कुलटेला गंगाबाईसारख्या पतिव्रतेच्या मनोरचनेची कल्पनाही येणें शक्य नव्हतें. म्हणून गणपतीभय्या आणि गंगाबाई यांच्यावर आपण कसा सूड उगवावा, हा विचार तिच्या मनामध्यें या वेळीं एकसारखा पेट घेत होता.

आणि जरी ती पुराण ऐकण्याकरितां या वेळीं स्वामींच्या मठांत आलेली होती, तरी तिचें मन गंगाबाई आणि गणपतीभय्या जेथें उतरलीं होतीं तिकडे गेलेलें होतें. अशा रीतीनें तिचें मन दुसरीकडे व्यग्र झालेलें असतां तिचे डोळे तेथें जमलेल्या मंडळीमध्यें वावरत होते, व त्या ओघानें तिची दृष्टि स्वामी अभयानंद यांच्याकडेही गेली. पण ती दृष्टि त्यांच्याकडे गेल्यावर तेथून ती त्या वेळीं हलली मात्र नाहीं. ती त्यांच्याकडे जास्तच न्याहाळून आणि निरखून पाहूं लागली; ती जसजशी त्यांच्याकडे जास्त पाहूं लागली तसतशी तिच्या तोंडावरील आश्चर्याची छटा जास्त वाढूं लागली !

आदल्या दिवशीं गणपतीभय्या घाबरून घाईघाईनें पळून गेला, त्या वेळीं त्याच्या बगलेंतील जी शालजोडी तेथें राहिली होती, ती आपली प्रिय पत्नी गंगाबाई हिची असल्यामुळें ती स्वामींना अत्यंत प्रिय झाली होती. ही शालजोडी आपल्याला मिळालेली नसून या शालजोडीची मालकीण, आपली प्रिय पत्नी गंगाबाई, हीच आपल्याला प्रत्यक्ष भेटली आहे, असें त्यांना वाटूं लागलें होतें. त्या शालजोडीला ते जिव कीं प्राण करूं लागले. तिचा एका क्षणाचाही वियोग त्यांना पटेनासा झाला. ते कोठेंही गेले किंवा कांहींही करीत असले, तरी ते आपल्या प्रियेची ती शालजोडी आपल्या अंगावर बाळगीत असत. आदल्या दिवशीं रात्रीं आपल्या व्याघ्रचर्माच्या शय्येवर ती शालजोडी अंथरून ते निजले, तेव्हां त्यांना झोंप लागली; आणि पहाटेस ती शालजोडी त्यांनीं पांघरावयाला घेतली, तेव्हां त्यांची थंडी राहिली. इतकें त्यांचें प्रेम त्या शालजोडीवर बसलें. सकाळीं ध्यान करते वेळींही ती शालजोडी त्यांनीं पांघरून घेतली होती. आणि संध्याकाळीं ते पुराणाला बसले, तेव्हांही ती शालजोडी त्यांच्या अंगावर होती. बोलण्याच्या ओघांत ती शालजोडी स्वामींच्या पाठीवरून घसरत घसरत जाऊन मध्यंतरीं खालीं पडली होती. पण ती सावरून फिरून स्वामींनीं जेव्हां आपल्या अंगावर घेतली, तेव्हां कमळाबाईचें लक्ष त्या शालजोडीकडे गेलें; आणि त्या वेळीं ती शालजोडी पाहून वर सांगितल्याप्रमाणें कमळाबाई आश्चर्यानें अगदीं चकित होऊन गेली. तिनें ती शालजोडी पक्की ओळखली. जी शालजोडी गणपतीभय्यानें आपल्याला बक्षीस दिली होती, आणि जी आपल्याशीं बेइमान होऊन आपल्यापासून परत घेऊन गंगाबाईला खूष करण्याकरितां त्यानें तिला नजर केली होती, तीच ही शालजोडी येथें या स्वामींच्याजवळ कशी आली आणि हे स्वामी ती शालजोडी

इतक्या आदरानें आपल्या अंगावर घेऊन कां बसत आहेत, याचें तिला मोठें गूढ पडलें; व या प्रश्नाचा तिला कांहींच उलगडा करतां येईना. गणपतीभय्या आणि गंगाबाई हीं विंध्यवासिनीला आलेलीं असल्याचें तिला आदल्या दिवशींच समजलें होतें; तेव्हां त्या दोघांपैकींच कोणाकडून तरी ही शालजोडी स्वामींकडे आलेली असावी, येथपर्यंत तिचा तर्क चालला. पण ती स्वामींकडे कां व कशी आली असावी, याबद्दलचा कांहीं एक उलगडा तिच्या मनामध्यें होईना. आणि हा उलगडा झाल्याशिवाय तिला चैनही पडेना. म्हणून पुराण संपेपर्यंत तर ती थांबलीच; पण पुराण संपून बहुतेक श्रोते निघून गेले, तरीही कमळाबाई तेथें रेंगाळत आणि इकडे तिकडे फिरत उभी राहिली होती. पुराण संपल्यावर कांहीं वेळानें स्वामी अभयानंद आपल्या मठींत गेले. आणि त्यानंतर कांहीं वेळानें कमळाबाईनेंही युक्तीयुक्तीनें आंत आपला प्रवेश करून घेतला. कमळाबाईसारख्या बायकोला स्वामींच्या मठींत प्रवेश करण्याची परवानगी मिळणें केव्हांही कठिणच, तरी पण स्वामींच्या अंगावरील शालजोडीसंबंधानें आपल्याला स्वामींपाशीं कांहीं बोलावयाचें आहे, असा कमळाबाईनें शिष्यांच्या हातीं स्वामींकडे निरोप पाठविला. स्वामींना शालजोडीबद्दल जी कांहीं माहिती मिळेल ती मिळविण्याची उत्कंठा आधींपासूनच लागलेली होती, तेव्हां शालजोडीचें नांव घेतल्याबरोबर कमळाबाईला परवानगी मिळाली.

आंत आल्याबरोबर कमळाबाईनें स्वामींना खालीं वांकून वंदन केलें व स्वामींनींही नारायणनामस्मरणपूर्वक आशीर्वाद देऊन तिला खालीं बसण्याला सांगितलें. कमळाबाई त्या दिवशींच्या पुराणांतील विषयाला अनुलक्षून कांहीं औपचारिक भाषण करण्याला सुरुवात केली व त्यासंबंधानें थोडेसें बोलणें झालें. पण स्वामींना शालजोडीबद्दलची माहिती ऐकण्याविषयीं अनावर उत्सुकता झालेली होती, त्यामुळें त्यांनीं तो विषय बदलून मध्येंच एकदम शालजोडीचा प्रश्न काढला, तेव्हां कमळाबाईनें स्वामींना विचारलें कीं, " ही शालजोडी कोणाची ? "

" कोणाची म्हणजे ? " स्वामींनीं चकित होऊन उत्तर दिलें, " कोणाची म्हणजे ? ही शालजोडी माझी आहे ! "

" स्वामीमहाराज, " कमळाबाई थोडें लाजत आणि थोडें हंसत म्हणाली, " आपण असें कसें म्हणतां ? ही शालजोडी माझी आहे. "

" तुझी कशी ? " स्वामींनीं विचारलें.

" गणपतीभय्या म्हणून माझा एक मित्र आहे. " कमळाबाई सांगूं लागली.

" तो प्रयागास रहात असतो ? " स्वामी म्हणाले.

" होय. आणि मी देखील प्रयागासच रहात असतें. माझें नांव कमळाबाई." कमळाबाई पुढें सांगूं लागली, " माझ्यावर त्याचें एकदां फार प्रेम होतें. त्या वेळीं त्यानें मला ही शालजोडी बक्षीस दिली होती. "

" पण ही शालजोडी त्याच्यापाशीं कोठून आली ? " स्वामींनीं विचारलें.

" तें मला कांहीं माहीत नाहीं. " कमळाबाई कानावर हात ठेवून म्हणाली. " कदाचित् त्यानें ती नवीन विकत घेतलेली असेल. पण त्यानें ती मला दिली, तेव्हां ती कोरी नव्हती, पूर्वी वापरलेली असल्यासारखी दिसत होती."

" ही तुमची खूण बरोबर पटते. " स्वामी म्हणाले. " ही आमचीच शालजोडी होती आणि ती आम्हींच वापरलेली होती. ही शालजोडी आमचीच आहे, हें मी पक्कें ओळखतों. "

" मग ती तुमच्यापासून कशी नाहींशी झाली ? " कमळाबाईनें ओघानें प्राप्त झालेला प्रश्न विचारला.

" आम्ही एकदां प्रवास करीत असतां एका ठगाच्या टोळीनें जंगलांत आम्हांला लुटलें. त्यांत आमच्या इतर सामानाबरोबर ही शालजोडीही लुटली गेली. तीच ही शालजोडी. मला याबद्दल बिलकुल शंका नाहीं. पण ती चोरीस गेलेली आमची शालजोडी ह्या तुझ्या गणपतीभय्याजवळ कशी आली ? त्यानें ती कोरी नवीन विकत घेतलेली असणें शक्यच नाहीं. "

यावर कमळाबाईला बरोबर समाधानकारक असें उत्तर देतां येईना. ती बराच वेळ घुटमळत होती. लहान लहान चोऱ्या करणें आणि चोरीचा माल विकत घेणें हा गणपतीभय्याचा धंदा आहे, ही गोष्ट तिला माहीत होती. आणि ह्यावरून तिच्या मनांत जी एक अर्धवट कल्पना आलेली होती, तीच खरी असली पाहिजे, असें तिला या वरील हकीकतीवरून आणि युक्तिवादावरून वाटूं लागलें; पण ती गोष्ट आपण उघडपणें सांगून कबूल करावी किंवा नाहीं, याच्याबद्दल तिच्या मनांत कांहीं वेळ विचार चालला होता.

" कां ? तुम्ही बोलत कां नाहीं ? " स्वामींनीं कमळाबाईला विचारलें.

" तर मग मला वाटतें," कमळाबाई म्हणाली, " ही शालजोडी जर तुमचीच

असेल, आणि ती जर चोरीस गेलेली असेल, तर तो चोरांचा माल म्हणून गणपतीभय्यानें विकत घेतला असला पाहिजे."

"तर मग एकूण," स्वामी चपापून जाऊन म्हणाले, "या तुमच्या गणपतीभय्याचा चोरांशीं आणि ठगांशीं संबंध असला पाहिजे!"

"तें कांहीं मला नक्की सांगतां यावयाचें नाहीं, पण यावरून असें दिसतें खरें." कमळबाईनें कबूल केलें.

"बरें, मग तुम्हांला गणपतीभय्यानें दिलेली ही शालजोडी तुमच्यापासून कशी नाहींशी झाली?" स्वामींनीं विचारलें.

"गणपतीभय्या हा कशा प्रकारचा मनुष्य असला पाहिजे," कमळाबाई सांगूं लागली, "हें आतां स्वामींच्या लक्षांत आलेंच असेल. मला दिलेली ही शालजोडी तो एक दिवस माझ्यापासून घेऊन गेला आणि त्यानें ती दुसऱ्याच एका स्त्रीला दिली. आणि ती बाई ती शालजोडी आपली बळकावून बसली. मी तिच्याशीं जाऊन भांडलें, तरी ती मला देईना. ती बाई ती शालजोडी रोज अंगावर पांघरून घेऊं लागली आणि प्राण गेला तरी मी ही शालजोडी दुसऱ्या कोणाला परत देणार नाहीं, असें ती तणतणूं लागली."

ही हकीकत ऐकून स्वामींच्या मनांत कांहीं निराळेच विचार उत्पन्न होऊं लागले. ते आपल्या मनाशीं म्हणाले, "प्राण गेला तरी मी ही शालजोडी दुसऱ्या कोणाला देणार नाहीं, इतक्या रीतीनें आपल्या प्राणापेक्षांही या शालजोडीला जास्त किंमत देऊन ती आपल्या अंगावर नित्य पांघरून घेणारी ही कोण बरें स्त्री असावी?" असें म्हणून स्वामींनीं आपल्या अंगावरच्या त्या शालजोडीकडे आपली दृष्टि वळविली आणि तिला उद्देशून ते फिरून आपल्या मनाशींच म्हणाले, "हे भाग्यशाली शाली! तूं कोणाला इतकी प्रिय झाली होतीस? सांग–मला कांहीं तरी सांग!—जी तुला आपल्या प्राणापलीकडे जपत होती, ती कोण? आणि तिनें तुझ्यावर आपल्या प्राणापेक्षांही जास्त प्रेम करण्याचें कारण काय!–माझ्या मनांत जी आशा उत्पन्न होत आहे, ती खरी होईल काय?–आमच्या दोघांशिवाय या शालजोडीवर प्राणापलीकडे इतकें दुसऱ्या कोणाचें प्रेम असूं शकणार आहे? उन्हाळ्याच्या दिवसांत पहाटेच्या प्रहरीं पडणाऱ्या थंडीच्या वेळीं किती तरी वेळां आम्ही दोघें या शालजोडीच्या एका पांघरुणामध्यें जवळ जवळ निजलेलीं होतों!

आणि एखादे वेळीं मी उठून गेलों, तरी ही प्रेमाची शाल मी आपल्या प्रियेच्या अंगावर किती तरी वेळां घातलेली आहे! अशा अनेक पूर्वपरिचित निमित्तांसाठीं या शालजोडीवर माझें जसें प्राणापेक्षांही जास्त प्रेम आहे, तसेंच जर हिच्यावर दुसऱ्या कोणाचें प्रेम असेल, तर तें माझ्या प्रियेशिवाय दुसऱ्या कोणाचें असूं शकणार आहे!–हे अभाग्यशाली शाली! मग त्या माझ्या प्रियेची आणि तुझी फिरून गाठ पडली असतां तिला तूं कां सोडलेंस? आणि तूं माझ्याकडे कां आली आहेस?–माझ्या प्रियेची कांहीं वार्ता सांगण्याकरितां का तुला तिनें माझ्याकडे पाठविली आहे?—आणि मग तूं अशी मुकाट्यानें कां बसली आहेस? तुझी मैत्रीण आणि माझी प्रिया सुखरूप आहे ना? ती कोठें आहे! तुझ्याबरोबर तिनें माझ्यासाठीं काय निरोप पाठविला आहे? आणि तो तूं मला केव्हां सांगणार?—अथवा ही निर्जीव शालजोडी मला काय सांगणार? आणि मी हिला वेडयासारखें काय विचारीत बसलों आहें?" असें म्हणून स्वामींनीं एक दीर्घ सुस्कारा टाकला आणि त्या शालजोडीच्या टोंकानें आपल्या डोळ्यांत उद्भवूं लागलेले अश्रुबिंदु त्यांनीं आंतल्या आंत पुसले.

"स्वामीमहाराज," आपला शोकाचा उमाळा आंतल्या आंत दाबून धरण्याचा चाललेला स्वामींचा प्रयत्न पाहून कमळाबाई म्हणाली, "मी या शालजोडीची जी हकीकत आपल्याला सांगत आहें, ती ऐकून आपल्याला कष्ट होत आहेत, असें मला दिसतें. तेव्हां ती हकीकत पुढें सांगून तुम्हांला जास्त देणें मला बरोबर वाटत नाहीं."

"छे, छे, छे," शालजोडीच्या टोकानें डोळ्यांतील आंसवें पुशीत पुशीत स्वामी म्हणाले, "ही हकीकत तुम्ही इतक्यांत अशा अर्धवट रीतीनें मुळींच बंद करतां कामा नये. मला अजून या शालजोडीबद्दल तुम्हांला किती तरी प्रश्न विचारावयाचे आहेत."

"आणि मलाही अजून तिची किती तरी हकीकत सांगावयाची आहे." कमळाबाई म्हणाली.

"सांगा तर मग. मलाही ती ऐकावयाची आहे." स्वामी म्हणाले.

"ही शालजोडी" कमळाबाईनें सांगण्याला सुरुवात केली, "मी तिच्या अंगावरून हिसकावून घेऊं लागलें तेव्हां ती म्हणाली, "ही शालजोडी मी कोणालाही घेऊं देणार नाहीं. ती माझी आहे."

" ती माझी आहे ! " स्वामी आनंदाच्या आणि आश्चर्याच्या मुद्रेनें म्हणाले. " काय ? ही शालजोडी माझी आहे असें ती म्हणाली ? "

" होय ! तिनें बेलाशक असें उत्तर दिलें ! " कमळाबाई म्हणाली.

तें ऐकून स्वामींच्या मनांत फारच चलबिचल उत्पन्न झाली. ते आपल्या मनाशीं म्हणाले, " झालें ! ही शालजोडी माझी आहे, असें जर ती म्हणाली असेल, तर माझ्या प्रियेवांचून दुसरें कोण असें म्हणूं शकणार आहे ! ही शालजोडी माझी आहे असें म्हणण्याचा अधिकार मी आणि माझी प्रिया यांच्याशिवाय तिसऱ्या कोणालाही नाहीं. या कल्पनेवरून माझ्या मनांत उत्पन्न होणारा आशेचा आनंद माझ्या हृदयांत मावेनासा होत आहे. पण अजून माझी पुरी खात्री होत नाहीं. ही शालजोडी माझी आहे असें ती म्हणतें हें खरें; पण याच शालजोडीवर याच माझ्याजवळ बोलत बसलेल्या बाईनेंही आपला मालकीचा हक्क पहिल्यानें सांगितला नाहीं काय ! तशीच हीही दुसरी कोणीतरी असली तर काय करावयाचें ? म्हणून याबद्दल आपण जास्त शहानिशा केल्यावांचून उगीच उतावळि होणें बरोबर नाहीं. " असा विचार मनांत आणून स्वामींनीं आपल्या कल्पनेनें एक प्रश्न बनवून तिला विचारला.

स्वामी म्हणाले, " ती बाई कदाचित् कोणी गोरगरीब असेल ! कदाचित् लहान वयाची असेल ! लहान वयांत बायकांना मोठी हौस असते ! आणि ती गोरगरिब असली तर तिला असली शालजोडी कोठून मिळणार ? म्हणून हातीं लागलेली ही शालजोडी माझी म्हणून बहुतकरून ती बळकावून बसली असेल ! "

" स्वामींचे दोन्ही तर्क अगदीं बरोबर आहेत. " कमळाबाई म्हणाली, "अहो, गोरगरीब म्हणून काय म्हणतां ? ती गणपतीभय्याकडे पहिल्यानें आली तेव्हां अगदीं एखाद्या भिकारणीसारखी दिसत होती. तिचें वय अगदीं पोरसवदा आहे. फार झालें तर अठरा वीस वर्षाच्या आंत तिचें वय असेल. तिचें वय पोरसवदा आहे आणि तिची मुद्रा मोहक असून नाकीं डोळीं मोठी सुरेख आहे; तरी पण तिच्या अंगावर ती आली तेव्हां एक देखील धड वस्त्र नव्हतें. अशा बायकोला एकदम एवढी मोठी शालजोडी मिळाली, तर ती माझीच आहे असें म्हणून ती बळकावून कां बसणार नाहीं ? "

" हिनें सांगितलेलें वय तर माझ्या प्रियेच्या वयाशीं अगदीं बरोबर जमतें ! " स्वामी आपल्या मनाशीं विचार करूं लागले. " तसेंच तिची मुद्रा मोहक आणि

तिचे नाक डोळे सुरेख हें जें तिचें वर्णन ही बाई सांगत आहे, तेंही माझ्या प्रियेच्या स्वरूपाशीं अगदीं बरोबर मिळतें! आणि ती ही शालजोडी माझी म्हणून म्हणते, या सगळ्या गोष्टींवरून ती माझीच प्रिया असली पाहिजे हें खास!— पण प्रिये, तूं एका सरदाराची पत्नी असून तुझ्या कपाळीं फाटकीं वस्त्रें नेसून एखाद्या भिकारणीसारखी फिरण्याची पाळी यावी हें ऐकून माझ्या हृदयाचें पाणीच होऊन जात आहे! चोरांनीं लुटल्यानंतर अंगावर असलेल्या एका वस्त्रानिशीं जर तूं रानावनांत वाट काढीत हिंडली असशील, तर तुझ्या त्या एका वस्त्राच्या लक्तऱ्या होऊन न जातील तर काय होईल! देवा, त्या कोमल साध्वीचे या अवस्थेंत किती तरी हाल झाले असतील! आणि तिच्या त्या हालअपेष्टा दूर करण्याला मी जवळ नाहीं, हा मी केवढा हतभाग्य!"

एवढा वेळपर्यंतच्या प्रश्नोत्तरांवरून आणि खाणाखुणांवरून ही आपलीच प्रिय पत्नी गंगाबाई असली पाहिजे, असा स्वामींचा निश्चय झाला. आणि हा निश्चय खरा कीं खोटा याचीं शहानिशा करून टाकण्याच्या उद्देशानें स्वामींनीं कमळाबाईला विचारलें, "कमळाबाई, या बाईचें नांव काय?" हा प्रश्न विचारून त्याच्या उत्तराकडे स्वामी सारें लक्ष लावून बसले.

"गंगाबाई." कमळाबाईनें सांगितलें.

"गंगाबाई!" स्वामींच्या तोंडून एकदम आनंदाचे उद्गार बाहेर पडले. "काय म्हणालां? तिचें नांव गंगाबाई? गंगाबाई!—गंगाबाई!--गंगाबाई जिवंत आहे? ती कोठें आहे? ती तुम्हांला माहीत आहे काय? ती येथें आहे काय? तिची आणि माझी तुम्ही गाठ घालून द्याल काय?"

हे प्रश्न विचारतांना स्वामी इतके उतावीळ झाले होते आणि त्यांची चर्या आनंदानें इतकी पालटून गेली कीं, तो सगळा प्रकार पाहून कमळाबाई आश्चर्यानें अगदीं चकित होऊन गेली. आपली शालजोडीची तक्रार पुढें चालविण्याचें तिचें काम बाजूलाच राहून मध्येंच उपस्थित होत चाललेल्या या नवीन प्रकरणामुळें ती अगदीं गोंधळून गेल्यासारखी झाली. तिला स्वामींच्या या बदललेल्या चित्तवृत्तीचा अर्थ समजेना. म्हणून तिनें स्वामींना नम्रपणानें विचारलें, "स्वामीमहाराज, या बाईचें नांव गंगाबाई आहे असें ऐकल्याबरोबर आपल्या चित्तवृत्तीमध्यें एकदम इतका बदल कां झाला? आपला आणि या बाईचा काय संबंध? आपण तर संन्यासी आहां!"

कमळाबाईचा हा प्रश्न ऐकून स्वामींचें डोकें ताळ्यावर आलें. आपल्या वर्तनांत आपल्या हातून काय चूक झाली, हें त्यांच्या लक्षांत आलें. आपल्या पत्नीच्या वृत्तांताच्या भरांत आपल्या संन्याशाच्या निर्विषयक चित्तवृत्तीची मर्यादा आपल्याकडून उल्लंघिली गेली, याबद्दल आतां आपण पुढें काय करावें, याची त्यांना पंचाईत पडली. ते अगदीं गोंधळून गेले. कमळाबाईच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें हें त्यांना सुचेना. कमळाबाई मोठी धूर्त होती. तिला संशय येऊं लागला. आणि स्वामींच्या संन्यासवृत्तींत कांहीं तरी काळेंबेरें असलें पाहिजे, अशी एक अंधुक कल्पना तिच्या मनांत येऊं लागली.

पण इतक्यांत स्वामींनाही एक युक्ति सुचली. त्यांनीं पूर्वी ठगांना ठकविण्याकरितां जी एक बनावट गोष्ट बनविली होती, तिची त्यांना या वेळीं आठवण झाली. आणि त्या गोष्टीच्या आश्रयानें त्यांनीं ही वेळ मारून नेण्याचा प्रयत्न केला. ते म्हणाले, " कमळाबाई, मी एक काशीचा ब्रह्मचारी असून ब्रह्मचर्याश्रमांतूनच मी एकदम संन्यास घेतला आहे, हें येथील पुष्कळ लोकांना माहीत आहे."

" होय. " कमळाबाई म्हणाली, " मी देखील आपली ही हकीकत नुकतीच कोणाच्याशा तोंडून ऐकली आहे. आपण काशीहून निघून तीर्थयात्रा करीत हिंडत असतां आपली आणि झांशीच्या एका जहागिरदाराची गाठ पडली वगैरे हकीकत देखील मी ऐकली आहे."

" बस्स, झालें ! " स्वामी म्हणाले, " त्या जहागिरदारांच्याच बायकोचें नांव गंगाबाई ! त्यांनीं मरतांना मला सांगितलें कीं, माझ्या बायकोचा तुम्हांला कोठें पत्ता लागला, तर त्या बिचारीची वास्तपुस्त घेऊन तिला माझ्या घरीं पोहोंचती करण्याची तजवीज करा ! कमळाबाई, तुमच्या बोलण्याच्या ओघांत सहज तिची हकीकत जी कळली, त्यावरून ही जी गंगाबाई तुम्ही म्हणतां, ती त्या जहागिरदारांचीच बायको असली पाहिजे, असें मला वाटतें. म्हणून ती मला कोठें भेटेल याबद्दलच्या सर्व खाणाखुणा तुम्ही मला सांगाल, तर तुमची माझ्यावर मोठी मेहेरबानी होईल; आणि माझी समक्ष गाठ पडल्यानंतर या शालजोडीची काय भानगड आहे ती त्यांना विचारून तुमची शालजोडी तुम्हांला परत देण्याची मी तजवीज करीन."

स्वामींच्या या विनंतीप्रमाणें कमळाबाईनें गंगाबाई आणि गणपतीभय्या कोठें उतरले होते याच्या सर्व नक्की खाणाखुणा स्वामींना सांगितल्या व त्यानंतर स्वामींचें मन अस्थिर झालेलें असल्यामुळें व स्वामींची संध्याकाळच्या नित्यकर्माचीही वेळ झालेली असल्यामुळें स्वामींनीं या वेळीं कमळाबाईला जाण्याची सूचना केली आणि त्याप्रमाणें फिरून केव्हां तरी दर्शनाला येण्याचा उल्लेख करून कमळाबाईही निघून गेली. कमळाबाई निघून जाऊन बराच वेळ झाल्यानंतर स्वामींच्या मनांत आणखी एक प्रश्न सुचला. गंगाबाई प्रयागला आली, त्या वेळीं ती गरोदर होती का, पुढें ती प्रसूत कधीं झाली, तिला काय झालें, आणि तें मूल हल्लीं तिच्याजवळ आहे ना, हे प्रश्न आपण कमळाबाईला विचारावयाला पाहिजे होते; म्हणजे आपल्या पत्नीच्याबद्दलची आणखी एक जास्त खूण आपल्याला पटली असती आणि तिच्या प्रियकर तान्ह्या मुलाबद्दलही माहिती मिळाली असती, असें त्यांना वाटलें. पण हा महत्त्वाचा प्रश्न त्यांना उशीरानें सुचल्यामुळें त्याचा खुलासा या वेळीं होणें तसेंच राहून गेलें.

* * *

स्वामींची आणि कमळाबाईची जी भेट आणि जें भाषण झाल्याचें वर सांगितलें आहे, त्याच्या आदल्या दिवशीं गणपतीभय्या गंगाबाईच्या गळ्यांतील हार आणि गंगाबाईच्या अंगावरील शालजोडी यांची खूण बरोबर घेऊन अभयानंदस्वामींकडे गेला होता; तो परत येण्याची गंगाबाई चातकासारखी वाट पहात होती. गणपतीभय्या स्वामींकडे गेल्यावर चिंताक्रांत मनःस्थितीमध्यें तिचा वेळ जाईना, म्हणून गंगेच्या कांठच्या दूरवरच्या निर्जन प्रदेशांतून ती भटकत होती व आपल्याला अनुकूल अशी बातमी गणपतीभय्यानें आणली नाहीं तर गंगेंत जीव देण्यासाठींही तिनें एक जागा पाहून ठेविली होती. पण इतक्या निराशेमध्येंही तिच्या मनाला आपल्या नवऱ्याच्या शोधाची आशा वाटत होती आणि दुःखातिरेकामुळें उत्पन्न झालेल्या तिच्या वेडसरपणाच्या लहरीमध्येंही तिच्या नवऱ्याच्या शोधाकरितां लागणारें शहाणपण तिच्याजवळ कायम होतें. आपल्या दुःखाच्या आणि दुर्दैवाच्या वैतागानें ती जरी वाटेल तें बडबडत वाटेल तिकडे फिरत होती, तरी गणपतीभय्या परत येण्याच्या वेळेच्या सुमाराला ती आपल्या मुक्कामावर हजर होती. आणि अजून गणपतीभय्या कां येत नाहीं म्हणून ती बाहेर जाऊन दहा वेळां दूर दृष्टि फेंकून पाहून आली; पण गणपतीभय्या बराच वेळ आला नाहीं.

पण तो आला नव्हता तोंपर्यंत त्यांतल्या त्यांत तिला एक प्रकारची स्वस्थता वाटत होती. परंतु तो आला म्हणजे काय सांगेल याची कल्पना तिच्या डोळ्यापुढें उभी राहिली, म्हणजे तिचें मन अगदीं व्यग्र होऊन जाई. त्यानें चांगली बातमी सांगितली, तर ठीक आहे; पण त्यानें कांहीं विपरीत बातमी आणिली, तर मग मी पुढें काय करूं, माझा हा शेवटचा आशेचा धागा तुटला तर मग माझी पुढें वाट काय, अशा अनेक कल्पना तिच्या मनामध्यें येऊन त्या तिच्यावर दुःखाचा कहर कोसळवीत होत्या. इतक्यांत अखेरीस गणपतीभय्या आला. गंगाबाई अत्यंत उत्सुक झाली होती. पण तिनें त्याला एकही प्रश्न विचारला नाहीं. ती त्याच्या डोळ्यांकडे आणि तोंडाकडे पाहून त्याच्या एकंदर चर्येवरून त्याच्या वृत्तांताबद्दल अनुमान काढीत होती. प्रत्यक्ष प्रश्न विचारून एकदम उत्तर ऐकण्याचें तिला धारिष्ट होईना. पण गणपतीभय्याच्या जवळ दिलेलें शालजोडीचें गांठोडें त्यानें परत आणलेलें नाहीं हें तिच्या लक्षांत आलेलें होतें व त्यावरूनही अनुकूल अनुमानें आपल्या मनांतल्या मनांत काढीत होती. अखेरीस गणपतीभय्यानें एक दीर्घ सुस्कारा टाकून झालेली सर्व हकीकत गंगाबाईला सांगितली. पण त्या सगळ्या हकीकतीपासून निश्चयात्मक असें कांहींच निष्पन्न होत नाहीं, हें पाहून गंगाबाईचें मन उदास झालें. पण अजून आशा करण्याला जागा आहे हेंही त्याच वेळीं लक्षांत आणून तिनें धीर सोडला नाहीं.

ती आपल्या मनांत म्हणाली:—" गणपतीभय्याच्या दोन खेपा झाल्या, पण त्या दोन्हीही फुकट गेल्या. शिवाय माझ्याजवळच्या खुणेच्या वस्तूंपैकीं ज्या दोन वस्तु मी पाठविल्या, त्या माझ्यापासून नाहींशा मात्र झाल्या, पण त्याच्या मोबदला त्या दोन्हीही वस्तूंनीं मला एकसुद्धां वार्ता कळविली नाहीं." गणपतीभय्याच्याबद्दल स्वामींच्या मनांत हा कोणी तरी त्या ठगांपैकींच असेल असा विकल्प येणें साहजिक आहे म्हणून गणपतीभय्याला पुढें न करितां आपण स्वतःच या बाबतींत आतां शक्य तो प्रयत्न केला पाहिजे, असा तिनें आपल्या मनांत विचार केला व तो तिनें गणपतीभय्याला कळविला; तो त्यालाही मान्य झाला. त्यानंतर गंगाबाईनें ती रात्र कशीबशी काढली व दुसरे दिवशीं सकाळीं गंगाबाई आणि गणपतीभय्या हीं दोघेंही कांहीं तरी प्रयत्नानें स्वामींना गाठण्याच्या उद्देशानें बाहेर पडलीं. स्वामींच्या मठाच्या आसपास दूर कोठें तरी कोणाच्या फारशा नजरेस न येण्यासारख्या जागीं बसून स्वामी कोठें बाहेर पडले, तर त्यांना दुरून

पाहून बाहेरच्या बाहेर कोठें तरी जमल्यास बोलण्याचा ओघ आणावा आणि होतां होईल तों स्वामींच्या शिष्यांच्या चौकीपहाऱ्यांतून परवानग्या घेऊन स्वामींच्या मठाच्या आंत जाण्याची अडचण टाळावी, अशी गंगाबाईची कल्पना होती. म्हणून त्याप्रमाणें गंगाबाई व गणपतीभय्या मठाच्या आसपासच्या एका जागेंत जाऊन बसलीं. ही जागा डोंगरांतलि विंध्यवासिनीचें देऊळ आणि त्या देवळाला जाणाऱ्या पायऱ्यांच्या पायथ्याशीं असलेली शंकराचार्यांची छावणी यांच्या दरम्यान मध्यभागीं एका झाडाखालीं होती. तेथून शंकराचार्यांच्या छावणींतील सर्व हालचाली दिसत होत्या व मधून मधून पायऱ्यांचींही कांहीं वळणें चांगलीं दिसत होतीं. पायऱ्यांवरून देवीच्या दर्शनाकरितां येणाऱ्या आणि जाणाऱ्या यात्रेकरूंची अतिशय भीड झालेली होती. गंगाबाई आपल्या जागीं बसून हा सगळा देखावा पाहून पाहून अगदीं कंटाळून गेली होती. येथें आपण शंभर घटका बसलों, तरी आपल्याला पाहिजे तें काम साधावयाचें नाहीं, असें तिला वाटूं लागलें होतें. इतक्यांत पायथ्याजवळच्या शंकराचार्यांच्या छावणींत शिंगें आणि कर्णे यांचे आवाज होऊं लागले. आणि कांहीं वेळानें पायऱ्यांवरून भालदार-चोपदारांच्या ललकाऱ्या ऐकूं येऊं लागल्या. त्याचप्रमाणें शंकराचार्यांच्या बिरुदावलीचा जयघोषही खालून जवळ जवळ ऐकूं येऊं लागला. यात्रेकरूंना बाजूला हटवून त्यांच्यामधून शंकराचार्यांच्या स्वारीला वाट करण्यांत येऊं लागली. शंकराचार्य या नवरात्राच्या दिवसांत आपल्या बरोबरच्या सर्व मंडळीसह आणि लवाजम्यासह श्रीविंध्यवासिनीच्या दर्शनाला दररोज सकाळीं आणि संध्याकाळीं जात असत. त्याप्रमाणें ही देवीच्या दर्शनाला निघालेली स्वारी पहाण्याकरितां यात्रेकरू पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंनीं रांगेनें उभे राहिले आणि त्यांनीं मधून आचार्यांच्याकरितां वाट मोकळी केली. तें पाहून या समारंभाचा सोहळा आपल्याही दृष्टीस पडावा अशा इच्छेनें गंगाबाईही गणपतीभय्याला आपल्याबरोबर घेऊन त्या रांगेनें उभे राहिलेल्या यात्रेकरूंच्या रांगेच्या पाठीमागें येऊन उभी राहिली. पण ती तेथें इतक्या गर्दीत आणि इतक्या पाठीमागें होती कीं, ती पायऱ्यांवरून जाणाऱ्या कोणालाही दिसणें शक्य नव्हतें. पण त्या पायऱ्यांवरून जाणारे लोक मात्र त्या गर्दीमधूनही तिला दिसत होते. शंकराचार्यांच्या हलकाऱ्यांचे आवाज अगदीं जवळ जवळ ऐकूं येऊं लागले. आचार्यांच्या स्वारीच्या पुढें कित्येक वैदिक ब्राह्मण वेदपठण करीत चालले होते. त्यांचेंही तें म्हणणें अगदीं जवळ आलें. वेदघोष

करणाऱ्या ब्राह्मणांच्या पाठीमागें खुद्द शंकराचार्य, त्यांच्या पाठीमागें त्यांच्या-बरोबरचे कित्येक संन्यासी, त्यांच्या पाठीमागें मठांतील शास्त्री, पुराणिक, त्यांच्या पाठीमागें मठाचे कारभारी, कारकून वगैरे, अशा क्रमानें स्वारीचा थाट खालून वर हळू हळू चढत वर येत होता. स्वारी खालून वर येत होती आणि गणपती-भय्या व गंगाबाई हीं वरून त्यांच्याकडे पहात होतीं. त्यामुळें या दोघांना खालून वर चढत येणारा सगळा समारंभ चांगला दिसत होता. या स्वारी-मध्यें बहुतकरून आपल्याला पाहिजेत ते स्वामी असतील असा दोघांचाही तर्क होता. आणि त्यासाठीं गणपतीभय्या फार काळजीपूर्वक रीतीनें पाहत होता. त्यांच्या अदमासाप्रमाणें स्वामी अभयानंद हे त्या स्वारीमध्यें होतेच. शंकराचार्यांच्या पाठीमागच्या रांगेंत अगदीं अग्रभागी ते चालत होते. व या वेळीं त्यांनीं त्यांना आदल्या दिवशीं गणपतीभय्याकडून मिळालेली शालजोडी पांघरण्याकरितां आपल्या अंगावर घेतली होती. ती शालजोडी गंगाबाईला पहिल्यानें दिसली आणि "शंकराचार्यांच्या पाठीमागें चालत आहेत तेच ते स्वामी!" असें गणपतीभय्यानें गंगाबाईला बोटानें निर्देश करून मागाहून दाखविलें. त्या स्वामींना पाहिल्या-बरोबर गंगाबाईचा आनंद तिच्या पोटांत मावेनासा झाला! तिनें भय्यासाहेबांना एकदम ओळखलें. आणि आपण गणपतीभय्याबरोबर पाठविलेली शालजोडी त्यांनीं आपल्या अंगावर घेतलेली पाहून तर तिच्या मनाला बिलकूलच संशय उरला नाहीं. ती त्यांच्याकडे एकसारखी टक लावून पहात उभी राहिली, व त्या वेळीं तिचे डोळे पाण्यानें भरून आले. तिला असें वाटलें कीं, या गर्दींतून उडी टाकून धांवून जाऊन आपण आपल्या प्रियपतीला कडकडून भेटावें. पण असा उतावीळपणा करण्यांतील वेडेपणाही त्याच वेळीं तिच्या लक्षांत आला, व ती आपल्या मनाशीं म्हणाली:—"आई जगदंबे, कांहीं हरकत नाहीं! मी त्यांना आतां सावकाश भेटेन! ते जिवंत आहेत हें मला समजलें आणि मी त्यांना प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिलें, हेंही तूर्त कांहीं थोडें नाहीं!" असें म्हणून तिनें आपल्या प्रेमाची उसळणारी लाट त्या जनसम्मर्दामध्यें तशीच दाबून ठेविली व ती स्वामी अभयानंदांकडे फिरून पाहूं लागली. शंकराचार्यांच्या स्वारींतील लोक हळू हळू वर चढत पुढें गेले, तेव्हां गंगाबाई स्वामी अभयानंदांकडे पाठी-मागून पाहूं लागली. ते वर जातां जातां अगदीं दिसेनासे होईपर्यंत ती त्यांच्या-कडे पहातच होती. ते वर जाऊन दिसेनासे झाले, तरी ती आपल्या जागेवरून

हलेना. तिनें गणपतीभय्याला सर्व खरी हकीगत सांगितली. आणि शंकराचार्यांची स्वारी देवदर्शनाहून परत जातांना आणखी एकदां भय्यासाहेबांना पहावयास सांपडावें अशा हेतूनें गंगाबाई तेथेंच उभी राहिली होती. देवीचें दर्शन घेऊन आचार्यांची स्वारी परत फिरली व त्यांच्या लवाजम्यांतील सर्व लोक जसे वर गेले होते, त्याच क्रमानें पायऱ्यांवरून खालीं उतरून गेले. जाते वेळींही गंगाबाईनें आपल्या नवऱ्याला पोटभर पाहून घेतलें. तरी पण तिच्या डोळ्यांची तृप्ति झाली नाहीं, आणि आचार्यांची स्वारी फार जलदीनें गेली, असें तिला वाटलें. अखेरीस आचार्यांची स्वारी अशा रीतीनें निघून गेल्यानंतर आतां आपण पुढें काय करावयाचें, हा गंगाबाईला प्रश्न येऊन पडला. आपला पति जिवंत आहे, आपण त्याला प्रत्यक्ष पाहिलें, आतां आपण त्याला जाऊन भेटण्याचाच काय तो अवकाश, म्हणजे आपण सुखसमुद्रामध्यें निमग्न होऊन जाऊं, एवढेच काय ते विचार आतांपर्यंत गंगाबाईच्या मनांत आलेले होते. गंगाबाईचा नवरा त्यांना अशा अचानक रीतीनें आढळल्याबद्दल गणपतीभय्यालाही मोठा आनंद झाला. पण गंगाबाईचा नवरा जर हा अशा प्रकारचा संन्यासी झाला आहे, तर आतां याबद्दल कशी काय व्यवस्था होणार, हा एक नवीन प्रश्न गणपतीभय्याच्या मनांत उपस्थित झाला. गंगाबाई तर आपला पति सांपडला, या आनंदाच्या भरांत अगदीं निमग्न होऊन गेली होती. अशा या तिच्या आनंदाचा उच्छेद करणारी असली ही शंका तिला सांगावी किंवा न सांगावी या विचारांत गणपतीभय्या होता. इतक्यांत गंगाबाईनेंच गणपतीभय्याला पुढील प्रश्न केला. " काय हो, या शंकराचार्यांची बायको त्यांच्या मठांत खालीं असेल नांहीं का? मला वाटतें, तिला जाऊन भेटावें आणि तिला आपली सर्व हकीगत सांगून तिच्यामार्फतच तिकडच्या भेटीचा योग जुळवून आणावा!" बिचारी गंगाबाई अद्यापि अल्पवयी होती. तिला जगांतील सगळ्याच व्यवहाराचें अद्यापि ज्ञान झालेलें होतें असें नाहीं. संन्याशांना बायका असूं शकत नाहींत, या गोष्टीची त्या बिचारीला कल्पनाही नव्हती. गंगाबाईचा प्रश्न ऐकल्यानंतर त्याला काय उत्तर द्यावें, हें गणपतीभय्याला समजेना. पण अखेरीस तो मोठ्या कष्टानें म्हणाला, " गंगाबाई, या शंकराचार्यांसारख्या संन्याशांना बायका नसतात!"

" हे शंकराचार्य बरेच वृद्ध झालेले आहेत," गंगाबाई म्हणाली, " म्हणून कदाचित् त्यांना बायको नसेल."

" असें नव्हे." गणपतीभय्या म्हणाला, " कोणत्याच संन्याशाला बायको असूं शकत नाहीं!"

" असें कसें म्हणतां?" गंगाबाईनें विचारलें, " आतां तिकडे संन्यासी व्हावयाचें झालें असलें, तरी मी त्यांची बायको आहें तर खरी?"

" तेंच आतां कसें काय होणार, याचा मी विचार करीत आहें." गणपतीभय्यानें उत्तर दिलें.

" म्हणजे! तुमच्या म्हणण्याचा अर्थ मी समजलें नाहीं!" गंगाबाई म्हणाली.

" गंगाबाई," गणपतीभय्या मोठ्या कष्टानें बोलूं लागला, " तुम्हांला ही गोष्ट सांगण्याचें माझ्या मोठें जिवावर आलें आहे; पण काय करावयाचें? तें सांगितल्यावांचून गत्यंतर नाहीं."

" तें काय?" गंगाबाईनें विचारलें.

" ज्यांना बायका असतात ते संन्यास घेत नाहींत." गणपतीभय्या म्हणाला. " आणि एकदां संन्यास घेतल्यावर मग कोणालाही आपल्या बायकोशीं कोणताही संबंध ठेवतां येत नाहीं!"

" असें कोण म्हणतें?"

" शास्त्र असें सांगतें."

" हाय! हाय!" गंगाबाई कपाळावर हात मारून म्हणाली, " गणपतीभय्या, तुम्ही हें शास्त्राचें म्हणणें मला कशाला सांगितलें? अनेक दिवस नाहींशा झालेल्या माझ्या प्रिय पतीला मी आपल्या डोळ्यांनीं जिवंत असलेला पाहून अजून पाव घटका देखील लोटली नसेल, तों इतक्या लवकर तुम्ही मला ही गोष्ट कशाला सांगितली! मी ज्याला कदाचित् मेलेला म्हणून समजत होतें, त्या माझ्या पतीला देवानें या वेळीं फिरून जिवंत केलें असतां या धर्मशास्त्राच्या शस्त्रानें माझ्यापुरतें तरी निदान त्यांना तुम्हीं मारून टाकिलें आहे! मी लग्नाची बायको असून ते संन्यासी झाल्यामुळें त्यांना माझ्याशीं आणि मला त्यांच्याशीं पतिपत्नीचा संबंध जर ठेवतां येत नसेल, तर आम्ही दोघें एकमेकांना मेल्यासारखींच झालों असें म्हणण्याला काय हरकत आहे? आणि असें असेल, तर मग मला आतां जिवंत राहून तरी काय करावयाचें आहे? आई गंगे, तुझ्याशिवाय तर मग आतां दुसरीकडे कोठें थारा नाहीं! म्हणून तूंच मला आपल्या पोटांत घे!"

"गंगाबाई, असा अविचार करूं नका." गणपतीभय्यानें त्यांना थांबवून सांगितलें. "मी सांगितला हा शास्त्राचा सामान्य सिद्धांत सांगितला. पण शास्त्रानें त्यांतही कांहीं सवड ठेवलेली असेल. आपली पत्नी मरण पावली असावी अशा चुकीच्या समजुतीनें त्यांनीं बहुतकरून वैतागानें हा संन्यास घेतला असला पाहिजे. पण आतां तुम्ही जिवंत आहां असें आढळून आलें, तर अशा प्रसंगीं शास्त्रार्थाची कांहीं तरी सवलत असलीच पाहिजे. म्हणून आपण या शास्त्रार्थाच्या बाबतींत चांगल्या कोणाचा तरी सल्ला घेऊं आणि मग त्याप्रमाणें काय करावयाचें तें ठरवूं."

हें म्हणणें गंगाबाईला मान्य झालें व त्याप्रमाणें तीं दोघें तेथून निघून गेलीं.

* * *

संन्याशाला बायको असणें शक्य आहे किंवा नाहीं याबद्दलच्या शास्त्रार्थाची गंगाबाई आणि गणपतीभय्या ज्या दिवशीं संध्याकाळीं चौकशी करीत होतीं आणि ज्या दिवशीं संध्याकाळीं कमळाबाई सांगितलेल्या खाणाखुणांवरून गंगाबाईला भेटण्याकरितां स्वामी अभयानद तयारी करीत होते, त्याच दिवशीं संध्याकाळीं सूर्यास्ताच्या सुमारास डोंगरांतील विंध्यवासिनीदेवीच्या देवळाच्या वरील जंगलांतून लपत छपत असा एक मनुष्य हळु हळू चाललेला होता. सूर्य नुकताच मावळला होता, तरी पण त्याचे आरक्त किरण अद्यापि पाठीमागें पुष्कळ शिल्लक राहिलेले होते. आणि त्यांचा तांबूस प्रकाश आकाशांत आणि पृथ्वीवर पसरलेला असल्यामुळे त्या वेळीं येथील सर्व वस्तुजाताला एक प्रकारची अपूर्व शोभा प्राप्त झालेली होती. अशा वेळीं एखाद्या उंच डोंगरावरून आपल्या खालीं पसरलेल्या सखल प्रदेशाकडे पहाणें फारच मनोवेधक असतें. डोंगरावरून लपत छपत येत असलेल्या वर सांगितलेल्या त्या इसमाचें लक्ष त्या वेळच्या या सृष्टिसौंदर्याकडे जाऊन तो अगदीं चकित होऊन गेला. तो म्हणाला, "अहाहा! काय ही शोभा! परमेश्वरानें आपल्या मर्जीतील पुण्यवान प्राण्यांच्या सुखोपभोगाकरितां ही स्वर्गातील सौंदर्याची अपूर्व संपत्ति येथें या पृथ्वीतलावर आणून ओतलेली आहे आणि तिचा येथें हे पसरलेले असंख्य लोक पूर्ण उपभोग घेत आहेत. पण आमच्यासारख्यांच्या कपाळीं हें सुख नाहीं. आम्हांला दिवसास बाहेर तोंड काढण्याची सुद्धां पंचाईत. हे किती तरी लोक देवीच्या यात्रेसाठीं या ठिकाणीं जमलेले दिसत आहेत. पण ज्या देवीच्या दर्शनासाठीं इतके हे लोक इतक्या हालअपेष्टा सोसून या ठिकाणीं जमलेले आहेत,

त्या देवीचें दर्शन आमच्यासारख्यांच्या कपाळीं नाहीं! जी आई जगदंबा इतक्या सगळ्यांच्या पोटाला देतें, तिनें आम्ही चोऱ्या, खून, दरवडे, रक्तपात, वगैरे केल्यावांचून आमच्याही पोटाला पोटभर दिलें नसतें काय! पण आमचें प्राक्तन खोटें! लोकांनीं दिवसाढवळ्या राजरोस फिरावें आणि आम्ही रात्रीच्या वेळीं चोरून मारून लूट फाट करावी, हेंच आमच्या कपाळीं लिहिलेलें! लोकांनीं पुण्यकर्म करावें आणि आम्ही आमच्या अघोर कर्मांनीं नरकाच्या कोठड्या भराव्या, असेंच आमच्या कपाळीं लिहिलेलें! ही समोर गंगा नदी वाहत असलेली दिसत आहे! सगळ्या जगाचें पातक ही धुऊन टाकते असें म्हणतात! पण आम्ही कधींही भक्तिभावानें हिच्यामध्यें स्नान करण्याला गेलों नाहीं! मी आतांपर्यंत निरुपद्रवी वाटसरूंचे खून करून सांडलेलें सगळें रक्त एका ठिकाणीं केलें, तर त्या मी सांडलेल्या रक्ताची ह्या भागीरथीएवढी मोठी नदी होईल! इतका मी पापी! या टेकडीच्या पायथ्याशीं दिसत असलेल्या ज्या मठामधून भजनाच्या झांजांचे आणि मृदंगांचे आवाज मला येथें वरती ऐकूं येत आहेत, त्याच मठांत शंकराचार्य उतरलेले आहेत. आपला धर्म समजून घेण्याकरितां आणि यांच्या दर्शनाकरितां त्यांच्याकडेही किती तरी लोक जात येत आहेत! मी त्यांच्याकडे गेलों तर मलाही ते धर्मोपदेश नाहीं का करणार? पण माझ्या कपाळीं तें नाहीं! माझ्या गुरूनें मला—या हतभाग्याला—असा एक धर्मोपदेश करून ठेवलेला आहे कीं, अशा चोऱ्या करतां करतां यांतच कधीं तरी आमचा कपाळमोक्ष होणार!—बाकी मीही एक दिवस या शंकराचार्यांच्या मठांत जाणार आहें! पण तो त्यांच्यापासून धर्मोपदेश घेण्याकरितां नव्हे; मला त्यांच्यापासून जें घ्यावयाचें आहे तें त्या पोकळ धर्मोपदेशापेक्षां कांहीं तरी जास्त वजनाचें आणि जास्त किंमतीचें असें आहे! पण त्या शंकराचार्यांच्या मठांत तो भय्यासाहेब—तो आमच्यांतून पळून गेलेला भय्याखान—एका संन्याशाचें सोंग घेऊन दडून राहिला आहे, असा मला संशय आहे. त्यामुळें या शंकराचार्यांच्या छावणीवर छापा घालण्याला माझें मन जरा कां कूं करीत आहे. तो मरून गेला, अशी एक बातमी आहे आणि तो जिवंत आहे अशीही दुसरी एक बातमी आहे. यांतील खरें काय हें पाहण्यासाठीं मी आपल्या विश्वासांतील एका ठगाला इकडे पाठविलें होतें. पण त्याचा इतके दिवसांत अजूनपर्यंत कांहींच पत्ता नाहीं. म्हणून दुसऱ्या एका मार्गानें हा भय्यासाहेब जिवंत आहे किंवा मेला आहे याची शहानिशा करून घेण्याची मी एक निराळीच तोड काढली आहे. या

विंध्यवासिनीच्या आसपास पुष्कळ मांत्रिक राहतात; आणि या नवरात्राच्या दिवसांत बाहेरचेही पुष्कळ मांत्रिक येथें जमतात. ते आपल्या अंगांत भुतें आणून विचारलेल्या प्रश्नांचीं उतरें सांगतात किंवा मेलेल्या माणसांचीं भुतें प्रत्यक्ष आणून दाखवितात, असेही कांहीं मांत्रिक आहेत, असें म्हणतात. मी अशा एखाद्या मांत्रिकाचा शोध करतां करतां नुकताच मला एक इसम भेटला आहे. त्याच्या-पाशीं जादूनें भारलेली आणि अनेक मंत्रांनीं मंतरलेली अशी एक अंगठी आहे. आतां त्याला एखाद्या मेलेल्या बाळंतिणीच्या डोक्यांतील कवटीच्या हाडाची फक्त जरूरी आहे. तेवढें मिळालें म्हणजे माझें काम होईल. मी आपल्या टेहळ्यांना यात्रेंत शोधासाठीं पाठविलें होतें. त्यांनीं मला नुक्तीच अशी एक बातमी कळविली आहे कीं, या यात्रेकरूंपैकीं एक बाळंतीण मेली असून तिला बहुतकरून आज रात्रीं त्या दूरच्या गंगेच्या कांठच्या स्मशानामध्यें जाळण्यांत येईल. तो मांत्रिक असें सांगतो कीं, याला बाळंतिणीच्या डोक्याची कवटी मिळाली, तर तिच्या जोरावर जादूच्या मंत्रांनीं हा आपल्याला बांधून टाकील. म्हणून कोणी इसम बाळंतिणीची कवटी काढावयाला गेला असतां त्यानें ज्या दुष्मनांना मारलें असेल, त्यांचीं भुतें तेथें येतात आणि त्याला ती कवटी घेऊं देत नाहींत. अशा वेळीं हीं मंतरलेली अगठी हातांत असली म्हणजे त्या भुतांचें कांहीं एक चालत नाहीं. ती अंगठी तो मांत्रिक आज संध्याकाळीं मला या ठिकाणीं आणून देणार होता. हीच ती जंगलांतील आमची दोघांची ठरलेली खुणेची जागा. करकरीत तिनसांजा मी येतों, असें त्यानें मला सांगितलें आहे बहुतकरून इतक्यांतच तो येईल. तोंपर्यंत त्याची येथें वाट पहात बसणें जरूर आहे." असें म्हणून तो तेथें एका झाडाच्या आड दडून बसला.

स्वामींच्या मठांतील एका शागीर्दाची अंगठी एके दिवशीं संध्याकाळीं हरवली होती, व कांहीं वेळानें ती सांपडली, म्हणून मागील प्रकरणामध्यें सांगितलें आहे. ती एक यःकश्चित् अंगठी असून ती शोधण्याकरितां तो शागीर्द इतकी खटपट करीत आहे असे उद्गार त्या वेळीं स्वामी अभयानंद यांच्या तोंडून निघालेले होते. पण ती अंगठी यःकश्चित् नव्हती. ती एक मंतरलेली अंगठी होती. आणि त्या मंतरलेल्या जादूच्या अंगठीमध्यें काय सामर्थ्य होतें याची स्वामींना कल्पनाही नव्हती. ती अंगठी ठरलेल्या वेळीं त्या शागीर्दानें त्या जंगलांत वाट पहात बसलेल्या इसमाला नेऊन दिली. त्या वेळीं त्या इसमानें त्या शागीर्दाला नम्रपणानें मुजरा

करून सांगितलें कीं, "महाराज, आज एक बाळंतीण मेली असल्याची मला खबर मिळाली आहे. रात्रीं गंगेच्या कांठच्या स्मशानांत ती जाळली जाईल. तेव्हां आजच्या आज आपल्याकडून ही अंगठी मला मिळाली, हे फार बरें झालें. उद्यां मी त्या बाळंतिणीची कवटी घेऊन तुमच्या दर्शनाला येतों."

"ठीक आहे." तो शागीर्द म्हणाला, "तूं ती कवटी आणलीस म्हणजे तुझा दुष्मन मेला आहे किंवा नाहीं, याची नक्की माहिती मी आपल्या अंगांत भूत आणून तुला सांगेन. पण ही गोष्ट कदाचित् मी सांगण्याच्या आधींही तुला कळण्याचा संभव आहे. कारण तुझें हें कारस्थान तुझ्या दुष्मनाच्या भुताला कळलेलें असलें तर माझ्या मंत्रानें आपण बांधले जाऊं नये म्हणून तुझ्या दुष्मनाचें भूत तूं बाळंतिणीच्या चितेंतून तिची कवटी ओढून काढीत असतांना तुझ्यासमोर येऊन उभें राहील, तुझ्या अंगावर ओरडेल, तुला भेवडावील आणि तुला ती कवटी घेऊं देणार नाहीं, त्या वेळीं तूं घाबरलास, तर तूं मेलासच म्हणून समज. म्हणून तुझ्या दुष्मनाचें भूत तुझ्यासमोर येऊन तुला भेवडावूं लागलें, तर त्याला ही आंगठी तूं दाखव, म्हणजे त्या भुताचा कांहीं एक जोर चालावयाचा नाहीं; आणि तूं बाळंतिणीची कवटी घेऊन सुरक्षित परत येऊं शकशील, आणि तुझ्या दुष्मनाच्या भुताला तुझी ही बातमी न कळून ते स्मशानांत आलें नाहीं, तर त्या बाळंतिणीच्या कवटीच्या साहाय्यानें मी त्याला तुझ्यासमोर आणून उभा करतों, आणि तुला काय पाहिजे असेल तें त्याच्याकडून बोलवितों!"

असा त्या दोघांचा संकेत ठरून रात्रीच्या काळोखांत ते दोघे जण दोन निरनिराळ्या वाटांनीं निघून गेले.



## रांग एकुणतिसावी

रात्र बरीच झाली होती. चंद्र मावळून गेल्यामुळें जिकडे तिकडे काळोख पसरला होता. आणि शिवाय आकाशांत ढग आलेले असल्यामुळें पृथ्वीवरील काळोख जास्तच निबिड झालेला होता. यात्रेकरूंची रहदारी बहुतेक बंद झाली असून जिकडे तिकडे सामसूम होत चाललेलें होतें. अशा वेळीं गणपतीभय्या आपल्या बिन्हार्डी जेथें निजला होता, त्या घराच्या दारावर कोणी तरी थाप मारीत आहे असा आवाज ऐकूं आला. गणपतीभय्याला थोडी झोंप लागली होती, पण या आवाजानें तो जागा झाला. जागा होऊन तो कानोसा घेत आहे, तों 'येथें गणपतीभय्या या नांवाचे कोणी इसम रहातात ना?' असें आपल्याला बाहेरून कोणी तरी विचारीत आहे, असें त्याला ऐकूं आलें. तेव्हां तो आपल्या अंथरुणावरून उठून डोळे चोळीत चोळीत दरवाज्याकडे गेला व 'बाहेर कोण आहे?' म्हणून त्यानें विचारलें. "येथें गणपतीभय्या या नांवाचे कोणी इसम राहातात ना?" असा बाहेरून आवाज आला. "होय, तुम्ही कोण? गणपतीभय्यापाशीं तुमचें काय काम आहे?" असा गणपतीभय्यानें आंतून फिरून सवाल केला. त्यावर बाहेरच्या इसमानें उत्तर दिलें कीं, "गणपतीभय्यापाशीं माझें कांहीं काम आहे; जरा दरवाजा उघडा पाहूं." असें म्हणून त्या बाहेरच्या इसमानें थोड्याशा जोरानें त्या दारावर एक धक्का दिला. गणपतीभय्या आंतून कडी काढणारच होता, इतक्यांत बाहेरच्या इसमानें दिलेल्या धक्क्याच्या योगानें दार एकदम उघडलें आणि तो इसम आंतमध्यें आला. आपण दरवाजाची कडी काढण्याच्या आधींच दरवाजा कसा उघडला, याचें गणपतीभय्याला आश्चर्य वाटलें. पण त्याबद्दल विचार करण्याला त्याला फुरसतच मिळाली नाहीं. कारण जो इसम त्याच्याकडे आला होता, त्यानें आवाजावरून हाच गणपतीभय्या असें

आधींच ताडलें होतें. त्यामुळें दार उघडलें जाऊन तो आंत आल्याबरोबर त्यानें एकदम गणपतीभय्यापाशीं बोलण्याला सुरुवात केली. तो म्हणाला, " गणपती-भय्या, गणपतीभय्या, तुमचेंच नांव गणपतीभय्या ना ? आज सकाळीं शंकराचार्यांच्या छावणींत ज्या अभयानंद स्वामींच्याकडे तुम्ही आलां होतां त्या स्वामींनीं मला तुमच्याकडे पाठविलें आहे. त्या गंगाबाई येथेंच असतात ना ? त्या कोठें आहेत ? "

" मी स्वामींकडे आलों, त्या वेळीं स्वामींनीं मला धुडकावून लाविलें. " गणपतीभय्या म्हणाला. " पण आज सकाळीं देवीच्या दर्शनाला चाललेल्या शंकराचार्यांच्या स्वारींत आम्हीं स्वामींना पाहिलें, तेव्हां गंगाबाईनें ' हाच आपला पति ' म्हणून नक्की ओळखलें ! "

" खरेंच का ? " त्या आलेल्या इसमानें विचारलें.

" अगदीं खरें ! " गणपतीभय्यानें उत्तर दिलें. " पण त्या बिचारीला आपला नवरा सांपडून न सांपडल्यासारखा झाला ! "

" असें कां ? " त्या इसमानें आश्चर्यानें विचारलें.

" कां तर काय ? " गणपतीभय्या म्हणाला, " आम्ही पुष्कळ शोध केला. पण संन्याशाला आपल्या बायकोशीं कोणताही संबंध ठेवितां येत नाहीं; ती त्याला मेल्यासारखीच आहे, असेंच ज्यांनीं त्यांनीं सांगितलें. तेव्हां अशा स्थितींत जगण्यापेक्षां मरणेंच बरें, असें वाटून तिनें अगदीं गंगेंत जाऊन जीव देण्याचा देखील निश्चय केला होता. पण मी तिला दोन गोष्टी सांगून कशी तरी थांबवून ठेविली. "

" छे, छे, छे ! " तो इसम घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला, " हा कोणी भलताच शास्त्रार्थ सांगितला ?—ती कोठें आहे ?—प्रत्यक्ष स्वामींनीं मला पाठविलें आहे. चला, ती कोठें आहे तें मला दाखवा !—स्वामींनीं शास्त्रार्थाची तजवीज केली आहे ! चला चला, ती कोठें आहे, तिकडे मला घेऊन चला ! ती येथेंच आहे ना ?—तिला झोंप का लागली आहे ?—इतक्या दुःखद स्थितींत तिला इतकी स्वस्थ झोंप कां लागली आहे ?—आपल्या इतक्या बोलण्यानें ती अजून जागी कशी झाली नाहीं ? "

तो इसम हे सगळे प्रश्न एकामागून एक घाईघाईनें विचारीत होता, त्या वेळीं गणपतीभय्या थोडासा घाबरून गेला होता. त्यानें त्या नवीन आलेल्या

इसमाला विचारलें, " तुम्ही दार आंत ढकललें, तेव्हां तें आपोआप उघडलें काय ? "

" तें मला काय माहीत ? " तो इसम म्हणाला, " तुम्ही आंतून कडी काढली असेल ना ? "

" नाहीं ! " गणपतीभय्यानें उत्तर दिलें, " मी निजतांना मुद्दाम कडी घालून निजलों होतों. पण आतां मी कडी काढण्याच्या आधींच तुम्ही ढकलल्याबरोबर दार उघडलें ! "

" पण मी विचारतों आहें त्याचा आणि या दाराच्या कडीचा काय संबंध आहे ? " त्या इसमानें उतावीळपणानें विचारलें.

" पुष्कळ संबंध आहे ! " गणपतीभय्यानें अगदीं गोंधळून जाऊन उत्तर दिले. " तुम्ही माझ्याबरोबर या ! मला एक संशय आला आहे ! मला ' होय ' म्हणून मला झोंप लागल्यावर ती दाराची कडी काढून गंगेवर गेली कीं काय, अशी मला भीति वाटत आहे ! "

असें बोलत बोलत गंगाबाई ज्या खोलींत निजली होती त्या खोलींत ते दोघे जण गेले. तेथें एक बारीक दिवा मिणमिण जळत होता. एका लहानशा भांड्यांत शिजविलेलें अन्न खाल्ल्याशिवाय तसेंच्या तसेंच पडलें होतें. आणि एका बाजूला एक वाकळांची वळकटी उलगडलेली दिसत होती. तिच्याकडे बोट दाखवून गणपतीभय्या त्या आलेल्या इसमाला म्हणाला, " येथें--या अंथरुणावर ती निजली होती ! "

" मग आतां ती येथून कोठें गेली ? " त्या इसमानें डोळ्यांत अश्रु आणून सद्गदित कंठानें विचारलें. अशा करुण स्वरामध्यें विचारलेला हा प्रश्न ऐकून गणपतीभय्याचें लक्ष त्या इसमाच्या चेहऱ्याकडे गेलें. त्या इसमाचा चेहरा आणि आवाज गणपतीभय्याला थोडासा ओळखीचा असा एकदां वाटला. पण त्याचा पोशाख अगदीं निराळा होता. डोकीला एक फेटा बांधलेला असून त्याचा सोगा पाठीवर सोडण्यांत आलेला होता. अंगांत शिपाई बाण्याचा अंगरखा असून पायांत तंग तुमान आणि कंबरेला एक कमरबंद असून त्यांत कांहीं तरी हत्यार लटकलेलें होतें. कपाळ मोठें, डोळे पाणीदार, नाक तरतरीत, छाती रुंद, बांधा उंच, असा त्या इसमाचा एकंदर सरदारी रुबाब दिसत होता. पण स्वामींनीं हा कोण सरदार गंगाबाईच्या शोधाकरितां पाठविला आहे; हें गणपतीभय्याच्या कांहीं लक्षांत

येईना. त्यामुळें हा कोण असावा, आणि गंगाबाई कोठें गेली असावी या विचारांनीं गोंधळून जाऊन तो अगदीं स्तब्ध उभा राहिला.

पण त्या सरदारी पोषाखांतील नवीन आलेल्या इसमाला आतां एका क्षणाचाही विलंब सहन होईनासा झाला होता. त्यानें फिरून गणपतीभय्याला विचारलें, " ती येथें निजलेली नाहीं, तर मग ती येथून कोठें गेली असावी ? "

" दुसरीकडे कोठें ? " गणपतीभय्या आपल्या कपाळावर हात मारून म्हणाला, " विश्वासघात करून गंगाबाईनें अखेरीस मला फसविलें ! ती दुसरीकडे कोठें जाणार ? आपल्या पतीच्या प्राप्तीबद्दल निराश होऊन ती बहुतकरून गंगेमध्यें जीव देण्याकरितां गेली असावी ! ती साध्वी दुसरीकडे कोठें जाणार ! "

" हाय हाय ! काय हा प्रसंग ! " तो इसम म्हणाला, " तिला किती वेळ झाला असेल ?—ती कोणीकडच्या बाजूला गेली असेल, याची तुम्हांला कांहीं कल्पना असेल काय ? चला—चला ! गणपतीभय्या, धांवत धांवत जाऊन ती पुढें गेली असली तरी आपण तिला गांठूं—चला. आणि तिनें गंगेंत उडी टाकली असली, तर तिला काढण्याकरितां मीही गंगेंत उडी घेईन ! ' असें म्हणत म्हणत ते दोघे जण घराच्या बाहेर पडून गंगेच्या किनाऱ्याकडे वळले. धांवतां धांवतां मधून धापा टाकीत टाकीत गणपतीभय्या म्हणाला, " तुम्ही माझ्यामागून या. या गंगेच्या कांठीं तें दूर जें एक स्मशान आहे, तिकडे आपण जाऊं ! त्या स्मशानाच्या दरडीवरून गंगेंत उडी टाकण्याला एक फार चांगली जागा मी पाहून ठेविली आहे, असें ती म्हणत होती ! तेव्हां तिकडेच आपण जाऊं चला. " असें म्हणून ते दोघेजण धांवपळ करीत तिकडे चालले. गंगाबाई त्यांच्या आधीं बराच वेळ घरांतून निघाली होती. गणपतीभय्या आपल्या संकटांत आपल्या इतका उपयोगी पडला, म्हणून त्याचें मन दुखविलें जाऊं नये, एवढ्याचकरितां ' मी जीव देणार नाहीं ' असें तिनें त्याच्यापाशीं कबूल केलें होतें. पण आपला नवरा संन्यासी झाला असतां त्याच्याशीं कोणताही संबंध ठेवण्याला शास्त्र आपल्याला परवानगी देत नाहीं, तेव्हां आतां आपण आपल्या नवऱ्याला जिवंत भेटून त्याच्या एकाग्र चित्तवृत्तीमध्यें व्यग्रता उत्पन्न करण्यापेक्षां आपण आपला देहत्याग करून आपल्या नवऱ्याच्या यतिधर्माचरणाला आणि त्याच्या तपःसिद्धीला मदत करणें हेंच पतिव्रतेचें खरें कर्तव्यकर्म आहे, असा विचार करून ती पूर्वसंकल्पित

स्थळीं गंगेमध्यें जीव देण्याकरितां तिकडे चालली होती. कांहीं वेळानें ती स्मशानांत पोहोंचली. त्या वेळचा तेथील देखावा फारच भयंकर दिसत होता. रात्र किर्र ओरडत होती. स्मशानांतील हाडें चघळीत पडलेल्या कुत्र्यांच्या भुंकण्याचे आवाज दुरून मधून मधून ऐकूं येत होते. आणि समोरासमोरच्या दोन झाडांवर दोन घुबडें बसून अतिशय भेसूर रीतीनें एकामागून एक अशीं किती तरी वेळ तीं घुमत होतीं. प्रत्यक्ष भुतें किंचाळलेलीं ऐकूं आलीं असतीं तर त्यांची तितकी भीति वाटली नसती, इतकें या घुबडांचें गंभीरपणाचें घुमणें भयंकर भासत होतें. काळोख तर अगदीं काळाकुट्ट पडलेला होता. पण स्मशानाच्या दरडीच्या खालीं कांहीं अंतरावर गंगेच्या पाण्याजवळ एक प्रेत अगदीं जळते जळत आलेलें होतें; त्याच्या निखाऱ्यांतून निघणाऱ्या ज्वाळांचा तांबूस प्रकाश तेथें आसपास पसरलेला होता. तरी पण त्याच्या योगानें तो काळोख जास्तच भेसूर आणि जणुं काय रक्तानें माखल्यासारखा दिसत होता! पण या सगळ्याची भीति कोणाला! ज्याला आपल्या जिवाची आणि जिवंतपणाची काळजी असेल त्याला! पण गंगाबाई तर आपल्या जीवावर उदार होऊन प्रत्यक्ष जीव देण्याकरितांच तेथें आलेली! ती याची पर्वा कशाला करील! उलट त्या स्मशानांतल्या श्वानांनीं, घुबडांनीं आणि प्रेतांनींच भिऊन जावें, इतके गंगाबाईचे विचार या वेळीं भीषण स्वरूपाचे झालेले होते अशा त्या स्मशानांत येऊन गंगाबाई पोहोंचल्यावर तिनें प्रथमतः आपल्या नवऱ्याचें स्मरण करून त्याला नमस्कार केला. नंतर तिनें आपल्या तान्ह्या बाळाचें स्मरण केलें आणि आपले सासूसासरा, आईबाप या सर्वांना, आपल्या या कृत्याबद्दल आपल्याला क्षमा करावी, अशी प्रार्थना केली. त्याच्या पाठीमागून तेथील दशदिशा, आकाश, रात्र, वृक्ष, स्थलदेवता, जलदेवता वगैरे सर्वांना तिनें वंदन केलें आणि अखेरीस तिनें गंगेची अशी प्रार्थना केली कीं, 'माझा पति आपल्या यतिधर्माच्या आचरणानें ज्या लोकामध्यें येईल, त्या लोकामध्यें, हे जगदुद्धारिणि गंगे, माझ्या पातिव्रत्याच्या बळानें—नव्हे, नव्हे, तुझ्या कृपाकटाक्षाच्या लीलेनें —त्यांचें स्वागत करण्याकरितां तूं मला आधीं नेऊन ठेव!' असें म्हणून ती पुढल्या तयारीला लागली. तिनें एक वेताचा धोंडा पाहून तो पसंत केला, व तो ती आपल्या पदरानें आपल्या गळ्यांत बांधण्याची तजवीज करण्यांत गुंतली होती. इतक्यांत दूर कोणी तरी बोलत आहे असा तिला संशय वाटला. तो आवाज अर्थातच गणपतीभय्या आणि त्याचा जोडीदार सरदार यांचाच होता.

" तें पहा ! तेथें मनुष्याच्या आकृतीसारखें कांहीं तरी दिसत आहे ! " तो सरदार काळोखांतून बोट दाखवून म्हणाला.

" होय ! " गणपतीभय्या म्हणाला, " तुम्ही म्हणतां ती माणसाचीच आकृति दिसते खरी ! या रात्रीं इकडे दुसरे कोण येणार ! बहुतकरून तीच असली पाहिजे ! "

असें म्हणून ते दोघेही फार जलदीनें धांवत धांवत बऱ्याच जवळ येऊन पोहोंचले. तरी आपण कदाचित् वेळेवर जाऊन पोहोंचणार नाहीं आणि उशिरा गेल्या-वर उपयोग होणार नाहीं, म्हणून गणपतीभय्याला अजून जरी ती गंगाबाईच आहे असें नक्की दिसलें नव्हतें, तरी तिनें आरंभिलेल्या कृत्यापासून तिला रोखून ठेवण्यासाठीं गणपतीभय्यानें अदमासानें दुरूनच तिला उद्देशून पुढील शब्द मोठ्यानें उच्चारिले, " कोण आहे तें ! हां ! गंगाबाई, खबरदार ! थांबा ! जेथें उभ्या आहांत तेथेंच थांबा ! एक पाऊल पुढें टाकाल, तर तुम्हांला शपथ आहे ! "

गंगाबाईनें ते शब्द ऐकले आणि तो आवाजही ओळखला. इतकें चुकवितां चुकवितां अखेरीस गणपतीभय्या आपल्या उद्देशांत व्यत्यय आणणार असें तिला वाटलें. पण आतां गणपतीभय्यानें सांगितलें तरी मी त्याचें ऐकणार नाहीं, असा निश्चय करून गणपतीभय्याचा आवाज जिकडून आला होता तिकडे ती वळली आणि अगदीं जवळ येऊन पोहोंचण्याच्या बेतांत आलेल्या गणपतीभय्याला उद्देशून ती म्हणाली, " गणपतीभय्या, माझ्या भाऊ गणपतीभय्या, तूं मला शपथ घालूं नको ! असल्या कामांत आतां या वेळीं मी तुझी शपथ मानणार नाहीं ! "

" गणपतीभय्याची शपथ तूं मानणार नसशील, तर नको मानूं ! पण !—" गणपतीभय्याच्या बरोबर असलेला सरदार घाईघाईनें पुढें सरसावून आणि गंगा-बाईचा हात धरून गंगाबाईला म्हणाला, " पण माझी शपथ तर तूं मानशील ना ? "

कोणी तरी परपुरुषानें अशा रीतीनें एकदम येऊन आपला हात धरावा याबद्दल गंगाबाईला त्वेष आला व हा असा धीट मनुष्य कोण आहे, हें जाणण्याकरितां त्या तांबूस रंगाच्या काळोखांतून त्याच्या चेहऱ्याकडे पाहत पाहत ती आपला हात सोडवून घेऊं लागली. पण आपल्या हातांत धरलेला तिचा हात न सोडतां तो

गंगाबाईला म्हणाला, " माझी शपथ मानावयाला मी तुला उगीच सांगत नाहीं !—मला तूं अजून ओळखलें नाहींस काय ! "

गंगाबाईनें त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलें, त्याच्या पोषाखाकडे पाहिलें, आणि ती अगदीं आश्चर्यानें चकित होऊन गेली. भय्यासाहेब झांशीस असतांना आणि प्रवासांत असतांना जशा प्रकारचा सरदारी बाण्याचा त्यांचा पोषाख असे, तसाच तो या वेळीं होता. गंगाबाईनें आपल्या नवऱ्याला ओळखलें. पण तिच्या मनाची कांहींच समजूत न पडल्यामुळें ती अगदीं गोंधळून गेली, आणि ती म्हणाली, " मीं अजून नाहीं ओळखलें ! कोण तें ? "

" प्रिये," तो सरदार म्हणाला, " मी तुझा सेवक—मी तुझा प्रिय भय्यासाहेब नव्हे काय ? अजूनही तूं मला ओळखिलें नाहींस काय ? "

" होय ! मी ओळखलें ! " असें बोलून गंगाबाईनें आपल्या नवऱ्याला घट्ट मिठी मारिली व आपली मान त्याच्या खांद्यावर ठेवून आपल्या डोळ्यांतील आनंदाश्रूंनीं गंगाबाईनें आपल्या पतीला जणूं काय मंगल स्नानच घातलें ! ! नंतर गंगाबाईनें जीव देण्याकरितां आपल्या पदरांत बांधलेला दगड भय्यासाहेबांनीं सोडून दूर फेंकून दिला. गणपतीभय्या हा सर्व प्रकार पाहत अगदीं स्तब्ध उभा राहिला होता. त्याला यांतील अर्थ कांहींच कळेना. अखेरीस गंगाबाईनें भय्यासाहेबांच्या गळ्यांत हात घालून त्यांच्या तोंडाकडे प्रेमानें पहात पहात आणि हंसत हंसत विचारलें. " मी ओळखलें असें म्हटलें खरें; पण मी आपल्याला आज सकाळीं स्वामी अभयानंद म्हणूनही ओळखिलें होतें ! तेव्हां याचा काय अर्थ आहे, हें मला अजून कांहीं एक समजलें नाहीं. "

" प्रिये, " गंगाबाईच्या डोळ्यांतील अश्रू पूसून आणि तिच्या कपोलप्रदेशावरून प्रेमानें हात फिरवून भय्यासाहेब म्हणाले, " प्रिये, तें मी तुला आणि गणपतीभय्याला सर्व समजावून सांगतों. पण थांब ! तें मी तुम्हांला आतांच सांगितलें असतें !—पण तो पहा ! तुम्ही दोघें जण जरा येथेंच थांबा !—त्या गंगेच्या कांठीं पाण्याच्या जवळ तें पहा एक प्रेत जळत आहे. आणि त्याच्या ज्वाळांचें प्रतिबिंब गंगेच्या पाण्यांत पडल्यामुळें एकाच्या जागीं दोन प्रेतें जळत आहेत कीं काय असा भास होत आहे !—पण दोन नाहीं दहा प्रेतें जळत असलीं, तरी तुम्ही भिऊं नका !–तो पहा कोणी तरी एक जण लपत छपत–तुम्ही बिलकूल घाबरूं नका !—असले हे जादूटोणे करणारे अघोरी लोक रात्रींच्या प्रहरीं जळणारीं प्रेतें

उसकटून त्यांतील हाडें चोरून नेण्याकरितां येत असतात ! अशा वाममार्गी लोकांना शासन केलेंच पाहिजे !— तुम्ही येथें स्वस्थ बसा !— आतां हें प्रेत जळत आलें, आतां याला भीति नाहीं, असें समजून त्या प्रेताच्या बरोबरचे लोक माघारे गेलेले असावेत, आणि आतां या प्रेताचें संरक्षण करण्याकरितां येथें कोणी नाहीं असें पाहून हा कोणी तरी दुष्ट जादूगार ही चिता उसकटण्याचा प्रयत्न करीत आहे. पण ज्याचें संरक्षण करण्याला दुसरें कोणी नाहीं त्याचें मी संरक्षण करतों !— प्रिये, गणपतीभय्या तुला येथें सोबत करील ! मी हा आतां जाऊन आलों पहा !" हे शब्द अर्धवट पुरे झाले नाहींत, तोंच भय्यासाहेब दहा पांच पावलें पुढें गेलेही. 'तुम्ही अशा अपरात्रीच्या वेळीं तिकडे भलतीकडे जाऊं नका,' असें गंगाबाई त्यांना सांगत होती; पण भय्यासाहेब तोंपर्यंत घाईघाईनें इतके दूर गेले कीं, त्यांनीं आपल्या प्रियेचे ते ममतेचे शब्द क्वचित्‌च ऐकले असतील.

पूर्वीच्या भागांत सांगितलेला इसम त्या शागीर्दानें दिलेली जादूची अंगठी आपल्या बोटांत घालून गंगेच्या कांठीं जें प्रेत जळत होतें त्याच्या आसपास टेहेळणी करीत फिरत होता. त्या बाळंतिणीच्या प्रेताला अग्नि देऊन बरोबरचे सर्व लोक माघारे गेले, आणि आतां आपल्याला हरकत करण्याला कोणीही येण्याचा संभव नाहीं, अशी खात्री झाल्यावर तो हळू हळू पुढें येऊं लागला. तो शरीरानें धिप्पाड असून त्याचा रंग अगदीं काळाकुट होता. त्याच्या हातांत एक तलवार होती. त्या चितेच्या ज्वाळांचें प्रतिबिंब त्याच्या त्या लखलखीत तलवारीवर पडून ती इतकी चमकत होती कीं, ती तलवार त्या इसमानें ती चिता उसकटण्याच्या हेतूनें त्या आगींत घातली त्या वेळीं बाकीच्या ज्वाळांप्रमाणें हीही एक आगीचीच ज्वाळा वर चालली आहे कीं काय, असा भास होत होता. तो आपल्या तलवारीनें त्या चितेच्या डोक्यावरील निखारे उसकटीत होता. इतक्यांत भय्यासाहेबांनीं तें त्याचें कृत्य पाहून त्याला थांबविण्याकरितां दुरूनच एक आरोळी दिली. ती आरोळी ऐकून तो थोडासा घाबरला, पण त्या दूरच्या आरोळीचा इसम जवळ येण्याच्या आधींच आपण त्या प्रेताची कवटी घेऊन जाऊं, असा त्याचा अदमास होता. म्हणून तो मुकाट्यानें आपल्या तलवारीनें त्या चितेंतील निखारे बाजूला सारून हाडें बाहेर काढण्याच्या बेतांत होता. इतक्यांत भय्यासाहेब त्याच्या बरेच जवळ येऊन पोहोंचले, आणि त्याला म्हणाले, " तूं कोण आहेस ? हें काय करतो आहेस ? ह्या पवित्र चितेला तूं कां विटाळीत आहेस ? मेलेल्या माणसांना—त्यांच्या

चितेवर—आगीच्या डोंबामध्येंही–स्वस्थता मिळूं न देणारा असा तूं अधम प्राणी कोण आहेस ? " हे शब्द भय्यासाहेबांकडून उच्चारले जात होते, त्या वेळीं चितेचा विध्वंस करणाऱ्या त्या इसमाची पाठ भय्यासाहेबांकडे वळलेली होती; परंतु त्यांचे हे शब्द ऐकून त्यानें आपलें तोंड भय्यासाहेबांकडे वळविलें. आणि भय्यासाहेबांच्या इतक्याच जोरानें तो त्यांना उलटून म्हणाला, " मला विचारणारा तूं कोण ? मेलेल्या माणसांची काळजी घेण्याकरितां येथें आलेला तूं याच्यापूर्वी मरून भूत झालेला नसून अजून जिवंत असशील, तर तुला हा मी ठार मारून टाकतों ! " असें म्हणून त्यानें आपली तलवार उपसली, व भय्यासाहेबांच्या अंगावर तो धांवून गेला. पण भय्यासाहेबांच्याजवळ जाऊन त्यानें त्यांच्या तोंडाकडे पाहिलें, तों त्याची ती पहिली सगळी वीरश्री उतरून गेली. त्यानें वार करण्याकरितां वर उचललेला हात खालीं आला. त्यानें पुढें टाकलेलें पाऊल मागें हटलें. त्याच्या मनांतील धैर्याची जागा भीतीनें घेतली. त्याचा आवाज बदलला आणि कांपऱ्या कांपऱ्या स्वरानें तो म्हणाला, " तूं कोण ! भय्यासाहेब ! अरेरे घात झाला ! "

भय्यासाहेबांना करीमबक्षानें विंध्याचलाच्या जंगलांत पूर्वी ज्या पोषाखामध्यें असतांना लुटलें होतें, त्याच्याचसारख्या पोषाखामध्यें या वेळीं भय्यासाहेब त्याच्या- समोर उभे होते. त्या पोषाखांत भय्यासाहेबांना पाहून तो इसम अगदीं गर्भगळित होऊन गेला. त्याच्या मांत्रिकानें त्याला जी खूण सांगितली होती, ती त्याच्या अनुभवाला आली. तुझ्या दुष्मनाचें भूत स्मशानांत येऊन तेथें तुला हरकत करील, हे त्या मांत्रिकाचे शब्द त्याला आठवले, आणि आपल्या मांत्रिकानें सांगितलेल्या भाकिताप्रमाणें हें भय्यासाहेबांचें भूतच आपल्या समोर येऊन उभें राहिलें आहे, अशी त्याचा खात्री झाली व त्यामुळें तो मनांतून अगदीं घाबरून गेला. तरी पण त्या वेळेपुरतें उसनें धैर्य आणून तो म्हणाला, " तूं कोणीही ऐस. मी तुझी बिलकूल पर्वा करीत नाहीं. तूं भय्यासाहेबाचें भूत असलास, तरीही मी भिणार नाहीं. "

तो तलवार उपसून भय्यासाहेबांच्या जवळ आला, तेव्हां तो कोण आहे, हें भय्यासाहेबांच्याही लक्षांत येऊन चुकलें, व या वेळीं हा आपल्या तावडींत चांगला सांपडला आहे असें पाहून भय्यासाहेबांना आनंदही झाला. आणि तेही आपल्या कमेरची तलवार बाहेर काढून त्याला म्हणाले, " मी भय्यासाहेबाचें भूत नाहीं ! पण भुतापेक्षांही भयंकर असा हा प्रत्यक्ष भय्यासाहेबच तुझ्यापुढें उभा आहे !

" जो मी मेलेल्या भय्यासाहेबाच्या भुतालाही भीत नाहीं, " तो इसम म्हणाला, " तो मी जिवंत भय्यासाहेबाला तर केव्हांच भिणार नाहीं! हा करीमबक्ष लोकांना भेडसावण्यासाठीं जन्मास आलेला असून लोकांपासून भिण्याकरितां जन्मास आलेला नाहीं! तूं जिवंत ऐस किंवा मेलेल्या भय्यासाहेबाचें भूत ऐस! मला तुझी बिलकूल दिक्कत वाटत नाहीं! "

" करीमबक्ष, तूं भ्यायला आहेस किंवा नाहींस, " भय्यासाहेब शांतपणानें म्हणाले, " हें तुझ्या आवाजावरूनच स्पष्ट होत आहे! "

" भय्यासाहेब, अरे भय्यासाहेब, " करीमबक्ष म्हणाला, " तुला मी भिणार? तूं याच वेळीं नेमका येथें आलास, यावरूनच मला पाहिजे होतें तें सिद्ध झालें आहे. तेव्हां आतां मी तुला काय म्हणून भ्यावें? तूं अजून जिवंत आहेस कीं काय याच्याबद्दल मला धास्ती वाटत होती. पण आतां या ठिकाणीं या भुताच्या स्वरूपामध्यें तूं आल्यानें तूं खास मेलेलाच असला पाहिजेस, अशी माझी पक्की खातरी होऊन चुकली आहे! "

" करीमबक्ष, " भय्यासाहेब आपली तरवार उगारून म्हणाले, " मी मेलों नसून जिवंत आहें, याबद्दल ही माझी तरवार तुझी लवकरच खात्री पटवून देईल! "

" पुष्कळ भुतें मेलेलीं असतांना जिवंतपणाचें ढोंग करतात, हें मला माहीत आहे! " करीमबक्ष म्हणाला. " शिवाय माझ्या गुरूनें तुझ्या आधींच मला सांगून ठेवलेलें आहे कीं, तुझ्या दुष्मनाचें भूत स्मशानांत तुला आडवें येईल, तुला भेवडावील आणि तुझा उद्देश शेवटास जाऊं देण्याला हरकत करील. "

" होय? तर मग हा मी तुला हरकत करतोंच! " भय्यासाहेब म्हणाले. " तुझ्या गुरूच्या सांगण्याप्रमाणें माझ्या भीतीनें तूं आधीं भेदरून तर गेलेल आहेसच आणि शिवाय तुझ्या उद्देशांत तुला मी हरकतही करतोंच! "

" तूं मला हरकत करणार! " करीमबक्ष म्हणाला. " आणि तुझ्यासारख्या मेलेल्या माणसांच्या आणि भुतांच्या हरकतीला हा करीमबक्ष भीक घालणार! तुझ्यासारख्यांच्या भुतांना बांधून टाकण्याकरितां आणि त्यांच्याकडून वाटेल तशीं कामें करून घेण्याकरितां मी या बाळंतिणीची कवटी या चितेंतून ही पहा तुझ्या देखत काढून घेत आहें! कर तुला काय हरकत करावयाची आहे ती! "

" मी तुला ती काढूं देणार नाहीं ! " भय्यासाहेब त्याच्यापुढें आडवे येऊन म्हणाले.

करीमबक्ष त्यांच्या अंगावर चवताळून जाऊन म्हणाला, " अरे भय्यासाहेबाच्या भुता, तूं या भुताटकीच्या बळावर आपल्याला अजिंक्य समजूं नकोस ! अशी तुझ्यासारखीं भुतें माझ्या अंगावर येऊन तुटून पडूं लागलीं, तर त्यांना मागें हटविण्याकरितां माझ्या गुरूनें माझ्यापाशीं जादूनें भारलेली अंगठी दिलेली आहे आणि ती मी या बोटांत घालून सुरक्षित ठेविली आहे. ही पहा ती ! हिला पाहून तुझ्यासारख्या भुतांनीं गर्भगळित होऊन मागें हटलेंच पाहिजे ! " असें म्हणून करीमबक्षानें मोठ्या ऐटीनें त्या अंगठीचें बोट भय्यासाहेबांच्यापुढें करून " खबरदार आतां पुढें येशील तर ! " अशी भय्यासाहेबाला दबकावणी दाखवली.

पण या दबकावणीनें दबून न जातां भय्यासाहेब आपल्या ठिकाणीं शांतपणानें स्थिर उभे राहिले; फक्त त्यांनीं हळूच आपल्या कमरेच्या पट्टयांतील तरवारीनें करीमबक्षानें जो हात खबरदार म्हणून त्यांच्यापुढें उभारला होता, तो एका घावासरशीं तोडून जमिनीवर खालीं पाडला. त्या वेळीं आपला हात तुटल्याबद्दल करीमबक्षाला इतकें वाईट वाटलें नाहीं; पण आपल्या हाताच्या बोटांतील मंतरलेली जादूची अंगठी आपला हात तुटून आपल्यापासून दूर गेल्यामुळें आतां आपण या भुताला आपल्या कह्यांत ठेवूं शकणार नाहीं या भीतीनें तो जास्त गांगरून गेला. तरी पण दुसऱ्या हातानें तो तुटलेला आपला हात वर उचलून घेण्याचा करीमबक्ष प्रयत्न करीत होताच. पण हाताच्या जखमेनें विव्हळ झालेल्या करीमबक्षाला स्वाभाविकपणेंच जो थोडासा जास्त वेळ लागला तेवढ्यांत भय्यासाहेबांनीं तो जमिनीवरचा तुटलेला हात उचलून त्यांतील अंगठी काढून घेतली. आणि तिच्याकडे पहात ते करीमबक्षाला म्हणाले, " या यःकश्चित् अंगठीच्या जोरावर तूं मला जिंकूं पहात होतास ! पण ती अंगठी आतां माझ्या बाजूला आली आहे. पण मी तुला सांगतों कीं, असल्या जादूच्या अंगठ्या कोणाही पापी मनुष्याच्या कधींही उपयोगी पडावयाच्या नाहींत ! या जगांत सद्‌गुणासारखी दुसरी जादू नाहीं, आणि परमेश्वराच्या नांवासारखा दुसरा मंत्र नाहीं ! करीमबक्ष, तुझ्या गुरूनें तुला हें इद्रत सांगितलें असतें, तर तुझें पुष्कळ कल्याण झालें असतें. पण त्यानें नाहीं, तर मी तुला आतां सांगत आहें, हें माझें सांगणें तरी तूं ऐक ! "

भय्यासाहेब हा उपदेश करण्याच्या भरांत होते, पण त्याच्याकडे करीमबक्षाचें फारच थोडें लक्ष होतें. त्याच्या डोक्यांत त्या वेळीं दुसऱ्याच कल्पना चाललेल्या होत्या. हा बोलण्याच्या नादांत आहे असें पाहून आपल्या उरलेल्या एका हातानें आपल्या तरवारीचा घाव भय्यासाहेबांच्या पायावर करण्याच्या उद्देशानें करीमबक्षानें आपली तरवार फेकली. पण त्याचा डाव लक्षांत आणून भय्यासाहेब एकदम मागें हटले. त्यामुळें त्यांच्या पायाला कांहीं एक इजा झाली नाहीं. पण आतां यापुढें याची उपेक्षा करणें बरोबर नाहीं, असें त्यांना वाटलें. सापाला दूध पाजलें, तरी तो विषच ओकतो, त्याप्रमाणें याला आपण सदुपदेश करीत असतां हा आपले पाय तोडण्याच्या विचारांत होता, ही गोष्ट लक्षांत येऊन भय्यासाहेबांना अतिशय त्वेष आला व ते त्याला म्हणाले, " करीमबक्ष, मी तुला एक वार केला त्याच्यापेक्षां जास्त दुखापत तुला करण्याची माझी इच्छा नव्हती. पण तूं ज्याअर्थीं माझे पाय तोडण्याची इच्छा करीत आहेस, त्याअर्थी तुझे पाय तोडण्याला मलाही कांहीं हरकत दिसत नाहीं. शिवाय हे तुझे पाय शिल्लक ठेविले तर ते तुला जास्त पातकें करण्याकडेच ओढून नेतील, असे तुझे पाय छाटून टाकणें हेंच योग्य आहे ! " असें म्हणून भय्यासाहेबांनीं करीमबक्षावर एकदम झडप घातली. आपली फेंकलेली तरवार खालीं पडून निरुपयोगी झालेली पाहून लढण्याचा नाद सोडून देऊन त्या बाळंतिणीच्या प्रेतांतील हाडें घेऊन पळून जाणें हाच आतां उत्तम मार्ग आहे, असें ठरवून भय्यासाहेबांना कांहीं एक उत्तर न देतां करीमबक्ष फिरून मुकाट्यानें चितेकडे वळत होता, इतक्यांत भय्यासाहेबांनीं त्याला पकडलें. त्या वेळीं दोघांची जोराची झटापट सुरू झाली. तींत करीमबक्ष भय्यासाहेबांच्या अंगाला बिलगून त्यांच्या हातांतील तरवार आपल्या हस्तगत करून घेण्याचा निकरानें प्रयत्न करीत होता.

इकडे गंगाबाई आणि गणपतीभय्या यांना तुम्ही येथेंच थांबा असें सांगून जरी भय्यासाहेब गेले होते, तरी त्यांच्याच्यानें तेथें स्वस्थ राहवेना. आपल्या गांठी पडल्या नाहीं तोंच भय्यासाहेब आपल्यावर आणखी काय नवीन नसतें संकट ओढवून घेतात कोण जाणें, अशी गंगाबाईला फार काळजी वाटूं लागली. म्हणून तो प्रकार काय आहे हें जाणण्याकरितां गंगाबाई आणि गणपतीभय्या हीं दोघें कांहीं वेळानें तेथून निघालीं. तीं कांहींशा अंतरावर येऊन पहातात तों या दोघांची झोंबी चाललेली त्यांच्या नजरेस पडली. त्यामुळें गंगाबाई फारच घाबरून गेली.

पण इतक्यांत चालू असलेल्या कुस्तींत भय्यासाहेबांची सरशी झाली. आणि भय्यासाहेबांनीं मोठ्या शिताफीनें आपल्या तरवारीनें त्याचे दोन्हीही पाय छाटून टाकले. त्यामुळें करीमबक्ष अगदींच लुलाखुळा झाला व त्याला लागलेल्या जखमांनीं तो अगदीं व्याकुळ झाला. तरी पण तशाच तुटक्या पायांनींहि तो खुरडत खुरडत दूर निघून जाण्याचा प्रयत्न करूं लागला. तेव्हां त्याला कोठें तरी बांधून ठेवणें जरूर झालें. गंगाबाई आणि गणपतीभय्या आपल्या बाजूला येऊन उभीं राहिलेलीं भय्यासाहेबांनीं पाहिलीं होतीं. तेव्हां गणपतीभय्याच्या मदतीनें भय्यासाहेबांनीं करीमबक्षाला पकडून धरून आपल्या डोकीचा फेटा काढून त्यांनीं त्याला जवळच्या एका पिंपळाच्या झाडाच्या मोठ्या मुळकुंडीला बांधून ठेविलें. आणि त्यानें इतक्यांत कोठें सुटून जाण्याचा प्रयत्न करूं नये म्हणून गणपतीभय्याजवळ त्याची तरवार देऊन त्याच्यावर पहारा करण्याकरितां तेथें बसवून करीमबक्षाच्या संबंधानें ताबडतोब पुढील कायमची कांहीं तरी तजवीज करण्याकरितां गंगाबाईला बरोबर घेऊन भय्यासाहेब मठाकडे परत गेले.

* * *

भय्यासाहेब आणि गंगाबाई यांची जरी वर सांगितल्याप्रमाणें एकमेकांची गांठ पडली होती, तरी आतां पुढें काय करावयाचें याच्याबद्दल भय्यासाहेबांच्या मनांत कांहींच निश्चय झालेला नव्हता. स्वामी अभयानंद गंगेवर स्नानाला गेले असतां सुसरीनें त्यांना धरून पाण्यांत ओढून नेल्यामुळें ते गंगेंत बुडून समाधिस्थ झाले अशी एकीकडे एक अफवा उठवून द्यावी आणि दुसरीकडे आपल्या कुटुंबाला घेऊन आपण झांशीस परत जावें, अशी एक कल्पना एकदां त्यांच्या मनांत आली होती. पण हा प्रामाणिकपणाचा मार्ग नसल्यामुळें ही कल्पना त्यांना मुळींच पटली नाहीं. शिवाय ज्या शंकराचार्यांच्या आश्रयाचा आपल्याला इतके दिवस फायदा मिळाला, त्यांच्याशीं अशी वंचना करणें योग्य नसल्यामुळें त्यांनीं ती कल्पना एकदम रहित केली. पुढें सरळ मार्गानें काय तोड निघेल, हें ठरविलें जाईपर्यंत त्यांनीं गंगाबाईला पूर्वींच्याच ठिकाणीं आणि पूर्वींच्याच स्थितीमध्यें राहण्याला सांगितलें, व त्यांनींही स्वतः रात्रीचा आपला भय्यासाहेबांचा सरदारी पोषाक उतरून पहाटेच्या आधींच ते फिरून पूर्वींच्यासारखे स्वामी अभयानंद बनून आपल्या मठींत ध्यानधारणादिक कृत्यें नेहमींच्याप्रमाणें करीत बसले. इकडे गंगाबाई ही रोजच्याप्रमाणें सकाळीं गंगेवरून स्नान करून आपल्या मुक्कामा-

कडे परत येत असतां वाटेंत एका पिंपळाच्या पाराभोंवतीं पुष्कळ लोकांची गर्दी जमलेली तिला दिसली. पारावर गांवचे पाटील-पटवारी बसले असून त्यांच्या हाताखालचे कांहीं नोकर लोक त्यांच्याजवळ होते. त्यांच्यापुढें पिंपळाच्या पारावर ठेवलेलें एक लहान मूल होतें आणि त्या मुलाला पहाण्याकरितां पाराभोंवतीं लोकांची गर्दी जमली होती. आसपासच्या लोकांनीं सकाळीं उठून पाहिलें, तों त्या पिंपळाच्या पारावर कोणी एक लहान मूल आणून टाकलेलें त्यांना दिसलें. त्यामुळें त्यांनीं पाटलाला वर्दी दिली. पाटील आपले हाताखालचे लोक घेऊन तेथें आला. त्यानें त्या मुलाला पाहिलें व " गंगेच्या कांठच्या विश्वनाथजींच्या मंदिराजवळच्या पिंपळाच्या पारावर एक लहान मूल कोणी ठेविलें आहे तें ज्या कोणाचें असेल त्यांनीं तें ओळखण्याकरितां गंगेच्या कांठच्या पारावर यावें," अशी गांवच्या महाराकडून साऱ्या गांवांत आणि यात्रेकरूंच्या भागांत दवंडी पिटविली. त्यामुळें अनेक लोक ते मूल पाहण्याकरितां येत होते, आणि ते आपलें नाहीं असें पाहून परत जात होते. परत जातांना अनेकांच्या तोंडून अनेक उद्गार निघत होते. त्यांत एकजण बाई म्हणाली, " कोणा माउलीचें मूल असेल तें असो! मूल कसें नक्षत्रासारखें सुरेख आहे!" ते शब्द ऐकून गंगाबाईच्या मनांत कळवळा उत्पन्न झाला आणि ती आपल्या मनाशीं म्हणाली—' रात्रीं मी याच पिंपळाच्या पाराजवळून स्मशानाकडे गेल्यें आणि तेव्हां येथेंच कोणी तरी लहान मूल रडल्याचा मला भास झाला. तेव्हांपासून का हें मूल येथें पडलेलें आहे? कोणाचें मूल आहे कोण जाणें! इतक चांगलें मूल आहे म्हणतात, तर तें आपणही पाहूं या!—पण मला दुसऱ्यांचीं हरवलेलीं मुलें पाहून काय फायदा! माझें हरवलेलें मूल, देवा, तूं मला असें कधीं दाखवशील काय!—हें मूल येथें पडलेलें आणि त्याची आई माझ्यासारखीच कदाचित् या वेळीं आपल्या मुलासाठीं शोक करीत असेल!" असें म्हणत म्हणत ती त्या पाराच्या पायऱ्या चढून वर आली. व आपल्या हातांतील गंगेनें भरलेला तांब्या आणि ओल्या वस्त्राचे पिळे बाजूला ठेवून ती तेथें ठेवलेल्या त्या मुलाजवळ येऊन त्याच्याकडे पाहूं लागली. त्याला पाहिल्याबरोबर गंगाबाईच्या हृदयांत प्रेमाचा पाझर फुटला. " अग बाई!" ती म्हणाली, " हें तर माझेंच मूल! देवा, किती रे तूं कृपाळु आहेस!" असें म्हणून ती खालीं बसली आणि तिनें तें मूल एकदम आपल्या मांडीवर घेतलें. आणि त्याच्या डाव्या कानाची पाळी दुमडून तेथें आपल्या मुलाच्या डाव्या कानाच्या पाठीमागें असलेल्या तिळाची खूण आहे किंवा

नाहीं हें तिनें आधीं पाहिलें. आणि ती खूण पटल्यावर मग तर तिला बिलकूल संशयच राहिला नाहीं. त्याच्या पायाच्या अंगठ्याजवळचीं बोटें लांब होतीं, तीही खूण पटली. पण या सगळ्या बाहेरच्या खुणांपेक्षां अंतर्यामींची खूण गंगाबाईला या सगळ्या खुणांच्या आधीं पटली होती. तें मूल पाहिल्याबरोबर गंगाबाईला जो पान्हा फुटला तो तिला आवरेना. तिनें तें मूल आपल्या पदराच्या खालीं झांकून घेतलें आणि त्याच्या तोंडावरून आणि पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत ती त्याला पाजूं लागली. त्या पुत्रदर्शनाच्या आनंदानें आणि पुत्राच्या प्रेमानें तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तेव्हां तिनें आपल्या डोळ्यांना पदर लाविला आणि "देवा, तूं किती गे कृपाळू आहेस!" असें तिच्या तोंडून किती तरी वेळां उद्गार निघाले.

गंगाबाईनें त्या मुलाला एकदम आपला म्हणून ओळखिलें, त्याला तिनें एकदम आपल्या मांडीवर घेतलें. तिला कानापाठीमागच्या तिळाची खूण पटली, तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले, आणि तिला पुत्रवात्सल्यानें पान्हा फुटला, या सगळ्या स्वाभाविक गोष्टी पाहून त्या पाटलाला आणि तेथें जमलेल्या इतरही सर्व लोकांना हा हिचाच मुलगा असला पाहिजे, असें वाटूं लागलें; व गाईवासरांची भेटाभेट झाली हें फार चांगलें झालें, असे उद्गार सगळ्यांच्या तोंडून निघूं लागले. इतक्यांत साऱ्या गांवभर जी दवंडी पिटविली जात होती, ती ऐकून पंड्या कालीकिशोर हा घाईघाईनें त्या ठिकाणीं आला आणि "कोठें आहे तें मूल? मला तें आधीं दाखवा पाहूं!" असें पारावर बसलेल्या पाटलाला तो म्हणूं लागला, "पंड्याजी" पाटलानें कालीकिशोरला सांगितलें, "ह्या बाईनें हें मूल आपलेंच आहे म्हणून ओळखिलें आहे!"

"पण मला मूल तर पाहूं द्या!" पंड्या म्हणाला. "आमच्या येथें यात्रेकरू उतरले आहेत; त्यांचें मूल काल संध्याकाळपासून नाहींसें झालें आहे. त्यांनीं दवंडी ऐकिल्याबरोबर मला मूल पाहून येण्यासाठीं धाडलें आहे. तेव्हां मला तें मूल पहावयाला मिळालेंच पाहिजे."

"तुम्हांला मूल दाखविण्याला कांहीं हरकत नाहीं." पाटलानें त्याचें म्हणणें वाजवी आहे असें पाहून उत्तर दिलें; व गंगाबाईकडे वळून तो म्हणाला, "बाई, जरा तें मूल या कालीकिशोर पंड्याला पाहूं द्या बरें!"

" हें मूल माझें आहे ! " गंगाबाई म्हणाली, " त्यांना पाहिजे तर नुसतें पाहूं द्या. आणि त्यांनीं पाहिलें म्हणजे हें आपलें नाहीं अशी त्यांचीही खात्री होईल. हें मूल माझें आहे. आणि तें मी कोणालाही घेऊं देणार नाहीं—मी तुम्हांला दाखवतें !—पण आतांच मी त्याला अंगावर प्यावयाला घेतलें आहे ! त्याला जरा पोटभर पिऊं द्या ! "

खऱ्या मातेशिवाय दुसऱ्या कोणाच्याही तोंडून न निघणारे हे प्रेमाचे उद्गार ऐकून तेथील सर्व लोकांच्या मनाला मोठा चटका लागला, व पंड्या कालीकिशोर हाही क्षणभर निरुत्तर होऊन स्तब्ध राहिला. पुढें कांहीं वेळानें पोटभर पिऊन झाल्यावर गंगाबाईनें आपल्या मुलाच्या तोंडावरचा पदर काढला व टिचक्या वाजवून ती त्याला खेळवूं लागली. तें पाहून सर्वांना मोठें समाधान वाटलें. पण कालीकिशोरचे विचार निराळ्याच दिशेनें काम करूं लागले. तो त्या मुलाच्या जवळ आला आणि त्याचे हात, कंबर, डोकें, वगैरे सर्व त्यानें बारकाईनें तपासून पाहिलें व हें सर्व झाल्यावर तो पाटलाला म्हणाला, " पटेलसाहेब, हा मुलगा आमचा आहे. आज चार पांच दिवस माझे घरीं माझे यजमान आले आहेत त्यांचा हा मुलगा. मी त्याला रोज पहातों. आणि मी त्याला पक्कें ओळखलें. काल त्यांच्याकडे देवीचें बोडण झालें व देवीचे त्यांनीं देवब्राह्मण केले. म्हणून त्यांनीं या मुलाच्या अंगावर काल बरेच दागदागिने घातले होते. ते पाहून कोणीतरी भामट्यांनीं माझ्या घरांतून या मुलाला उचलून नेलें. काल संध्याकाळपासून हें नाहींसें झालेलें आहे. रात्रीं भामट्यांनीं त्याच्या अंगावरचे दागिने काढून घेऊन मूल या पारावर ठेवून दिलेलें असलें पाहिजे. "

" पाटील, " गंगाबाई डोळ्यांत अश्रू आणून रडत रडत म्हणाली, " माझ्या-वर मेहेरबानी करा !—हें मूल माझें आहे ! मी तें कोणालाही घेऊं देणार नाहीं ! " असें म्हणून गंगाबाईनें त्या मुलाची हनुवटी वर उचलून त्याचें प्रेमानें चुंबन घेतलें.

" आईसाहेब, " पाटील म्हणाला, " तुम्ही काळजी करूं नका. माझ्या हातून बिलकूल अन्याय व्हावयाचा नाहीं. " असें गंगाबाईला आश्वासन देऊन पाटील कालीकिशोर पंड्याकडे वळून त्याला म्हणाला, " पंड्याजी, हें मूल ह्या बाईचेंच आहे अशी माझी तरी निदान पक्की खात्री झाली आहे. पण तुम्ही म्हणतां कीं,

हें मूल तुमचें. पण तुम्ही हें कशावरून म्हणतां ? त्याला तुमच्या खाणाखुणा काय आहेत किंवा तुमचा साक्षीपुरावा काय आहे ? ”

इतक्यांत दुसऱ्या एका बाजूनें आपल्या खांद्यावर टाकलेल्या एकतारीच्या नादावर प्रेमळ भजन करीत एक भिकारीण त्या पाराजवळ आली. तेथें गर्दी जमलेली पाहून तिनें एकतारी आणि आपलें भजन अशीं दोन्ही थांबविलीं. आणि, पिंपळाच्या पारावर काय भांडण चाललें आहे तिकडे ती पाहूं लागली.

पाटलाच्या प्रश्नाला उत्तर देतांना कालीकिशोर म्हणाला, “ पटेलसाहेब, हा मुलगा आमच्या यात्रेकरूंच्यापैकींच आहे याबद्दल माझी खात्री आहे व तुमचीही मी खात्री करून देऊं शकतों. मी तुम्हांला सांगितलें कीं, काल याच्या अंगावर दागदागिने घालण्यांत आलेले होते; आणि त्या दागिन्यांच्या लोभानें भामट्यांनीं या मुलाला माझ्या घरून उचलून नेलेलें असलें पाहिजे असा माझा तर्क आहे. कारण या पहा खुणा. याच्या हातांत सोन्याचीं कडीं होतीं. तीं काढतांना याच्या दोन्ही हातांना निघालेले हे ओरखडे अगदीं स्पष्ट दिसत आहेत. त्याच्या कंबरेंत सोन्याच्या सांखळींत ओंवलेल्या वाघऱ्यांचा आणि मोत्यांचा करगोटा होता, तो चोरांना चटकन् निघाला नसावा. आणि म्हणून त्यांनीं तो कात्रीनें तोडला असावा. कारण ही पहा रात्रीच्या काळोखांत कात्रीच्या टोंकानें रक्त निघून झालेल्या जखमेची खूण त्याच्या कंबरेवर अजून स्पष्ट दिसत आहे. त्याचप्रमाणें या मुलाच्या डोकींत काल त्याच्या घरच्या माणसांनीं जडावाचें पिंपळपान घातलें होतें; आणि तेव्हां त्यामुळें तो किती सुंदर दिसत होता. तें पिंपळपानसुद्धां चोरांनीं कात्रीनें कातरून घेतलेलें असलें पाहिजे. कारण, हें पहा या मुलाच्या डोक्यावरचें पिंपळपान घालावयाच्या जागचे केस कातरलेले अगदीं उघड दिसत आहेत. ”

कालीकिशोर पंड्यानें दाखवून दिलेल्या खाणाखुणा पाहून पाटलाच्या मनांत चलबिचल उत्पन्न झाली व पंडयाच्या खुणा बरोबर आहेत आणि म्हणून त्याचें म्हणणेंही बरोबर असलें पाहिजे असें त्याला वाटलें. आणि गंगाबाईकडे वळून तो म्हणाला, “ बाई, हा पंडया सांगतो त्या खुणा बरोबर जमतात. तेव्हां आतां त्याच्यावर तुमचें काय म्हणणें आहे ? ”

“ माझें दुसरें तिसरें कांहीं एक म्हणणें नाहीं. ” गंगाबाई म्हणाली, “ माझें

एकच म्हणणें आहे. आणि तें हें कीं, हा मुलगा माझा आहे. आणि माझा प्राण जाईपर्यंत तो मी दुसऱ्या कोणाला घेऊं देणार नाहीं!"

"बाई, असें म्हणून कसें चालेल?" पाटील म्हणाला, "पुराव्यानें जें ठरेल, त्याप्रमाणें सगळ्यांनीं वागलें पाहिजे."

पाटलाचें हें बोलणें ऐकून गंगाबाई थोडीशी निराश आणि उदासीन झाली. तिच्या चेहऱ्याकडे त्या गर्दीतून पूर्वीं सांगितलेली ती एकतारीवाली भिकारीण टक लावून पहात होती. ती या वेळीं त्या गर्दीतून निघून पाराच्या पायऱ्या चढून वर आली आणि गंगाबाईसमोर उभी राहून म्हणाली, "कोण आहे तें? गंगाबाई?" हा प्रश्न ऐकून गंगाबाई त्या भिकारणीच्या चेहऱ्याकडे पाहूं लागली, तेव्हां दोघींनीं एकमेकींना ताबडतोब ओळखलें; पूर्वीचे प्रसंग दोघींच्या स्मरणांत प्रत्यक्ष उभे राहिले; त्या भिकारणीनें गंगाबाईच्या मुलाला ओळखलें. आणि आपण दुसऱ्याला देऊन टाकलेलें गंगाबाईचें मूल तिचें तिला परत मिळवून देण्याच्या कामीं आपण साह्य करणें जरूर आहे असें ध्यानांत आणून तिनें पाटलाला सांगितलें, "पाटीलबाबा, मी सुद्धां या मुलाला ओळखतें व या बाईलाहि ओळखतें. हें मूल हिचेंच आहे. हिची आणि हिच्या मुलाची ताटातूट करूं नका. देव तुमचें कल्याण करो!" असें म्हणून ती भिकारीण गंगाबाईच्या जवळ बसली. तिनें तें मूल आपल्या मांडीवर घेतलें आणि आपली एकतारी वाजवून त्याला ती खेळवूं लागली!

हें पाहून कालीकिशोर फारच चिडून गेला आणि म्हणाला, "पटेलसाहेब, तुम्ही या बायकांच्या नादीं काय लागतां आणि यांच्या बोलण्यावर काय विश्वास ठेवतां? हा मुलगा आमचा आहे. हा मुलगा तुम्ही या बायांना घेऊं देऊं नका. मी यांच्याविरुद्ध पुरावा सिद्ध करतों. ज्यांचा मुलगा हरवला आहे, त्या यात्रेकरूंनाच मी येथें घेऊन येतों, म्हणजे तर तुमची खात्री होईल? कालपासून तीं बिचारीं सगळीं माणसें रडत बसलीं आहेत. त्यांचे दागिन्यापरी दागिने गेले आणि आतां मुलापरी मूल जाणार! त्या भामट्यांनीं तुमच्या अपरोक्ष दागिने चोरून नेले आणि या बाया तुमच्यासमक्ष या मुलाला चोरून नेणार, हा काय न्याय झाला? थांबा! मी त्या यात्रेकरूंनाच येथें घेऊन येतों!"

असें म्हणून कालीकिशोर पंड्या आपल्या घराकडे जाण्याला वळला, तों इतक्यांत ज्यांचा मुलगा हरवला होता, ती त्याच्या घरची यात्रेकरू मंडळी इकडेच

येत असलेली त्याला दिसली. हरवलेल्या मुलाची दवंडी ऐकल्याबरोबर काली-किशोर पंड्याला पुढें पाठविण्यांत आलें होतें. पण मागच्या माणसांना मागें स्वस्थ बसवेना; म्हणून तींही इकडे येण्याकरितां निघालीं. रामचंद्रराव, त्यांच्या पत्नी, भय्यासाहेबांच्या मातोश्री, त्यांचे कारभारी, वगैरे सर्व मंडळी जवळ आलेली पाहून कालीकिशोर त्यांना हातानें खूण करून मोठ्यानें 'या, या,' म्हणून हांक मारली. 'या, या, महाराज! या, या; बाईसाहेब, लवकर या! तुमचा मुलगा सांपडला आहे! पण ही कोणी तरी एक लबाड बाई मध्येंच घुसली आहे; आणि ती तुमचा मुलगा उपटून नेऊं पहात आहे!"

कालीकिशोरचे ते शब्द ऐकून ती सर्व मंडळी अगदीं घाबरून गेली. रामचंद्र-रावांच्या पत्नी त्या मुलाला आपल्या पोटच्या मुलाप्रमाणें वागवीत असत. त्यामुळें तो मुलगा हरवल्यापासून त्यांना फारच दुःख झालें होतें. पण भय्यासाहेबांच्या आईच्या दुःखाला तर आतां पारावारच उरलेला नव्हता. त्या विंध्यवासिनीला आल्यापासून आणि या मुलाला पाहिल्यापासून त्यांच्या मनानें असें घेतलें कीं, हा आपल्या भय्यासाहेबांचाच मुलगा असला पाहिजे. कारण त्या मुलाचा तोंडा-वळा आणि त्यांच्या सुनेचा तोंडावळा अगदीं एकसारखा जमत होता. तेव्हां तो मुलगा नाहींसा झाल्यापासून त्यांच्या मनानें फार खंती घेतली होती. परंतु तो मुलगा सांपडला आहे, असें ऐकून त्यांच्या मनाला क्षणभर बरें वाटलें. तरी पण तो मुलगा आपला आहे असें म्हणून तो हिरावून नेण्याचा दुसरी कोणी एक बाई यत्न करीत आहे, असें ऐकून त्या बाईबद्दल त्या सर्वांना अतिशय त्वेष आला. आणि रामचंद्ररावांची पत्नी व भय्यासाहेबांची आई अशा दोघीजणी कालीकिशोर पंड्याजवळ पुढें येऊन म्हणाल्या, "कोण? कोण ती विवशी? आमच्या मुलाला आपला म्हणणारी कोण बाई ती? कोठें आहे ती?" त्या गर्दीतून पुढें येऊन कालीकिशोरनें हातानें दाखविलें, "ही पहा! आणि हा पहा तुमचा मुलगा!"

"अग बाई!" त्या दोघीजणी मुलाला ओळखून म्हणाल्या, "हा आमचाच मुलगा!—आणि तूं कोण ग म्हणत्येस हा तुझा मुलगा म्हणून? तूं कोण ग?— अग बाई! हा काय चमत्कार!" त्या दोघीजणी गंगाबाईच्या तोंडाकडे पाहूं लागल्या, आणि गंगाबाईही त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागली. पाहिल्याबरोबर एकमेकांची ओळख पटली. गंगाबाईनें आपल्या सासूला आणि आपल्या आईला

ओळखिलें. आणि इतक्यांत पाठीमागून आलेल्या आपल्या वडिलांना—रामचंद्र-रावांनाही—तिनें ओळखिलें. आईनें तिला आपल्या पोटाशीं धरलें, व दोघी रडूं लागल्या. भय्यासाहेबांच्या आईनें त्या दोघींच्याही पाठीवरून हात फिरवून त्यांना रडूं नका म्हणून सांगितलें. नंतर गंगाबाईनें त्या एकतारीवालीच्या मांडीवर असलेलें आपलें मूल घेऊन तें आपल्या सासूबाईच्या ओटींत घातलें आणि कालीकिशोर पंड्याला जवळ हांक मारून आणि त्याला नमस्कार करून सांगितलें कीं, "पंडितजी, तुम्ही म्हणत होतां त्याप्रमाणें हा मुलगा ह्या यात्रेकरूंचा आहे बरें! आणि तो मी त्यांचा त्यांच्या हवालीं करीत आहें." त्यावर भय्यासाहेबांची आई, त्या मुलाचें चुंबन घेऊन गंगाबाईला म्हणाली, "सूनबाई, हा तुझा मुलगा मी तुझ्या ओटींत परत घालतें! देव त्याला शतायुषी करूं दे म्हणजे झालें!—पंडितजी, आमच्यामधील मुलाचें भांडण मिटलें बरें!"

हा प्रकार पाहून सर्वांना मोठा चमत्कार वाटला व मुलाच्याबद्दल लागलेला तंटा इतक्या आनंदपर्यवसायी रीतीनें मिटलेला पाहून पाटील वगैरे सर्व लोकांना समाधान वाटलें. नंतर या अपूर्व योगायोगाबद्दलचा आणि भय्यासाहेबांच्याबद्दलचा खुलासा एकमेकांना कळण्याकरितां भय्यासाहेबांच्या मातोश्री गंगाबाईसह सर्वांना बरोबर घेऊन आपल्या बिऱ्हाडीं गेल्या.



: : ## रंग तिसावा

भय्यासाहेबांनीं करीमबक्षाला आपल्या डोकीच्या फेट्यानें तात्पुरतें बांधून ठेविलें होतें खरें; पण अशा लेच्यापेच्या बंधनांनीं बांधला जाण्यासारखा करीमबक्ष नव्हता. त्याचे त्या बंधनांतून सुटण्यासाठीं एकसारखे प्रयत्न चाललेले होते. गणपतीभय्या हातांत तरवार घेऊन जवळ उभा होता; व 'तूं सुटण्याचा प्रयत्न करशील तर या तरवारीनें मी तुला ठार मारीन,' अशी तो त्याला तंबी देत होता. तरी पण कशालाही न जुमानतां करीमबक्षाचे सुटून जाण्याचे प्रयत्न एकसारखे चालूच होते. भय्यासाहेब आपल्या मदतीला आणि याच्या बंदोबस्ताला जास्त कुमक केव्हां पाठवितात, याची गणपतीभय्या एकसारखी वाट पहात होता. पण कोणीही माणूस येत असल्याची चाहूल त्याला ऐकूं येईना. करीमबक्ष आपल्या दांतांनीं त्या फेट्याच्या फडक्याचे त्या काळोखांत हळु हळु कुरतडून लहान लहान तुकडे तोडीत होता. आपण या जादूच्या नादीं लागून भय्यासाहेबाच्या हातांत जिवंत सांपडलों, ही गोष्ट चांगली नव्हे, व यांतून आपण कसेंही करून सुटलें पाहिजे असें त्याला वाटत होतें. त्याचे हातपाय तुटल्याचें त्याला दुःख वाटत नव्हतें; पण तो जिवंत पकडला गेल्याबद्दल त्याचें मन त्याला खात होतें. माझ्यासारख्या ठगांच्या टोळीच्या नायकानें दुसऱ्याच्या हातांत जिवंत सांपडण्यापेक्षां या गंगेंत जीव दिलेलाही कांहीं वाईट नाहीं, इतकें त्याचें डोकें फिरून गेलें होतें. आपण सुटलों तर गणपतीभय्याच्या हातांत जी तरवार आहे ती आपलीच आहे, आणि त्याच तरवारीनें त्याला कंठस्नान घालून आपण येथून पोबारा करूं, अशी त्याला उमेद होती. व त्याप्रमाणें तो सुटण्याकरितां एकसारखी धडपड करीत होता. आणि अखेरीस त्याच्या शक्तीला यश येऊन त्यानें तें फेट्याचें बंधन तोडलें. त्याचें हें कृत्य चाललें असतां गणपतीभय्या त्याला तरवारीच्या टोकानें

एकसारखें टोंचीत होता. पण भय्यासाहेबांच्या हातांत सांपडलेली ही जिवंत शिकार ठार करण्याचें अपयश आपण आपल्याकडे घेऊं नये, अशा हेतूने गणपतीभय्या त्याचा शिरच्छेद करण्याला मागेंपुढें पहात होता. त्याचा फायदा घेऊन करीमबक्षानें अखेरीस आपली सुटका करून घेतली; व तो गणपतीभय्याच्या अंगाला बिलगून त्याच्या हातांतील तरवार एका हातानें घेण्याचा यत्न करूं लागला. गणपतीभय्या खंबीर होता. पण मोकळया झालेल्या करीमबक्षाच्या पुढें आपला किती टिकाव लागेल, याची त्याला शंका वाटत होती. व आतां कुमक येऊन पोहोंचली नाहीं, तर करीमबक्ष आपल्या हातांतून जाणार, असें वाटून तो अगदीं निराश झाला.

पण इतक्यांत दुरून पावलांचा आवाज ऐकूं येऊं लागला. आणि कांहीं जवान त्यांना सांगितलेल्या खुणेच्या जागीं येऊन गणपतीभय्याजवळ ठेपले. ते भय्यासाहेबांनीं मठांतून पाठविलेलेच शिपाई होते. ते आलेले पाहून गणपतीभय्याची काळजी दूर झाली. त्यांनीं आपल्याबरोबर आणलेल्या लोखंडी सांखळदंडांनीं आणि दोऱ्यांनीं करीमबक्षाला भक्कम बांधलें आणि नंतर त्याला उचलून घेऊन गणपतीभय्यासह ते सर्वजण माघारे परतले; व आपल्या ठिकाणावर आल्यानंतर त्यांना हुकूम झाला होता, त्याप्रमाणें त्यांनीं करीमबक्षाची गुप्तपणानें आणि बिनबोभाटपणानें सर्व व्यवस्था लावली, व त्याबद्दलची वर्दी भय्यासाहेबांकडे नेऊन पोंचविली.

त्या साऱ्या रात्रभर भय्यासाहेबांना मुळींच झोंप नव्हती. तरी पण नेहमींप्रमाणें उठून ते आपलें नित्यकर्म करीत बसले होते. इतक्यांत शंकराचार्यांचा भालदार स्वामी अभयानंदांकडे यांच्याकडे आला आणि स्वामींनीं आपल्याला ताबडतोब बोलाविलें आहे असें त्यानें त्यांना कळविलें. त्याबरोबर ते आचार्यांच्या दर्शनाला गेले. तेथें गेल्यावर शिंदे सरकारचे सरदार गोपाळभय्या यांचेकडून आचार्यांच्या नांवानें आलेली थैली आचार्यांनीं स्वामी अभयानंद यांच्यापुढें ठेविली. त्यांतील मजकूर स्वामी अभयानंद यांनीं वाचून पाहिला. नंतर आचार्य आणि स्वामी अभयानंद यांचें बराच वेळपर्यंत खलबत झालें व त्या थैलींतील मजकुराच्या संबंधानें पुढें काय करावयाचें याबद्दल दोघांचा मनसुबा ठरला व

त्याप्रमाणें आचार्यांनीं आपल्या कारभाऱ्यांना हुकूम सोडला. स्वामी अभयानंद यांनीं मठामध्यें जी एक पलटण तयार केली होती, त्या पलटणींतील बहुतेक लोकांना कारभाऱ्यांची ताकीद पोहोंचली व त्याप्रमाणें ते आपल्या तयारीला लागले. दुपारच्या सुमाराला स्वामींच्या मठांत रणशिंगें वाजूं लागलीं, आणि पलटणींतील सर्व लोक आपलीं हत्यारें घेऊन रांगेनें उभे राहिले. आणि जे घोडेस्वार होते, ते आपल्या घोडयांवर बसून कूच करण्याला तयार झाले. भय्यासाहेबहि आपल्या सरदारी बाण्याच्या पोषाखामध्यें एका उमद्या घोडयावर बसून आपल्या सर्व हत्यारांसह आपल्या पलटणींतील लोकांचे मुजरे घेत व त्यांची पाहणी करीत फिरूं लागले. सर्व तयारी झाल्यावर आचार्य स्वतः आले; त्यांनीं ती तयारी पाहिली. त्यांना परम संतोष झाला. त्यांनीं सर्वांना विजयश्रीचा आशीर्वाद दिला. तो आशीर्वाद शिरोभागीं धारण करून अभयानंद स्वामींनीं आपल्या पलटणीसह प्रयाण केलें.

गंगाबाईनें आपले आईबाप आणि आपल्या सासूबाई यांना झालेली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकल्याबरोबर भय्यासाहेबांना पाहण्याविषयीं सर्वांच्या मनामध्यें अतिशय उत्सुकता उत्पन्न झाली. त्याचप्रमाणें रात्रीं परत येतांना आपल्या मुलाबद्दल भय्यासाहेबांनीं गंगाबाईला प्रश्न विचारला असतां त्या वेळीं त्यांना जरी निराशाजनक उत्तर देणें भाग पडलें होतें, तरी आतां आपलें मूल आपल्याला देवानें सांपडवून दिलें आहे, ही आनंदाची बातमी सांगण्याकरितां व तें मूल आपल्या पतीला प्रत्यक्ष दाखविण्याकरितां गंगाबाईही अतिशय उत्कंठित झालेली होती; त्यामुळें ती सर्व मंडळी स्वामींच्या मठाकडे दर्शनासाठीं म्हणून निघाली. आपण योग्य संधि पाहून अभयानंदस्वामींच्या स्वरूपांतून कसें बाहेर पडावयाचें हें नक्की ठरविण्यांत येईपर्यंत गंगाबाईनें आपल्यापाशीं स्वामी अभयानंद या नात्यानेंच वागलें पाहिजे, ही जी सूचना रात्रीं परत येते वेळीं भय्यासाहेबांनीं गंगाबाईला दिलेली होती, ती सूचना तिनें आपल्या सर्व वडील माणसांना मोठ्या सविनय रीतीनें सांगितली होती व ती गोष्ट सर्वांना मान्यही झालेली होती. त्याप्रमाणें मठांत गेल्यावर स्वामी अभयानंद कोठें आहेत, त्यांचें दर्शन घेण्याकरितां आम्ही आलों आहों, अशी चौकशी करण्यांत आली. पण स्वामी मठांत नसून ते बाहेर गेले आहेत व त्यांची आज भेट होणार नाहीं, असें सांगण्यांत आलें. तेव्हां सर्वांची निराशा होऊन ती सर्व मंडळी माघारी आली.

मठांत रात्रभर सारे लोक सचिंत बसले होते. साऱ्या रात्रींत कोणालाही झोप लागली नाहीं. आचार्य मोठ्या काळजींत असल्यामुळें त्यांचाही डोळ्याला डोळा लागला नाहीं. बहुतेक सर्व जवान लोक स्वामी अभयानंद यांच्याबरोबर जरी कूच करून गेले होते, तरी मठांत पाठीमागें जे लोक राहिले होते, त्यांचे साऱ्या रात्रभर मठाच्या भोंवतीं चौकी-पहारे बसविण्यांत आलेले होते. मठांतील सर्व जडजवाहीर कोणाच्या हातीं लागूं नये, अशा रीतीनें दूर एका सुरक्षित ठिकाणीं नेऊन पुरून ठेवण्यांत आले होतें. चंद्रमौलीश्वराच्यापुढें साऱ्या रात्रभर स्वतः आचार्य प्रार्थना करीत बसले होते. अशा स्थितीमध्यें मठांतील लोकांनीं ती रात्र काढली. आणि उजाडल्यावर त्या मंडळींच्या जिवांत जीव आला. मग शंकराचार्यांना अशी खात्री वाटूं लागली कीं, ज्या अर्थी गेल्या रात्रीं करीमबक्षाच्या टोळीचा आपल्या मठावर छापा आला नाहीं, त्या अर्थी शिंद्यांचे सरदार, गोपाळभय्या व आपले सरदार स्वामी अभयानंद या दोघांनीं गोपाळभय्यांच्या योजनेप्रमाणें बहुतकरून करीमबक्षाच्या छावणीवर एकाच वेळीं दोन निरनिराळ्या बाजूंनीं अचानक हल्ला केला असला पाहिजे व त्यांत त्यांना यशही आलें असलें पाहिजे. परंतु तिकडून तशी नक्की कांहीं खबर बराच वेळ येईना; म्हणून आचार्य चिंताक्रांत होऊन बसले होते. व त्यांनीं आपले कांहीं हलकारेही तिकडील बातमी आणण्याकरितां पुढें पाठविले होते.

अखेरीस दोन प्रहरच्या सुमारास उत्तरच्या बाजूनें धुळीचे लोट दिसूं लागले. त्यावरून मठांतील लोकांचें लक्ष तिकडे वेधलें. इतक्यांत आचार्यांनीं पाठविलेले हलकारे विजयाची बातमी घेऊन ती आचार्यांना सांगण्याकरितां धांवत धांवत पुढें आले. आचार्यांना ही आनंदाची बातमी कळतांच त्यांना मोठें समाधान वाटलें व गोपाळभय्या आणि स्वामी अभयानंद यांच्या स्वागताकरितां आणि आदरातिथ्याकरितां कडेकोट बंदोबस्त करण्याविषयीं त्यांनीं कारभाऱ्यांना सांगितलें. गोपाळभय्या आणि भय्यासाहेब झांशीवाले, हे दोघे घोडयावर बसून सर्वांच्या अग्रभागीं चालले होते व करीमबक्षाच्या टोळींतील कैद करून आणलेल्या चोरांना मध्यभागीं घालून त्यांच्या पाठीमागून लछमनसिंग आपल्या हाताखालच्या व शंकराचार्यांच्या लष्करासह मागाहून मोठ्या बंदोबस्तानें येत होता. वाटेनें येतांना भय्यासाहेबांनीं आपली सर्व हकीगत गोपाळभय्यांना सांगितली व आचार्यांचें मन न दुखवितां त्यांच्या संमतीनें या संन्याशाच्या स्वरूपांतून कसें

बाहेर पडावें याविषयीं त्यांनीं गोपाळभय्यांचा सल्ला विचारला. पण हें बोलणें चाललें आहे, तों त्यांच्या स्वाऱ्या आपल्या कैद्यांसह आणि लष्करासह मठाच्या जवळ येऊन पोहोंचल्या. यात्रेंतील हजारों लोकांची गर्दी तो देखावा पहाण्यासाठीं तेथें जमली. आचार्यांनीं मठामध्यें शिंदे-सरकारच्या व आपल्या अशा दोघांही सरदारांचें बहुमानपूर्वक स्वागत केलें. पुढें सर्वांचीं भोजनें वगैरे झाल्यावर भय्या-साहेब हजर असतांना त्यांच्या देखतच आचार्यांच्यापुढें गोपाळभय्यांनीं आदल्या दिवशींच्या रात्रीच्या छाप्यामध्यें कसें काय झालें याबद्दलची सविस्तर हकीगत सांगितली व स्वामी अभयानंद यांनीं सदर प्रसंगीं दाखविलेल्या शौर्याबद्दल आणि युद्धकौशल्याबद्दल त्यांनीं त्यांची फारच तारीफ केली. आणि ते अखेरीस म्हणाले: "या मोहिमेंत श्रींच्या कृपाप्रसादानेंच आम्हांला यश आलें, आणि आमच्या शिंदेसरकारांच्या इच्छेप्रमाणें या करीमबक्षाच्या टोळीचा आज उच्छेद झाला. कारण त्यांच्या टोळींतील बहुतेक चोरांना आम्हीं कैद केलें आहे व त्यांचा खजिनाही आमच्या हातीं लागला आहे. फक्त वाईट वाटण्यासारखी एकच गोष्ट आहे; आणि ती ही कीं, इतका सगळा खटाटोप करून या टोळीचा मुख्य जो करीमबक्ष, तो आमच्या हातीं सांपडला नाहीं. त्यामुळें माझ्या मनाला मोठी रुखरुख लागली आहे."

हें बोलणें ऐकून भय्यासाहेब थोडे पुढें सरसावले व स्वामींना आणि गोपाळ-भय्यांना अत्यंत नम्रतापूर्वक प्रणाम करून ते म्हणाले, "महाराज, आपल्याला ही करीमबक्षाबद्दलची रुखरुख लागण्याचें कारण नाहीं! तो या क्षणीं आपल्या कैदेमध्यें आहे!"

"काय म्हणतां!" गोपाळभय्या आश्चर्यानें चकित होऊन विचारूं लागले, "करीमबक्ष तुमच्या कैदेंत आहे? तो कोठें आहे? त्याला तुम्ही कसा कैद केलात? तुमच्या शौर्याबद्दल तर आतां शिकस्तच झाली. या तुमच्या कामगिरीबद्दल कोण कसें उतराई होणार? शिंदेसरकारकडे तर मी तुमच्याबद्दल शिफारस करीनच! पण श्रींच्या चरणींही माझी अशी विनंति आहे कीं, श्रींनींही यांना कांहीं तरी योग्य पारितोषिक द्यावें!"

"गोपाळभय्या," आचार्यांनीं उत्तर दिलें, "तुम्ही सांगाल तें पारितोषिक देण्याला मी तयार आहें!"

स्वामींचें असें अभिवचन मिळाल्यानंतर गोपाळभय्यांच्या विनंतीप्रमाणें आपण करीमबक्षाला कसें आणि कोठें कैद केलें याबद्दची सर्व हकीगत भय्यासाहेबांनीं सांगितली. व खरोखर संन्यास न घेतला असतां संन्याशाचा वेष घेतल्याबद्दल आपल्या हातून जो दोष घडला आणि जी वंचना झाली, त्याबद्दल आचार्यांनीं आपल्याला क्षमा करावी, अशी भय्यासाहेबांनीं श्रींच्या चरणांवर मस्तक ठेवून प्रार्थना केली. भय्यासाहेबांच्या चरित्रांतील ते निरनिराळे हृदयद्रावक प्रसंग ऐकून श्रींच्या अंतःकरणांत करुणा आणि नेत्रांत अश्रु उत्पन्न झाले. पूर्वीची ज्ञानेश्वर-महाराजांच्या वडिलांची वगैरे याच्याहीपुढें गेलेलीं उदाहरणें लक्षांत आणून अशा स्थितीमध्यें भय्यासाहेबांनीं फिरून आपला पूर्वीचा गृहस्थाश्रम स्वीकारण्याला कोणतीही हरकत नाहीं, असा श्रींनीं आपला अभिप्राय दिला. भय्यासाहेबांची पत्नी गंगाबाई ज्या मुक्कामावर रहात होती, तेथून तिला बोलावून आणण्याकरितां मनुष्य पाठविण्यासाठीं त्यांनीं आपल्या चोपदाराला सांगितलें. परंतु स्वामी अभयानंद यांना भेटण्याकरितां बरीच बायका व पुरुष मंडळी मठांत आलेली आहेत, असा उलट निरोप सांगण्यांत आला; त्यावरून त्या सर्वांना आंत घेऊन येण्याबद्दल आचार्यांनीं सांगितलें. त्याप्रमाणें आपल्या कडेवर मुलगा घेतलेल्या गंगाबाई, भय्यासाहेबांच्या मातोश्री, त्यांचे कारभारी, गंगाबाईचे वडील रामचंद्रराव, त्यांच्या पत्नी, वगैरे मंडळी आंत आली, व त्यांनीं प्रथमतः स्वामींना प्रणिपात केला व नंतर ते एकमेकांकडे पाहूं लागले, तों तेथें सर्वच मंडळी एकमेकांच्या ओळखीची! भय्यासाहेबांच्या आईनें भय्यासाहेबाला आपल्या पोटाशीं धरून त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें आणि आपल्या अश्रूंनीं त्याच्या मस्तकावर सिंचन केलें. गंगाबाईनें आज आपलें हें बाळ देवीच्या कृपेनें आपल्याला मिळालें म्हणून भय्यासाहेबांना सांगितलें. त्याच्या तोंडाकडे नुसतें हंसून पाहून भय्यासाहेब आपले श्वशुर आणि सासूबाई यांना नमस्कार करण्याकरितां त्यांच्याजवळ गेले. गोपाळभय्यांनीं भय्यासाहेबांच्या पराक्रमाबद्दल त्यांच्या आईपाशीं वर्णन करून सर्वांच्या गांठी पडल्याबद्दल आनंद व्यक्त केला. आणि शेवटीं आचार्यांनीं सर्वांना आशीर्वाद देऊन, गंगाबाई आणि भय्यासाहेब यांचा स्वहस्तानें एकमेकांच्या हातांत हात घालून देऊन दोघांनाही गृहस्थाश्रमानें राहण्याची अनुज्ञा दिली!

× × ×

गणपतीभय्या गंगाबाईपाशीं आपल्या बहिणीप्रमाणें वागला, याबद्दल त्यालाही आपल्या भावाप्रमाणें वागविण्याचें गंगाबाईनें आपल्या नवऱ्याकडून त्याला अभिवचन देवविलें. कमळाबाई गंगाबाईच्या आणि भय्यासाहेबांच्या विरुद्ध या उप्पर चहाड्या सांगून भय्यासाहेबांचें मन कलुषित करूं शकली असती, ही गोष्ट शक्य नव्हती. तिला पाहिजे होती ती शालजोडी गंगाबाईला आणि भय्यासाहेबांना दोघांनाही जरी अनेक कारणांसाठीं प्रिय होती, तरी कमळाबाईच्या इच्छेप्रमाणें ती तिला भय्यासाहेबांनीं देऊन टाकिली. जम्नामाईचा नवरा किसनप्रसाद याला शोधून शोधून जम्नामाई कंटाळून आपल्या घरीं जाऊन बसली होती. तिचा नवरा किसनप्रसाद हा करीमबक्षाच्या टोळींत जरी कांहीं दिवस जाऊन सामील झाला होता, तरी खरोखर तो गोपाळभय्यांचा हेर होता. करीमबक्षाच्या छावणींतील बातमी आपल्याला कळण्यासाठीं मुद्दाम गोपाळभय्यांनीं त्याला तेथें पाठविलें होतें. तेथील सगळी खडान्खडा माहिती गोपाळभय्यांना पुरविण्याचें त्याचें काम झाल्यावर तो घरीं जाऊन त्याची आणि जम्नामाईची याच्यापूर्वीं कधींच भेट होऊन तीं दोघें सागर येथील सरोवराच्या कांठच्या आपल्या मंदिरामध्यें पुष्कळ दिवस सुखानें राहूं लागलीं होतीं !

समाप्त

किंमत साडेतीन रुपये

कै. शि. म. परांजपे यांचें

वाङ्मय

मराठ्यांच्या लढायांचा इतिहास

गोविंदाची गोष्ट

स्वातंत्र्यासाठी आत्मयज्ञ

टायरोलची स्वातंत्र्यकथा

ग्रीस देश स्वतंत्र कसा झाला.

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २